











Founded by
CHAKRAPANI
B. NAGI REDDI
Editor
VISWAM
Editorial Advisors
RUSKIN BOND
MANOJ DAS
Designing & Technical Advisor
UTTAM
Publisher
B. VISWANATHA REDDI
Director Marketing
V. MADHUSUDHAN



HEAD OFFICE
Chandamama Buildings
Vadapalani, Chennai-600 026
Tel: 4841778 Fax: 4835298

OTHER OFFICES

BHUBANESWAR
116-B, B.D.A. Duplex House
Baramunda
Bhubaneswar-751 003
Orissa. Phone: 55 0534

DELHI
Flat No. 415, 4 th Floor
Pratap Bhawan
5, Bahadurshag Zafar Marg
New Delhi-110 002.
Phone: 2270199

MUMBAI
2/8 Naaz Buildings
Lamington Road.
Mumbai-400 004
Phone: 3889763-3886324-3877110
Fax: 3889670







संस्थापक
**बी.नागी रेड्डी, चक्रपाणी**


# आशेचा समय

सध्यां जगांत सगळीकडे आशा नि अपेक्षा यांची कंपने जाणवत आहेत. आपण एका फार महत्वपूर्ण कालखंडामधून जात आहोत. एका नव्या शतकाचीच नव्हे तर एका सहस्त्रकाची सुरवात होणार आहे. साहजिकच, आपण सर्वजण एका आगळ्या उत्साहाने भारलो आहोत.

आता इसवी सन २००० हे वर्ष या शतकाचे शेवटचे मानायचे की नव्या शतकाचे पहिले वर्ष मानायचे, याबद्दल अद्याप वाद सुरुं आहेच.

कांही कां असेना, हे वर्ष या दोन्ही शतकांमधला पूल आहे हे मात्र खरं!

नव्या शतकाकडे आणि नव्या सहस्त्रकाकडे आपण आशेने पहात आहोत याचा कांही निराळा अर्थ आहे कां? अर्थातच आहे. ''नव्या शतकांत जास्त समृद्ध व चांगल्या जीवनाबद्दलची आशा यावेळेस आपल्या मनांत पालवली आहे. आपला भविष्यकाल जास्त उज्ज्वल असावा ही अपेक्षा आपण बाळगून आहोत. विसाव्या शतकांत सर्वांनी खूप दुःखे भोगली आहेत. दोन जागतिक महायुद्धें, भारताची फाळणी यांसारखी मानवनिर्मित दुःखे होती, त्याचबरोबर भूकंप, वादळें, महापूर यासारख्या नैसर्गिक आपत्तीही होत्या. नुकतेच ओरिसांत झालेले झंझावाती महावादळ तुम्ही पाहिले आहेच.

परंतु मनुष्यजातीला दीपस्तंभासारखे अनेक थोर, आदर्श विचार मिळत गेले. सुस्थिर राष्ट्रसंघ व अणुबॉंबवर बंदी आणण्याची इच्छा करणारे आदर्शवादी यासारख्या कित्येक उत्तम घटना मानवास उपकारक ठरल्या. अस्मानी संकटांशी सामना देणाऱ्या दुःखितांना, जगाच्या कानाकोपऱ्यांतून सहानुभूति व इतप्रकारची मदत लगोलग मिळत गेली.

आगामी काळांत आपण सर्वजण एकत्र होऊन, गुण्यागोविंदाने, चांगुलपणानें व समंजसपणे राहाण्याचा प्रयत्न करुं या!



# चान्दोबा




इंग्रजी व संस्कृत सह एकाच वेळी प्रत्येकाशी किंवा प्रत्येकीशी त्यांच्या मातृभाषेतून बोलत, अर्धशतकापेक्षा अधिक वर्षांचा काळ चन्दामामा प्रकाशनाने भारतातील बालकांची, एक इन्द्रधनुषी पूल बनून सेवा केली आहे.

छोटे वाचक व त्यांच्या पालकांनी दोघांनी वाचून वाचावा केलेला एक अद्वितीय प्रयोग.

नवीन शतकाच्या व नवीन सहस्रकाच्या आगमनाबरोबर तुमचं मासिक नवीन क्षितिजांकडे निर्देश करत आहे.

भारतात सर्वांना अतिप्रिय असे गोष्टी सांगणारे दोघे जण रस्किन बॉण्ड व श्री. मनोज दास यांचं संपादन -

- सहयोगाने म्हणून आपले प्रकाशन तुमची भेट करून देत आहे.

**अन् आता चान्दोबाच्या वैभवशाली अनुक्रमणिकेवर एक दृष्टी टाकून पहा -**




- **भारताची वीरगाथा**

  जगात अनेक महान संस्कृती नांदल्या पण हजारो वर्षांपर्यंत अखंड चालत राहिलेल्या संस्कृती व सुसंस्कृतता तुम्हाला भारताशिवाय अन्य कोठेही पहायला मिळणार नाहीत. हा जोरदार प्रवाह कशामुळे टिकून राहिला? भूतकाळातील व्यक्ती व दंतकथा यांच्याद्वारे हे कोडे सोडवले जाईल.

- **भारत: तेंव्हा व आता**

  आजच्या आधुनिक 'गोहाटी' ला प्राचीन काळी 'प्राग्ज्योतिषपूर' असे का म्हणत असत? त्याचप्रमाणे असणाऱ्या लहान लहान बेटांचे मुंबई हे गाव आजच्या एका प्रमुख शहरात कसे रूपांतरित झाले? संपूर्ण जगात सर्वात जास्त आयुष्य लाभलेली शहरे, सर्वात जास्त संख्येने केवळ भारतातच आहेत. अशा स्थळांबद्दलच्या दंतकथा व इतिहास व त्यांची आजची परिस्थिती तुम्हाला माहीत होईल.

- **जास्त चांगली व जास्त सुखी व्यक्ती बनत रहा**

  इथे तुम्हाला जीवनात केवळ प्रिय बनण्यासाठीच नव्हे, तर तुमच्या बाह्यपरिस्थितीशी - मग ती कितीही खडतर असो - जुळवून घेण्याची शक्ती मिळण्यासाठी काही व्यावहारिक सूचना मिळतील.

- **आजचे जग**

  घटनांबाबत घडणाऱ्या काही घटनांबाबत अंतर्दृष्टी

- **न सुटलेली कोडी**

  यती किंवा हिममानव अस्तित्वात आहे का? बर्मुडा त्रिकोणात जहाजे अदृश्य कशी होतात? जगाला कोड्यात टाकणाऱ्या कोड्यांवर प्रकाश.

- **चालू महिन्याची प्रमुख व्यकती**

  चालू महिन्यात जन्मलेल्या एका विशेष व्यक्तीचे जीवन व कृति.

- **भारताचा शोध**

  भारताची संस्कृती, वाङ्मय व वारसा यावर प्रश्न. आणि साहित्यात वर्णित काही अर्थपूर्ण बौद्धिक व शैक्षणिक गोष्टी - मधल्या जागा भरण्यासाठी हे सर्व आणि शिवाय 'जास्त चांगल्या इंग्लिशच्या दिशेने' 'प्रकाशातील बातम्या', 'अगणित सुभाषिताने' 'व' 'शुभ प्रतीचे कुतूहल'.

- **चान्दोबा 2000**

  तुमच्या आयुष्याच्या सोबती व क्षितिजाकडे नेणारा वाटाड्या!





## THANK YOU THE FOURTH ESTATE!

The news of the reappearance of *Chandamama* was no doubt a delight for the young and that was only expected, but what gave us an added reassurance was the warm coverage of the event by the media. Several major newspapers, in English and other languages, carried the good tide to their readers and the BBC and the Doordarshan Metro (*Aaj Tak* of TV Today) telecast interviews with the publishers highlighting the spirit behind the publication–which is to familiarise the young with the different aspects of the heritage of India through tales, legends, quizzes, and other features, while inspiring them to enter the new millennium with a faith in the future.

We thank the media and wish them a bon voyage into the new era along with *Chandamama*.

Simultaneously, we wish the same to our numerous readers and would-be readers, writers, distributors, agents, and other collaborators and well-wishers who reiterated their support to the publication as soon as the news of its re-launch reached them.

— Publisher

## MORE FOR OUR READERS

We are overwhelmed by the welcome extended by our readers on hearing about the relaunching of their favourite magazine and by their reaction on seeing the first issue for December 1999.



We are extremely grateful for their words of praise, unequivocal support, encouragement, and suggestions.



Among them are puzzles, quizzes, painting contests, and essay-writing competitions which will tap their talents. All these are being planned.



Our subsequent issues will carry details. Our readers may watch out for the announcements. Meanwhile, keep writing to us.

—Editor

# खास बातम्या

## समुद्रांत बुडालेली द्वारका

गुजरातेतील द्वारका ही नगरी श्रीकृष्णाने वसवली होती. त्याच्या निर्वाणानंतर ती लौकरच समुद्रांत बुडाली अशी माहिती पुराणांत आहे.

भारतीय सागरी पुराणवस्तुसंशोधन खात्याचे महर्षी, डॉ. आर.एस. राव यांनी अनेक वर्षे या पुराणकालीन जागेत उत्खनन केलेले आहे. त्यांच्या मते, ही श्रीकृष्णाची नगरी, कुशस्थळी या प्राचीन बेटाच्या भग्न अवशेषांच्यावर ३७०० वर्षांपूर्वी वसवली होती. पण शंभर वर्षांनंतर



समुद्राने ती गिळंकृत केली. तरीही हे अरिष्ट येण्यापूर्वी, एक आठवडा अगोदरच, श्रीकृष्णाने सर्व नगरवासीयांचें स्थलांतर केलेले होते. द्वारका नगरी बांधताना श्रीकृष्णाने जमीन सुधारण्याचे जे तंत्रशास्त्र वापरले होते ते आजही प्रचलित आहे.

द्वारकेचं उत्खनन निधीच्या अभावी सध्यां तहकूब केलेलं आहे. लौकरच या संपूर्ण प्रकल्पावर बीबीसी एक लघुपट तयार करणार आहे.

## वयोवृद्ध पथिक

धारीर हा जॉर्डनचा १२८ वर्षे वयाचा नागरिक सगळीकडे चालत फिरत जाई. शेवटपर्यंत तो चालू शकत होता.

मात्र त्याच्या तरुणपणी जॉर्डनचा संस्थापक किंग अब्दुल्ला याच्याबरोबर तो घोड्यांच्या व उंटांच्या शर्यतीत भाग घेत असे. त्याला गोड पदार्थ व चमचमीत भोजन अतिशय आवडे पण



बरेच दिवस तो उपवासही नेमाने करत असे. त्याच्या पश्चात त्याच्या घरांत १२८ नातवंडे व पंतवंडे आहेत.

## धरतीवर चाललेला सर्वांत मोठा प्राणी

"खरंच आश्चर्य वाटण्यासारखंच आहे! पृथ्वीच्या पाठीवर कधीकाळी चालणारा सर्वांत मोठा प्राणी आहे हा - "ओक्लाहोमा युनिव्हर्सिटीचे तज्ज्ञ मि. रिचर्ड सिफेली म्हणतात, त्यांच्या नेतृत्वाखाली संशोधन करणाऱ्या तुकडीला, आग्नेय ओक्लाहोमामध्यें डायनासॉरचे अवशेष सांपडले. या अवशेषांवरून अंदाज बांधता आला कीं, जिवंतपणी या प्राण्याचे वजन ६० टन व उंची ६० फूट होती, आणि सर्वांत जास्त लांबीची त्याची मान होती अशी माहिती अधिकृतरित्या नोंदली



गेली आहे. म्हणजे हल्लींच्या अनेकमजली, उंच इमारतींतल्या सहाव्या मजल्यावरच्या एखाद्या खिडकीत, तो जमिनीवर उभा राहून सहज डोकावूं शकला असता. त्याचं नांव 'सौरोपोसायडन' असं पडलं आहे. त्याचा अर्थ 'जो चालायला लागला कीं पृथ्वी हलते असा देवसदृश' असा होतो.

वेताळाच्या गोष्टी



# प्रजाशिक्षण

निश्चयाचा पक्का विक्रमार्क आडाजवळ पुन्हा परत आला. त्याने झाडावरुन प्रेत खाली काढले आणि आपल्या खांद्यावर घेतले. नंतर तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ म्हणाला. "राजन् ! मध्यरात्रींच्या यावेळी स्मशानात भुतेंखेते, विषारी सर्प अगदीं मुक्तपणें हिंडत असतात. हे ठाऊक असूनदेखील तू आपला जीव कां धोक्यांत घालतो आहेस? असं कोणतं लक्ष्य आहे की ते साधण्यासाठीं तू हा धोका पत्करतो आहेस? आपले ध्येय साधण्यासाठी तू जो मार्ग स्वीकारला आहेत तो योग्य आहे की नाही याचा तू विचार केला आहेस कां? कारण कधीकधी हुशार व्यक्तीसुद्धां आपण करतो आहे ते ठीकच आहे आणि त्यांच्या प्रयत्नांतून त्यांचे निश्चितच कल्याण होणार आहे अशा भ्रमांत राहातात. गैरसमजुतीमुळें तुला सावध करण्यासाठी म्हणून जयचंद्र राजाची गोष्ट सांगतो त्याने तुझा थकवाही दूर होईल. तेव्हां नीट ऐक." हे सांगून वेताळ विक्रमार्काला राजा जयचंद्राची गोष्ट सांगू लागला.

"महेन्द्रगिरीचा राजा जयचंद्र सर्व शास्त्रांत पारंगत व एक कुशल राज्यकर्ता होता. प्रजा त्याच्यावर अगदी खूष होती.



एकदा राजा वेष बदलून आपला मंत्री धीरवर्मा याच्याबरोबर नगरांत फिरत होता. एका घरांतून जोरजोरांत आवाज येत होता. ते दोघे त्या घरांत गेले.

त्या घरांत गौरी नांवाची एक मुलगी खूप दिवस आजारी होती. तिला बराच ताप होता. त्या दिवशी सण होता म्हणून घरांतल्या मंडळींनी ताप असतानाही तिला अट्टाहासाने आंघोळ घातली. तेव्हां ताप आणखी वाढला. रोग्याला तपासायला वैद्यबुवांना बोलावणे पाठवले. ताप वाढण्याचे कारण वैद्यांना कळताच त्यांनी घरांतल्या मंडळींवर रागाने तोंड सोडले.

त्यावर घरातला म्हातारा मालक जोराने ओरडून वैद्याला म्हणाला – मुलीच्या नशिबांत जिवंत राहाणे असेल तर राहील. पण जर मरण लिहीलेलं असेल तर ती मरेल. पण परंपरेनुसार जे आम्ही करायला हवं, ते आम्ही जरूर करणारच."

वैद्यांनी निमूटपणे रोग्याला औषध दिले व थोड्या वेळानंतर म्हणाले, "सुदैवाने आता धोका टळला आहे."

म्हातारा पुन्हां म्हणाला, "धोका टळला याचं कारण तिचं भाग्य आहे, तुमच औषध नव्हे."

हे सर्व पाहून जयचंद्र खूपच चिडला आणि त्याला वाईट वाटले. राजवाड्यांत परतल्यावर तो मंत्र्याला म्हणाला, "मंत्रीजी, आपल्या प्रजेंत किती मूर्खपणा आणि गाढ अंधविश्वास भरलाय. याचं मूळ उपटून काढण्यासाठीं आपण लौकरच कांही उपाययोजना केली पाहिजे.

मंत्री धीरवर्माने जरा विचार करून सांगितले, "आधुनिक शिक्षणाच्या प्रसारानेच हे अज्ञान नाहीसे होऊं शकेल. यासाठी आपण जर कांही कायदे बनवलेत, तर ते अमलात आणता येतील."

राजा जयचंद्राने मंत्र्याच्या सल्ल्यानुसार कांही नवे कायदे बनवले व त्यांची अंमलबजावणी करण्याचा हुकूम दिला. हे नियम देशांतल्या रितीरिवाज व परंपराविरुद्ध होते. म्हणून प्रजेला ते पसंत पडले नाहीत. लोकांनी आरोप केला कीं हजारो वर्षांची परंपरा व वहिवाट मोडण्याची राजाची इच्छा आहे. सर्व लोकांनी मिळून विनायक नावाच्या एका व्यक्तीस आपला प्रतिनिधी निवडला व विचारविनिमय करण्यासाठीं राजाकडे पाठवला.

विनायकने राजाला सांगितले, "महाराज, पिढ्यानापिढ्या चालू असलेली परंपरा आपण नाहींशी करूं पाहात आहात. पण ती आपल्या देशाची संस्कृति आहे. याचा अर्थ असा होतो कीं आपण संस्कृतिविरोधक आहात. जर आपण हे कायदे लौकर रद्द केले नाहीत तर प्रजा बंड करून उठेल आणि कुणीही आपल्याला साथ देणार नाही."



जरी विनायक हे सर्व मोठ्या विनम्र भावाने बोलत होता, तरी त्याच्या स्वरांत धोक्याची सूचना होती. राजाने मनोमन विचार केला, "एक सामान्य नागरिकाचे हे धाडस, कीं मला बंडाची धोक्याची सूचना देऊं शकतो हा !" राजाच्या चेहऱ्यावरचा संताप समजत होता. त्याच्या मनांत विचार आला की या विनायकाला अटक करुन तुरुंगात डांबून ठेवावे.

मंत्र्यांनी राजाच्या चेहऱ्यावरुन त्याचे विचार ओळखले. राजाला शांत राहण्याची खूण करीत तो म्हणाला, "महाराज, मूर्ख व अंधविश्वास असणाऱ्यांबरोबर आपण नाही जिंकू शकणार. एकवेळ मृगजळांतले पाणी पिता येईल, पण मूर्खपणा दूर करणे अशक्य आहे. ब्रह्मदेवाचासुद्धां पराभव होतो मूर्खांपुढे ! विनायकाला आता अटकेंत टाकले तर त्याचा अर्थ होईल की प्रजेला आपणाच बंड करण्यासाठी भडकवतो आहोत."

"मग काय जाणूनबुजून आपणही मूर्ख बनून अडाण्यासारखं वागायचं? अंधविश्वासामुळें बळी जाणाऱ्या निर्दोष, अश्राप मुलांना नि स्त्रियांना मरूं द्यायचं?" राजा पोटतिडीकेने बोलला.

धीरवर्मा विचारांत पडला. नंतर विनायकाला बोलावून म्हणाला, "बघ, आम्ही नवे कायदे कांही काळ स्थगित करतो आहोत. तोपर्यंत तू चांगला कायद्याचा अभ्यास कर. त्यानंतरही जर तुला असं वाटलं की हे कायदे प्रजेच्या हिताचे नाहीत तर ते रद्द केले जातील. या विचाराशी तूं सहमत आहेस कां?"

विनायकने ही गोष्ट मानली. तो पांच वर्षांपर्यंत मनःपूर्वक अभ्यास करत होता. शिक्षण पूर्ण झाल्यावर तो राजाला भेटला. राजाने विचारलं, "सांग, आता तुझा काय विचार आहे?" विनायकने सांगितलं, "महाराज, खरंच माझा विचार बदलला आहे. जोपर्यंत प्रजेला या सडक्या रितीरिवाजांच्या दलदलींतून बाहेर काढता येणार नाही, तोपर्यंत आपल्या देशाची उन्नति अशक्य आहे.

"फार छान ! आता कायद्याचं पालन आपल्या प्रजेकडून करवून घेणं हे तुझं काम राहील" राजा त्याला विश्वासात घेऊन म्हणाला.

"परंतु महाराज, प्रजेकडून या कायद्यांचं पालन करवून घेण्यांत मला कोणता फायदा?" विनायकने प्रश्न केला. 'दरमहा तुला हजार मोहरा दिल्या जातील.' राजा म्हणाला, "आणि राजकर्मचारीपद देखील!"

'महाराज, मी प्रजेचा प्रतिनिधी आहे, म्हणून त्यासाठीं मला हजार मोहरा मिळतील. पण आपणसुद्धां प्रजेचे प्रतिनिधी आहात. मला कळेल कां की आपल्याला दरमहा किती मोहरा





मिळतात?'' विनायकने धिटाईने विचारले.

राजा जयचंद्रास राग आला. त्याने करड्या स्वरांत म्हटले, ''आमचे पूर्वज वर्षानुवर्षे या देशावर राज्य करीत आले आहेत. माझी तुझ्याशी बरोबरी करण्याचा प्रश्नच येत नाही.''

विनायकने हंसून म्हटले, 'आपण राजवंशात जन्म घेतला आहे म्हणून राजा झालात. म्हणजे एका मूढ परंपरेने आपल्याला राजा बनवलं. पण मला तर प्रजेने आपला प्रतिनिधी नेमला आहे. जुन्या परंपराच्यांवर बहिष्कार टाकण्यासाठी तर आपण कायदे तयार केलेत. याचा अर्थ असा झाला की आपल्या देशांत राजा होण्याच्या परंपरेचादेखील शेवट झाला पाहिजे.'' विनायकचा हा निर्णायक तर्क ऐकून राजाचा चेहरा एकदम उतरला. काय उत्तर द्यावे ते राजाला समजेना. म्हणून त्याने तांतडीने मंत्री धीरवर्मा यांना बोलावून घेतले.

धीरवर्माने विनायकची सारी चर्चा ऐकल्यानंतर त्याला म्हटले, ''तुझे म्हणणे ठीक आहे पण यांत प्रजेचे मन काय आहे ते कळणें आवश्यक आहे. जर प्रजामत तुझ्या बाजूने असले तर महाराज वानप्रस्थ स्वीकारतील व सिंहासन तुझ्यावर सोंपवतील. मात्र एक अट आहे, अट इतकीच की जेव्हां देशांतली सारी प्रजा शिक्षित होईल, तेव्हाच त्यांचं मत विचारलं जावं.'' ''माझ्या मते हे कधीच शक्य होणार नाही. मी तर कर्मचारीपद स्वीकारणेंच पसंत करीन'' इतकं म्हणून विनायक निघून गेला.

विनायक जाताच राजाने मंत्र्यास आश्चर्याने व रागाने विचारले, ''तूं विनायकला असं कां सांगितलंस की मी सिंहासन त्याच्यावर सोंपवीन म्हणून?'' ''महाराज, क्षमा करा, माझ्या म्हणण्यांत एक मोठं राजनैतिक रहस्य आहे. जोपर्यंत प्रजा अशिक्षित आहे, मूढ आहे, परंपरावादी आहे, जुन्या रिवाजांवर अंधश्रद्धा ठेवते, तोपर्यंत राजवंशातल्या व्यक्तिलाच प्रजा राजा मानेल, एखाद्या सामान्य व्यक्तिला नाही. कारण ही सुद्धां एक जुनी परंपरा आहे. विनायकच्या सांगण्यावरुन प्रजा त्याचे ऐकणार नाही. म्हणून मी जाणूनबुजून ही गोष्ट काढली. आणखी एक अटपण ठेवली की ती कधीच पूर्ण होणार नाही. त्यासाठी राज्यपरंपरा किंवा आपल्या विरोधांत जाण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही.'' मंत्रीनी आपल्या रहस्यपूर्ण उत्तराचा खुलासा केला. जरी मंत्र्याच्या बोलण्यावरुन स्पष्ट दिसत होतं कीं राजाच्या सिंहासनाला प्रजेकडून काही एक धोका नाही, तरी राजा जरा हताश झाला. थोडा वेळ मौन पाळून च गंभीर चेहरा करुन तिथून निघून गेला. वेताळाने ही गोष्ट सांगितल्यावर प्रश्न केला, 'राजन, प्रजेने विनायकला आपला प्रतिनिधी नेमला. शिक्षित झाल्यानंतर तो



महत्त्वाकांक्षी बनला आणि बुद्धीच्या बळावर त्याने राजाच्या सिंहासनावर बसण्याचा प्रयत्न केला. परंतु शेवटी राजकर्मचारीच होऊन राहाण्याच्या निर्णय कां घेतला? दुसरा प्रश्न हा, कीं जेव्हां मंत्र्यांनी वेळ मारुन नेण्यासाठी विनायकवर राजाच्यातर्फे राजसिंहासन सोंपवण्याचे आश्वासन दिले तेव्हां राजा त्याच्यावर नाराज झाला. कारण यामुळें सिंहासन हातातून निसटण्याची भिती होती. यावर सर्वांनी राजाला आश्वासन दिले कीं जोपर्यंत प्रजा मूर्ख, परंपरावादी व अंधश्रद्धाळू आहे, तोपर्यंत त्यांच्या राज्याला मुळींच धोका नाही. यावर तर राजा प्रसन्न व्हायला हवा होता. परंतु तो हताश झाला आणि गंभीरहोऊन उठून निघून गेला. असं कां? माझ्या या प्रश्नाचं उत्तर माहीत असूनही गप्प बसलास तर तुझ्या डोक्याचे तुकडे-तुकडे होतील.

विक्रमार्काने वेताळाचा संदेह दूर करण्याच्या उद्देशाने म्हटले, ''कुणी कितीही शिकलेला कां असेना, पण स्वार्थ कांही कुणाला सुटलेला नाही. बौद्धिक विकास झाला की महत्त्वाकांक्षा जास्तच वाढत जाते. याच कारणामुळें लिहावाचायला शिकताच राजसिंहासनावर बसण्याची इच्छा करुं लागला. पण अटीनुसार प्रत्येक नागरिक शिक्षित झाला की राज्यांत कितीतरी विनायक होतील. आणि सगळे राजसिंहासनाचे स्वप्न पाहूं लागतील. राजा होण्यासाठी सर्वांमधे स्पर्धा लागेल. या स्पर्धेत त्याला भाग घ्यायचा नव्हता. कारण त्यांत तोच जिंकेल अशी कांही खात्री नव्हती. त्यामुळें त्याने राजकर्मचारीच बनून राहण्यांत आपले हित साधले. स्वार्थ हेच याचं मूळ आहे.''

दुसऱ्या शंकेच्या समाधानासाठी राजा विक्रमार्काने सांगितलं, ''आपल्या राज्यांतील जुन्या परंपरा, अंधश्रद्धांना मूढ पद्धती समजून राजा त्या रद्द करणार होता. पण जेव्हां त्याच्या हे लक्षांत आलं कीं राजाची वंशपरंपरा ही देखील एक मूर्ख परंपरा आहे, तेव्हां तो गंभीर झाला. कारण परंपरा नष्ट झाल्या तर राजसिंहासनाचे अस्तित्वसुद्धां धोक्यांत येऊं शकतं. म्हणून नाईलाजाने त्याला आपल्या प्रजेला पूर्वीच्याच आचारपद्धतींत सोडून द्यायला हवं आणि ते त्याला पटत नव्हतं ! म्हणून दुःखी होऊन तो गंभीर मुद्रेने तिथून उठून निघून गेला.''

राजाचा मौनभंग करण्यांत सफल झाल्यामुळें मौनभंग वेताळ शवासहित अदृश्य झाला व पुन्हां झाडावर जाऊन बसला.

**कल्पित (मूळ रचना - वसुंधरा)**



# निसर्गाचा खेळ

या वर्षी फार जास्ती पाऊस पडल्यामु चहूंकडे पाणीच पाणी झालं होतं. कुशस्थळी नदीच्या पुरांत आसपासची सर्व गांवे पाण्याखाली गेली होती. नायडूची जमीन नदीकिनाऱ्यालगत होती व त्याने खूप कष्ट करुन पीक उभं केलं होतं. ते सगळं नष्ट झालं. मोठ्या मुश्किलीने नायडू आपल्या कुटुंबासह प्राण वांचवून सुरक्षित ठिकाणी पोंचू शकला.

ही गोष्ट जेव्हां नायडूचा मित्र रायडू याला समजली तेव्हां तो शहरातून त्याला भेटायला आला व त्याने त्याचे सांत्वन केले. ''नायडू, हा सगळा नशिबाचा खेळ आहे. जेव्हां लक्ष्मी येते तेव्हां नारळाच्या पाण्यासारखी येते, आणि जेव्हां जाते तेव्हां हत्तीने खाल्लेल्या बेलीप्रमाणें दिसेनाशी होते. नशीब एका हाताने देतं नि दुसऱ्या हाताने काढून नेतं. यांत नवीन ते काय आहे?''

दोन मिनिटे गप्प राहून नायडू उत्तरला, ''तीस वर्षे मी दिवसरात्र मेहनत करून मिळवलेली सारी कमाई एका रात्रींत गमावली ह्याचं मला वाईट वाटतं. तूं ज्या नशिबाबद्दल बोलतो आहेस. त्यानेच मला ही मिळकत थोडीथोडी करत दिली होती. जर त्याने माझ्याकडून थोडीथोडी काढून घेतली असती तर मला इतकं वाईट वाटलं नसतं. पण त्याने सर्व कांही एका रात्रींत काढून घेतलं ! नाहीतर तुलासुद्धां माझी समजूत घालण्याची वेळ पडली नसती, नाही कां?'' हे ऐकून रायडू चूप बसला.

**आर. सत्या**





# सुवर्ण सिंहासन

फार फार वर्षांपूर्वी एक काळ असा होता कीं दक्षिण भारतांत चार मोठी बलदंड राज्यें होती. कौंडिन्य, कालिंदी, चंपक व कुंद ! यांच्याखेरीज सहा लहान राज्येंही होती.

हैहय वंशाचा कौंडिन्यचा राजा पौरस्वत मोठा पराक्रमी व कुशल राज्यकर्ता होता. दक्षिण भारतातल्या राज्यांमधे क्षुल्लक कारणांमुळें नेहमी लढाया होत असत. पौरस्वतने आपले राजकारणी कौशल्य वापरून त्यांच्यात सद्‌भावना व एकी प्रस्थापित केली. त्याच्या नेतृत्वाखाली सारा दक्षिण भारत एका छत्राखाली नांदत होता. सर्व राजांनी त्याला आपला नेता व सम्राट मानले होते. चारी दिशांना त्याची कीर्ति पसरलेली होती.

दुर्दैवाने त्याला मूलबाळ नव्हतं, म्हणून त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या भावाचा मुलगा हयग्रीव याने राज्याचा भार सांभाळला.

हयग्रीव स्वभावाने खूप चांगला होता पण एका चांगल्या राज्यकर्त्याचे गुण त्याच्यांत नव्हते. ही गोष्ट त्याचे सरदार, अधिकारी व सामंतांना माहीत नव्हती. राज्यांत फक्त एकच व्यक्ती अशी होती की राजा हयग्रीवाची कुवत त्याला बरोबर ठाऊक होती. ती व्यक्ती म्हणजे पुलिंद भट्टारक.

पुलिंद भट्टारक मंत्रशास्त्रांतले एक मोठे पंडित व कुशल राजकारणपटु होते. आपले शिक्षण काशीत पूर्ण करून सम्राट पौरस्वतच्या वेळीं कौंडिन्य राज्याच्या आश्रयाला आले. त्यांच्या



पांडित्यामुळें प्रभावित होऊन पौरस्वतने आपल्या दरबारांत त्यांचा रीतसर सत्कार केला व त्यांना आश्रय दिला होता.

पौरस्वतच्या मरणानंतर हयग्रीवाने त्यांना एका गुरुचा व पित्यासमान मान देऊन राज्यांत त्यांची प्रतिष्ठा आणखी वाढवली. जेव्हां राजगुरुंचे निधन झाले तेव्हां हयग्रीवाने पुलिंद यांस कौंडिन्य राज्याचे राजगुरुपद दिले.

गुरुशिष्यांचे एकमेकांवर अतिशय प्रेम होते. म्हणून राजगुरु पुलिंदास हयग्रीवाची असमर्थता पाहून वाईट वाटे. त्याने राजाला एक योग्य व समर्थ राज्यकर्ता बनवण्याची पराकाष्ठा केली. राजगुरुंची आत्यंतिक इच्छा होती कीं पौरस्वताप्रमाणें हयग्रीवाची कीर्ति दूरवर पसरावी, व मांडलिक राजांनीही त्यांना तितकाच मान द्यावा. एका बाजूने ते राजाला कुशल राजनीतीची शिकवण देत होते व दुसऱ्या बाजूने दरबारी व मांडलिक सामंतांपासून राजाची कमजोरी लपवत राहिले. म्हणजे सामंतांनी राजाचा योग्य तो मान राखावा, व त्याच्या दुर्बलतेचा अनुचित फायदा घेऊं नये हा हेतू! पण यांत पुलिंदास यश मिळाले नाही व हयग्रीव कधीही चांगल्या प्रकारें राज्य करूं शकला नाही.

एक दिवस कांही सैनिकांसह हयग्रीव जवळच्या रानांत शिकारीसाठी गेला. तिथें त्यांनी एक बारशिंगा पळताना पाहिला. हयग्रीवाने नेम धरुन बाण मारला पण त्याचा बाण चुकला व बघताबघता शिकार हातातून निसटली. हयग्रीव निराश व उदास झाला. त्याला आपल्या दुर्बलतेची शरम वाटत होती. त्याच वेळेस मागून येणाऱ्या सैनिकांचे कुत्सित हास्य त्याने ऐकले. ही गोष्ट त्याच्या मनाला फारच लागली. त्याला वाटलं जसं कांही हे जसं सैनिक म्हणताहेत "तुम्ही इतके दुबळे नि असमर्थ आहात कीं एका साध्या बारशिंग्याला मारूं शकलां नाहीत. मग एवढ्या मोठ्या राज्याचा कारभार कसा काय सांभाळत आहात? पौरस्वतासारख्या पराक्रमी वीरराजाचे तुम्ही लायक उत्तराधिकारी आहात कां?"

जखमी हरिणासारखं त्याचं हृदय विद्ध झालं. एकदा त्याला वाटलं कीं सैनिकांना जाऊन रागवावं कीं मला हंसण्याची तुमची हिंमत कशी होते? आणि त्यांना दंड ठोठवावा. परंतु तो अतिसंकोची व न्यूनगंडाने पछाडलेला असल्यामुळें तो कठोरपणें बोलू शकला नाही. त्याच्या मनांत आलं कीं तो खरोखरच राजा होण्यास लायक नाही आणि म्हणून



शिपायांना कांही विचारण्याचा नैतिक अधिकार त्याला नाही.

तो मुकाट्याने राजधानीला परत आला. राजा गंभीर झालाय हे पाहून शिपाई घाबरले. कुणीही राजाला प्रश्न विचारायचं धाडस केलं नाही. तेदेखील त्याच्यामागोमाग निमूटपणें आले.

हयग्रीव हळव्या व नरम स्वभावाचा होता. त्यामुळें त्याच्या सैनिकांनी अजाणतेपणें केलेला अपमान त्याला असह्य होत होता. स्वतःच्या दुबळेपणाचा व बावळटपणाचा त्याला पश्चाताप वाटत होता. त्याच्या मनांत आलं कीं जर हे सामान्य शिपाई माझ्या चुकीला हंसण्याचं साहस करूं शकतात तर दरबारांतले बुद्धिमान नागरिक, सरदार, अधिकारी माझ्याविषयी काय म्हणत असतील? या कल्पनेने त्याला मेल्याहून मेल्यासारखे झाले, व मन कष्टी झाले. "राजाच्या भूमिकेतच काय, एक साधा नागरिक म्हणून देखील जगायचा मला अधिकार नाही; जगांत दुर्बल व अकार्यक्षम लोकांसाठी मुळीच स्थान नसतं. धिक्कार असो माझ्या जगण्याला." अशा विचारांत खिन्न, निराश व उदास होऊन तो राजवाड्यांत पोंचला.

दुसऱ्या दिवशीं राजगुरु पुलिंद यांस संदेश मिळाला कीं महाराज हयग्रीव यांचे पहाटे आकस्मिक निधन झाले. ते स्तंभित झालेले व धांवतच अंतःपुरांत आले. राजपरिवारांतील सर्व मंडळी या अचानक व अकारण मृत्यूमुळें सचिंत व चकित होऊन महाराजांच्या शवापाशी बसली होती. जेव्हां राजगुरु पुलिंद महाराजांच्या मृत्यूबद्दल विचार करत घरी परतले, तेव्हां एका सैनिकाने घाबरत त्यांना एक लहान संदूक दिली व म्हणाला,



"महाराजांनी आज सकाळीं हे आपल्याला द्यायला सांगितलं होतं. त्यावेळेस आपण मंदिरात पूजा करीत होतात, व नंतर लगेच आपण राजवाड्यावर गेलात म्हणून यापूर्वी मी देऊं शकलो नाही."

त्या संदुकीत महाराजांनी लिहीलेलं एक पत्र होतं. पत्रावरुन महाराजांनी आत्महत्या केल्याचे कळले. मृत्यूचे कारण आत्महत्या हे समजल्यावर राजगुरु जास्तच दुःखी व अस्वस्थ झाले.

हयग्रीवाचे अंत्यसंस्कार झाल्यावर त्याच्या तीन वर्षाच्या मुलाला राज्याभिषेक केला गेला. राज्यकारभार त्याच्या वतीने राजगुरु पुलिंद स्वतः पाहूं लागले.

हयग्रीवाच्या राजवटींत राज्यांत किरकोळ संघर्ष होऊं लागले होते. ज्या राज्यांनी पौरस्वत



महाराजांचा पराक्रम पाहून त्यांना आनंदाने सम्राटपद दिले होते, तेच आता कौंडिन्य राज्यांतून वेगळे होऊं पाहात होते. हळूंहळूं हा विद्रोह वाढूं लागला. हयग्रीवाचा मुलगा मोठा होईपर्यंत सर्व राज्यें स्वतंत्र झाली होती. सहा छोटी राज्यें होती तीही फुटून वेगळी झाली. हैहय वंशजांच्याजवळ पुन्हां फक्त कौंडिन्य राज्यच शिल्लक राहिले.

त्यावेळेला कौंडिन्यमध्यें हैहय वंशाचा पांचवा राजा श्रीदत्त राज्य करीत होता. तो मृदु स्वभावाचा असूनही एक समर्थ व हुशार राज्यकर्ता होता. त्याला एकच मुलगा होता. मुलाच्या जन्माच्या वेळींच राणीचा देहान्त झाला. राजाचे राणीवर निरतिशय प्रेम होते. तिच्या मृत्यूमुळें त्याच्या मनाला फार मोठा धक्का बसला. जरी त्यावेळीं तो तरुण होता तरीदेखील त्याने दुसरा विवाह केला नाही व राणीशी एकनिष्ठ राहिला. आपल्या पुत्राचे पालनपोषण त्याने मोठ्या प्रेमाने केले व तो थोडा मोठा झाल्यावर दक्षिण भारतांतल्या श्रेष्ठ व प्रसिद्ध अशा गुरु कृष्णचंद्राच्या आश्रमांत त्याला पाठवला.

हा बालक युवराज विजयदत्त, शस्त्र व शास्त्र या दोन्ही विद्यांत चंद्रकलेसारखा चमकूं लागला. तो हुशारी आणि कर्तबगारीत सर्वांपेक्षां सरस असल्यामुळें आपल्या गुरुंचा लाडका शिष्य होता. शस्त्र व शास्त्रांच्या अभ्यासानंतर गुरुजींनी त्याला राजनीतीचे शिक्षण दिले. म्हणजे राज्यकारभार नि राजाचे कर्तव्य या विषयांतले ज्ञानही दिले. त्याचा देश व राज्याच्या इतिहासाबद्दल शिकवताना त्याचे पूर्वज पौरस्वताने आपल्या बुद्धी व पराक्रमाच्या जोरावर आपल्या छोट्या राज्याचे एक विशाल साम्राज्य कसे बनवले, हेही त्याला समजावून सांगितले. पण त्याच्या दुर्बल व अकार्यक्षम वारसांमुळें साम्राज्याचे पुन्हां तुकडे तुकडे झाले. हे सर्व ऐकल्यानंतर तो खूप गंभीर होऊन विचार करायचा आणि त्या राज्यांना पुन्हां एकत्र कसे आणून एक अखंड साम्राज्य बनवावे याचे चिंतन करत राहायचा.

आता युवराज विजयदत्ताचा शिक्षणक्रम संपत आला होता तोंच राजा श्रीदत्ताने विजयदत्तास त्वरित परत पाठवावे असा संदेश आपल्या सैनिकांमार्फत कृष्णचंद्रास पाठवला. जरी पित्याच्या या अनपेक्षित बोलावण्याने विजयदत्त चकित झाला, तरी गुरूचा आदेश घेऊन तो घोड्यावर स्वार होऊन ताबडतोब राजधानीकडे निघाला.



मुलाच्या आगमनाची बातमी ऐकून महाराजांनी राजभवनाच्या प्रवेशद्वाराशीच त्याचे स्वागत केले. पित्याची गंभीर व चिंताक्रांत मुद्रा पाहून पुत्राला वाटलं कीं राज्यांत नक्कीच एखादी कठीण समस्या उत्पन्न झालेली आहे.

भोजनानंतर जेव्हां पितापुत्र एकांतात बसले, तेव्हां विजयदत्ताने विचारले, "पिताश्री, मला तुम्ही अचानक बोलावलंत त्याचं कारण कळेल कां?"

श्रीदत्त कांही क्षण मूक राहून नंतर म्हणाले, "पुत्रा! तुला माहीत असेलच कीं आपले पूर्वज पौरस्वत महाराज संपूर्ण दक्षिणचे सम्राट होते व सारी लहानमोठी राज्यें त्यांच्या अंमलाखाली होती. त्या राजवटींत त्यांना मांडलिक राजांनी कितीतरी अमूल्य नजराणे. निधी, अजोड वस्तू भेट म्हणून दिलेल्या होत्या. त्यांतली सोने, चांदी व कोट्यवधी रुपयांची रत्नें खजिन्यांत आहेत. याची माहिती त्या राजांना आहे. पौरस्वत महाराजांनंतर त्या मांडलिक राजांनी जरी आपली स्वतंत्र राज्यें घोषित केली असली, तरी आपल्याकडे मान वर करून पाहाण्याचं साहस अजून तरी कुणी केलं नाही. म्हणून हा सारा धनकोश अद्याप सुरक्षित आहे. परंतु...."

एवढं बोलून श्रीदत्त एकदम गंभीर व गप्प झाला. "परंतु काय पिताश्री?" विजयदत्तने जरा घाबरूनच विचारले. "परंतु आज त्यावर कोणाचीतरी गिधाडनजर पडली आहे." पिता म्हणाला. "कोण आहे तो, ज्याने हे साहस केलं आहे, पिताश्री?" संयमाने राग आवरत विजयदत्तने विचारलं.

प्रदीर्घ श्वास घेऊन श्रीदत्तने सांगितलं, "षडयंत्रकारी एकटा नाही. निघेजण आहेत. दक्षिणापथचे सर्व राजे एकत्र जमून आपल्याविरुद्ध कारस्थान रचत आहेत." "सगळे?" चकित होऊन विजयदत्तने विचारलं. "कालिंदीचा राजा पण या कटांत सामील आहे?"





"हो ! तो देखील!"

विजयदत्ताला धक्काच बसला. कुणीतरी विश्वासघात केलाय असंच त्याला वाटलं. राज्याची समस्या किती गंभीर आहे व पिताश्री इतके चिंताग्रस्त कां आहेत ते आत्ता त्याला कळलं.

श्रीदत्त आजपर्यंतच्या सर्व घटनांची जंत्री देत बोलला, "जेव्हां सर्व राजे कौंडिन्य राज्यांतून वेगळे होऊन स्वतंत्र झाले, तेव्हांही आमच्यापैकी कुणाच्याच मनांत त्यांच्याबद्दल नाराजी नव्हती. माझ्या पित्याने माझी बहीण इंदुमती, हिच्या विवाहासाठीं स्वयंवराची घोषणा केली होती. देशविदेशांत निमंत्रणें पाठवली होती, पण इंदुमतीने कालिंदीच्या राज्याचे युवराज माधवसेन यांच्या गळ्यांतच वरमाला घातली. मोठ्या थाटांत हा विवाहसोहळा पार पडला. नंतर कालिंदी राज्याची स्नुषा इंदुमतीला सासरी पाठवलं. परंतु थोड्याच दिवसानंतर एका अपघातांत तिचा मृत्यू झाला. त्यानंतर माधवसेनाने वसुमतीशी, एका दुसऱ्या राजकुमारीशी विवाह केला. हा विवाह माझ्याच खटपटीमुळें झाला होता. म्हणून वसुमती मला सख्ख्या भावाप्रमाणें मानत असे.

आतापर्यंत आम्हा दोघांतले संबंध मित्रत्वाचे आहेत. माधवसेन राजा, कौंडिन्य राज्यांत येत असे. वसुमतीची मनोमन इच्छा होती की तिची एकुलती एक मुलगी श्रीलेखा हिचा विवाह तुझ्या-बरोबर व्हावा, व यावेळीं कालिंदीची राजकन्या कौंडिन्यची राणी होऊन यावी ! मी पण याला संमती दिली होती. माधवसेनने कधी यावर विरोध दर्शवला नव्हता. पण आज मात्र तो आमच्या विरोधकांपैकी एक झाला आहे."

एवढं बोलून, एक उसासा सोडून, श्रीदत्त गप्प झाले. विजयदत्ताला आश्चर्य वाटलं, की असंसुद्धां होऊं शकतं तर; याचा तो विचार करूं लागला. माधवसेनासाठीं त्याच्या वडिलांनी खूप कांही केलं होतं. त्याबद्दल ही परतफेड? हा तर विश्वासघात आहे.

विजयदत्त मूक राहिलेला पाहून महाराजांनी त्याची प्रेमाने पाठ थोपटली व म्हटले, "पुत्रा ! माझादेखील बातम्या प्रथम विश्वास बसला नाही. म्हणून याचा शहानिशा करण्यासाठी मी सेनाध्यक्ष वीरबाहू यांच्यावर हे काम सोपवलं. गुप्तहेरांमार्फत त्यांनी तपास केला आणि दहा दिवसांपूर्वी सविस्तर लिहीलेलं निवेदन माझ्यासमोर सादर केलं. ते पाहून



तर मी खरोखरच अवाक् झालो."

विजयदत्त पित्याचे बोलणें लक्षपूर्वक ऐकत होता. त्याला जाणवलं की या साऱ्या समस्यांचा चक्रव्यूह त्यालाच भेदायचा आहे. पित्याने पुढें सांगायला सुरवात केली. "या निवेदनामुळें ज्या इतर मुख्य गोष्टी उजेडांत आल्या आहेत त्याविषयी नीट ध्यान देऊन ऐक. हे सर्व एकाच समस्येचे धागेदोरे आहेत.

"दक्षिणापथच्या चार मोठ्या राज्यांतले एक चंपकराज्य आहे. त्याचा सध्याचा राजा मरालभूपती आहे. त्याचा पिता होता चक्रभूपती. त्याने आपल्या वडील भावावर विषप्रयोग करून त्याला ठार मारले व आपण गादीवर बसला. मरालभूपति हादेखील पित्याप्रमाणेंच कुटिल व दुष्ट आहे. त्याला दोन मुलगे आहेत. राज्याचा वारस थोरला चक्रभूपति-केवळ नांवातच साम्य नव्हे, तर शरीराची ठेवण व दुष्ट स्वभावात देखील तो आपल्या आजोबांसारखा आहे. ही बापले-काची जोडी दुष्ट आहेच, शिवाय युद्धकलेंतही प्रवीण आहे. दोघांनाही आपल्या क्रूरतेचा व कुटिल कारवायांचा फार अभिमान आहे. या दोन सैतानी व्यक्तींची वाईट नजर आता फक्त आपल्या अलोट संपत्तीवरच नव्हे, तर दक्षिणापथच्या सार्वभौमत्वावर देखील आहे.

"सध्यां चंदन राज्याचा राजा आहे वृषभध्वज. हा वृद्ध आणि असमर्थ आहे. शिवाय त्याला मूलबाळ नाही. सिंहासनावर वारस म्हणून हक्क सांगू शकणारा कुणी जवळचा आप्तही दुर्दैवाने नाही. या सर्व कारणांमुळे तो मरालभूपतिच्या जाळ्यांत सहजपणें अडकला गेलाय. त्याने अगोदरच



सांगितलं होतं कीं या वृद्धावस्थेंत तो कुठे येऊं-जाऊं शकत नाही. पण जी सेना किंवा रसद हवी असेल ती तो पाठवीत जाईल. आता हे पितापुत्र जरी थोडेसे सैनिक घेऊन त्याच्यावर हल्ला करते तरी सहज जिंकू शकले असते. पण त्यांनी तसं केलेलं नाही, कारण प्रथम ते कौंडिन्य राज्य हडप करण्याचा बेत करत आहेत. जोपर्यंत त्यांची ही योजना सफल होत नाही तोपर्यंत ते इतर कोणत्याही राज्याशी युद्ध करणार नाहीत. कारण त्यामुळें आपलं लक्ष त्यावर जाईल आणि आपणही सावध होऊं."

"कुंदच्या राजाने त्यांच्याशी तह केला आहे."

"आता त्यांची नजर कालिंदीवर आहे आणि ते राज्य आपल्या व त्याच्या राज्याच्या मधें येतं !

आपला व कालिंदीच्या राजाचा नातेसंबंध असल्यामुळें मरालभूपति आता सावधपणें पावलें टाकतो आहे. याखेरीज, त्याच्या पुत्राने जेव्हां कालिंदीच्या राजकुमारीच्या अपूर्व सौंदर्याची चर्चा ऐकलीय, तेव्हांपासून तिच्याशी विवाह करण्याची त्याची लालसा आहे."

अितकं बोलून श्रीदत्त पुन्हां थांबला. विजयदत्त पित्याने सांगितलेल्या राजनैतिक घटनांचे विवरण लक्षपूर्वक ऐकत होता. पित्याचे बोलणें अचानक थांबल्यामुळें त्याला शंका आली. तेव्हां पित्याने बरकरणीं हंसल्यासारखें करून म्हटले, "वडीलधारी माणसं म्हणतात कीं राजाचं जीवन कांट्यामधे उमलणाऱ्या गुलाबा-सारखं असतं."

पित्याचे बोलणें ऐकताना अनेक शंकांचे मोहोळ त्याच्या मनांत उठले होते. त्याला ठाऊक होतं कीं कौंडिन्य आणि कालिंदी, या दोन्ही कुटुंबांची इच्छा होती कीं त्याचा विवाह श्रीलेखाशीच व्हावा ! लहानवयापासूनच दोघं एकमेकांना आवडत होती. पण चालू राजकारणाचे डावपेंच बुद्धिबळातल्या खेळाप्रमाणे होते. त्याचं प्रेम हा आता त्या खेळांतला एक मोहरा बनला होता. त्याला वाटलं, या राजकारणी बुद्धिबळांत आपण आपल्या मोहऱ्याचं रक्षण करण्यास असमर्थ आहोत. इतक्या साऱ्या शत्रूंना मारल्यानंतरही श्रीलेखाशी त्याचे लग्न होईल कां? तोपर्यंत ती अविवाहित राहील कां? चंपकच्या राजकुमाराशी तिचा गुपचूप विवाह झाला तरी त्यांत आश्चर्य वाटणार नाही.

बराच वेळ विजयदत्त विचारांत बुडला होता. श्रीदत्तही कांही न बोलता बसला होता.

आपल्या मुलाच्या चेहऱ्यावरचे बदलते भाव निरखत होता व त्याच्या मनांतल्या भावनांचा कल्लोळ जाणण्याचा प्रयत्न करत होता.

तेव्हां विचारांचा गुंता सुटून भानावर येणाऱ्या व्यक्तिप्रमाणें चकित होऊन तो म्हणाला,

"पुढे सांगा ना पिताश्री !"

**(क्रमश)**





## १८५७ ची वीर गाथा

# पहिलें स्वातंत्र्य-समर



(यापूर्वी - साऱ्या देशांत जिकडेतिकडे क्रांतीची आग भडकत होती. या क्रांतिचे नेतृत्व करत होत्या दोन महान व्यक्ती-झांशीची राणी आणि नानासाहेब ! ब्रिटिश सरकारने झांशीच्या राजेसाहेबांच्या मृत्यूनंतर कारणाशिवाय झांशीचे राज्य हडप करण्याचा प्रयत्न केला होता; परंतु राणीने तो सफल होऊं दिला नाही. आक्रमक ब्रिटिश सेनेशी तिने मोठ्या शर्थीने टक्कर दिली. परंतु जेव्हां किल्ला वाचवण्याचे सारे प्रयत्न फोल ठरले तेव्हां आपल्या दत्तक पुत्राला पाठीवर बांधून, पुरुषवेषांत घोड्यावर स्वार होऊन, मुख्य दरवाज्यातून ती किल्ल्याबाहेर पडली व इंग्लिश सैन्यापासून बचावली. ... पुढें चालू)

राणी आपल्या दोन विश्वासू दासी, मंदर व काशी, यांच्यासह दूरवर जाऊं लागली. इंग्लिश सेनेची एक छोटी पण बहादुर तुकडी तिचा पाठलाग करत होती. राणीला वारंवार मागे वळून पाहात, त्यांच्याशी लढत, त्यांच्यापासून बचाव करावा लागत होता.

एक संपूर्ण दिवस, विश्रांति न घेता, ती घोड्यावर बसून सतत पुढे जात होती. त्यांचा पहिला मुक्काम काल्पीला पडला. आदल्या रात्री झांशीहून निघालेली राणी दिवसभरानंतर मध्यरात्री काल्पीला पोचली.

नानासाहेबांचे चुलतबंधू व सच्चे देशभक्त रावसाहेब, यांच्या महालाबाहेर मशाली घेऊन संत्री पाहारा करत होते.

"राणी? झांशीची राणी इथें?" संत्री आपापसांत कुजबुजूं लागले. रावसाहेबांनी बाहेर येऊन राणीचे स्वागत केले. राणी घोड्यावरुन उतरली व महालांतल्या स्त्रियांनी झोपलेल्या बाळाला आंत नेले. नोकरांनी राणीच्या घोड्याचा लगाम धरला.

अरेरे ! या घोड्याने आपल्या मालकिणीची निष्ठेने सेवा केली व आपले कर्तव्य पुरे केले. तो



अचानक धप्पदिशीं खाली पडला व कांही क्षणांतच त्याने देह ठेवला.

राणी गुडघे टेकून त्याच्याजवळ बसली व तिने त्याला प्रेमाने थोपटले. तिच्या डोळ्यांतून अश्रू वाहत होते. आपल्या या मुक्या सेवकासाठी ती अश्रूपूर्ण श्रद्धांजलीच वाहत होती.

परंतु राणीपाशी विश्रांतीसाठी वेळ कुठे होता? सकाळ होतांच रावसाहेबांच्याबरोबर लढाईची पुढची चाल नक्की करण्यास ती बसली. राणीच्या गुप्तहेरांमार्फत बातमी मिळाली होती की झांशीत दिवसभर लुटालूट व कतल करुन, ब्रिटिश सेनानी सर ह्यू रोजच्या नेतृत्वाखाली निम्मे सैन्य तिच्या पाठलागावर निघाले होते.

राणी, रावसाहेब व आणखी एक महान क्रांतिनेता तात्या टोपे, यांनी त्या भागांतल्या तीनचार राजे-सामंतांच्या खाजगी सैनिकांची फौज एकत्र केली. तात्या टोपेंच्या नेतृत्वाखाली हे सैनिक त्यांच्याकडे येणाऱ्या इंग्लिश सैन्याच्या दिशेने जाऊं लागले. कुंद गांवात दोन्ही सैन्ये एकमेकांसमोर आली.

दोघांच्यात घनघोर लढाई झाली. दुर्दैवाने तात्या टोपे यांना आपल्या सैनिकांची नीट जुळवाजुळव करण्यास पुरेसा वेळ मिळाला नाही. त्यामुळें कांही तासांच्या लढाईनंतर त्यांना माघार घ्यावी लागली. इंग्लिश सैन्याने काल्पीत प्रवेश करुन शहर लुटले. रावसाहेबांनी आपल्या कारखान्यांत बनवलेल्या बंदुका, दारुगोळ्याचे भरलेले प्रचंड कोठार व शस्त्रागार आयतेच ताब्यांत आल्यामुलें सर ह्यू रोजला एक मोठे घबाड मिळाले.

या विजयामुळें इंग्लिश सेनेने जल्लोष साजरा केला. पण राणी लक्ष्मीबाई, रावसाहेब किंवा तात्या टोपे यांपैकी कुणालाही ते पकडू शकले नाहीत याचे त्यांना दुःख होत होते. हे तिन्ही नेते आपल्या सैन्याची पुन्हां जमवाजमव करण्यास ग्वाल्हेरला पोंचले. ग्वाल्हेरचे राजे शिंदे इंग्रजांच्या पक्षाचे होते. पण सामान्य जनता व उच्चवर्गीयांच्या मनांत क्रांतिकारकांविषयी आदर होता.

जेव्हां ही मंडळी ग्वाल्हेरला पोंचली, तेव्हां शिंदेराजे ग्वाल्हेर सोडून पळून गेले. राणी व तिचे सहकारी यांचे जनतेने भव्य स्वागत केले. ह्यू रोजला हा फार मोठा अपमान वाटला. त्याला पक्कं ठाऊक होतं की शिंद्यांना ग्वाल्हेर जर परत मिळालं नाही, तर ईस्ट इंडिया कंपनीची संरक्षण द्यायची ताकद कमी आहे असं इतर राजे मानतील व त्यांचा विश्वास उडेल. त्यांच्या सुदैवाने झांशीवर त्यांचे पूर्ण नियंत्रण होते. इंग्लिश सेना झांशीमधें असणे





आवश्यक नव्हते. ह्यू रोजने सेनेला बोलावून घेतले व मोठे सैन्य एकत्र करुन ग्वाल्हेरवर हल्ला केला. त्याने शिंद्यांना आपल्या सेनेच्या अग्रभागी ठेवले. ही त्याची खेळी अत्यंत यशस्वी ठली. ग्वाल्हेरच्या प्रजेने क्रांतिकारकांचे स्वागत आनंदाने केले होते. इंग्रजांनी हिंदुस्तान सोडून परत स्वदेशी जावे असं त्यांना वाटत होते. परंतु त्यांच्या पिढीजात राज्यकर्त्याबद्दल त्यांना साहजिकच सहानुभूती होती. जेव्हां प्रजेने पाहिलं, कीं इंग्रजांशी लढणें, म्हणजे आपल्याच राजाशी लढणें, तेव्हां ते तटस्थ राहिले.



राणीने मोठ्या बहादुरीने व शर्थीने इंग्रज सैन्याशी मुकाबला केला. लढाईत ती नेहमी सैन्याच्या आघाडीवर राहात होती ! दुर्दैवाने तिचा विश्वासू घोडा अगोदरच मेला होता. ज्या नव्या घोड्यावर ती स्वार झाली होती, त्याला लढाईमधें येणारा वेग व चालबदलीची संवय नव्हती. शिवाय एक समोरचा शत्रूही निर्दय होता. ह्यू रोज हा एक कुशल व अनुभवी सेनापती होता. त्याच्या अधिपत्याखाली इंग्लिश सैन्याने अनेक लढाया लढलेल्या होत्या. तरीदेखील, केवळ वीस वर्षांच्या राणीने खूप वेळापर्यंत त्यांना झुंजवत ठेवले.

तिच्याकडे होतं फक्त अचाट साहस, दृढ निश्चय व राष्ट्रभक्ति !

तिच्या सैनिकांत कडवी निष्ठा होती, पण त्यांना युद्धाचे प्रशिक्षण मिळालेले नव्हते. त्यामुळें त्यांचा अनुभवी इंग्लिश सैनिकांच्या रणनीतीसमोर टिकाव लागला नाही. जर ग्वाल्हेरने तिला मदत केली असती तर परिस्थिती बदलली असती.

दुपार टळल्यानंतर बऱ्याच वेळाने राणीच्या सेनाधिकाऱ्यांनी परत फिरण्याचा सल्ला देताना सांगितले, ''यावेळीं युद्धांत प्राण देण्याचे औचित्य नाही. जर आपण जिवंत राहिलो तर आपल्या झेंड्याखाली पुन्हां आपण संघटित होऊं शकूं.''

राणीने त्यांचा सल्ला मानून मंदर, काशी व मूठभर सैनिकांसह रणभूमीतून माघार घेतली. घोड्यावर स्वार होऊन ती मोठ्या वेगाने जाऊं लागली. भुकेल्या लांडग्याप्रमाणें शत्रुसैनिक तिचा पाठलाग करीत होते. राणीला जिवंत अथवा मृतावस्थेंत पकडून दिलं तर जिंदगीभर पुरेल इतकं मोठं इनाम मिळेल हे त्यांना चांगलं ठाऊक होतं.

एका चौरस्त्यावर आल्यानंतर राणीने एका लहान बोळांत घोडा वळवला. पाठलाग करणारांना ती कुठल्या दिशेला गेली ते कळेना. म्हणून त्यांच्या चार तुकड्या चारी दिशांना पांगल्या. राणीचे अंगरक्षक अचानक थांबले, आणि पाठलाग



करणाऱ्या इंग्लिश सैनिकांना त्यांनी मारले.

कांही अंतरापर्यंत राणी सुरक्षितपणें दौडत होती. शत्रूच्या दुसऱ्या तुकडीचे शिपाई तिच्या मागांवर होते. वाटेंत एक लहानशी नदी लागली. राणीचा जुना घोडा असता तर यापेक्षांही रुंद पात्रावरुन छलांग मारुन त्याने नदी पार केली असती. पण हा नवा घोडा तितका अनुभवी नव्हता. तो थांबला आणि घाबरुन नदीकांठानेच हळूं चालूं लागला.

तोपर्यंत शत्रूचे शिपाई जवळ आले व राणीच्या सैनिकांवर ते तुटून पडले. मंदर जखमी झाली. नदी किनाऱ्यावरच्या एका मोक्याच्या ठिकाणीं राणी पोंचली तिथें प्रवाह अरुंद होता व नदी पार करणं सहज जमलं असतं. पण मंदरच्या किंकाळीमुळें राणीला परत फिरावं लागलं. तलवारीच्या एका घावातच राणीने त्या सैनिकाचे शीर धडावेगळे केले. व घोड्यावरुन उतरुन तिने घायाळ मंदरला सावरले. त्याचवेळेस एका भेकड शिपायाने तिच्या डोक्यावर वार केला. राणीच्या अंगरक्षकांनी ताबडतोब त्याला यमसदनी पाठवले, व राणीला जवळपासच्या एका झोंपडीत आणले. ''माझ्या बहादुरांनो,'' मरणासन्न राणी संथ आवाजात म्हणाली, ''माझे प्राण गेले की लगेच मला मडाग्नि द्या. शत्रू जवळच आहे. त्यांचा स्पर्श होऊन माझे शरीर अपवित्र होऊं नये ही माझी इच्छा आहे.''

खरोखरच कांही क्षणांत तिने प्राण सोडला. तिच्या विश्वासू सेवकांनी सुकी लांकडे व पालापाचोळा एकत्र करुन तिच्यावर अंतिम अग्निसंस्कार केले.

अशा प्रकारे भारतीय इतिहासातला एक चमकता तारा अस्तंगत झाला. जगाच्या इतिहासात या तोडीची दुसरी एकच व्यक्ति होती – जोन ऑफ आर्क!

जवाहरलाल म्हणतात, ''निरनिराळ्या लोकांच्या आठवणीत एक नांव सदैव ताजे आहे, ते म्हणजे झांशीची राणी लक्ष्मीबाई – केवळ वीस वर्षांची तरुणी, जिने देशासाठी लढतालढता जिवाशी खेळ केला.

शत्रूच्या इंग्रजी सेनापतीने तिच्याबद्दल उद्गार काढले, ''सर्वोत्तम आणि श्रेष्ठ वीरांगना!''

हे क्रांतियुद्ध लवकर संपलं. कारण एकामागून एक सर्व नेते युद्धांत बहादुरीने लढताना मेले किंवा फांशीच्या तख्तावर चढले.

शौर्य, धैर्य, दूरदर्शीपणा व नेतृत्व–भारतात या गुणांची कधीही कमतरता नव्हती. एकाच गुणाची उणीव होती. ती म्हणजे त्यावेळच्या राजांची एकजूट! एकमेकांवर कुरघोडी करण्याची जबरदस्त चढाओढ त्यांच्यामधे चाललेली होती. त्यांच्यापैकी कांहीजणांनी तर आपल्याच देशांतल्या विरोधी राजांशी लढण्यासाठी परकीय शक्तींची मदत निर्लज्जपणें घेतली होती. त्याशिवाय इंग्लिश सेना अधिक श्रेष्ठ होती व त्यांत अनुभवी कुशल सैनिक होते. पण भारतीय मात्र प्रशिक्षित लढवय्ये नसून स्वातंत्र्यासाठी आहुती देणारे सर्वसामान्य नागरिक होते.

ही क्रांती संपल्यानंतर ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकाऱ्यांनी व सैनिकांनी भारतीयांवर अनन्वित अत्याचार केले. हजारों निर्दोष व्यक्तींना निर्दयपणें मृत्यूच्या दारांत ढकलले व शेंकडों गांवे जाळून बेचिराख केली. महाल व किल्ले यांची विध्वंसक लूट केली गेली. शेवटचा मोंगल बादशहा, ज्याने क्रांतिकारकांना मदत केली होती, त्या बहादुरशहा जफरला कैद करुन त्याला रंगूनला हद्दपार करण्यांत आले. तिथेंच त्याला म्हातारपणीं एकांतवासात मरण आले.

असं झालं तरी, ब्रिटनच्या नेत्यांनी व नागरिकांनी मात्र ईस्ट इंडिया कंपनीच्या अशा अत्याचारी, घृणास्पद कारवाया व दुर्व्यवस्थेबद्दल त्यांना दोषी ठरवले. हिंदुस्तानातील त्यांच्या कारभाराची कडक छाननी झाली. महाराणी व्हिक्टोरियाने राजक्षमेची घोषणा केली व भारतातल्या राजांचे तात्कालिक अधिकार मान्य केले.





# धनासाठी धनाची मदत

एका राजाच्या महालासमोर एक बैरागी येऊन दररोज उभा राहत असे व म्हणत असे, 'माझ्यांत अपार बुद्धिमत्ता आहे. परंतु अशी कुणीही व्यक्ती भेटत नाही की जी तिचा उपयोग करील. मी स्वतः कांही कारणास्तव याचा उपयोग करण्यास असमर्थ आहे.'' ही गोष्ट राजापर्यंत पोंचली. एक दिवस राजाने बैराग्याला महालांत बोलावून सांगितले, ''तू रोजरोज एकच गोष्ट पुन्हांपुन्हां सांगतो आहेस. काय हेतू आहे तुझा ह्याच्यात? जरा सविस्तर समजावून सांग.''

''राजन, जर आपण विश्वास ठेवलात आणि मी जितकं मागेन तितकं धन मला देत जाल तर कांही दिवसांनंतर दिल्याच्या दसपट धन मी परत देऊं शकेन. मी मूळ मुद्दलाची धनराशी इतकी वाढवीन की आपला खजिना भरून जाईल.'' बैराग्याने मोठ्या विश्वासाने सांगितले.

मंत्री राजाच्या कानात हळूंच बोलले, ''महाराज यांत धोका असेलसं वाटतं. आपण विश्वास ठेवूं नका.'' पण राजाने मनांत बैराग्याला धन देण्याचे ठरवले होते म्हणून त्याने मागेल तेवढी रकम देऊन त्याला निरोप दिला.

वर्षानंतर बैरागी पुन्हां आला व राजाला म्हणाला, ''आठवतंय कां महाराज? गेल्या वर्षी आपण मला जरूरीप्रमाणे धन द्यायचं वचन दिलं होतं. मला माझी योजना कार्यान्वित करण्यासाठी आणखी धन हवे आहे.''

मंत्री नको म्हणत असतानादेखील, राजाने बैराग्याला जितकं त्याने मागितलं तेवढं धन दिलं. वर्षानंतर पुन्हां येऊन म्हणाला, ''माझी योजना आता शेवटच्या पायरीवर आहे. धनाची चणचण जाणवते आहे. म्हणून परत आलोय. मला आणखी धन हवंय.''

राजाने यावेळीही त्याला भरपूर धन देऊन परत पाठवले. मंत्र्याने यावेळेसही राजाला धन देण्यास विरोध दर्शवला.

एक वर्षानंतर बैरागी परत आला. ''काय, आणखी धन हवंय?'' राजाने विचारलं. ''नाही





महाराज, माझी योजना पूर्ण झाली आहे. आता आपण मंत्रीना घेऊन माझ्याबरोबर चलावे व आपल्या धनाच्या मदतीने किती मोठा खजिना शोधून काढलेला आहे ते पाहावे.''

बैराग्याबरोबर जाण्यास राजा लगेच तयार झाला पण मंत्री म्हणाला, ''हा तर आपणां दोघांनाच बोलावतो आहे. त्याच्याबरोबर आपण दोघांनीच जाणं सुरक्षित नाही.''

''मी त्याच्या बुद्धीचा चमत्कार पाहायचा निर्णय घेतला आहे. मोठ्या आशेने, धैर्याने व सहनशक्ती राखून मी त्याच्याशी व्यवहार केला आहे. जर मी त्याला घाबरलो असतो तर इतकं धन मी त्याला दिलं असतं कां?'' राजाने मंत्र्याला सुनावलं. सुरवातीपासूनच मंत्र्याला बैराग्याचा संशय येत होता, हे बैराग्याच्या लक्षांत आलं होत. म्हणून तो मंत्र्याला म्हणाला, ''मंत्रीजी, जर तुमच्या मनांत कांही वाईटसाईट शंका असेल तर तुमचे अंगरक्षक बरोबर घेऊन चला.''

पण राजाने साफ नकार दिला. ''नाही, फक्त आम्ही दोघंच येऊं तुझ्याबरोबर.''

दोघंही बैराग्याबरोबर निघाले. तरीही मंत्र्याने आपले दोन सैनिक गुप्तपणें बरोबर नेले होते. बैरागी, राजा व मंत्री यांसह शहर, नदी, वन व पर्वत पार करून समुद्रकिनाऱ्यावर आला. तिथें एक छोटीशी नाव होती. त्यांत तिघंही बसले. नावाड्याखेरीज इतर कुणासाठी त्यांत जागा उरली नव्हती. नाव एका बेटाला लागली. तिथें चारी बाजूला दूरवरपर्यंत राख पसरलेली होती व बगळे घिरट्या घालत होते. राखेच्या मधोमध एक पाऊलवाट होती त्यावर ते चालूं लागले. ''हा बहुतेक जादूटोण्याचा टापू दिसतोय. आम्हाला आता कुठे नेणार आहेस रे बैरागी?'' मंत्र्यानी भयभीत होऊन आपली तलवार उपसली व विचारले. 'घाबरण्यासारखं कांहीही नाही. हा जादूटोण्याचा देश नाही आहे. अपार धन दौलत असलेलं हे एक छोटंसं बेट आहे. जास्त लोक दिसले की बगळे घाबरून जातील. म्हणून मी तुमच्या अंगरक्षकांना तटाच्या बाजूला थांबवलं आहे.'' बैराग्याने मंत्र्याला सांगितलं.

चालतचालत बैरागी एका ठिकाणीं थांबला. तिथे एक लोखंडी दरवाजा होता. बैराग्याने दार उघडून राजाला आंत जाण्यास सांगितले. आंत जाताच खाली जाण्याचा जिना केलेला होता. राजा निर्भयपणें एकटाच आंत शिरला. तिथें मोठ्या गुहेंत मोत्यांचं भांडार होतं. राजा ते पाहून आश्चर्यचकित झाला. डोळे विस्फारून तो फिरत किंमती मोत्यांचे ढीगच्या ढीग होते ते खूप वेळ पाहात बसला. जेव्हां बराच वेळ राजा वर आला नाही म्हणून मंत्री पुन्हां साशंक झाला. मंत्र्याने बैराग्याला पकडले व आपली

तलवार परजली. तोंच राजा आंतून आला व मंत्र्याला म्हणाला, "जा, तुम्हीही पाहून या." जेव्हां मंत्री खाली गेला तेव्हां त्यालाही आश्चर्याचा धक्का बसला. वैराग्यावर संशय घेण्यांत त्याची चूक झाली हे त्याला उमजलं वैराग्याने जे कांही सांगितलं तसं करून दाखवलं. वरती येऊन मंत्र्याने वैराग्याची माफी मागितली. राजाने वैराग्यास मोत्यांचे रहस्य विचारले. वैराग्याने सविस्तर हकीकत सांगितली. तो म्हणाला, 'माझं नावं सदानंद आणि मी एक व्यापारी आहे. समुद्रावर जहाजांतून आपला माल घेऊन अनेक बेटांवर मी जात असे. तेव्हां या बेटाबद्दलचं एक रहस्य मला कळलं. बेटाच्या चारी दिशाना लहानमोठे खडक आहेत. भरती ओहोटीच्या वेळी हे खडक स्पष्ट दिसतात. या खडकांत अगणित शिंपले आहेत. शिंपल्याच्या आंतल्या मासळीसाठी बगळे त्यांना उचलून आणतात आणि या खडकांवर बसतात. शिंपल्यांत तेजस्वी मोती असतात. या किंमती मोत्यांचा मला संग्रह करायचा होता! परंतु तेव्हां दुर्दैवाने एका अपघातांत माझी पत्नी व मुलें वारली. या आघातानंतर मी आयुष्यांत कोलमडूनच गेलो. तरीसुद्धां या बेटांतल्या मोत्यांत माझं मन रमत होतं. मला वाटलं की जोपर्यंत या मोत्यांबद्दलची माझी आसक्ती सुटत नाही, तोपर्यंत मी खरा विरक्त वैरागी होऊं शकणार नाही. म्हणून मी आपल्याजवळ आर्थिक मदत मागितली. आपल्या धनाचा उपयोग करून हे भूमिगत भांडार बनवलं. इथें सगळीकडे राख पसरली. त्यामुळें राखेच्याखाली लपलेले मोती बगळ्यांना दिसत नाहीत व ते पुन्हां आणखी शिंपले आणून टाकत. नंतर कांही माणसांच्या मदतीने मी शिंपल्यातले मोती काढले आणि तळघरांतल्या भांडारात ते सुरक्षित ठेवले.

मला ठाऊक होतं की प्रत्यक्ष पाहिल्यानंतर तुम्ही माझ्या शब्दांवर विश्वास ठेवाल. म्हणून ही सारी योजना आपल्यापासून गुप्त राखली. मीनेजे वचन दिलं होतं, ते पुरं केलंय. आता आपणच या मोत्यांचे मालक आहात. आता मला जीवनाबद्दल यत्किंचित आसक्ती उरलेली नाही. यापुढें शांतपणें तपस्या करण्याची माझी इच्छा आहे. आपण नि आपली प्रजा सुखी राहूं द्यात.

एवढं बोलून मोत्यांचा सारा खजिना राजाकडे सोंपवून वैरागी तिथून निघून गेला.





# टिपूची राजधानी

वर्णन : जयंती महालिंगम      चित्र : गौतम सेन

कृष्णराजसागरपासून सुमारें ३७ कि.मी. पर्यंत आग्नेयेस वाहणारी कावेरी अचानक दोन भागांत विभागली जाते आणि एक बेट कृष्णराज निर्माण होते. श्रीरंगपट्टण नामक हा टापू ५ कि.मी. लांब आणि ८ कि.मी. रुंद आहे. हा कावेरीच्या तीन मोठ्या बेटांपैकी पहिला आहे. तिन्ही बेटांवर श्रीरंगपट्टणचे मंदिर या सांखळीतले पहिले मंदिर असल्यामुलें आदिरंग म्हटले जाते.

मध्ययुगापासूनच हे एक महत्वाचे लष्करी ठाणें होते आणि १८ व्या शतकाच्या शेवटी हे बेट हैदरअली व टिपू सुलतानाची राजधानी झाले.

श्रीरंगपट्टणचा किल्ला त्याच्या लष्करी महत्त्वाच्या दृष्टीने योग्यच होता. विजयनगरच्या राजांच्या काळांत हा १४५४ मधें बांधला गेला. किल्ल्याचं क्षेत्रफळ ५ चौरस कि.मी. आहे व आंत २०,००० नागरिकांसाठी राहण्याजोगी मोठी पेठ वसवलेली होती. किल्ल्याचा तट ४.५ कि.मी. लांबीचा आहे आणि त्यांत चार दरवाजे आहेत. त्यापैकीं तीन बंगळूर दरवाजा, म्हैसूर दरवाजा आणि दिल्ली दरवाजा आहेत. चौथ्याचं नांव मात्र वॉटरगेट आहे. उघडच ते इंग्लिश लोकांनी दिलेलं नांव आहे. तीन तट व तीन खंदकांनी वेढलेला किल्ला आता पडक्या अवस्थेंत आहे. तरीही येणाऱ्या प्रवाशांना तो प्रभावित करतो. किल्ल्यांत ज्या मुख्य प्राचीन इमारती आहेत त्या म्हणजे रंगनाथाचं मंदिर, टिपूने बांधलेली मशीद, टिपूचा लालमहल प्रासाद (जो आता भग्नावस्थेंत आहे) व ज्यांत युद्धबंदी कैदेत ठेवले जात होते त्या कालकोठड्या !

प्रसन्नसरिता
कावेरी



गुंबज

शेर-अे-म्हैसूर टिपू सुलतान एक विलक्षण माणूस होता. स्वातंत्र्य हे त्याचं सर्वोच्च ध्येय होतं. कांही इतिहासकारांनी - खास करून इंग्लिश - त्याला धर्मांध व देशद्रोही रंगवला आहे. पण ही गोष्ट जास्त अतिरंजित वाटते. कारण जेव्हां शृंगेरीच्या शंकराचार्यांच्यावर संकट आले ले तेव्हां त्यांच्या सांगण्यावरून टिपूने सैनिक पाठवून मदत केली व त्यांची जहागीर त्यांना परत देववली.

शंकराचार्यांनी टिपूला आदराने लिहिलेले पत्र आजही सुरक्षित आहे. हैदर आणि टिपू, दोघांनी हिंदू देवळांना उदारपणे देणग्या दिल्या होत्या. रंगनाथ मंदिरात त्यांनी दिलेली चांदीची भांडी आजही पाहायला मिळतात. असं म्हणतात की लढाईला निघण्यापूर्वी बापलेक प्रथम रंगनाथस्वामींच्या पुढें डोके टेकून जात.

श्रीरंगपट्टणच्या किल्ल्यावर शेवटचा मोठा वेढा १७९९ मधें चौथ्या इंग्रज-म्हैसूर युद्धांत पडला होता. यावेळेस टिपू हल्ल्याचा तडाखा झेलूं शकला नाही. शेवटच्या संग्रामात जुन्या महालाजवळ नदीकडे जाणाऱ्या फाटकापाशी (वॉटरगेट) शत्रूशी झुंजत तो जखमी होऊन खाली पडला, आणि जवळजवळ अर्धवट शुद्धींत असताना त्या लहान फाटकाकडे जाण्यास घसटून सरकूं लागला. तो आंतल्या तटांत तसा पोंचला असता, परंतु मीर सादिक नांवाच्या एका फितुर अधिकाऱ्याने त्याचा मार्ग रोखला व एका इंग्लिश सैनिकाने मारलेली



हवासिल

लकलक

गोळी टिपूच्या मस्तकांतून आरपार गेली. टिपूला जिथें वीरगती मिळाली तिथे एक संगमरवरी शिळा लावलेली आहे. या युद्धांत इंग्लिश फौजेचं नेतृत्व आर्थर वेलस्लीने केलं होतं. त्याने नंतर १८१५ मधें वॉटरलूच्या लढाईत जर्मन जनरल ब्लूखेरच्या मदतीने नेपोलियनला शह दिला.

श्रीरंगपट्टणमधें टिपू सुलतानने बांधलेली तीन उल्लेखनीय स्मारकें आहेत - मशीद, दर्यादौलत व गुंबज. मशीद १७८७ मधें तयार झाली. ८७५ पायऱ्या असणाऱ्या दोन मनोऱ्यांवरून आसपासचा टापू नजरेंत येऊं शकतो. दर्यादौलत बाग किल्ल्याच्या बाहेर केलेली आहे. आणि तिथें टिपूचा ग्रीष्म ऋतूसाठी बांधलेला महाल चांगल्या अवस्थेंत आहे. महालाच्या भिंतींवर टिपूच्या लढायांची चित्रें लावली आहेत. आता या महालाचे संग्रहालय झालेले आहे. गुंबज हे टिपू व त्याचे मातापिता यांचे समाधि-स्थळ आहे. कसब्याच्या आग्नेयेस असलेल्या या देखण्या इमारतींत काळ्या बेसॉल्ट दगडांचे खांब व हस्तीदंती नक्षी जडवलेले दरवाजे आहेत.

किल्ल्याच्या उत्तरटोंकाला असलेल्या रंगनाथ मंदिराचे वेगवेगळे भाग बहुधा निरनिराळ्या शतकांत निर्माण झाले असावेत. रंगनाथस्वामींची मुख्य मूर्ती ४.५ मीटर लांब आहे आणि शेषनागावर पहुडलेली आहे. भगवानाच्या मस्तकावर नागाच्या सात फण्यांचं छत्र आहे आणि पायापाशी लक्ष्मी बसलेली आहे. गौतम ऋषी आणि कावेरीच्या छोट्या मूर्ती जवळच खाली स्थापन केलेल्या आहेत. गाभाऱ्याच्या बाहेर उभे राहूनच देवाचे दर्शन घेता येते.

रंगनाथस्वामी मंदिर



या टापूच्या पूर्वटोंकाला, किल्ल्याच्या बाहेर गंजाम नांवाचे उपनगर आहे ते टिपूने वसवलं होतं. कधी काळी हे नगर अंजीर, कापड आणि कागदाच्या उत्पादनासाठीं प्रसिद्ध होतं. गंजामची एकमेव उल्लेखनीय इमारत म्हणजे इथलं कॅथलिक चर्च. हे प्रसिद्ध फ्रेंच पाद्री एबे दुबोय यांनी बांधलं आहे.

श्रीरंगपट्टणला कावेरी दक्षिणेकडे वळते. सुमारें २५ कि.मी. पुढें, नदीच्या डाव्या तीरावर सोमनाथपूर गांव आहे. इथे होयसळ शैलीचे एक सुरेख मंदिर आहे. ते बेलूर व हळेबीडच्या प्रसिद्ध मंदिरांपेक्षा जास्त चांगल्या अवस्थेंत आहे. होयसळच्या तिसऱ्या नरसिंह राजाच्या एक मंत्री सोमनाथ दंडनायक याने १८५६ मधें हे मंदिर बांधलं. इतर होयसळ मंदिरांप्रमाणेच हे केशवमंदिर ताऱ्याच्या आकारांत बांधलेलं आहे. बाहेरच्या भिंतींवर रामायण - महाभारताच्या कथा कोरलेल्या आहेत. पण गाभाऱ्यांत मात्र निरनिराळ्या १९४ देवीदेवता आहेत. मुख्य गाभारा रिकामा आहे. कधी काळी इथें केशवाची मूर्ती विराजमान होती.

बहुतेक मोठ्या हिंदू मंदिरांचे स्थपती व शिल्पकारांची नांवे कुणाला माहीत नसतात. पण सोमनाथपूर मंदिराच्या बाहेरच्या भिंतींवर त्याच्या शिल्पीचे हस्ताक्षर आहे. एका फरशीवर देणगीदारांची नांवेही कोरलेली दिसतात. असं मानतात कीं सोमनाथ दंडनायकने आणखी चार मंदिरं बांधली होती, त्यांतली आता फक्त दोन शिल्लक आहेत. पंचलिंगेश्वर मंदिर व लक्ष्मीनरसिंह मंदिर. दोन्ही भग्नावस्थेंत आहेत. जर केशवमंदिराची नीट देखभाल व दुरुस्ती केली नाही तर त्याचीही तीच दशा होण्याची भिती आहे.



**सोमनाथपूर**
**केशव मंदिर**





# अर्धा आशिर्वाद - अर्धा शाप

विदेह देशांतल्या कोदंडगिरी गावात कोदंडशेट नांवाचा एक व्यापारी राहात होता. तो इमानेइतबारे व्यापार करीत असे म्हणून गांवातले लोक त्याच्याकडे आदराने पाहात असत. तो आनंदाने जीवन कंठीत होता.

त्याला अरुणा ही एकुलती एक मुलगी. ती सुंदर आणि सुशील होती. मुलगा नसल्यामुळें कोदंडशेटची इच्छा होती कीं त्याच्या एका दूरच्या नातलगाचा मुलगा विनयशील याच्याशी आपल्या मुलीचा विवाह करून त्याला घरजांवई करावा. आपली इच्छा व्यक्त करून त्यावर विचार करण्यासाठी त्याने विनयशीलच्या वडिलांना तसा निरोप पाठवला.

विनयशीलच्या आईला हा प्रस्ताव पसंत पडला. तिने नवऱ्याला सांगितलं, - ''कोदंडशेटना बहुतेक माहीत नसावं की व्यापारांत यंदा आपल्याला किती नुकसान आलंय आणि कर्जाच्या भाराखाली आपण किती अडकलो आहोत ! आणि त्यामुळें तुम्ही विनयशीलला व्यापारासाठीं कुंतलद्वीपलासुद्धां पाठवणार आहात ते !

''जरी कुंतलद्वीपच्या राजाची परवानगी मिळाली असली आणि विनयशीलने जायची सारी तयारी केली असली, तरी मला वाटतं विनयला कुंतलद्वीपला न धाडतां कोदंडशेटच्या मुलीशी त्याचा विवाह करावा. त्याला हुंडा मिळेल त्यांत आपण कर्जफेड करून टाकूं. आणि व्यापारांत जे कांही मिळेल त्यांत आनंदाने गुजराण करूं, व शांततेने जीवन जगूं शकूं. विनयला दूरदेशीं एकटाच पाठवताना आपल्याला जी काळजी लागली असती, त्यातूनही आपण सुटून मोकळे होऊं. आणि कोण जाणे, देवाची कृपा असेल तर इथेंच आपल्या व्यापारांत फिरून चांगले दिवस येतील.''

विनयशील आईचे बोलणे ऐकत होता. त्याला घरजांवई बनण्यापेक्षां आपल्या कष्टाने धन कमावणें जास्त पसंत होते. त्याने आईला म्हटले, "पैशाच्या अडचणीमुळें घाबरून जाऊन तूं असं बोलते आहेस आई ! अडचणी वाईट नसतात, त्यांना भिऊन जाणं मात्र वाईट असतं."

"आपल्या घरांतली आर्थिक परिस्थिती त्या मंडळींना माहिती व्हावी असं मला वाटत नाही. खास करून ज्यांच्याशी आपले नातेसंबंध जुळणार आहेत निदान त्यांना तरी ! जर त्या कुटुंबातल्या मुलीशी माझं लग्न झालं नि मी घरजांवई म्हणून त्यांच्या घरीं राहिलो तर त्यांना खरी आर्थिक परिस्थिती निश्चितच कळेल.

मग त्यांना आपल्याबद्दल काय वाटेल? ते म्हणतील की कर्ज फेडण्यासाठींच आपण त्यांच्याशी संबंध जुळवला आहे. ते आपल्याकडे अनादराच्या नजरेने पाहतील. त्यांच्या मनांतून आपण उतरूं. आणि मला एखाद्या नोकराप्रमाणे त्या घरांत राहावं लागेल. माझ्या म्हणण्याचा अर्थ असा बिलकुल नाही कीं अरुणाशी मी विवाह करण्यास तयार नाही. माझी एवढीच इच्छा आहे की विवाहाच्या अगोदर आपणसुद्धां त्या घराण्याच्या प्रतिष्ठेला योग्य बनावे. कुंतलद्वीपच्या महाराजांकडून तिथें जाण्याचा परवाना मला मिळाला आहेच. तिथें आपल्या देशांतल्या वस्तू दुप्पट दराने विकल्या जातात. तिथं सोनं खूप स्वस्त मिळतं. दोन वर्षांत पैसा मिळवून पुष्कळ सोनं खरीदता येईल आणि आपणही पुन्हां त्यांच्यासारखेच धनवंत व प्रतिष्ठित होऊं शकूं. फक्त दोनच वर्षे वाट पहा आई. फक्त दोन वर्षे."

मुलाचे हे बोलणे ऐकून विनयशीलचे वडील फारच खुष झाले. त्याच्या बोलण्याला दुजोरा देत ते पत्नीला म्हणाले, "आपल्या परिवारास व्यापारी बुद्धी वंशपरंपरागत मिळालेली आहे. विनयशीलमधे एका हुशार व्यापाऱ्याची झलक मला दिसते. संकटात असताना दीनदुःखी होऊन







कुणाच्या समोर वाकणं माझ्याही स्वभावांत नाही." नंतर त्यांनी विनयशीलला हांक मारून सांगितले, "तरीसुद्धां मुला, माझा एक सल्ला आहे. तूं अवश्य कुंतलद्वीपला जा. परंतु जाण्यापूर्वी कोदंडशेटना एकवार भेटण्यास मात्र अवश्य जा."

विनयशील कोदंडशेटना भेटायला त्यांच्याकडे गेला. कोदंडशेटना जेव्हां कळलं की विनयशील व्यापार करण्यासाठी कुंतलद्वीपला जातोय, तेव्हा ते फारच आनंदित झाले. ते म्हणाले, "समुद्र पार करून दूरच्या एखाद्या देशांत जाऊन व्यापार करणं कठीण आणि जबाबदारीचं काम आहे. मला काळजी वाटते, पण तुझी जबरदस्त इच्छा पाहून तुला अडवणं हेदेखील उचित नाही.

"तूं तिथें पैसे मिळव वा ना मिळव, पण जर तूं दोन वर्षांत परत आलास तर माझ्या मुलीचा विवाह मी तुझ्याशीच लावून देईन."

विनयशील अरुणाला भेटला. अरुणाचे सौंदर्य व सुस्वभाव पाहिल्यावर त्याला ती फारच आवडली. त्याने अरुणाला सांगितलं, "तुला भेटल्यानंतर कुंतलद्वीपला जावेसेच वाटत नाही. मला वाटतं कीं तुझ्याशी लग्न करून इथेंच आपण राहावं. तुझ्या वडिलांना पण असंच वाटत होतं.

"पण तुझी काय इच्छा आहे?" जरा वेळ थांबून विनयशीलने तिला विचारले.

"कोदंडगिरी एक छोटेसे गांव आहे" थोडा वेळ विचार करून हंसतमुखाने अरुणा बोलूं लागली.

"इथें मोठ्या व्यापारास नि तुमच्या योग्यतेस व हुशारीस फारसा वाव मिळण्यासारखा नाही या ठिकाणीं! खरे धाडसी व्यापारी नव्या संधीचा शोध सतत करतात. माझी तर इच्छा आहे कीं, तुम्ही समुद्रपार नव्या देशांत जाऊन व्यापारांत खूप यश मिळवावे नि बडे व्यापारी बनावे ! देशविदेशी तुमच्या नांवाचा बोलबाला व्हावा. मला तुम्ही किती कमवाल याची फिकीर नाही,



पण विदेशांत व्यापार करुन परतलेल्या एका यशस्वी व्यापाऱ्याची पत्नी म्हणवण्यांत मला जास्त आनंद आणि अभिमान वाटेल.

दोन वर्षांनंतर तुम्ही जेव्हां एक कुशल नि अनुभवी व्यापारी बनून परदेशांतून परत याल तेव्हां मला फारच आनंद वाटेल. तिथल्या अनुभवाची इथें तुम्हाला आणखी जास्त धन व नांव मिळवण्यास मदतच होईल.

कुंतलद्वीपच्या राजाचा परवानासुद्धां तुम्हाला मिळालेला आहे. या संधीचा योग्य उपयोग करायला हवा! सोनेरी भविष्यासाठीं सध्यां थोड्याशा सुखाचा त्याग करण्यांतच हुशारी आहे."

विनयशील अरुणाला म्हणाला, "आता मला कळलं कीं प्रत्येक पुरुषाच्या यशामागे एखाद्या स्त्रीची प्रेरणा आवश्यक होत असते." अरुणाच्या प्रेमपूर्वक शुभकामना व तिच्या व आपल्या मातापित्यांचा आशिर्वाद घेऊन विनयशील कुंतलद्वीपच्या प्रवासास निघाला.

कुंतलद्वीपमधें विनयशीलला व्यापारांत खूप यश मिळाले. त्याने दोन वर्षांत बरेच धन कमावले. कमाईचा मोठा हिस्सा तो आपल्या मातापित्यांना पाठवत होता त्यांतून ते कर्जफेड करीत एकीकडे व्यापार वाढवत होते. कुंतलद्वीपमधें विनयशीलला एक बुद्धिमान आणि प्रतिष्ठित व्यापारी म्हणून मान मिळायला लागला होता.

तेव्हां अचानक घडलेल्या एका घटनेने सर्वांच्या मनांत काळजीचे काहूर दाटले. कुंतलद्वीपच्या राजावर प्राणांतिक हल्ला केला गेला. सुदैवाने राजा वाचला, परंतु हत्येच्या प्रयत्नाबद्दल तपास करताना हल्लेखोर विदेह देशांत लपून बसल्याची बातमी लागली. त्याबरोबर कुंतलद्वीपच्या राजाने विदेह देशाच्या राजाला दूताकरवी निरोप दिला, "तपासानंतर शाबित झालंय की माझ्यावर हल्ला करणारे कारस्थानी आपल्या देशांत लपले आहेत. आम्ही आपल्या देशाला मित्रदेश मानतो. एका मित्रदेशाच्या नात्याने आपण या गुन्हेगारांचा शोध करणें व त्यांना पकडून आमच्या देशाकडे पाठवणे हे आपले कर्तव्य ठरते.

या गंभीर मामल्यांत आपला पुरेपूर सहयोग जर मिळाला नाही तर आम्हाला असे समजावे लागेल कीं आपण मित्र नसून शत्रू आहात, आणि जाणूनबुजूनच आपण अपराध्यांना आश्रय दिला आहेत."

त्यांना सूचना देताना शेवटीं असंही लिहीलं होतं, "जर आपण तांतडीने कारवाई केली नाहीत तर आमच्या राज्यांत व्यापार किंवा इतर काम करणारे आपल्या देशांतले नागरिक निर्दयपणे मारले जातील."

विदेहचा राजा हे पत्र वाचून फारच कष्टी झाला. त्याने ताबडतोब आपल्या गुप्तहेरांना बोलावून या आरोपांत किती खरेपणा आहे याचा शोध करण्यांस सांगितले. आणि जर हे सत्य असेल तर गुन्हेगारांना लवकर पकडावे. ते कितीही प्रतिष्ठित व्यक्ती कां असेनात असेही फर्मावले.

गुप्तचरांचे जाळें साऱ्या राज्यांत पसरले गेले. व अपराध्यांचा शोध सुरुं झाला. सर्व संशयास्पद व्यक्तींवर कडक नजर ठेवण्यांत आली. विनयशीलचे भावी सासरे देखील यापैकीं एक होते. त्यांच्या एका नातेवाईकाच्या घरीं लग्नाच्या प्रसंगी एक पुरोहित व एक कवी आले होते. त्यांना राहाण्यासाठीं त्यांनी आपल्या घरांतील एक खोली दिली होती.

पुरोहिताने भिंतीवरच्या एका खुंटीवर आपला सदरा अडकवला होता, तो काढताना एकदम फाटला. यावर कविने टिप्पणी केली, "हाडं नाहीत, डोकें नाही, हात आहेत पण पाय नाहीत. फाटला तर काय झालं? घातल्यानंतर त्यांत जीव येईल." असं म्हणून कवी हंसायला लागला.

पुरोहित नाराज होऊन म्हणाला, "आपली कविता बंद करा कविमहाराज! मी सुईदोरा घेऊन आत्ताच शिवून टाकीन."

तेव्हां कवीची दृष्टी खिडकीबाहेर उभ्या असलेल्या अरुणावर पडली. त्याने तिला बोलावून सांगितले, "मला एक आणून दे, ज्याला एक डोळा आहे पण तो कावळा नव्हे, बरोबर त्यालाही आण जो समुद्रासारखा वाढतो, आणि चंद्रासारखा लहान होतो. पण ना तो समुद्र आहे



ना चंद्र. जर हे दोघंही मिळाले तर पुरोहितांची अडचण निभावेल."

असली विचित्र भाषा ऐकून अरुणा घाबरली. अरुणाच्या पित्याने ही गोष्ट ऐकली. त्यांनी कविला फटकारलं, "असली फालतू बडबड करुन मला संकटात लोटूं नकोस. सध्यां देशभर गुप्तहेर फिरत आहेत. जरी त्यांनी तुमची असली व विचित्र बटबट ऐकली तर आपल्या दोघांनाही तुरुंगात जावे लागेल." गुप्तहेर देशभर कां हिंडत आहेत व कुणाला शोधत आहेत याचा खुलासा देखील त्यांनी केला.

कोदंडशेटची घाबरगुंडी पाहून कवी हंसत सुटला आणि म्हणाला, "माझ्या बोलण्यांत कांही एक रहस्य नाही. शेटजी, एकडोळावाली म्हणजे सुई, आणि वाढल्यावर कमी होणारा तो धागा! अलंकारिक भाषा वापरणें हा कवींचा स्वभाव

असतो. आपल्या घरांत आपण आम्हाला आश्रय दिलात याबद्दल मी आपल्याला आशीर्वाद देतो, आणि जो आपल्यला त्रास देईल त्याला माझे शाप!

''कविच्या मुखांतून निघालेले वचन ब्रह्मवाक्यासारखे असते. हे कारस्थानी लपण्यासाठी मंदिरासारख्या जागा शोधतात. मला वाटतं तसंच असेल. अर्धा आशिर्वाद व अर्धा शापाच्या नांवामुळे चमत्कार होतो. आपल्याला तोच आशिर्वाद देतो आहे. असा संकेत आहे कीं तो पक्षी व त्याच्या बाजूला पक्षांचा राजा मानला जाणारा आहे.''

शेटजींना यांतला गूढार्थ कांहीच कळला नाही. पण त्यांच्या घराजवळ हिंडणाऱ्या हेरांना मात्र कवीच्या शब्दांतून गुन्हेगारांबद्दल सांकेतिक माहिती मिळाली होती. त्यांनी कविच्या रहस्यपूर्ण वचनाचा अर्थ असा काढला की हल्लेखोर अशा एका मंदिरात लपले आहेत की ज्याची देवता पक्षांचा राजा गरुड, त्याचा स्वामी म्हणजे विष्णू आहे किंवा विष्णुचा दुसरा एखादा अवतार आहे.

हेरांनी कसून शोध करताना खरोखरच गांवात एक जुने देऊळ सांपडले. ते प्राचीन काळांत गरुडद्वारा प्रतिष्ठापित विष्णूचा अवतार जो नरसिंह भगवान, त्याचे देऊळ होते. त्या देवालयाची नीट छाननी केल्यावर कुंतलद्वीपच्या राजद्रोह्यांचा पत्ता लागला. राजाने त्या सर्वांना कैदेंत टाकले आणि त्यांना कुंतलद्वीपच्या राजाकडे धाडले. विनयशील आणि विदेह देशांतले इतर व्यापारी स्वदेशी सुखरूप परत आले. कोदंडशेटने आपली मुलगी अरुणा हिचा विनयशीलशी विवाह मोठ्या थाटाने साजरा केला, त्यांत महाराजही सहभागी झाले व नव्या दांपत्यास त्यांनी आशिर्वाद दिला. या समारंभात महाराजांनी त्या कवीलाही किंमती उपहार देऊन त्याचा सत्कार केला. कारण त्याच्या रहस्यमय शब्दांच्या संकेताच्या आधारे हेरांना कुंतलद्वीपच्या गुन्हेगारांना पकडता आले होते. आपला राजा व देश यांना एका मोठ्या संकटातून त्याने वाचवले होते.

दोन वर्षांच्या प्रतीक्षेनंतर, विवाह झाल्यावर विनयशील आपल्या व्यापारांतल्या यशाचं सारं श्रेय, अरुणाची प्रेरणा व प्रतीक्षा याला देत होता व स्वतःला भाग्यवान समजत होता. अरुणा आपला पती एक यशस्वी व प्रसिद्ध व्यापारी झाला आहे हे पाहून अभिमानाने व आनंदाने फुलली होती.



# महाभारत

धृतराष्ट्राने आपला पुत्र दुर्योधन याला सावध करण्यासाठीं सांगितलं कीं युद्ध हे सर्वानाच विनाशाकडे नेणारे आहे. कोणत्याही मार्गाने हा विनाश तूं रोखून धर. परंतु दुर्योधन कांही एक ऐकायला तयार नव्हता. तेव्हां सभेंत उपस्थित असलेल्या सर्व राजांना वाटलं की आता युद्ध हे निश्चित होणार, व ते टाळणं आता अशक्य आहे. ते सर्वजण युद्धाची तयारी करण्यासाठी एकामागून एक असे सभेतून उठून निघून गेले.

युद्धांत आपल्या मुलांचाच विजय होईल असें धृतराष्ट्राला वाटत होते. त्याने संजयला एकांतात बोलावून सांगितलं, ''संजय, तूं पांडव आणि कौरवांचे बळ व पराक्रम याबद्दल सर्व कांही जाणतोस. तेव्हां पांडवांच्या पक्षांत असणाऱ्या राजांपैकी कोण राजे उत्साह दर्शवित होते व कोणते राजे उदास होते ते तूं मला सांग.''

संजय म्हणाला, ''राजन, मी आपल्याला एकांतात कांहीही सांगणार नाही. माझे बोलणे ऐकल्यानंतर आपल्या मनांतली ईर्षा जागृत राहील. तेव्हां जर आपण महर्षी व्यास व गांधारी यांना इथें बोलावलं तर ते ठीक होईल.'' त्यांच्या समक्ष मी आपल्याला सर्व कांही सांगेन.

धृतराष्ट्राने व्यास व गांधारी यांस बोलावणे पाठवलं. त्यांच्यादेखत संजयने धृतराष्ट्राला उद्देशून सांगितलं, ''राजन्, कृष्ण व अर्जुन अवतारी पुरुष आहेत, महावीर आहेत. तिन्ही लोकांतले सर्व योद्धे त्यांच्याविरुद्ध उभे राहिले, तरीदेखील कृष्णाला ते पराजित करूं शकणार नाहीत. अशा महान पुरुषाने, कृष्णाने आपल्या पुत्रांचा विनाश करण्याचा निश्चय केलेला आहे.''





"संजय, हे रहस्य तुला कसं ठाऊक? मला हे कां उमजलं नाही?" धृतराष्ट्राने विचारलं.

"राजन्, आपण विद्याविहीन आहात. आपले मन कलुषित झाले आहे, तामसी विचारांनी भरले आहे भरलेले आहे त्यामुळें आपण कृष्णाची शक्ती ओळखूं शकला नाहीत. विद्येमुळेच मी कृष्णाची महानता पूर्णपणे ओळखली आहे." संजयने निःसंकोचपणें व निर्भयपणे उत्तर दिले.

व्यासांनी धृतराष्ट्राला सांगितलं, "कृष्णाचा तुझ्यावर लोभ आहे. संजयला कृष्णाविषयी संपूर्ण माहिती आहे. संजयच्या म्हणण्याप्रमाणें तूं वागलास तर तुझा लाभ होईल, व राज्याची हानी होणार नाही."

उपप्लाव्यहून संजय हस्तिनापुरला परत गेल्यानंतर धर्मराज कृष्णाला म्हणाला, "कृष्णा, या संकटकालीं केवळ मित्रच आम्हाला मदत करुं शकतात. आणि तुझ्याशिवाय आमचा दुसरा कोण मित्र असूं शकेल? तुझ्या भरवंशावरच आम्ही कौरवांचा नाश करण्याचा संकल्प केला आहे. कांहीही होवो, तू आमचा त्राता आहेस. आमच्या रक्षणाचा भार आता तुझ्यावर आहे."

"तुला जे कांही सांगावचंय ते निश्चिंत मनाने सांग, "श्रीकृष्णाने आश्वासन देत सांगितले.

तेव्हां धर्मराज म्हणाला, "सभेंत संजय जे कांही बोलला ते तूं ऐकलंस. त्याने धृतराष्ट्राचेच विचार पुन्हां एकदां सांगितले. धृतराष्ट्र आम्हाला राज्य दिल्यावाचूनच शांतीची बोलणी करत आहेत. त्यांच्यावर विश्वास ठेवल्यामुळें आम्ही कठोर बनवास भोगला. मातोश्री व आमचे हितचिंतक यांना मी कांही एक सुख देऊं शकलो नाही. धृतराष्ट्राने दुर्योधनाच्या बोलण्याला संमती दिली. दुर्योधनाला जे कांही हवं त्याप्रमाणेच ते वागतील.

मी तर फक्त पांच गांवे आम्हाला दिलीत तरी युद्ध होणार नाही इतकं सांगून पाहिलं. पण दुर्योधन त्यालाही तयार नाही!

दारिद्र्यापेक्षां मृत्यू परवडला. आम्ही क्षत्रिय-धर्माचा त्यागही करुं शकत नाही किंवा दुसरी इतर वृत्तीही स्वीकारुं शकत नाही. म्हणून आमच्या शांतिप्रयत्नाच्या व्यतिरिक्त जरी आम्हाला दोषी ठरवण्यांत आलं तरी न्यायासाठीं आम्हाला युद्ध हे करावेच लागेल.

"आता तुम्हीच सांगावे कृष्णा, आपण कोणता मार्ग धरायचा? असल्या परिस्थितीत आमचं कर्तव्य कोणतं असायला हवं?"



श्रीकृष्ण लक्षपूर्वक धर्मराजाची व्यथा ऐकत होते. ते गंभीर स्वरांत म्हणाले, "राजन, माझ्या दृष्टीने पांडव व कौरव सारखेच आहेत. दोन्ही पक्षांचे हित लक्षांत घेऊन मी कौरवांशी बोलणी करीन व आपला हेतू साध्य करण्याचा भरघोस प्रयत्न करीन - या पुण्यकार्यांत जर मला यश मिळाले तर युद्धाची आपत्ती येणार नाही व अनेक निर्दोष लोकांना मी काळाच्या दाढेतून वाचवूं शकेन, व ह्या चांगल्या गोष्टीचे श्रेयदेखील मला मिळेल."

"परंतु दुष्ट दुर्योधन तुमची कल्पना कधीही मानणार नाही. त्याच्याबरोबर असलेले सर्व राजे त्याच्या होला हो करीत असतात. सत्याची बाजू धरून तुम्हाला समर्थन देण्याचे साहस त्या राजांपैकीं कुणाच्यांतच नाही. त्यांच्या वागण्याचा किंवा बोलण्याचा तुम्हाला यत्किंचित जरी त्रास झाला तरी मला ते असह्य होईल" खिन्न मनाने धर्मराज उत्तरले.

श्रीकृष्णाने निर्धाराने सांगितले, "धर्मराज, मी दुर्योधनाला चांगलाच ओळखून आहे. त्याच्या पक्षांतल्या इतर राजांना माझा विचार काय आहे ते सर्वस्वी ठाऊक आहे. माझ्याशी लढण्याचे किंवा माझा अपमान करण्याचे साहस त्यांच्यात नाही. त्यांतून कुणी जर तसा विचार केलाच तर मी त्याचा सर्वनाश करेन.

पण ते अपमान करतील या भीतीने हा शांतीचा अंतिम प्रयत्न जर मी केला नाही तर लोक मला दूषण देतील. माझ्यावर शिंतोडे उडवतील त्यासाठीं, ती मंडळी माझ्याशी कशी कां वागेनात, माझे तिथें जाणें अत्यावश्यक आहे."



श्रीकृष्णाचा दृढनिश्चय पाहून धर्मराज शांत झाले व म्हणाले, "कृष्णा, मी तुला थांबवण्याच्या विचाराने म्हटलं नव्हतं. तुम्ही सांगितलेल्या मार्गावरुनच जाण्याची आम्हा सर्वांची इच्छा आहे. तू हस्तिनापुरला अवश्य जा व शांतीचा हा अंतिम प्रयत्नही करुन पहा. जरूर वाटल्यास कठोरपणे व्यवहार करण्यास संकोच करुं नकोस."

श्रीकृष्णाने समजावणीच्या सुरांत सांगितलं, "धर्मराज, तूं तर धर्माचा आश्रय घेतो आहेस, परंतु दुर्योधन हा अधर्माचा अवतार आहे. क्षत्रिय धर्मानुसार धर्माचे रक्षण करण्यासाठींच युद्ध करायचे असते. जिंकूं किंवा मरुं याचा विचार न करता आता आपण युद्धासाठीं सज्ज असायला हवं. क्षत्रिय कधी भिक्षा मागत नाही. पण आपल्या



योग्य अधिकारासाठी आपल्या स्वाभाविक प्रवृत्तीचा उपयोग करतो.

जोपर्यंत तुम्ही त्यांच्याबद्दल सहानुभूति दाखवत आहात, तोपर्यंत ते तुमच्याशी दुष्टपणाच करीत राहतील. आणि तुमच्या राज्यावर अधिकार गाजवत राहातील. कारण हीच त्यांची आसुरी प्रवृत्ती आहे.'' श्रीकृष्ण बोलत राहिले.

''त्यांनी आजपर्यंत इतके अधर्माने आचरण केले. तुमच्यावर अन्याय केला, त्याविषयी त्यांच्या मनांत पश्चात्तापाची यत्किंचित देखील भावना नाही. ते आपला शांतीचा प्रस्ताव धुडकावतील हे मला निश्चित माहित आहे. आणि तुम्हीही अशा भ्रमांत राहूं नका कीं धृतराष्ट्र किंवा भीष्म पितामह शांतीच्या बाजूने किंवा तुमच्या हिताचा विचार करतील म्हणून ! त्यांच्याबद्दल तुमच्या मनांतली आदरयुक्त भक्ती अस्थानी आहे. त्यांचे तुमच्यावर प्रेम असले तरी धृतराष्ट्र पुत्रमोहाने योग्य निर्णय घेणार नाही व भीष्म पितामह हस्तिनापूरच्या राज्याशी वचनबद्ध आहेत. त्यांच्याकडून कांहीही मार्गदर्शन होणार नाही.

कौरवसभेंत मी त्यांच्या साऱ्या दुष्कृत्यांचा पाढा वाचीन आणि तुमच्या धर्मपरायणतेवर जोर देईन. शांतीसाठी लागतील ते सारे प्रयत्न मी करीन आणि तुमचे हितही ध्यानांत ठेवीन. तरीही सध्याची परिस्थिती पाहून मला वाटतं कीं युद्ध अटळ आहे. जोपर्यंत दुर्योधन जिवंत आहे तोपर्यंत तुम्हाला राज्य मिळणार नाही. म्हणून आता युद्धाच्या तयारीला सुरवात करा.''

तेव्हां भीमानेही श्रीकृष्णास नरमाईच्या सुरांत म्हटले, ''कौरवसभेंत तुमचे जाणे आणि शांतीसाठी प्रयत्न करणें निश्चितच आवश्यक आहे. सर्वांच्या समक्ष दुर्योधनाला समजावून सांगा. त्या राक्षसाची समजूत पटवणें जरी अशक्य असले तरी त्याच्याशी प्रेमाने आणि मैत्रीपूर्ण स्वरांत तुम्ही बोलावे. आमच्या वंशावर विनाशाची सावली पडणार नाही हे तुम्ही पहावे. धर्मराज किंवा अर्जुन यांना, आणि मलाही युद्ध करण्याची मुळीच हौस नाही. युद्ध होऊं नये हीच आम्हा सर्वांची प्रार्थना आहे.''

आजपर्यंत भीमाने कौरवांबद्दल बोलताना इतका प्रेमळपणा कधी दाखवला नव्हता. किंवा शांतीच्या बाबतीत देखील इतके औदार्य दाखवले नव्हते. भीमाचे बोलणें ऐकून श्रीकृष्ण कांहीसा



निराश झाला. भीमाच्या बोलण्यांत दुष्ट कौरवांकडून झालेल्या अपमानाबद्दल तिरस्कार अथवा सूडाची भावना यत्किंचित दिसली नाही. म्हणून भीमाच्या मनांत युद्धाचे विचार भडकवण्याच्या उद्देशाने श्रीकृष्ण म्हणाला.

''भीमा, आज तूं फारच शांत दिसतो आहेस रे ! तूं तर सदा लढायला उतावळा असायचास. धृतराष्ट्राच्या मुलांचा वध करण्याचा तुझा संकल्प तूं विसरलास की काय? दुर्योधनाला ठार मारण्याचे तुझे स्वप्न कुठे गेले? युद्धाची वेळ आलेली नव्हती तेव्हां देखील युद्धाच्या कल्पनेने तुला जेवणाची किंवा झोपेची शुद्ध नरायची, आणि आज तूं शांतीची भीक मागतो आहेस? त्यांच्या पराक्रमाची व ताकदीची तुला भिती तर वाटत नाही ना? आणि त्यासाठी शांतीची इच्छा धरतो आहेस कां? भीम असं बोलूं शकतो याबर माझा खरोखरच विश्वास बसत नाही.

''हा भेकडपणा तुला शोभत नाही भीमा ! तुझ्या अचाट पराक्रमाचा व प्रचंड ताकदीचा तुला विसर पडलाय कीं काय? साऱ्या पृथ्वीवरचा कुणीही महाबली तुझ्या शौर्यापुढें टिकाव धरुं शकणार नाही. तूं कितीतरी मोठमोठी कामें करुन तुझं जीवन कृतकृत्य केलं आहेस. दुसऱ्याने दिलेलं दान स्वीकारण्यापेक्षां, तुझ्यासारखा महावीर योद्धा आपल्या बाहुबळावर मिळवलेलं राज्य चालवणं पसंत करेल.''

श्रीकृष्णाचे बोल ऐकून भीमाचे बाहू स्फुरण पावूं लागले. त्याच्या मनांतली युद्धाची निद्रिस्त भावना चेतवली गेली. तो जरा रागावून म्हणाला, ''कृष्णा, तुझा गैरसमज झालाय. तूं तर मला



इतक्या जवळून ओळखतो आहेस. तरीसुद्धां माझ्या बाबतीत तूं असं म्हणालास? मला माझ्या अचाट शक्तीसामर्थ्यावर जरूर विश्वास आहे. माझ्या हातात सांपडलेला शत्रू, तो कितीही बलदंड असला तरी, तो जिवंत राहूं शकणार नाही. युद्ध होईल ना त्यावेळेला माझा पराक्रम, शौर्य, माझे बळ तेव्हां बघशीलच. मी कोणालाही भीत नाही - मग तो देव असो, दानव असो किंवा यक्ष, किन्नर असो !

''मी फक्त भरतवंशाला सर्वनाशापासून वांचवण्यासाठी शांतीचा प्रस्ताव मांडण्याची इच्छा दाखवली.''

श्रीकृष्णाने मंदस्मित करत म्हटले, ''भीमा, मी तुला कोणत्याही प्रकारें क्षुद्र लेखण्यासाठीं बोललो नाही. तुझ्या शक्तिसामर्थ्याची मला



तुझ्यापेक्षां जास्त जाण आहे. युद्ध करावे असं मलाही वाटत नाही. तेव्हां तुमचे हित लक्षांत ठेवूनच मी शांतीसाठी आटोकाट प्रयत्न करणार आहे. जर माझा शांतीचा प्रयत्न असफल झाला तर मात्र युद्ध निश्चित होईल. अशा परिस्थितीत युद्धाचा सारा भार तुझ्या खांद्यावर राहील. तुला युद्धासाठी तयार करण्याच्या हेतूने मी हे सर्व बोललो. नाहीतर बोललो नसतो.''

त्यावर अर्जुन आपला मनोदय व्यक्त करताना श्रीकृष्णास म्हणाला, ''ज्येष्ठबंधू धर्मराजांनी आपला विचार सांगितलेलाच आहे. मला त्याबद्दल आणखी कांही वेगळं सांगायचं नाही. मी तुझ्याशी प्रत्येक बाबतीत सहमत आहे. तू सांगशील तसंच आम्ही सर्वजण करू. तू जे ठरवशील किंवा करशील, ते आमच्या हिताचंच असेल असा आमचा गाढ विश्वास आहे. जरी त्यासाठी त्यांचा विनाश आवश्यक ठरला तरी आम्ही तेसुद्धां करू. आमचे हित कशामधें आहे याचा निर्णय कृष्णा, तुलाच करायचा आहे.''

अर्जुनाच्या बोलण्याला अनुमोदन देत नकुल म्हणाला, ''कृष्णा, परिस्थितीनुसार तुला उचित वाटेल तसंच तूं करावेस.''

सहदेवाने युद्धाला दुजोरा देत म्हटले, ''जरी कौरवांना युद्ध नको असेल तरीही युद्धासाठी त्यांना प्रवृत्त करावे.''

सात्यकीनेही सहदेवाला पाठिंबा दिला. इतका वेळ गंभीर व गप्प बसलेली द्रौपदी आता पुढे आली. सर्वांनी आपापला विचार कृष्णाला सांगितला होता. डोळे पुसून द्रौपदीने दुःखी व क्रोधित स्वरांत सांगितलं, ''धर्मराजांनी शांती राहावी म्हणून केवळ पांच गांवें मागितली होती, पण दुर्योधनाने तीदेखील दिली नाहीत. आता आम्हाला पूर्ण राज्य हवंय. हे त्यांना जाऊन सांग. तेव्हांच शांती होऊं शकेल. माझ्या दृष्टीकोनांतून हाच धर्म आणि सत्याचा मार्ग आहे. दुष्ट कौरवांचा नाश करण्यास पांडव समर्थ आहेत. आणि जेव्हां तूं आमच्या पक्षांत आहेस तेव्हां भीती कसली?

''दुर्योधनाने माझा अत्यंत वाईट तऱ्हेने अपमान केलाय तरीदेखील अजून तो जिवंत आहे. माझे पांच महावीर पती असूनदेखील, ज्या अपवित्र हातांनी दुःशासनाने माझे केस पकडून मला खेचले होते, ते हात जोपर्यंत छाटले जात नाहीत तोपर्यंत मी शांत राहाणार नाही. तोपर्यंत माझे हृदय सूडाच्या कल्पनेने धगधगत राहील.



जर त्यांनी तहाची गोष्ट काढली, तर या प्रसंगाची त्यांना पुन्हां एकदा आठवण करून द्यायला विसरूं नकोस.''

श्रीकृष्णाने सर्वांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकले होते. जेव्हां सर्वांनी आपापले मत प्रकट केले, तेव्हां श्रीकृष्ण तहाची बोलणी करण्यासाठी जाण्यास तयार झाले. निघण्यापूर्वी सात्यकीला म्हणाले, ''शंख, चक्र, गदा व इतर कांही शस्त्रे रथांत ठेवून दे. दुर्योधन दुष्ट आहे, आणि त्याच्यापेक्षां जास्त दुष्ट आहेत शकुनि व कर्ण! आपण जरी कितीही बलवान असलो तरी शत्रुपक्षाची शक्ती कधी कमी समजूं नये.''

कोणत्याही अनपेक्षित प्रतिक्रियेसाठी आपण सदैव सज्ज राहिलं पाहिजे. आपल्या अपेक्षेनुसार शत्रू सहसा वागत नाही. आणि त्याच्या कुठल्याही खेळीला आपण पोरखेळ समजता कामा नये.

श्रीकृष्ण व सात्यकी रथांत बसून निघाले. पांडव, चेकितान, धृष्टकेतू, द्रुपद, काशिराज, धृष्टद्युम्न, विराट इत्यादि राजे थोड्या अंतरापर्यंत त्यांना पोंचवण्यास गेले.

निरोप देताना धर्मराजाने श्रीकृष्णाला आलिंगन दिले आणि म्हटले, ''कुंतीमातेची विचारपूस करून ये. त्यांनी आम्हाला फार लाडाकोडांत वाढवलंय. आमच्यामुळें मातेला खूप कष्ट भोगावे लागत आहेत. आम्हा सर्वांतर्फे तिला भेटून तिला आश्वासन द्यावे. आम्हीही मातेचे दर्शन घेण्यास उत्सुक आहोत. तिच्या आशिर्वादामुळेंच आम्ही अद्याप सुखरूप आहोत. तिला आम्हा सर्वांचे प्रणाम सांगावेत. धृतराष्ट्र, भीष्म, द्रोण, कृपाचार्य, बाह्लिक, सोमदत्त वगैरे सर्व वडील मंडळींस आमचे प्रणाम विदुरकाकांस माझे सप्रेम नमस्कार सांगावे'' श्रीकृष्णास निरोप देऊन सर्वजण परतले.

त्या रात्री श्रीकृष्णाने वृकस्थल गांवात विश्रांति घेतली. गांवातल्या प्रमुख नागरिकांनी त्याचे उचित स्वागत केले. श्रीकृष्णानेदेखील आपल्या अतिथीगृहांत या सर्वांची आस्थेने भेट घेतली.



# दंबोध्भव

दंबोध्भव एक हुशार राजा होता. त्याचे राज्य धनवान व ऐश्वर्यसंपन्न होते. तो धर्मपरायण असून अतिशय चांगल्या तऱ्हेने राज्यकारभार चालवीत होता. फक्त त्याचा स्वभाव जास्त अहंकारी व अति महत्त्वाकांक्षी होता.

सगळ्या नागरिकांनी त्याला सर्वश्रेष्ठ राजा व एक महान पुरुष मानून त्याचा गुणगौरव करावा अशी त्यांची आत्यंतिक इच्छा होती. ही भावना दिवसेंदिवस वाढत चालली होती. सिंहासनावर बसल्यानंतर तो रोज प्रश्न विचारीत असे, "मित्रांनो, सेनाधिकाऱ्यांनो राजप्रतिनिधींनो, माझ्यापेक्षा अधिक श्रेष्ठ, बलवान व महान व्यक्ती या पृथ्वीतलावर आहे का ते सांगा !"

राजाचा राग ओढवून घेण्याची कुणाचीच इच्छा नसे. सर्वजण मोठ्या आवाजांत म्हणत, "नाही प्रभो ! कुणीही नाही. आपली बरोबरी करणारा राजा या धरतीवर नाहीच नाही."

हे ऐकून राजा आनंदाने अतिप्रसन्न होत असे. काही दिवसानंतर राजाला भेटायला एक मुनी आला. राजाने मुनींना तोच प्रश्न विचारला. मुनीवर्यांनी निर्भयपणे, संकोच न बाळगता सांगितले "हो राजन, जरूर आहेत! एकच नाही, दोघेजण आहेत." "कोण आहेत ते? आणि राहतात तरी कुठे?" राजाने आश्चर्यचकित होऊन विचारले. "ते नर-नारायण आहेत. ते गंधमादनपर्वताच्या शिखरावर राहातात आणि जगांतल्या सर्व मानवांमध्ये ते श्रेष्ठ आहेत." एवढं बोलून मुनी निघून गेले.

मुनींच्या उत्तरामुळें राजा संतापला व आपली सेना बरोबर घेऊन गंधमादन पर्वताकडे चालूं लागला. तिथें पोंचल्यानंतर पाहिलं तर दुर्बल दिसणारे दोन मुनी शिखरावर बसलेले होते व तपस्येत मग्न होते.

त्यांना पाहून दंबोध्भव फारच निराश झाला. परंतु इतक्या दूरवर आला होता, तेव्हां निमूटपणे परत जाणेही त्याला सुचेना. त्याने त्या मुनींना मोठ्याने हाक मारली. पण मुनींनी डोळे उघडले नाहीत. ते शांत, ध्यानमग्न होते. राजाने त्यांची तपस्याभंग करण्याचे प्रयत्न केले, पण ते दोघे शांत होते. शेवटी चिडून राजा त्यांना वाईट शब्द बोलूं लागला.

तेव्हां मात्र एका मुनींनी डोळे उघडले. त्यांनी जवळच पडलेली गवताची एक लहानशी काडी घेतली, तिचे चार भाग करून राजाच्या सैनिकांच्या दिशेने भिरकावले. दुसऱ्याच क्षणीं सर्व सैनिक आंधळे झाले व त्यांचे स्वरूपही विकृत दिसूं लागले.

दंबोध्भवाला लगेच कळून चुकले कीं मुनीवर्यांच्या तपोबल व आध्यात्मिक शक्तीपुढें त्याचे सैनिकबळ क्षुद्र ठरले होते. त्याचा उन्मत्तपणा क्षणार्धातच वितळला. आपल्या अपराधाची क्षमा मागून त्याने नर-नारायणांच्या, पायांशी लोटांगण घातले. मुनीवर्यांनी त्याला क्षमा केली व राजाला सदुपदेश केला, "प्रजेवर प्रेमभाव राहूं दे. अहंकारावर ताबा ठेवलास तरच तूं खरोखर श्रेष्ठ राजा मानला जाशील."

आपल्या राज्यांत परतल्यानंतर दंबोध्भवाने प्रजेवर प्रेमभाव ठेवून राज्याची सेवा केली आणि सुखाने व शांतीने आपले जीवन व्यतीत केले.



जे इंग्रजांशी लढले ८

# राणी चेन्नम्मा

◆ कथा : मीरा उग्र
◆ चित्र : गौतम सेन

कित्तूर हे भारताच्या नैऋत्येला एक छोटं परंतु समृद्ध राज्य होतं.



धारवाडमध्ये राहणाऱ्या इंग्लिश पोलिटिकल एजंट थॅकरेने राजाच्या दत्तकपुत्राला गादीचा वारस मानण्यास नकार दिला.



कित्तूरचा राजा शिवलिंग रुद्र सर्जाचा १८२६ मध्ये मृत्यू झाला. मरतेसमयी त्याने आपल्या लहान दत्तक पुत्राला आपली सावत्र आई चेन्नम्मा हिच्या हवाली केले.




काही दिवसानंतर -







दोन्ही पक्षांनी लढाईची तयारी केली. २३ ऑक्टोबरला थॅकरे सैन्यासह येऊन पोंचला
किल्ल्यात या उघडा!
राणी चेन्नम्मांचा हुकूम आहे की आपल्याला आत येऊं द्यायचें नाही


आपल्या राणीला सांगा की वीस मिनिटांच्या आंत तुम्ही शरण या, नाहीतर गोळीबार होईल


सर्वजण श्वास रोखून राणीच्या उत्तराची वाट पहात होते. वीस मिनिटांची मुदत पूर्ण व्हायला आली होती तोच
पुढे चला
धावा पळा!


अचानक झालेल्या हल्ल्याने इंग्रज बावरले
या दुष्टांनी....


आह!
इंग्रजांना धूळ चारली गेली. शेवटी ठार झालेल्यांत थॅकरेही होता.




परंतु चेन्नम्माला ठाऊक होतं की पुढची लढाई अटळ आहे.
जास्त सैनिक भरती करा. कोल्हापूरच्या राजाच्याकडे मदतीसाठी संदेश पाठवा.
राणीच्या दूतांना इंग्रजांनी कोल्हापूरच्या रस्त्यांत पकडून नेलं.


परंतु प्रजाजन आपल्या राणीच्या मदतीस आले.
तरुण काय, वृद्ध काय, आपल्या बाजूने लढायला सगळे आले आहेत राणीसाहेब!


हे रायण्णा, संगोली गांवचे चौकीदार.
या, या, रायण्णा! आपल्यासारख्यांची आम्हाला गरज आहे.


१ डिसेंबरला कर्नल मॅक्लॉइडने २५,००० सैनिक व तोफांसह किल्ल्याला वेढा घातला.
किल्ला फार मजबूत आहे आणि लोक खूप लढवय्ये आहेत. पण किल्ल्यांतलाच कुणीतरी आपल्या मदतीला येईल.


दोन दिवसानंतर इंग्रजांनी किल्ल्यावर गोळीबार सुरू केला.
BOOM!
धाम!

















# गिधाडछाप नाकाची जादुगारीण

ललिता भरद्वाजची एकुलती एक मुलगी होती. ललिताला नरहरी आवडत असे ही गोष्ट सर्वांना माहिती होती.

ललिताला बारावे वर्ष लागले तेव्हां भरद्वाज व्यापारासाठी शहरांत आला. कांही वर्षांतच तो लखपती बनला होता आणि शहरांतला एक प्रतिष्ठित व्यापारी झाला.

नरहरी गांवातल्या शेतकऱ्याचा मुलगा होता. आता भरद्वाजाला आपल्या मुलीचे लग्न शेतकऱ्याशी व्हावे हे पसंत नव्हते, पण ललिता इतर कुणाशीही लग्न करायला तयार नव्हती. भरद्वाजने ललिताला खूप समजावलं, पण ललिता हटून बसली. ललिताच्या आईने देखील ललिताचा विवाह नरहरीशी व्हावा म्हणून आपल्या पतीला विनंती केली.

लग्नाच्याबद्दल बोलणी करण्यासाठी भरद्वाज आपल्या गांवी गेला. परत आल्यानंतर तो ललिताला रागाने म्हणाला, "नरहरीला तूं विसरून जा. आता त्याच्याशी तुझं लग्न कधीच होऊं शकणार नाही." पित्याचे बोलणें ऐकून ललिता खूप उदास झाली.

ललिताची आईदेखील काळजींत पडली. तिने आपल्या पतीला विचारलं, "काय झालंय ते नीट सांगत कां नाही तुम्ही?" भरद्वाजने सांगितलं, "दोन महिन्यांपूर्वी नरहरी घर सोडून गेला आहे. नुकतंच कळलंय कीं तो गांवाच्या पूर्वेला असलेल्या जंगलात एका तलावाच्या किनारी, एका लहानशा झोंपडीत राहात आहे. तो घरांतल्या मंडळींना देखील भेटत नाही, त्यांच्याशी बोलत नाही; सगळेजण म्हणतात कीं त्याने संन्यास घेतला आहे. अशा संन्याशाला मी कशी माझी मुलगी देईन?" "असं असलं तर आपण आपल्या मुलीचं लग्न त्याच्याशी कधीच करून देणार नाही." पत्नीनेदेखील भरद्वाजची री ओढली.

तिने मुलीला समजावलं, "तुझे वडील बरोबर सांगत आहेत. नरहरीला तूं विसरून जा. त्याला निश्चित कांहीतरी झालंय. नाहीतर आईवडिलांना सोडून तो जंगलात कशाला राहील? सर्वांशी अबोला कां धरील? तूं त्याला विसरून जा. हट्टाने जर त्याच्याशी लग्न केलंस तर तुझं आयुष्य बरबाद होईल. मी आई आहे तुझी! तुला मी दुःखी पाहूं शकणार नाही."



आईचे बोलणें ऐकून ललिता रडायला लागली. रात्रभर तिला झोंप लागली नाही. ती विचार करूं लागली की त्याने घर कां सोडलं असेल? खरोखरीच त्याच्या मनांत संसाराबद्दल वैराग्य उत्पन्न झालं असेल कां? कीं माझ्याकडून निराशा झाली म्हणून त्याने हा निश्चय केला आहे? किंवा एखाद्या संकटात फसून गेल्यामुळें त्याने हा निर्णय कदाचित घेतला असेल. तिने मनांत विचार केला कीं नरहरीला भेटल्यावरच खरं काय ते कळेल.

त्या रात्रीनंतर, पहाटे तिचे आईवडील झोंपेत असतानाच, ललिता आपला जीव धोक्यांत घालून, नरहरीला भेटण्यास एकटीच निघाली. गांवाबाहेर जंगलात त्याची झोंपडी शोधताशोधता संध्याकाळ झाली. त्यावेळेस नरहरी तलावाच्या कांठी बसला होता.

ललिताला बघून तो स्तंभित झाला. त्याच्याजवळ बसत ती म्हणाली, "हा अवेळीं अरण्यवास कशासाठी? संन्याशाचं जीवन जगायचं व्रत तुम्ही घेतलं आहेत कां? कीं कोणावर रुसून, रागावून हा निर्णय घेतला आहेत?"

तिच्या प्रश्नांना उत्तर न देताच नाराजीने नरहरी म्हणाला, "तूं इथें कां आलीस? तीसुद्धां एकटी?"

"आपल्या लग्नासंबंधी बोलायला !" न घाबरता, न कचरता निर्भयपणें ललिताने उत्तर दिले.

"लग्नाची गोष्टच काढूं नकोस आणि ताबडतोब इथून निघून जा." नरहरीने जास्तच रागावून तिला सांगितले.

"नाही जाणार. कारण समजल्यानंतरच इथून जाईन. तुम्ही मला सांगितलंच पाहिजे कीं घर सोडून इथें अरण्यांत कां राहात आहात?" ललितेच्या स्वरांत निग्रह होता.

"कोणत्याही परिस्थितींत मी तुला कारण सांगणार नाही. आणि आपलं हित पाहाणार असशील तर ताबडतोब इथून निघून परत जा." रागीट स्वरांत बोलताबोलता तो झटकन उठून झोंपडीत गेला व त्याने आंतून दरवाजा बंद केला.

अगतिक होऊन ललिता रडतरडत परतीच्या वाटेला लागली. सूर्यास्त होऊन गेला होता. अंधार पडूं लागला होता. थोड्याच वेळांत भयानक



काळोखी रात्र साऱ्या धरतीवर पसरली असती. तिचे मन विदीर्ण झाले होते.

"हीच कां माझ्या उरलेल्या आयुष्याची कहाणी?" तिने तारे दिसतील म्हणून आकाशाकडे पाहिले, पण राक्षसी ढगांनी त्यांना झांकून टाकले होते.

लौकरच वादळी वाऱ्यांच्या आवाजाने जंगल अस्वस्थ झाले. हरीण व इतर वन्य पशु भयभीत होऊन आसऱ्यासाठी इकडेतिकडे पळूं लागले. विजा चमकूं लागल्या आणि ढगांच्या गर्जनेबरोबर पाऊस सुरुं झाला. एकदां ललिताने ठरवले कीं तसेच पुढें जायचे. पण एका अज्ञात प्रेरणेने खेंचून तिला पुन्हां नरहरीच्या झोंपडीपाशी परत आणले. तिने खूप वेळ दरवाजा ठोठावला पण उघडला गेला नाही. खिडकीच्या मधल्या बारीक भोंकातून, आंत तेवणाऱ्या दिव्याच्या ज्योतीच्या मंद प्रकाशाची एक रेषा, बाहेरच्या अंधारात स्पष्ट दिसत होती. तीच तिची भाग्यरेखा बनणार आहे हे ललिताला ठाऊक नव्हतं. तिने जेव्हां त्या फटींतून आंत पाहिले तेव्हां ती एकदम घाबरली, जी धैर्यवती वादळी रात्रीलाही भ्यायली नव्हती, ती झोंपडीतले दृश्य पाहून भितीने सुन्न झाली.

नरहरीच्या जागी आंत खाटेवर एक मोठे गिधाड झोपले होते. तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले. ती निचेष्ट होऊन तिथेंच बेशुद्ध पडली.

उजाडल्यानंतर नरहरी जेव्हां दार उघडून बाहेर आला तेव्हां ललिताला तिथें पाहून चकितच झाला. नरहरीने जेव्हां तिला जोराने हलवून उठवले तेव्हां तिची शुद्ध परत आली. शुद्धीवर आल्यावर तिने विचारले, "काल रात्री तुम्ही कुठे होतात? तुमच्या खाटेवर तर एक मोठे गिधाड होते."

हे ऐकून नरहरीने एक मोठा उसासा सोडला व



म्हणाला, "ओहो? तर तूं गिधाडाला पाहिलंस?" थोडा वेळ गप्प बसून तो पुढें म्हणाला, "तुला गिधाडाचे रहस्य कळावे अशी माझी इच्छा नव्हती. पण आता तूं पाहिलंच आहेस तेव्हां त्याची पूर्ण कहाणी मी तुला सांगतो.

"दोन महिन्यांपूर्वी तुला भेटायला मी शहराकडे निघालो. लवकर पोंचावे म्हणून जंगलातल्या वाटेने शहराकडे जात होतो. तिथें एक झोंपडी होती. त्याच्यासमोर खाटेवर एक भेसूर व अक्राळविक्राळ दिसणारी स्त्री बसलेली होती. तिचे केस तांबूस रंगाचे होते आणि ती ते विंचरत होती.

तिचा रंग काळाकुट्ट व नाक गिधाडासारखं होतं. लाल घोंगडीसारखा अंगरखा तिने घातला होता.

मला पाहून ती म्हणाली, "फार दिवसांनी एखादा सुंदर तरुण दिसला आहे. कुठे जातो आहेस रे तरुणा?"



मी शुष्क स्वरांत म्हटलं, "मी माझ्या भावी पत्नीला भेटायला जातो आहे. तुला यांत कांही स्वारस्य आहे थोडंच?"

"हो, हो, जरूर स्वारस्य आहे. मलादेखील लग्न करायचं आहे. मीसुद्धां एक कुमारी आहे. चल, आपण दोघंजण लग्न करुं या." ती आपलं गिधाडछाप लांब नाक पुढें आणत मला म्हणाली.

"तूंच मला सुंदर तरुण म्हटलं आहेस. पण तूं कधी आरशांत तुझं रूप पाहिलं आहेस कां? तुझं नाक गिधाडछाप आहे आणि किती काळुंद्री कुरूप दिसेतस तूं !

माझ्या तोंडून हे कटु शब्द सहजच निघाले होते. यावर तिला खूप राग आला. डोळे लाल करत ती म्हणाली, "गिधाडछाप नाकाची असं म्हणून तूं माझा अपमान करतो आहेस. बरं तर, आता तूंही रात्री अंधार झाला कीं गिधाड बनशील आणि दिवसा मनुष्य होऊन नाना प्रकारच्या यातना सोसत राहाशील." इतकं बोलून तिने कांही मंत्र उच्चारले.

तेव्हां मला समजलं कीं ती जादुगारीण आहे आणि तिने आपल्या जादूचा प्रयोग माझ्यावर केलेला आहे. तरीही तिच्या जादूची फिकीर न करता मी पुढें चालूं लागलो. जेव्हां रात्र झाली तेव्हां शरीरांतून असह्य गरम वाफा निघूं लागल्या आणि बघताबघता माझं एका गिधाडांत परिवर्तन झालं. रात्रभर मी एका झाडावर बसून राहिलो. सकाळ होताच मी पुन्हां जेव्हां मनुष्य बनलो तेव्हां मी जादुगारणीजवळ जाऊन खूप विनवणी केली, पश्चात्ताप व्यक्त केला, आणि तिचा अपमान केल्याबद्दल तिची क्षमा मागितली; पण तिने आपली जादू परत घेतली नाही.

"आता तिच्या शापाच्या ज्वाळेंत मी आयुष्यभर होरपळणार हीच माझी नियती आहे." नरहरी दीर्घ श्वास घेऊन बोलला. "हे रहस्य कुणाला कळावं ही माझी इच्छा नाही. कारण त्याचा सर्वांना त्रास होईल. म्हणून मी एकटाच निमूटपणें या नरकयातना भोगतो आहे."

ललिताने मनाशी निश्चय केला कीं एकतर ती नरहरीस जादुगारणीच्या शापांतून मुक्त करेल किंवा प्राणत्याग करेल. हा दृढ संकल्प ठरवून ती जादुगारणीला भेटायला निघाली.

जादुगारणीच्याकडे पोंचेपर्यंत दुपार होऊन गेली होती. त्यावेळीं ती बाजेवर आरामशीरपणें फुटाणे खात होती.

ललिता सख्ख्या बहिणीप्रमाणें तिच्या शेजारीच जाऊन बसताना म्हणाली, "ताई, ही तर जेवायची वेळ आहे. मग चणे खाऊन पोट कशाला भरतेस? म्हणूनच तूं इतकी हाडकुळी नि बारीक आहेस."

ललिताच्या आवाजात आपुलकीचा गोडवा



पुरेपूर भरला होता. "कोण आहेस ग तूं? नातं जोडते आहेस आणि माझ्या बाजेवर शेजारी अशी बसली आहेस की जसं कांही आपलं जुनं नातंच आहे." जादुगारीण नाराजीने उद्गारली. "तुझी बहीणच समज. पण भावोजी कुठे आहेत?"

इकडेतिकडे पाहात, तिच्या गळ्यांत हात घालत ललिताने विचारले.

"इतकं कुठलं माझं भाग्य? बहुतेक मी जन्मभर कुमारीच राहीन आणि माझ्या मंत्राचा अंत माझ्याबरोबरच होईल." जादुगारीण हताश सुरांत म्हणाली.

"असं कशाला म्हणतेस, ताई? हे काम तुला करणं अशक्य आहे थोडंच? जर तुला एखादा तरुण पसंत असेल तर आपल्या मंत्रशक्तीने त्याचं मन कां नाही वळवत?" ललिता हंसून म्हणाली.

जादुगारणीने एक उसासा सोडला आणि म्हणाली, "हो ग! पण मला हे कसं जमलं असतं? हिमालयातल्या गुंफेतून एक जादूगार आला होता. त्याच्याकडून मी इतरांना त्रास देणारे, नुकसान करणारे दुष्ट मंत्र तर घेतलेच, परंतु इतरांच्या भल्यासाठीं शुभमंत्र, देवमंत्र, मन बदलणारे मंत्र, दुसऱ्यांचे विचार जाणणारे मंत्र, हे मला नाही शिकता आले ! कारण तो जादूगार अचानक जलप्रवाहांत अंतर्धान पावला.

इतक्यांत बाजूच्या रताळ्याच्या वाफ्यांत एक साळू घुसली, आणि आपल्या पायांनी रोपं कुरतडायला लागली. जादुगारिणी ने कांही मंत्र पुटपुटत तिच्यावर एक खडा फेंकला आणि साळूचे त्वरित एका सरड्यामधें रुपांतर झालं.

"अय्या ताई ! फारच अद्भुत हं !" टाळी वाजवून ललिताने तिचे मन जिंकण्याचा प्रयत्न केला. ती पुढें म्हणाली, "आता याची पुन्हां साळू



होऊं शकेल ना ग ताई?"

"सांगितलं ना ! प्रतिशमन मंत्र मला येत नाहीत. याचा आणखी क्षुद्र किडासुद्धां मी बनवूं शकते. परंतु आता याची पुन्हां साळू नाही मला करता येणार. पण माझं रूप मात्र मी वाटेल तसं बदलूं शकते."

ललिता म्हणाली, "तर मग आता ही साळू कायमची सरडाच होऊन रहाणार आणि कधीही मुक्त होणार नाही? मेल्यानंतर सुद्धां नाही?"

जादुगारीण उपहासाने हंसत म्हणाली, "जरूर मुक्त होईल या जन्मांत, पण मी मेल्यानंतर! प्रत्येक जादुगाराच्या मृत्यूनंतर त्याची जादू व मंत्रातंत्राचा प्रभाव नाहीसा होतो." थोडा वेळ ललिता गप्प बसली. नंतर थोडा विचार करून म्हणाली, "आता आपण खऱ्याच जावाजावा बनणार आहोत. माझ्या थोरल्या दिराशी तुझे लग्न होणार आहे."

"खरंच? पण कसं? मला तर सगळेच कुरूप ठरवून नाकारतात. तुझ्या दिरांना माझ्याशी लग्न करायला तूं गळ घालणार आहेस कां?"

"आता ताई तूं समजच कीं तुझा भाग्योदय झाला म्हणून ! माझ्या दिरांना एका महात्म्याने रागावून शाप दिलेला आहे कीं जर तूं सुंदर मुलीशी लग्न केलंसतर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील. म्हणून माझे दीर अजून अविवाहित आहेत. खूप दिवसांपासून आम्ही त्यांच्यासाठी एखाद्या कुरूप मुलीच्या शोधांत आहोत. सुदैवाने आज तू भेटलीस. म्हणून तर तुला पाहिल्याबरोबरच मी तुला ताई असं म्हटलं होतं," ललिता म्हणाली.

खूष होऊन जादुगारीण उत्साहाने बोलली, "वा वा! आज माझा कुरूप चेहराच वरदान ठरला. शुभकार्याला उशीर कशाला? चल, आत्ताच मला तुझ्या दिरांकडे घेऊन चल."

"हां हां, धीर धर जरा. माझे दीर तुला पसंत पडतील कीं नाही याचाही जरा विचार कर. समजा, तुला ते आवडले नाहीत तर...? त्यापेक्षां तूं अगोदर त्यांना बघ आणि नंतरच लग्नाची गोष्ट काढूं या." ललिताने मोठ्या चतुरपणें सांगितले.

"हा चांगला सल्ला दिलाय हं ! मी तुझ्यासोबत पोपट बनून येते. तुझे दीर जर मला पसंत पडले तर मी तिथेंच माझ्या खऱ्या स्वरूपांत येईन." एवढं म्हणून जादुगारीण पोपट बनून ललिताच्या हातावर बसली. ललिताने झटकन पोपटाची मान मुरगळली आणि त्याचे पंख उपटून टाकून, त्याच्या मांसाचे लचके तोडले. मेलेल्या पोपटाला घेऊन ती नरहरीला भेटायला गेली. नरहरीकडे पोंचेपर्यंत रात्र झाली होती. नरहरीचे गिधाडांत रूप बदललेले होते. ललिताने मेलेला पोपट गिधाडाजवळ फेकून म्हटले, "ही आहे तुझी दुष्ट, गिधाडछाप नाकवाली जादुगारीण ! मी हिला मारून टाकली आहे. आता तूं हिच्या जादूतून मोकळा आहेस."

नरहरी शापमुक्त होऊन आपल्या खऱ्या रूपांत बदलला. नरहरी म्हणाला, "आज तूं मला एक नवा जन्म दिला आहेस. मी आजन्मच नाही, जन्मजन्मांतरी तुझा ऋणी राहीन."

ललिता स्मितहास्य करून म्हणाली, "तुम्हाला माहीत नाही का? प्रेमाच्या ऋणाच्या बंधनात असलेले आत्मेच पतीपत्नी होऊन पृथ्वीवर येतात.





# गप्प

एकदा गांवातून तिघेजण जवळच्या शहरांत खरेदीसाठी गेले होते. रात्र झाल्यामुळे त्यांनी एका धर्मशाळेंत उतरायचे ठरवले. त्या तिघांत एक गुराखी, एक चौकीदार व एक माळी होता.

गुराखी म्हणाला, "जेव्हां मी म्हशींसारखा ओरडतो, तेव्हां आजूबाजूच्या गांवातली चरणारी गुरं भीतीने उभी राहातात.

चौकीदार म्हणाला, "जेव्हां मी आवाज लावतो तेव्हां चोर भिऊन लपून बसतात. चित्तादेखील गांवाकडे येत असला तरी तो परत जंगलाच्या दिशेला पळायला लागतो.

माळी म्हणाला, "तुम्ही तर असल्या लहानसहान गप्पा मारता आहात. मी जेव्हां कोंबड्यासारखी बांग देतो तेव्हां सूर्य उगवतो.

धर्मशाळेच्या त्या दालनांत आणखी एक गृहस्थ अगोदरच आलेला होता व झोंपल्याचं सोंग करून गुपचूप बसला होता. त्याने विचार केला की या तिन्ही बातारामांची परीक्षा घ्यायलाच हवी. म्हणून त्याने चित्त्यासारखा आवाज काढून जोरदार डरकाळी फोडली. तो आवाज ऐकताच तिघेही धर्मशाळा सोडून पळत सुटले.

**- रामवरपु गणेशराव**








## पाकिस्तान -
## जिथें लोकशाही आक्रंदत आहे

आपल्या सुवर्णभूमीची, हिंदुस्तानची फाळणी १९४७ मधें झाली. मोठ्या भागाचे नांव हिंदुस्तान उर्फ भारत असे राहिले, व छोट्या विभागाचे नांव झाले पाकिस्तान.

हिंदुस्तानात म्हणजे भारतात सर्वधर्मसमभाव होता. कोणताही एक धर्म हा देशाचा अधिकृत सरकारी धर्म नव्हता. पाकिस्तानने मात्र आपण इस्लामी प्रजासत्ताक असल्याचे १९५६ मधें घोषित केले.

स्वातंत्र्य मिळाले तेव्हां दोन्ही देशांनी लोकशाही स्वीकारण्याची शपथ घेतली होती. लोकशाहीत नियमितपणे निवडणुका घेऊन राज्यकर्ते निवडण्याचे स्वातंत्र्य जनतेला असते. लोकशाही पद्धतीचे कांही तोटेही आहेत, पण तिचा सर्वांत मोठा फायदा म्हणजे लोकांच्या इच्छेप्रमाणेंच अखेर निर्णय होतो. वेळोवेळीं ते त्यांचे शासक शांततेच्या मार्गानें बदलूं शकतात. पण जर एखादा सत्तालोलुप हुकुमशहा देशावर राज्य करूं लागला, तर मात्र राज्यक्रांति खेरीज त्याला सत्तेवरून खाली खेंचता येत नाही.

आपला भारत अजून एक सर्वधर्मी, लोकशाही राष्ट्र आहे ही फार मोठी अभिमानास्पद गोष्ट आहे. आपला देश ही जगातली सर्वांत मोठी लोकशाही! पण दुर्दैवाने पाकिस्तानामध्ये मात्र तशी परिस्थिती नाही. १९५८ मधें फिल्डमार्शल अयूबखानने कट रचून सत्ता हस्तगत केली. त्याने घटना बदलली व सर्व अधिकार स्वतःकडे घेऊन तो हुकुमशहा बनला. त्याला ज. याह्याखान हा शेरास सव्वा शेर भेटला व त्याने सत्ता गिळंकृत करून १९६९ मधें अयूबखानाला सत्ताभ्रष्ट केले.

१९७१ मधें याह्याखानच्या राजवटीत पूर्व पाकिस्तानच्या (पूर्वीचा पूर्व बंगाल व आताचा बांगलादेश) प्रजेवर एक क्रूर दडपशाही लादली होती. पूर्व पाकिस्तानांतले लाखों बंगाली - हिंदु व मुसलमान, - निर्वासित होऊन भारतांत आले. म्हणून भारताला त्याची दखल घेणें भाग पडले. बांगलादेशींबरोबर भारतीय सेना डाक्क्यापर्यंत गेली व तिने पाकिस्तानी सैन्याला पराभूत केले. स्वतंत्र बांगला देशाचा असा जन्म झाला.

हरलेल्या व फजिती पावलेल्या याह्याखानाने राज्यसत्ता भुत्तो या एका राजकीय पुढाऱ्याकडे सुपूर्द केली. पुढें १९७७ मधें, पुन्हां राजकीय उलथापालथ झाली व जनरल हक झिया-उल-हक याने सत्ता काबीज केली. त्याने लोकशाही पुन्हां प्रस्थापित करण्याचे वचन दिले; पण त्याने आपला शब्द पाळला नाही. त्याने भुत्तोवर खुनाचा आरोप ठेवला व त्याला फांशी दिले. १९८८ मधें झिया-उल-हक एका रहस्यमय विमान अपघातात मरण पावला.

त्यानंतर निवडणुका झाल्या व पाकिस्तान पीपल्स् पार्टीचे नेतृत्व करणारी भुत्तोंची मुलगी, बेनझीर भुत्तो,

पाकिस्तानची पंतप्रधान बनली.

पण तिची कारकीर्द अल्प मुदतीचीच ठरली. राष्ट्राध्यक्ष गुलाम इसाकखान यांनी तिला पदच्युत केले. १९९० सालच्या निवडणुकीत इस्लामी जामहुरी पार्टीचे नवाझ शरीफ पंतप्रधान बनले. राष्ट्राध्यक्षांनी त्यांना १९९३ मधें पदच्युत केले. त्यानंतरच्या निवडणुकींत बेनझीर भुत्तो जिंकून पुन्हां पंतप्रधान बनली. १९९७ मधें तिला सत्ताभ्रष्ट करून नवाझ शरीफ पंतप्रधान झाले.

१२ ऑक्टोबर १९९९ रोजी, सरसेनापती जनरल परवेझ मुशर्रफ, ज्यांना पंतप्रधानांनी काढून टाकले होते, त्यांनी बंडाळी केली व आकस्मिकरित्या सत्ता काबीज केली. शरीफला अटक केली गेली. त्यांच्यावर आता अनेक गुन्ह्यांच्या आरोपाखाली खटला चालवण्यांत येईल.

पाकिस्तानांतली ही असाधारण राजकीय गोंधळाची परिस्थिति पाहून जगांतल्या बड्या राष्ट्रांचे नेते अस्वस्थ झाले आहेत, व त्यांनी आपली नाराजी स्पष्ट शब्दांत दाखवली आहे.

वास्तविक शरीफनी त्यांच्या मुखत्यारींत होतं त्यानुसार निर्णय घेतला. पंतप्रधानाला सर्वोच्च सेनाधिकाऱ्याला बडतर्फ करण्याचा अधिकार असतो. मुशर्रफने जे केलं ते लोकशाही व घटनेच्या विरुद्ध होतं व बेकायदेशीर होतं. कोणताही अधिकारी, मग तो कितीही मोठ्या पदावर असला तरी, पंतप्रधानाला डांवलूं शकत नाही. इथें जास्त चांगला प्रशासक कोण, शरीफ की मुशर्रफ, हा प्रश्नच उद्‌भवत नाही. जर एखाद्या सेनाधिकाऱ्याने, कायदा धाब्यावर बसवून, लोकशाही व घटनेच्या विरुद्ध कारवाई केली, तर त्याचे राष्ट्रविरोधी वर्तन सहन करावे कां, हा मुख्य प्रश्न आहे. आणि जगाचे मत मुशर्रफच्या कृत्याविरुद्ध आहे.



# खास बातम्या

## प्रथमावतार

भारतीय लोक देवाचे दशावतार मानतात. विष्णूचा पहिला अवतार मासा-मत्स्य होता. उत्क्रांतिवादानुसार असं मानलं जातं कीं जीव-सृष्टींत प्रथम पाण्यांतल्या वनस्पती निर्माण झाल्या.

पण मग पाण्यांतला पहिला मासा केव्हां आला? चीनमधल्या चेंगजिॲंगजवळ दोन




माशांचे सांगाडे सांपडले आहेत. त्यावरुन ते ५३० दशलक्ष वर्षांपूर्वी जिवंत असावेत असे अनुमान शास्त्रज्ञांनी काढले आहे. हे दोन्ही मासे निरनिराळ्या जातीचे आहेत. म्हणून संशोधक म्हणतात कीं त्यांच्या दोघांचा जो एक नातलग पूर्वज असेल तो आणखी कांही दशलक्ष वर्षांपूर्वी जिवंत असला पाहिजे.

यावरुन आपण समजतो त्यापेक्षां माशांची जमात किमान पन्नास दशलक्ष वर्षे तरी या पृथ्वीवरच्या पाण्यांत आहे असं म्हणायला हवं!

## आपल्याभोवती वावरणारा मारेकरी

हवेंतील प्रदुषणामुळें सुमारें एक लाख नागरिक दरवर्षी मरतात. ही बातमी जागतिक आरोग्य संघटनेने



प्रसिद्ध केली आहे.

प्रत्येक लहानसहान गोष्टीकडे लक्ष देऊन, जिथें शक्य आहे तिथें, आपण प्रदूषण कमी करण्याची आपली जबाबदारी नीट पार पाडली पाहिजे. कांही देशांत आता मोटार सायकली. ऐवजी साध्या सायकली वापरण्यासाठीं नागरिकांना उत्तेजन दिले जाते आहे. कृपया तुमच्या मित्रमंडळींना ही बातमी जरूर सांगा हं!



## ओरिसांतले महावादळ कां झाले?

केंब्रिज किनारपट्टी संशोधन समितीच्या तज्ञांचे म्हणणे आहे कीं नुकतेच ओरिसांत जे महाभयंकर वादळ झाले, त्याची तीव्रता, जर किनारपट्टीवर जंगलें असती तर, खूपच कमी झाली असती. गेल्या चाळीस वर्षांत भारताच्या किनारपट्टीवर असलेली निम्मी झाडे तोडण्यांत आली आहेत.



# ह्या महिन्यांत जन्मलेली श्रेष्ठ व्यक्ती

## माताजी



ज्या आज माताजी म्हणून ओळखल्या जातात, त्यांनी श्रीअरविंदांचं कार्य पुढें चालूं ठेवलं होतं. त्यांचा जन्म पॅरीसमधें २१ फेब्रुवारी १८७८ रोजीं झाला. लहान वयांतच त्यांना आपल्या आयुष्याचं ध्येय कांहीतरी जगावेगळं असामान्य आहे हे ठाऊक होतं.

१९१४ सालीं त्या पॉंडिचेरीला आल्या आणि त्यांनी श्रीअरविंदांचे दर्शन घेतले. क्षणभर त्यांना वाटलं की अरविंदबाबू हे दैवी शक्ती असलेल्या साधकांचे प्रतीक आहेत, व मानव-जातीच्या भविष्यांत काय वाढून ठेवलं आहे ते त्यांच्या दूरदृष्टीला दिसत आहे. १९२० सालीं त्या पुन्हां पॉंडिचेरीला आल्या आणि तिथेंच अखेर-पर्यंत राहिल्या. त्यांच्या आगमनानंतर, श्रीअर-विंदांच्या आश्रमाचा विस्तार वाढत गेला. जशी मातेच्या छत्रा-खालीं मुलें नकळत वाढत असतात त्याचप्रमाणें आश्रमाचे कार्य वाढत गेले.

श्रीअरविंदांचे मानवासंबंधीचे भाकित कांहीसे निराळे आहे, कांहीसे अनोखे आहे. त्यांच्या मतानुसार, आजपर्यंत जो मानव आपल्या मनाच्या नियंत्रणाखाली वागत आला, तो अजूनही जास्त उच्च विचारांच्या पातळीवर जाऊं शकेल. आज भावनिक स्तरावर मानवजात ही एक महान व कर्तबगार जमात आहे. तीच एक अतिमहान, अतिउत्तम व अनुपम दैवी शक्ती बनूं शकेल.

श्रीअरविंद व माताजींनी हा योग केला, नव्या विचारधारेसाठीं मनाचा मार्ग निर्मळ केला व हा विचार रुजवला. एक दिवस सारी मानवजात एका नव्या तेजाने झळकूं लागेल अशी त्यांची श्रद्धा आहे.

माताजींनी एका परिच्छेदांत म्हटलं आहे, "निसर्गक्रमानुसार उत्क्रांति नेहमी वरच्या दिशेने होते; दगडापासून रोपट्यापर्यंत, रोपट्या पासून प्राण्याकडे, प्राण्यापासून मानवा-पर्यंत कारण या शिडीवर सर्वांत वरच्या पायरीवर मानव उभा आहे. पण त्याला वाटतं कीं तो म्हणजे या चढत्या कमानीची शेवटची पायरी, आणि पृथ्वीवर त्याच्यापेक्षां श्रेष्ठ असं कांहीही नाही. पण ही त्याची गैरसमजूत आहे. त्याच्या शरीर-स्वभावानुसार तो जवळजवळ एक प्राणीच आहे; एक बोलणारा व विचार करुं शकणारा प्राणी-पण त्याच्या संवयी व वागणूक इतर कोणत्याही प्राण्यासारखीच आहे. अशा सदोष निर्मितीबद्दल निसर्ग-देवता कांही समाधानी असूं शकणार नाही. ती त्या मानवजातीतूनच एक जास्त चांगला प्राणी, जो इतर प्राण्यांपेक्षां वरचढ असेल असा मानवप्राणी बनवायचा प्रयत्न करते. शरीररुपाने जरी हा मानव दिसला तरी त्याच्या जागृतावस्थेंत त्याची बौद्धिक पातळी फार श्रेष्ठ दर्जाची असेल आणि हा मानव अज्ञानाचा गुलाम असणार नाही."



## पत्रकार बंधूंनो,

## धन्यवाद !

चांदोबाचे पुनरागमन झाल्यामुळें छोट्या वाचकांना आनंद झाला आहे. तो होईल ही आम्हाला खात्री होती. परंतु प्रसिद्धी-माध्यमांचे द्वारा ज्या उत्साहाने या घटनेचे स्वागत झाले, त्याने आमचा विश्वास दुणावला. इंग्लिश व अन्य भाषिक वृत्तपत्रांनी ही खूषखबर आपल्या वाचकांना दिली. दूरदर्शन (मेट्रो) आणि बीबीसी यांनी प्रकाशकांबरोबरची भेटवार्ता प्रसारित केली. त्या चर्चेत, नव्या सहस्रकांत प्रवेश करताना, पौराणिक कथा, जुन्या लोककथा, समर्थ ऐतिहासिक प्रसंग, प्रश्नावली व इतर सदरांमधून भारतीय परंपरेची विविधरंगी ओळख वाचकांना करुन देण्याची प्रकाशनाची मनीषा कळली. त्याबद्दल प्रसारमाध्यमांचे आभार मानून चांदोबा त्यांनाही नव्या युगाच्या शुभेच्छा प्रकट करीत आहे.

चांदोबाचे प्रकाशन पुन्हां सुरुं होण्याची बातमी ऐकल्यानंतर आमच्या असंख्य वाचक, लेखक, वितरक, प्रतिनिधी, सहकारी व हितचिंतकांनी आम्हास शुभेच्छा व्यक्त केल्या, त्या सर्वजणांना आमचे मनःपूर्वक धन्यवाद व शुभचिंतन !

बी. विश्वनाथ रेड्डी
संपादक



## नव्या स्पर्धा

### चांदोबाचे

### वाचकांस आवाहन

निरनिराळ्या क्षेत्रांत शोधबोध व कल्पनाविलास यांना चालना देणाऱ्या स्पर्धांमध्यें भाग घ्या.





### छायाचित्र

### शीर्षक स्पर्धा

१. नवोदित छायाचित्रकारांनी या स्पर्धेसाठीं एकमेकांशी संबंधित असलेल्या दोन छायाचित्रांची जोडी पाठवावी. दोन्ही चित्रांबद्दल छायाचित्रकाराने आपले स्पष्टीकरण सोबत दिले पाहिजे.

**निवडलेल्या चित्रांच्या जोडीस**
**रु. ५००- चे पारितोषिक**
**या स्पर्धेसाठीं केव्हांही छायाचित्रें पाठवा !**



२. चांदोबात जाहीर केलेली म्हण किंवा वाक्प्रचार याचा अर्थ सांगून स्पर्धकाने १५०-१७५ शब्दांत एखादा विनोद, स्वानुभव किंवा नवीजुनी गोष्ट सांगावी. तुमच्या लेखांत गोष्टीचे तात्पर्य जरूर असावें. परंतु ज्या मूळ कथेमधून ती म्हण प्रचलित झाली, ती कथा मात्र नसावी.

या महिन्यांतली स्पर्धा
**"कोल्ह्याला द्राक्षें आंबट"**
तुमचे लेख २९ फेब्रुवारी २००० च्यापूर्वी आमच्याकडे आले पाहिजेत.
बक्षीसपात्र लेख मे २०००च्या चांदोबा मध्यें प्रसिद्ध होईल.



वेताळाच्या गोष्टी

# राक्षस-धर्म

शब्दाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन प्रेत खाली उतरवले व आपल्या खांद्यावर घेतले. आणि मौन पाळून तो स्मशानाच्या दिशेने जाऊं लागला. तेव्हां प्रेतामधला वेताळ बोलला, "राजन्, तुझ्यांत अपार मनःशक्ती आहे, नि अत्यंत कठोर परिश्रम करूं शकतोस. तुझ्या मनांत आलेली गोष्ट मिळवण्याची तुझी तीव्र इच्छा असते. या तुझ्या गुणांना दाद दिल्याशिवाय मी राहूं शकत नाहीं. परंतु माझ्या मनांत एक शंका सतत येते आहे. या गुणांमुळें समाजाची शक्तिशाली तार्किक व्यक्ती व धोकेबाजांना नुसते पाहून ओळखण्याचे सूक्ष्म ज्ञान तुझ्यांत आहे कां? परिस्थितीमुळें किंवा केवळ नशीब बलवत्तर असले, तर जगांत कांहीं लोक गरिबीतून चांगल्या परिस्थितींत येतात व सुखाचा उपभोग घेतात. हे लौकिक सूत्र फक्त मानवांनाच नव्हे तर राक्षसांनादेखील लागू पडते. परंतु कांहीं लोक व्यवहारज्ञान व अनुभव विसरतात व आपली भाग्यरेखा आपल्याच हाताने विसकटतात. तुला सावध करण्यासाठी आणि भविष्यांत तुला उपयोगी



पडेल म्हणून तुला दीर्घबाहू नांवाच्या एका राक्षसाची गोष्ट सांगतो. ती ऐकलीस कीं तुझा थकवा दूर होईल.'' असं म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला.

खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ही ! शंकरशास्त्री नांवाचे एक पुरोहित कुंतल राज्यांत राहात होते. एकदा एका दूरच्या गांवी, एका श्रीमंत गृहस्थाकडे ते गेले. त्यांचे संपन्न शुभकार्य पूर्ण करुन मिळालेल्या भेटवस्तू घेऊन ते घरी परत जात होते.

त्यांना घरी लवकर पोहोचायचे होते. म्हणून ते जंगलातल्या रस्त्याने जाऊं लागले. थोडे अंतर चालल्यानंतर मोठमोठ्या वृक्षांनी वेढलेल्या एका डोंगराजवळून ते जाऊं लागले. तिथल्या एका गुहेंत एक राक्षस होता. त्याने आपले हात लांबवले आणि शंकरशास्त्रींची कंबर आपल्या पंजात पकडून त्यांना त्याने वर उचलले.

शास्त्री घाबरुन गेले. ते थरथर कांपू लागले. त्यांनी जरा डोके वर उचलून पाहिले तर समोरच गुहेचे तोंड होते व त्यांत एक करवतीसारख्या धारदार दातांचा एक राक्षस उभा आहे. शास्त्रींकडे रागाने बघत तो राक्षस म्हणाला, ''अरे, तुझ्यासारख्या म्हाताऱ्याला मी शिवतदेखील नव्हतो. पण आता कांही दुसरा इलाज नाही. तुला खावंच लागेल मला!''

जेव्हां राक्षस त्याला न मारताच बोलूं लागला, तेव्हां शास्त्रींना वाटलं, त्याला खूष करण्यासाठीं कांहीतरी बोलून आपला प्राण वाचवावा. अशा विचाराने ते राक्षसाला म्हणाले, ''हे राक्षसराज, आपल्याला पाहूनच कळतंय कीं आपण खूप शक्तिमान व गुणवान आहात! आपल्याजवळ अद्भुत शक्ती आहेत. गुहेच्या दारांतच उभे राहून आपण मला आपल्या पंजात अगदीं सहज पकडलेत. हे तर देवांना किंवा मानवांनाही शक्य नाही. अगर शक्य झालंच तर आपल्यासारख्या राक्षसेंद्रालाच हे शक्य होईल.''

या वृद्ध पुरोहिताचे बोल ऐकून राक्षस अतिशय प्रसन्न झाला. त्याच्या हंसण्याचा प्रतिध्वनी गुहेत गरजला. तो म्हणाला, ''अरे, जर्जरशरीरधारी मनुष्या, माझं नांव दीर्घबाहू आहे. माझे हात जन्मतःच लांबलांब आहेत. म्हणून माझ्या आईवडिलांनी माझं नांव दीर्घबाहू ठेवलं. बघ ना!'' असं म्हणून आपले हात लांबवून दूरवर असलेल्या एका झाडाची फांदी त्याने तोडली आणि लांबवर फेकून दिली.





आता शंकरशास्त्रींनाही थोडा धीर आला. त्यांनी एक शक्कल लढवली. राक्षसाकडे भेदक नजरेने पाहात ते म्हणाले, ''हे राक्षसेंद्रा, मी तर लौकरच मरणार आहे. तुझ्यासारख्या श्रेष्ठाची भूक माझ्यामुळें भागली तर यापेक्षां आणखी कोणते सद्भाग्य होऊं शकेल? खरोखर ही तर हजार जन्मांची पुण्याई होऊं शकेल. मी या प्रांतात दुसऱ्याच कामासाठी आलो होतो. माझं नांव शंकरशास्त्री आहे. राज्यांत माझी त्रिकालज्ञानी म्हणून प्रसिद्धी आहे. प्रथम तुझ्या जन्माचे रहस्य मला सांगू दे. नंतर मी मोठ्या आनंदाने तुझा आहार होईन.''

हे ऐकून दीर्घबाहू बुचकळ्यांत पडला. आपले गुडघे टेकून खाली बसत त्याने विचारले, ''माझं देखील कांही जन्मरहस्य आहे? काय आहे ते? लागलीच सांग पाहूं.'' त्याचं कुतूहल एकदम चाळवले गेले होते.

शंकरशास्त्रांनी घसा साफ करत सुरवात केली, ''दोन पिढ्यांच्यापूर्वी या कुंतल राज्याचे महाराज साक्षात् तुम्हीच होतात. तुम्ही शूरसिंह महाराज होतात. त्यावेळच्या तुमच्या राज्यकारभाराच्या कथा आजदेखील लोक सांगतात. त्यावरुन हे उघड आहे कीं तुम्ही किती प्रख्यात होतात, किती कीर्तीमान होतात ते ! दुर्दैवाने एका तापट ऋषीने तुम्हाला शाप दिला व तुम्हाला राक्षसजन्म मिळाला. आता या गुहेतल्या ओबडधोबड जमिनीवर झोपता, आणि माझ्यासारख्या माणसांना खाऊन आपले पोट भरता. तुमची ही दुर्दशा पाहून मला फारच वाईट वाटतंय हो! कुठे शूरसिंह महाराज आणि कुठे हे राक्षस दीर्घबाहू!'' नाटकी सहानुभूती दाखवत शास्त्री बोलले.

''ब्राह्मणा, तूं वाईट वाटून घेऊं नकोस. तुझ्यामुळें माझा महान भूतकाळ मला समजला. यापेक्षां आणखी कोणती जास्त आनंदाची गोष्ट असणार आहे? पण मला सांग, भविष्यांत माझी हीच दशा राहील कीं शापमुक्त होण्यासाठीं एखादा मार्ग मोकळा आहे?'' दीर्घबाहूने विचारले.

एक मोठा श्वास घेऊन शंकरशास्त्री म्हणाले, ''ज्या मुनींनी तुम्हाला शाप दिला, तेच तुम्हाला शापमुक्त करुं शकतात. पण ते तर कांही दिवसांपूर्वी हिमालयाच्या बाजूला निघून गेले आहेत. तेव्हां शापांतून मुक्त होता येणार नाही आता! पण हो, या राक्षसरूपांत तुम्ही राजा अवश्य होऊं शकाल! राजा झालात तर तुमच्या सुखाचा अंत कधीही होणार नाही. भोजनासाठीं,

गुहेच्यासमोर बसून डुलक्या घेण्याची कांही गरज पडणार नाही. राजा बनल्यानंतर जे तुम्हाला आवडत असेल ते भोजन, विनासायास खायला मिळेल. तुम्हाला मदिरापान करता येईल, रेशमी कपडे घालता येतील, अत्तरांत नहाता येईल, दहाशेर सोन्याचे दागिने अंगावर घालता येतील, आणि अगणित नोकरचाकर तुमच्या सेवेत राहातील. तुमच्या मर्जीप्रमाणें तुम्ही राज्य चालवूं शकाल."

शंकरशास्त्रींचे बोल ऐकून दीर्घबाहू हरखून गेला. त्या कल्पनाराज्यांत रंगलेला असताना आनंदाने टाळी वाजवून तो म्हणाला, "तुझं बोलणं ऐकायला किती चांगलं वाटतंय! पण काय रे, दररोज निदान तीन माणसें खायची माझी संवय आहे. राज्यांतल्या प्रजेला हे कांही आवडणार नाही, होय ना?"

"असले शब्द मनांतून काढून टाकावेत. अहो, राज्यांत लोकसंख्या मर्यादेच्याबाहेर वाढलीय. जी शेती होते ती पुरेशी नाही. म्हणून लोक असाच वेळकाढूपणा करतात. भुकेमुळें त्यांचे फार वाईट हाल होत आहेत. अशा अडचणीच्या वेळी तुम्ही तीनच काय, चार माणसं जरी खाल्लीत तरी जनतेला वाईट वाटणार नाही. उलट लोक समजतील कीं लोकसंख्येची समस्या तुम्ही सोडवत आहात. तुमचे कौतुकच होईल, कुणीही तुम्हाला दोष देणार नाही." शंकरशास्त्र्यांनी सांगितलं.

दीर्घबाहू थोडा वेळ विचारांत पडला व नंतर त्याने पृच्छा केली, "तुझं म्हणणं सगळं ठीक आहे रे! पण आत्ता गादीवर जो राजा बसलेला आहे त्याचं काय होईल रे?"

"तुमचं राक्षसबळ अफाट आहे, त्याच्यापुढे आमच्या त्या नेभळट राजाची काय बिशाद? तुमचा पराक्रम कुठे आणि त्याचा कुठे? तुम्ही माझ्याबरोबर याल तर तुम्हाला राजा दाखवण्याची जिम्मेदारी माझ्यावर सोंपवा. मग याल ना तुम्ही?" शास्त्रींनी विचारले.

दीर्घबाहूने होकारार्थी मान डोलावली व शंकरशास्त्रींबरोबर तो निघाला. जंगलातले रस्ते पार करताना शास्त्री कावऱ्याबावऱ्या नजरेने इकडे तिकडे पहात होते. जंगल पार केल्यानंतर मात्र स्वतःशी गुणगुणायला लागले व जोरांत चालायला लागले.

यावर दीर्घबाहूने आश्चर्य प्रकट केले. तो म्हणाला, "ब्राह्मणा, मला वाटलं जंगलात असताना तूं घाबरला होतास नि आता मात्र मोठ्या उत्साहाने चालतो आहेय, गाणें गुणगुणतो आहेस कीं !"

त्यावर शास्त्री हंसले आणि म्हणाले, "राक्षसराज, जंगलात एखादें क्रूर रानटी जनावर अचानक हल्ला करेल अशी मला फार भिती वाटत होती. पण आता तर आपण जंगल ओलांडले आहे. तेव्हां आता कसली आलीय भिती?"

"ते कां? जंगलाबाहेर रानटी जनावरं नसतात कां?" दीर्घबाहूने आश्चर्याने विचारले.

शंकरशास्त्री हंसून बोलले, "राक्षसेंद्र, मासे पाण्यांतच असतात. माणसें गांवातच वास्तव्य करतात आणि जनावरें जंगलात! जर मनुष्यप्राणी जंगलात शिरले तर श्वापदे त्यांना फाडून खातील कोणत्याही परिस्थितीत जर श्वापदें गांवात आली तर लोक त्यांचा पाठलाग करतील व त्यांना मारुन टाकतील. या कारणामुळें जो जिथें राहातो, त्यानें तिथेंच राहिलं पाहिजे, हा सृष्टीचा धर्म अनंतकालापासून आहे."

दोघेही निमूटपणें पुढें जाऊं लागले, तेव्हां बऱ्याच अंतरानंतर नदीच्या किनाऱ्यावर त्यांना एक गुरुकुल दृष्टीस पडलं. त्या गुरुकुलांतले कांही विद्यार्थी व्यायाम करीत होते तर कांहीजण







धनुष्यावर बाण लावत होते. एका बाजूला कांहीजण खड्गविद्या शिकत होते. त्यांच्यापासून थोड्या दूर अंतरावर एका झोंपडीसमोर उंच आसनावर बसून त्यांचे गुरु प्रतिभ आपल्या शिष्यांचे कौशल्य बघत होते.

दीर्घबाहूला हे दृश्य फारच विचित्र वाटलं. त्याने विचारलं, ''ब्राह्मणा, इथें ही सारी कसली गडबड चालली आहे?''

शंकरशास्त्रींनी दुरुनच प्रतिभ यांस प्रणाम केला व राक्षसाला ते म्हणाले, ''हे गुरुकुल आहे. राजकुमार व राज्यांतल्या इतर भागांतल्या प्रमुख व्यक्तींच्या मुलांना प्रतिभ क्षात्रविद्येबरोबर धर्मशास्त्रासारखे विषयही शिकवतात. मातृदेवोभव, पितृदेवोभव, गुरुदेवोभव हे आमचे आदर्श आहेत. मातापित्याच्यानंतर आम्ही गुरुंना तितकेच उचित स्थान देऊन त्यांची पूजा करतो. केवळ अयोध्या, कोसल, व अवंतीपुरचे राजेच नव्हेत तर इतर अनेक पराक्रमी राजेदेखील यांचे शिष्य आहेत. यांच्या मनांत असलं तर ते जग जिंकूं शकतील.''

त्यांचे वर्णन ऐकून दीर्घबाहू जरा अडखळत बोलूं लागला. ''होय कां, तर मग प्रतिभदेखील राजा बनूं शकतो व सर्व प्रकारची सुखें भोगूं शकतो. पण मग तो संन्याशाचे जीवन कां जगतो आहे? त्याचे जीवन इतके साधेसुधे कां आहे? या झोंपडीत कां तो राहातो? ''प्रतिभ गुरु आहेत, ते राजा होऊं इच्छित नाहीत. त्यांना ते पद पसंत नाही. आपल्या शिष्यांना प्रतिभावान बनवणें हे त्यांचे एकमेव लक्ष्य आहे! त्यांना योग्य राजा व कुशल नागरिक बनवणें यालाच ते आपलं कर्तव्य मानतात.''

हे सांगून शंकरशास्त्री चार पावलं पुढें सरकले आणि मागे वळून पाहातात तो काय, तोपर्यंत विचारमग्न असलेला दीर्घबाहू लगेच मागे फिरुन जंगलाच्या दिशेने वेगांत जाऊं लागला. असं वाटलं कीं त्याला कांहीतरी अचानक काम आठवलं व तो तातडीने निघाला.

शंकरशास्त्री मोठ्याने हंसूं लागले व टाळी बाजवून त्याला म्हणाले, ''अरे राक्षसा, झालं काय तुला? थांब, जाऊं नकोस.''

परंतु दीर्घबाहूने मागे वळूनसुद्धां पाहिलं नाही. उलट तो जास्तच वेगाने पळूं लागला. थोड्याच वेळांत तो दृष्टीआड झाला.

वेताळाने विक्रमार्क राजाला ही गोष्ट सांगितल्यानंतर विचारले, ''राजन्, दीर्घबाहू राजा बनून सुख उपभोगण्यासाठीं जंगल सोडून शास्त्र्याबरोबर आला होता. परंतु प्रतिभगुरुंची माहिती कळताच आपला निर्णय बदलून तो परत कां गेला? क्षत्रियविद्येत पारंगत प्रतिभ त्याला मारुन टाकतील अशी भीती कां त्याला वाटली? शंकरशास्त्रींनी आपले प्राण वांचवण्या-साठीं हे सर्व नाटक केलं व त्यांत त्याला फसवलं अशी कां शंका त्याला आली? जर ही गोष्ट खरी असेल तर तो शास्त्र्याला तिथल्या तिथें मारुं शकला असता व आपली भूक भागवूं शकला असता. पण त्याने तसं कां केलं नाही? माझ्या या शंकेचं समाधानपूर्वक उत्तर माहीत असूनही जर तूं गप्प राहिलास तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होतील.''

विक्रमार्क म्हणाला, ''दीर्घबाहूच्या निर्णयात बदल होण्यामागे आहे त्याची थोडीफार असलेली उपजत विचारशक्ती! त्याचे सर्व प्रश्न तर्कशुद्ध होते, शंकरशास्त्रींच्या उत्तरामागे जे मर्म साठलेलं होतं ते त्याला समजलं होतं. त्यामुळें त्याचा विचार बदलला. शंकरशास्त्रींनी आजवर पंडित व शास्त्रज्ञांकडून ऐकलेल्या गोष्टींबरोबर आपले अनुभव जोडले, व दीर्घबाहूला समजावून सांगितलं कीं प्राणीधर्म काय असतो, गुरुधर्म काम असतो ते! तेव्हां दीर्घबाहूला आपला राक्षसधर्म लगेच उमगला. धर्म तो हाच कीं श्वापदें अरण्यांत असावीत. उच्च श्रेणीच्या क्षत्रियविद्येत पारंगत असलेला गुरु एक योगी होऊन जीवन व्यतीत करतो आणि त्यालाच आपला धर्म मानतो. तेव्हां जंगलात राहूनच आपला धर्म पाळणें हे दीर्घबाहूचेही कर्तव्य ठरते. राजा बनण्याची त्याची आकांक्षा त्याच्या धर्माविरुद्ध होती. ही गोष्ट त्याच्या लगेच लक्षांत आली व तो राक्षसधर्मामधें बद्ध होऊन आपल्या स्थानावर परत गेला.''

राजाचे मौन भंग झाल्यामुळें वेताळ शवासहित अदृश्य झाला व झाडावर जाऊन बसला.

**(काल्पनिक - शिवशंकर त्रिपाठींच्या रचनेवर आधारित)**





# हुशार मुलगा

हेलापूर गावांत राहाणाऱ्या अशरफीलालला एक आठ वर्षाचा मुलगा होता. त्याचं नांव माधव. साऱ्या गांवात तो सर्व मुलांपेक्षां हुशार समजला जात असे. त्याच्या हुशारीचं सगळेजण खूप कौतुक करीत असत.

लहान वयाचा असूनही सगळ्या बाबतीत त्याला चांगली समज होती. पण नाणीं ओळखण्याच्या बाबतीत मात्र इतरांनी त्याला नादान ठरवलं होतं. त्याचं असं झालं, एकदा अशरफीलालचा एक नातेवाईक शामलाल त्यांच्या घरी आला. त्यानेही माधवचं गुणवर्णन ऐकलं होतं. त्याची परीक्षा घेण्याच्या हेतूने त्याने खिशांतून दोन नाणीं काढली. एक चांदीचे व दुसरं तांब्याचे ! आणि माधवला सांगितलं, ''यातलं एक नाणं तुला बक्षीस. हवं असेल ते नाणं उचल.''

माधवने तांब्याचं नाणं उचलून खिशांत ठेवलं, ते पाहून शामलाल निराश झाला. हा कसला आलाय हुशार मुलगा ! साधं तांब्याचं नाणं आणि चांदीचं नाणं यातलं अधिक किंमती नाणं कोणतं, हेसुद्धा त्याला कळलं नाही. माधवच्या मूर्खपणाला तो मनांतल्या मनांत हंसला. आणि चांदीचे नाणे उचलून घेऊन चालता झाला.

दुसऱ्याच दिवशीं गांवात बातमी पसरली कीं माधव हुशार तर नाहीच, पण अगदी खुळा आहे. कारण तांबे आणि चांदी यांतला फरक त्याला बिलकूल कळत नाही. आता ही गोष्ट खरी की खोटी हे पाहायला गांवातले लोक त्याच्याजवळ एक तांब्याचे व एक चांदीचे नाणें ठेवून बघायला लागले. दर वेळेला माधव तांब्याचेच नाणें उचलत असे. हे पाहून जमलेले लोक त्याच्या भोळेपणाला हंसत.

एक दिवस अशरफीलालच्या पत्नीचा चुलतभाऊ रामलाल त्यांच्याकडे आला. तो अशरफीलालकडे बरेच दिवस राहिला. गांवातल्या लोकांकडून त्यालाही माधवच्या भोळसटपणाबद्दल कळलं होतं. त्याने स्वतः माधवची परीक्षा घ्यायची ठरवलं. त्याने आपल्या खिशांतून दोन नाणी काढली. त्यांत एक होतं चांदीचं व दुसरं अर्थातच तांब्याचं होतं. दोन्ही नाणी माधवसमोर ठेवल्यानंतर त्याने म्हटलं. ''बाळ, या दोन्हींपैकी तुला जे आवडेल ते ठेव.'' माधवने याही खेपेला तांब्याचं नाणं उचललं.

पण इतर लोकांप्रमाणे रामलाल त्याला भोळाखुळा समजून हंसला नाही. उलट गंभीर होऊन त्याने विचारले, ''माधव, तुझ्या हुशारीबद्दल मी खूप ऐकले होते. पण दर खेपेला तू तांब्याचंच नाणं कां उचलतोस? चांदी आणि तांबे, यांच्या किंमतीमधला फरक तुला ठाऊक नाही कां? लोक तुझ्या बुद्धीची कींव करतात. ते टिंगल करुन म्हणतात कीं हा वाटतो तितका हुशार मुळींच नाही.''

माधवने कांही उत्तर दिले नाही. पण त्याच्या चेहऱ्यावर एक विजयी भाव होता. रामलालने फारच आग्रह धरल्यानंतर त्याने आपले तोंड उघडले.

''मामा, जर मी चांदीचे नाणें उचलले असते, तर एकदाच उचलले असते ना! माझ्या अकलेची परीक्षा घ्यायला कुणीही आलं नसतं. पण आता पहाना, तांब्याची नाणी बरीच जमली आहेत घरांत. त्यांची एकूण किंमत चांदीच्या एका नाण्यापेक्षां पुष्कळ जास्त आहे. तेव्हां आता तुम्हीच सांगा. मी मूर्ख आहे कीं हुशार?''

**सर्वेश्वर**



**धर्मनिष्ठ व्यक्तींच्यावर हल्ला करणारांसाठीं, चोरांसाठीं किंवा महाव्रताचा भंग करणारांसाठीं, पंडितांनी प्रायश्चित्तांचे निरनिराळे प्रकार सांगितलेले आहेत. परंतु कृतघ्न व्यक्तीला क्षमा करण्यास मात्र सांगितलेले नाही. - पंचतंत्र**



# जेव्हां चोर हंसत सुटला !

एका गांवात एक बुटका माणूस होता. तो स्वभावाने अतिशय विनोदी व बोलण्यांत चतुर होता. तो गांवोगांवी फिरत असे व लोकांचे मनोरंजन करुन थोडीफार कमाई करत असे. हेच त्याचे चरितार्थाचे साधन होते. लोक त्याला प्रेमाने वामनभट म्हणून हांक मारीत असत.

एक दिवस तो दुपारीं दुसऱ्या गांवाला जात होता. उन्हाच्या वेळी, विश्रांति घेण्यासाठी तो एका झाडाखालीं बसला होता. दुरुन एक इसम मोठ्या वेगाने त्याच्याकडे येताना त्याने पाहिला. त्या इसमाच्या भरघोस मिशा, खांद्यावरची एक कुऱ्हाड व त्याचे चालणें पाहून तो चोर असावा असं वामनभटाला वाटलं. जेव्हां तो इसम जवळ आला तेव्हां त्याचा तावडीतून सुटका करण्यासाठीं वामनभट म्हणाला, ''बघा, देव किती दयाळू आहे. तो सूर्याचे प्रखर उन्हीं देतो, नि त्याच्यापासून संरक्षण होण्यासाठी वृक्षाची थंडगार छायाही देतो.''

त्याच्या बोलण्यावर चोर जोरांत म्हणाला, ''तुम्ही वामनभट आहात आणि आपल्या बोलण्याने लोकांची करमणूक करता, त्यांना हंसवता आणि भरपूर पैसे घेता हे ठाऊक आहे मला. पण मी कांही तुमच्या बोलण्याला भुलणार नाही. मला हंसण्याखिदळण्याची शिसारी आहे. आयुष्यांत मी आजपर्यंत कधीही हंसलो नाही. माझे आजोबा म्हणत असत कीं हंसणे खिदळणें म्हणजे संकटांची पेटी असते. म्हणून मला हंसवण्याचा बिलकूल प्रयत्न करुं नकोस. जो कांही पैसा तुझ्या थैलींत आत्ता आहे तो मुकाट्याने मला दे.''

चोराने त्याच्या हातांतली थैली हिसकावून घेतली आणि तो जाऊं लागला. पण पुन्हां वळून मागें फिरला आणि म्हणाला, ''तुझ्यासारख्या धोकेबाज माणसाला जिवंत सोडलं तर मीच संकटात सांपडेन. त्यापेक्षां मी आता तुझे डोकेच उडवतो.'' असं म्हणून चोराने कुऱ्हाड वर उचलली.

पण वामनभट डगमगला नाही. त्याने हाताने चोराला थांबण्याची खूण केली व चटकन म्हणाला, ''हो हो, भाऊ, अरे काय करता आहात तुम्ही? माझं डोकं उडवू नका हो. आधीच मी लहान ठेंगू! आणखी ठेंगणा होईन - लोक माझी बुटका म्हणून टिंगल करतील की!''

वामनभटाने सहजपणे हजरजबाबी नि विनोदी उत्तर दिले. ते ऐकून चोराला हंसू आले. त्याला हंसू आवरेना. तो बराच वेळ हंसत होता आणि नंतर बोलला, ''मला समजायला लागल्यापासून आज मी पहिल्यांदाच हंसतोय! तूं खरोखरच हुशार नि हजरजबाबी आहेस वामनभटा! शाबास, हे घे तुझे बक्षीस.''

असं म्हणून चोराने वामनभटाची थैली त्याला परत दिली आणि तो आपल्या वाटेने निघून गेला.







# सुवर्ण सिंहासन

(२)

(**पूर्वसूत्रः** हैहय वंशाच्या कौंडिन्य देशाधिपती पौरस्वतने इतर राज्यें जिंकली व तो दक्षिणापथचा सम्राट झाला. पौरस्वतच्या दहाव्या पिढीचा राजा आहे श्रीदत्त. तोपर्यंत साम्राज्याची शकलें झाली होती. श्रीदत्तचा एकुलता मुलगा आहे विजयदत्त! गुरुकुलांत तो जेव्हां आपला विद्याभ्यास पूर्ण करत होता, तेव्हां राजधानीस लगेच परत येण्याचा निरोप त्याला मिळाला. परतल्यानंतर श्रीदत्त विजयदत्तला सांगू लागला कीं शेजारचा राजा आपल्या राज्यांतली संपत्ती व राज्य हडप करण्याची योजना कशी करतो आहे - त्यानंतर)

महाराजांनी आपले बोलणें पुन्हां सुरुं करुन सांगितले, ''मरालला वाटलं कीं मुलाच्या हट्टामुळें समस्या जास्तच कठीण होईल. तो मुलाला हो किंवा नाही असं स्पष्ट सांगेना! एका वेगळ्या दिशेने त्याचा विचार सुरुं झाला. कालिंदीचा राजा, माधवसेन याची सविस्तर माहिती गोळा करण्यास त्याने सुरवात केली.

मिळालेल्या बातमीनुसार त्याला कळलं कीं माधवसेन त्यांचा नातलग आहे. पण याबाबतीत त्याने विशेष उत्सुकता दाखवली नाही. मरालच्याकडून प्रकट झालेली कांही माहिती अशी होती - फक्त स्वयंवरात उपस्थित राहण्याचं त्याला निमंत्रण दिलेलं होतं. पण वसुमतीने अचानक त्याच्याच गळ्यांत वरमाला घातली. त्यामुळें त्याला तिच्याशी विवाह करावा लागला. त्याचं वसुमतीवर मन जडलं नव्हतं, किंवा हैहय वंशाबद्दल त्याला खास आदर व प्रेमही नव्हतं. इतकंच नव्हे, तर मरालने धाडलेल्या गुप्तचरांकडून त्याला हेही कळलं होतं कीं माधवसेनाची ऐश्वर्यवान बनण्याची प्रबळ इच्छा आहे.

माधवसेनाच्या या दुर्बलतेचा फायदा उठवून

लक्ष्मी गायत्री

आपला किल्ला मजबूत करण्याचा मरालने निश्चय केला. माघ शुद्ध सप्तमीला आपल्या कुलदैवताच्या, सूर्यभगवानांच्या रथोत्सवाच्या वेळेला अगत्य येण्यासाठीं माधवसेनास त्याने खास निमंत्रण पाठवले.

यापूर्वी माधवसेनाला कधी असे निमंत्रण मिळालेले नव्हते. त्याला याचे खूप आश्चर्य वाटले, परंतु देवाचा उत्सव आहे हे लक्षांत घेऊन तो सहकुटुंब चंपक देशीं जाण्यास निघाला.

चंपक राजा दरवर्षी हा उत्सव थाटांत साजरा करतात. रथसप्तमीच्या दिवशीं प्रातःकाळीं सूर्यदेवाची सुवर्णप्रतिमा रथांत ठेवतात. प्रमुख रस्त्यांवरून रथ नेला जातो. या उत्सवाची खास गोष्ट म्हणजे या रथाला घोडे नसतात.

त्याऐवजी राजपरिवारांतले सात प्रमुख पुरुष रथाच्या सात दोऱ्या आपल्या कमरेला बांधतात व रथ ओढतात. या सातजणांत चंपकचे महाराज व युवराज अवश्य असतात. बाकीचे पांचजण महाराजांचे आप्त किंवा मानकरी असतात.

दरवर्षी साजरा होणाऱ्या या रथोत्सवाच्या अगोदर मरालने खास घोषणा केली कीं रथ ओढणाऱ्या सात मानकऱ्यांमधें यंदा माधवसेन असतील. मरालने मोठ्या आदरभावाने एक दोरी माधवसेनाच्या कमरेला स्वतः बांधली, व एका बाजूला आपण उभा राहिला व दुसऱ्या बाजूला आपला मुलगा चक्रभूपती याला उभे केले.

राजपरिवाराशी संबंधित नसलेल्या व्यक्तीला प्रथमच रथ ओढण्याचा मान दिला जात होता. खुद्द महाराजांनीच ही पूर्वापार चालत आलेली रीत तोडली होती. यावर लगेच लोकांमधे कुजबूज सुरुं झाली.

जनतेच्या मनांतली ही भावना मरालराजाने जाणली, व मोठ्या दिलदारपणें त्याने सर्वांस सांगितले, "अत्यंत आदरणीय असे हे कालिंदीचे राजे, खास अतिथी म्हणून या रथोत्सवांत भाग घेण्यास आले आहेत. धर्मशास्त्रानुसार आपल्या देशांत आलेला अतिथी, आपल्या कुटुंबियांपेक्षांही जास्त मानावा. तेव्हां त्यांचा आदरसत्कार त्यांच्या





श्रेष्ठतेला साजेसा व्हायला हवा. या न्यायाने मी त्यांच्या कमरेला रथाची दोरी बांधली व त्यांचा आदरपूर्वक सन्मान केला. व अशा प्रकारें आपल्या देशाची प्रतिष्ठा व औचित्य दोन्हीही राखली आहेत."

हे ऐकून माधवसेन अतिशय खूष झाला. त्यादिवशीं दुपारचे भोजनदेखील फार स्वादिष्ट व शानदार बनवलेले होते. माधवसेनाने मोकळेपणीं आपली खुषी व्यक्त केली व मनःपूर्वक धन्यवाद दिले.

माधवसेनाचे कृतज्ञता दर्शवणारे बोलणें ऐकत असताना मरालभूपती गंभीर चेहरा करुन फक्त मान डोलवत होता. ते पाहून माधवसेनाच्या मनांत जरा शंका आली. जेव्हां दोघेही एकांतात भेटले तेव्हां त्याने मरालभूपतीला विचारले, "राजन्, आपण माझ्याबद्दल जो आदर व्यक्त केलात, त्याबद्दल मी आपला आभारी आहे! पण मला वाटतं कीं भोजनसमयीं मी जे कांही बोललो ते आपल्याला पसंत नसावं. माझ्या शब्दांनी मी आपलं मन दुखवलं तर नाही ना?"

मरालभूपतीने पुढे होऊन त्याचे हात हातांत घेतले व जसा कांही ह्या बोलण्यामुळें तो भारावलाय अशा थाटांत म्हणाला, "आपण माझं मन दुखवलंत? मुळींच नाही. माझ्या मनांत दुसराच विचार आहे. आपल्याला सांगावं कीं नाही हाच प्रश्न मला पडला आहे."

त्याचे उत्तर ऐकून चकित झालेला माधवसेन म्हणाला, "आपण निःसंकोचपणें सांगा." मरालने संकोचल्यासारखें दाखवून म्हटले, "मी



जे सांगणार आहे, ती माझी इच्छा आहे. पण मित्रवर्य, मी आपल्याला ती एका अटीवरच सांगेन. ज्यांनी आपला आदरसत्कार केला त्यांची इच्छा आपल्याला पुरी करता येत नसली तर त्याबद्दल जरासुद्धां वाईट वाटून घ्यायचं नाही." अशा रितीने मोठ्या चलाखीने आपल्या जाळ्यांत त्याला फसवले.

माधवसेन हंसून म्हणाला, "कबूल! सांगा तर खरं!" मरालने म्हटलं, "ठीक आहे, सांगतो. आमचे पाहुणे म्हणून आपण इथें येण्यापूर्वीच आम्हाला माहिती होतं कीं आपली कन्या श्रीलेखा एक असामान्य रूपवती आहे. माझ्या मुलाने आपल्या मुलीशी विवाह करण्याचा निश्चय केला आहे. पण मी त्याला समजावलं

कीं, पुत्रा, कौंडिन्यचा युवराज त्यांच्या नात्यांतला आहे व दोघांचे वयही योग्य आहे. तेव्हां त्यांच्याशी आपल्या मुलीचा विवाह करण्याचे आपल्या मनांत असेलच. पण आमचे युवराज म्हणाले, ''पिताश्री, कौंडिन्यप्रभू कधीकाळीं सम्राट होते. आजही त्यांच्याकडे भरपूर धनसंपदा असेल, पण राज्य हे वीरांचं असतं. क्षत्रियकन्या वीरपुरुषालाच वरते. मला खात्री आहे कीं माझे शौर्य व धैर्य दाखवून श्रीलेखाचे हृदय जिंकू शकेन. ज्या दिवशीं ती माझा पती म्हणून स्वीकार करील त्यादिवशी मी पुऱ्या दक्षिणापथावर विजय मिळवीन व तिला साऱ्या दक्षिण भारताची महाराणी बनवीन. इतकंच नाही तर तिच्या पित्याला मुलगा नसला तरी माझ्या पित्याप्रमाणेच मी त्यांचा मान राखीन. अर्धा भूभाग व कौंडिन्य देशांतून मिळालेल्या ऐश्वर्याचा अर्धा हिस्सा मी त्यांना देईन व त्यांना अधिपती बनवीन.''

''राजन्, माझ्या मुलाचे हे विचार ऐकून मी चकित झालो व कांही बोलूं शकलो नाही. थोड्या वेळानंतर मी त्याला म्हटलं, ''पुत्रा, जेव्हां नातेसंबंध जोडण्याची इच्छा असते तेव्हां स्नेहपूर्वक व्यवहार पाळणें आवश्यक ठरते. प्रथम कालिंदीनरेशांशी मी स्वतः बोलणें करीन. त्यांच्या विचारानुसार पुढें काय करायचं त्याचा निर्णय घेता येईल. तूं भावनेच्या आहारी जाऊं नकोस असं मी त्याला सांगितलं.'' असं म्हणून मराल थांबला.

मराल असा कांही प्रस्ताव मांडेल हे माधवसेनाच्या मनांतही नव्हतं. त्यामुळें तो एकदम चक्रावून गेला. हळूंहळूं तो विचार करूं लागला. मरालच्या बोलण्यावर तो भाळला होता. ते अपार ऐश्वर्य, दक्षिणावर्ताचे साम्राज्य याची लोभस स्वप्नें त्याला दिसूं लागली. त्या स्वप्नांच्या मोहांत त्यावेळेस आपली पत्नी व मुलगी श्रीलेखा यांची पसंती-नापसंतीदेखील तो विसरून गेला.



त्यानंतर दोनतीन तास त्या दोघांची खलबतें चालली होती. त्या तीन तासांत, मरालने माधवसेनास आपल्या बाजूला अनुकूल करुन घेतले.

''माघ महिन्यांत त्या दोघांमधें जो हा समझोता होत होता त्यावेळेस तुमचे गुरुकुलवास्तव्य पूर्ण होण्यास सहा महिने अवकाश होता. जरी तुझे शिक्षण आणखी थोड्या अवधींत पूर्ण झालं असतं तरीही देवीनवरात्रानंतरच तुला घरीं पाठवायचं असा गुरु कृष्णचंद्रांचा निर्णय होता. ही बातमी मरालला कळली.

''या सर्व गोष्टींचा नीट विचार करुन तूं गुरुकुलांतून परत येण्यापूर्वीच आपल्या राज्यावर आक्रमण करण्याचा त्यांनी बेत रचला आहे. दरवर्षी चैत्रमहिन्यांत वसंतोत्सवासाठी माधवसेन आपल्या राज्यांत येतो. तसा यंदाही येईल व आपल्या सैन्याची ताकद किती आहे त्याची माहिती गोळा करील. हादेखील त्यांच्या व्यूहाचा एक भाग आहे. वैशाख, ज्येष्ठ महिन्यांत कालिंदी, चंपक व कुंद राज्यांची सेना एका जागी एकत्र करतीलच व त्यांना लढाईचे खास प्रशिक्षण देतील. नंतर आषाढ महिना येतो. तेव्हां आकाशांत पावसाळी ढग असतात. उन्हें बेताचीच असतात. पाऊस सुरुं होतो.

तुला ठाउकच आहे की सैन्यांत अशा वेळेला गुप्त मसलतींसाठी चांगले वातावरण असते. आषाढाच्या महिन्यांत या तिन्ही देशांची सेना एकत्र होऊन आपल्याला वेढा घालतील.

बेटा विजय, आज ज्येष्ठ शुद्ध एकादशी आहे. तर आतापर्यंत तिन्ही देशांच्या सेना युद्धाला सज्ज झालेल्या असतील. व कांही दिवसांतच आपल्या देशांत रणभूमी तयार होईल. या प्रसंगाशी अचानक सामना करायला



लागेल. म्हणून या परिस्थितींत तुला परत बोलावण्याखेरीज अन्य मार्ग उरला नाही. या वस्तुस्थितीची मीदेखील कल्पना केली नव्हती. पण आपले राजगुरु शिवानंद यांच्या बोलण्यामुळें मला एक नवा आशेचा किरण दिसूं लागला आहे.

जशा गुप्तहेरांकडून बातम्या मला समजत होत्या, तशी मला तुझ्या भविष्याबद्दल फारच काळजी वाटूं लागली. माझं मन भितीने कांपू लागलं. तेव्हां मी तुझी जन्मकुंडली गुरुवर्यांना दाखवली. त्यांच्याकडून तुझे भविष्य काय आहे ते जाणण्याची मला तीव्र इच्छा झाली. त्यांनी बारकाईने कुंडली पाहिली. प्रथम त्यांनी मला कांहीच सांगितलं नाही.

ते अखंडपूजा करीत बसलेले होते. ध्यानांत



मग्न असताना त्यांच्या डोळ्यासमोर उगवत्या सूर्याचे बिंब, द्रुतगतीने जाणारा सर्पराज, उज्वल झळाळीने चमकणारे सुवर्ण, व सहा सुंदर मुली त्यांच्या डोळ्यांसमोर आल्या.''

ही गोष्ट सांगून ते म्हणाले, ''महाराज, युवराजांची कुंडली अद्‌भुत आहे, असामान्य आहे. जरी त्यांचा वर्तमानकाळ जरा अवघड समस्यांनी भरलेला आहे, जरी त्यांच्या जीवाला धोका आहे, तरी उत्तम ग्रहबलाच्या जोरावर ते सदा विजयी राहातील. मात्र त्यासाठीं त्यांचे पौर्णिमेपूर्वी स्वगृहीं राहाणें अत्यंत आवश्यक आहे. माझ्या अंदाजाप्रमाणें लौकरच त्यांना धनलाभ होणार आहे. त्यांच्यासमक्ष नगराच्या पूर्वेस जे मैदान आहे ते खणून पाहा जरा! कुठें खोदायचं ते मी मंत्रजल शिंपून सांगेन.'' याच कामासाठीं मी तुला बोलवलं होतं. बरं झालं, तूं अगदी वेळेवर आलास. आजच कदाचित राजगुरु काम करण्यास प्रारंभ करतील अशी शक्यता आहे.'' श्रीदत्तने सर्व कांही सविस्तर सांगितलं आणि एक दीर्घ श्वास घेतला.

विजयदत्तने शंका प्रकट करुन म्हटले, ''एका बाजूला लढाईचा धोका आपल्या शिरावर आहे आणि आपण धनाची गोष्ट कशाला आत्ता करायची? आपण तर लढाईच्या तयारीला लागलं पाहिजे. खोदाईच्या कामाला इतकं महत्व देणं मला पटत नाही.''

महाराज उत्तरले, ''शिवानंदजींनी सांगितल्यावर मीही हीच शंका व्यक्त केली होती.



पण त्यांनी ठासून सांगितलं कीं कोणत्याही परिस्थितींत खोदकाम स्थगित होता कामा नये. त्यांचा दावा आहे की या खोदाईमुळें आपले हरप्रकारे भलेच होणार आहे. खोदकामाला जास्तीत जास्त तीन दिवस लागतील. मी निश्चय केला आहे कीं शिवानंदजींच्या सल्ल्यानुसार करणें योग्य ठरेल.''

पित्याचे बोलणें ऐकून विजयदत्त जरा चिडून म्हणाला, ''पिताश्री, धर्म आणि न्याय आपल्या पक्षांत आहेत. प्रयत्न करण्यांत आपण कोणतीही कसूर करत नाही. तेव्हां या आधारावर आपण विश्वासाने आगेकूच करुंया आणि त्यांत आपलीच जीत होणार आहे.''

मुलाचे बोलणे ऐकताना महाराज मान डोलावत होते. ते कांही बोलणार इतक्यांत दरवाज्याजवळ जरासा आवाज झाला. चटकन दोघांनी वळून पाहिलं.

दरवाज्याजवळ उभ्या असलेल्या सैनिकांनी महाराजांना नमस्कार केला व ते म्हणाले, ''एक गृहस्थ आपल्याला तांतडीने भेटण्याचा आग्रह धरीत आहे. तो आपल्याला सांगू इच्छितो कीं लक्ष्मीदेवीचे पत्र आले आहे.'' महाराज म्हणाले, ''ठीक आहे, पाठवा त्याला आंत.''

सैनिकांच्या बरोबर एक युवक आंत आला, व महाराजांच्या शेजारी बसलेल्या विजयदत्ताला पाहून एकदम थांबला. त्या मुलाचा तोंडाकडे विजयदत्ताने नीट निरखून पाहिले व तो म्हणाला, ''पिताश्री, लक्ष्मीदेवीचे पत्र ज्यांनी आणलंय



तो दुसरा तिसरा कुणी नसून आपली भाची श्रीलेखा आहे.

महाराज ताडकन उठले आणि मोठ्या प्रेमाने त्यांनी तिचे हात आपल्या हातांत घेतले.

श्रीलेखा अश्रू पुसत म्हणाली, ''मामाजी, माझ्या मातेने आपल्याला निरोप दिलाय कीं अपरिहार्य परिस्थितीमुळें मी माझी मुलगी आपल्या आश्रयाखाली पाठवत आहे. तेव्हां यापुढें तिची जबाबदारी आपल्यावर राहील.''

तिच्या बोलण्याने महाराज अस्वस्थ झाले. त्यांनी मोठ्या प्रेमाने तिच्या मस्तकावर हात ठेवून म्हटले, ''मुली, तुझ्या मातेने तुला योग्य, ठिकाणींच पाठवले आहे. या जागेवर तुझा हक्क आहे.'' आपल्या मुलाकडे वळून ते म्हणाले, ''विजय, श्रीलेखाचं आगमन हा तुझ्यासाठीं पहिला शुभशकुन आहे. आपणां क्षत्रियांसाठी गांधर्व विवाह धर्मसंमत आहे. तुला माझा सल्ला आहे कीं तुम्ही दोघांनी गांधर्व विवाह करुन विवाहबंधन स्वीकारावे. सांग, तुझा काय विचार आहे?'' असं म्हणून त्यांनी श्रीलेखाच्या चेहऱ्याकडे पाहिलं. त्यांचे बोलणें ऐकून श्रीलेखाचा चेहरा खुलला. तिची इच्छा फलद्रुप होत आहे व तिला पुनर्जीवन मिळत आहे असं तिला वाटलं. तिने विजयदत्तकडे पाहिलं आणि लाजून मान खाली घातली.

आपले वडील व श्रीलेखाची उत्सुकता विजयदत्ताला जाणवत होती. त्याने हंसतहंसत पित्याला सांगितलं, ''जशी आपली इच्छा!''

मुलाची संमति मिळताच आनंदातिशयाने महाराज उत्तरले. ''शुभस्य शीघ्रम्! गांधर्व विवाहासाठी संकल्पबल हाच सुमुहूर्त असतो.'' असं म्हणून श्रीलेखाचा उजवा हात त्यांनी विजयच्या हातांत दिला. पाणिग्रहण झाल्यानंतर दोघेही महाराजांच्या पायां पडली.





## पंडिताला आपली बोली आठवली

कमलकुंड गांवातली एकही व्यक्ती कधीं शाळेंत गेली नव्हती. तेव्हां काशीला जाऊन शास्त्रांचा अभ्यास पूर्ण करणें हे त्यांच्या स्वप्नांत देखील येणें शक्य नव्हते.

पण तरुण जीवनेंद्राने हे करुन दाखवलं. तो शेजारच्या गांवात राहात असे, आणि आता तो कमलकुंडला आपल्या मामाच्या घरीं येणार होता.

काशीच्या या नव्या पंडिताला भेटायला लोक बरेच उत्सुक होते. आठवड्याच्या बाजाराचा दिवस होता. ज्यावेळेला धान्य, भाजीपाला, मिठाई, मातीची भांडी, वगैरेंची खरेदीविक्री जोरांत चालली होती, त्यावेळेस, ज्या मंडळींना जीवनेंद्र येणार आहे अशी बातमी मिळाली होती, ते लोक

रस्त्याच्या दिशेने वारंवार बघत होते.

अखेरीस, सूर्य मावळण्यास थोडा वेळ असताना, तो गांवाकडे येताना लोकांनी पाहिले. जीवनेंद्राने फिकट पिवळ्या रंगाचे धोतर व शेंदरी रंगाचा सदरा घातला होता. त्याची दाढी त्याच्या पगडीशी साम्य दाखवत होती. पंडितापेक्षां तो नवरदेवासारखा दिसत होता.

लोकांनी त्याला लवून नमस्कार केला. त्यानेही त्यांच्या डोक्यावर उजवा हात ठेवून त्यांना हंसतमुखाने आशिर्वाद दिला. त्यावेळेस त्याने कांही संस्कृत श्लोकांचे उच्चारण केले. ते कुणालाच समजले नाही. परंतु लोकांवर त्याचा प्रभाव पडला. कारण त्यांत त्याचं पांडित्य दिसून येत होतं. एखाद्या विद्वानाला भेटणं, त्याच्याशी परिचय होणं किंवा त्यांच्याशी बातचीत करणं ही नाहीतरी एक खास गोष्ट असते !

जेव्हां हा पंडित गांवातल्या लोकांशी बोलायला लागला, तेव्हां त्या भोळ्याभाबड्या लोकांना काय करावं ते समजेना. कारण तो संस्कृतमधे बोलत राहिला. लोक आ वासून बघत राहिले. एका माणसाने धीर एकवटून पंडिताला सांगितले, "गांवकरी अशिक्षित आहेत, तेव्हां त्यांना समजेल अशा भाषेंत कृपा करुन आपण बोलावे."

त्याने संमतिदर्शक मान हलवली व तो त्यांच्या भाषेंत बोलूं लागला. पण त्याची भाषा इतकी जडबंबाळ होती कीं गांवकऱ्यांना फारसं कांही समजलं नाही. मात्र त्यांना इतकंच लक्षांत आलं कीं पांच वर्षांच्या दीर्घ काळांत, तो महापंडितांच्या सहवासांत राहिला असल्यामुळें, साध्यासुध्या बोलीभाषेंत बोलणें त्याला कठीण जाते आहे!

श्रोत्यांपैकी कांहीजणांच्या मनांत शंका आली कीं फक्त पांच वर्षांत आपली मातृभाषा कुणीतरी



विसरुं शकेल कां?

जिथें हा तरुण पंडित उभा होता, तिथून थोड्या अंतरावर कांही लोक दोन बोकडांची झुंज पाहण्यांत गुंतले होते. अचानक एक बोकड पंडिताच्या रोखाने पळत येऊं लागला. बहुधा पंडिताची रंगीबेरंगी वस्त्रें पाहून बोकड गोंधळला असावा, किंवा दुसरा एखादा बोकड तिथे असेलसं त्याला वाटलं असावं ! तो बोकड पंडिताच्या जवळ येऊं लागला व त्याच्यावर चाल करण्याच्या तयारीने त्याने आपले डोके खाली वाकवले.

आपल्यासमोर वांकलेल्या प्रत्येक मस्तकाला आशीर्वाद देण्याची संवय असलेल्या पढीक पंडिताने नेहमीच्या संवयीनुसार आपला उजवा हात वर उचलला. पंडिताला बाजूला सरकण्याची सूचना देणारे आवाज घाबरलेल्या प्रेक्षकांमधून आले. पण पंडिताने त्यांच्याकडे लक्ष दिले नाही. दुसऱ्याच क्षणीं बोकडाने पंडिताला जोराने ढुशी दिली.

चारीमुंड्या चीत झालेला पंडित तत्क्षणीं बोकडाला अगदी अस्सल गांवरानी भाषेंत शिव्या देऊं लागला. त्या शिव्या मात्र सर्वांना छान समजल्या. जेव्हां पंडितमहाशय धडपडत उठून बसले तेव्हां त्यांच्या लक्षांत आलं कीं पांघरलेली पांडित्याची झूल केव्हांच फाटली आहे. आता वेळ गेलेली होती.

"आम्हाला वाईट इतकंच वाटतं, कीं आपल्यासारख्यांशी अदबीने कसं वागावं ते त्या नाठाळ बोकडाला ठाऊक नव्हतं. पण आपण आपली मायबोली विसरला नाहीत याचाही आम्हाला आनंद झाला आहे." एका हजरजबाबी इसमाने डोळे मिचकावीत म्हटले.

# भारत-गाथा

## सरस्वतीच्या किनारी - कोणे एके काळीं

"आजोबा, तुम्ही ही बातमी वाचलीत कां?" देवनाथांजवळ पळतपळत येऊन मोठ्या अधीरतेने संदीपने विचारले. देवनाथ हातांत काठी घेऊन नदीकिनाऱ्यावर फिरायला निघाले होते. सूर्यास्ताची वेळ होती. वातावरण प्रसन्न होतं आणि मंद वारा वाहत होता. त्या छोट्या शहरांतली ती संध्याकाळ फार सुरेख वाटत होती.

देवनाथ थांबले. आयुष्यभर ते इतिहास शिकवत आले होते. भारताच्या भूतकाळाबद्दल त्यांनी बरेच संशोधन केले होते. त्यांचे अनेक हुशार विद्यार्थी होते. पण आपल्या सर्व विषयांत मनापासून अभ्यास करणारा संदीपसारखा कोणी जिज्ञासू नव्हता! तो अजून शाळेंतच शिकत होता. पण जगांतल्या प्रत्येक गोष्टीची माहिती गोळा करुन घेण्याचा त्याचा छंद होता. आणि कां असणार नाही? त्याचे आजोबाच इतके असामान्य हुशार होते!

देवनाथ एक प्राध्यापक, मार्गदर्शक व शेवटी विश्वविद्यालयाचे कुलपती होते. आता निवृत्त झाल्यानंतर आपल्या लाडक्या नातवाचे शंकानिरसन करण्यासाठीं त्यांच्यापाशी भरपूर वेळ होता. जर एखाद्या वेळीं नातवाच्या प्रश्नाचे उत्तर त्यांना देता आले नाही, तरी ते स्वतः ती गोष्ट जाणून घेण्यास उत्सुक असत. त्यांच्या घरांतल्या ग्रंथालयांत वेंचक ग्रंथ होते. तिथली पुस्तकें चाळत दोघेही त्यावर खल करीत बसत. फ्रेंच विचारवंत वॉल्टेअर याच्या एका सुभाषिताचा देवनाथ वारंवार उल्लेख करीत असत.

"जितका मी जास्त वाचतो, तितकं माझं मनन अधिक होतं. जितकी मला जास्त माहिती होते, तितकी मला कमी माहिती आहे हे कळतं."

संदीपच्या मनांत आजोबांबद्दल नितांत श्रद्धा होती. आजोबा म्हणजे त्याचे मित्र, शिक्षक व आदर्श मार्गदर्शक होते.

"काय बाळ, कुठली नवीन बातमी मला सांगणार आहेस?" देवनाथांनी विचारलं.

"आजोबा, आपल्या प्राचीन साहित्यांत सरस्वती नदीचं वर्णन येतं! पण ती कुठेही दिसत नाही. एकदा एका प्रसिद्ध गृहस्थांनी 'अशी नदी अस्तित्वांतच नव्हती' असंही आम्हाला सांगितलेलं होतं. पण, या वर्तमानपत्रांत एक बातमी छापली आहे कीं लँडस्टेट नांवाच्या उपग्रहावरुन या नदीच्या मार्गाचा फोटो घेतलेला आहे. चौदा किलोमीटर रुंद असलेली ही नदी हिमालयांतून उगम पावली होती."

"अगदी बरोबर आहे बाळा! इतकंच नाही, तर आणखी माहितीदेखील मी वाचलेली आहे. कांही वर्षांपूर्वी एक प्रसिद्ध पुरातत्वसंशोधक पॉल हेन्री फ्रँकफर्त यांनी या महान नदीवर सर्व प्रकारें संशोधन केलेलं आहे. त्यांच्या मते ही नदी चार हजार वर्षांपूर्वी, बहुधा प्रदीर्घ काळ दुष्काळ पडल्यामुळें आटून गेली असावी. आणखी एका नदीची, दृसद्वतीचीही हीच दशा झाली."

"पण जेव्हां कांहीजण म्हणतात कीं ही नदी कधी अस्तित्वांतच नव्हती, तेव्हां हे जरा विचित्रच वाटतं, नाही कां?"

"छे रे - विचित्र कांहीही नाही. खरं म्हणजे आपल्या भूतकाळाबद्दल आपल्याला फार थोडी माहिती आहे. शेकडों वर्षे आपण तामसी, राकट, जीवन जगत होतो. त्यामुळें अभ्यास, संशोधन किंवा गंभीर विचारांमधें आपल्याला रस राहिला नाही. परंतु पश्चिमेच्या देशांतल्या अभ्यासू, विद्वान संशोधकांनी आपल्यासाठीं बरंच कांही केलेलं आहे. सांचीसारखं स्मारक व अजंठा-वेरुळच्या कलेचा खजिना त्यांनीच शोधून काढला. फार प्राचीन काळांतली आपली महत्त्वपूर्ण पांडुलिपी त्यांनी संशोधित केली आणि त्यांतली माहिती नीटपणें एकत्र करुन आपल्यापुढें ठेवली! परंतु त्याबरोबरच त्यांनी कांही असे सिद्धांत मांडले की ते नंतर चुकीचे ठरले.

त्याचं उदाहरण म्हणजे त्यांनी सांगितलं होतं कीं फार पूर्वी आर्यांनी भारतावर आक्रमण केलं होतं व इथले मूळ द्राविड रहिवासी, यांच्याशी युद्ध केलं होतं. आपल्या इतिहासकारांनी व शिक्षकांनी याची सत्यता पारखून न घेता हा सिद्धांत स्वीकारला. आपल्या इतिहासाच्या पुस्तकांतून ही माहिती शिकवली गेली. पण आज कुणीही खरा विद्वान हा सिद्धांत प्रमाण म्हणून स्वीकारत नाही. दुसऱ्या बाजूने पाहिलं तर यामुळें भारताची फार हानी झालेली आहे. आपण आपल्याला दोन निरनिराळ्या जातींच्या रुपांत पाहू लागलो." आजोबांनी संदीपला समजावून सांगितले.

"आजोबा, जेव्हां नदी सुकून गेली तेव्हां तिच्या कांठावर राहाणाऱ्या लोकांचे किती हाल झाले असतील नाही?" दोघेही नदीच्या कांठावर फिरत होते. देवनाथांना एकदम उत्साह संचारला. ते म्हणाले, "त्यांना संकटाशी सामना करावा लागला असेलच. पण हे संकट अचानक किंवा एकदम आलं नसेल. नव्या आसऱ्याच्या शोधांत



थोडीथोडी मंडळी दुसरीकडे जाऊं लागली असतील. हा एक विशाल देश होता आणि जागेची टंचाई नव्हती. पण सरस्वती नदीच्या तीरावर जी संस्कृती व साहित्य त्यांनी विकसित केलं होतं, ते महान साहित्य आपल्या देशाचा मानबिंदू म्हणून गौरवला जातो. त्याला वेद असं म्हणतात.

"आजोबा, जिथेंजिथें हे लोक गेले तिथें हे ग्रंथ त्यांनी बरोबर नेले होते कां?"

देवनाथ हंसून म्हणाले, "हो तर, त्यांनी वेद बरोबर नेले होते. पण फक्त त्यांच्या स्मृतीमध्यें! जरी त्यांना लेखनकला अवगत होती, तरीही ते वेद पाठ करुनच विद्याभ्यास करीत असत. आणि लक्षांत घे - चार चार वेद ! ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद नि अथर्ववेद!

"बाप रे, विश्वासच बसणार नाही." संदीपला आश्चर्य वाटले. "अरे, विश्वास आपला बसणार नाही, पण त्यांची राहाणी आपल्यापेक्षां फार वेगळी होती. त्या लुप्त संस्कृतिमधला प्रत्येकजण वेदांचा अभ्यास करुन वेद मुखोद्गत करीत होता असं माझं म्हणणं नाही. पण जे हे पठण करीत होते, ते म्हणजे दूरदृष्टी असलेले ऋषि व मुनी - ते समाजाचे शिक्षक होते.

मनाची एकाग्रता करुन त्यांनी ही सिद्धी प्राप्त केली होती. वेदपठण एका विशिष्ट लयींत केलं जात होतं. त्यांचे शुद्ध उच्चारण, व योग्य विरामस्थानांमुळें शब्दांचे पाठांतर होण्यास खूपच मदत होत होती.

"पण हा एवढा खटाटोप ते कां करत होते आजोबा?"

"तूं हा प्रश्न विचारणार हे ठाऊक होतं मला! संदीप, अरे जेव्हां आपण कोणत्याही गोष्टीसाठी कष्ट घेत असतो, तेव्हां आपल्याला कुठलातरी आनंद मिळण्यासाठी आपण ते कष्ट घेतो. परंतु त्या ऋषीमुनींनी मात्र हे कष्ट केले, ते ना स्वतःच्या आनंदासाठी ना कांही फायद्यासाठीं! ते जिज्ञासू होते, सत्याचे शोधक होते. जीवनांत येणाऱ्या समस्या व त्यावर आधारलेल्या शंकांचे निरसन करण्याच्या शोधांत ते होते.

आपल्या जीवनाचा हेतू काय आहे? मृत्यूनंतर आपलं काय होतं? आपल्याला दुःख कां होतं? वगैरे वगैरे. वेदांत या सगळ्या प्रश्नांची उत्तरें आहेत याची त्यांना खात्री होती.

"पण वेद लिहीले कुणी?"

"ते एक रहस्य आहे. आपण जसे पुस्तक, पत्र किंवा बातमी लिहीतो, त्या अर्थाने वेद कुणा एका व्यक्तीने लिहीलेले नाहीत. ऋषींनी ते इतरांना ऐकवले. म्हणून त्यांना श्रुतीदेखील म्हणतात. म्हणजे जे ऐकलेलं ज्ञान आहे ते ! त्यांचा विश्वास होता कीं कांही असे उच्च श्रेणीचे समर्थ लोक असतात, की त्यांनी बोललेल्या शब्दांचे रुपांतर ते मानवी सत्यामधे उतरवूं शकतात."

"वा, फारच छान. जर माझ्यातही तशी शक्ती असेल तर?" संदीपने नाटकी आवाजांत म्हटलं.

"ती देखील आपल्यासारखीच माणसेंच होती, संदीप! जर त्यांना ते साध्य होत होतं, तर तुलादेखील ते साध्य होऊं शकेल. नचिकेत तुझ्याहून खूप छोटा होता. त्या वयांत त्याने मृत्यूनंतरच्या जीवनाचं रहस्य शोधून काढलं."

"नचिकेत ! हे नांव ओळखीचं वाटतंय."

"बस, इतकंच! त्याचं नांव शेंकडो वर्षे कां घेतलं जातंय हे तुला ठाऊक नाही?"

"खरंच नाही."

"वेदानंतर अनेक ग्रंथ आले. त्यांना उपनिषदें म्हणतात! त्यांतल्या एका उपनिषदांत, कठोपनिषदांत नचिकेताचं वर्णन आहे. त्याचे वडील मुनी वाजश्रवा यज्ञ करीत होते. यज्ञाच्या पूर्णाहुतीनंतर ते ब्राह्मणांना आपल्या वस्तू दक्षिणेच्या रुपांत दान करीत होते.

छोटा बाळ नचिकेत हे सर्व लक्षपूर्वक पाहात होता. नंतर तो आपल्या पित्याजवळ येऊन म्हणाला, "आपण मला कुणाला दान केलं आहेत?"

पित्याने उत्तर दिले नाही. म्हणून नचिकेत म्हणून हाच प्रश्न पुन्हांपुन्हां विचारुं लागला. पित्याने चिडून उत्तर दिलं, "यमाला!"

नचिकेत निमूटपणे निघाला व यमाजवळ पोंचला. तेव्हां त्याला कळलं कीं यम म्हणजे आणखी कुणी नव्हे तर साक्षात् मृत्युदेव आहे! परंतु त्यावेळेला यमदेव आपल्या निवासस्थानीं नव्हते. नचिकेत तीन दिवस कांहीही न खातापिता, त्यांच्या दारासमोर वाट पाहात बसला.

तीन दिवस धैर्याने वाट पाहिल्याबद्दल, त्याच्या सचेपणाने भारावून जाऊन यमाने त्याला तीन वर दिले.

"मी दिसलो नाही म्हणून माझे पिताश्री काळजींत असतील. त्यांत शांती मिळूं दे." नचिकेतने पहिला वर मागितला.



"मला स्वर्गाबद्दल ज्ञान सांगावे" नचिकेताने दुसरा वर मागितला.

"तथास्तु!" यम म्हणाला.

"मला मृत्यूचे रहस्य सांगावे. देहान्त झाल्यानंतर माणसाचा आत्मा कुठे जातो? कृपया याचे ज्ञान मला द्यावे." नचिकेताने तिसरा वर मागितला.

एवढा छोटा मुलगा असला प्रश्न विचारील याची यमाला कल्पना नव्हती.

"बाळा! मृत्यू व आत्मा याचे ज्ञान तुझ्यासाठीं नाही. तूं दुसरं कांहीतरी असं माग कीं ज्याच्यामुळें तुला आनंद मिळेल म्हणजे दीर्घायुष्य, समृद्धी नि शक्ती." यम म्हणाला.

"हे करुणानिधान! यापैकीं कांहीही खरे सुख देऊं शकत नाही. मी जे मागितलंय तेच ज्ञान मला द्यावे. केवळ तेच ज्ञान मला वाचवूं शकेल." नचिकेताने आग्रह धरला.

शेवटी यमाने नचिकेतास आत्म्यासंबंधी ज्ञान प्रदान केले. आत्मा हा जन्मोजन्मींचा शाश्वत यात्री आहे व मृत्यूशी निगडीत आहे हे त्याला सांगितले. नचिकेत प्रबुद्ध होऊन घरी परतला आणि नंतर एक महान तपस्वी म्हणून प्रसिद्ध झाला.

"यमाचे घर शोधून काढणं त्याला शक्य तरी झालं असेल कां?" संदीपने थट्टेच्या सुरांत विचारलं.

"अरे पोरा! अशा कहाण्या केवळ त्यांच्या कथेची रुपरेषा म्हणून समजून घ्यायच्या नाहीत. त्यांच्यामागे प्रामाणिक निष्ठा लपलेली असते. वाजश्रवा ऋषी कांही तापट किंवा स्वतःच्या मुलाला शाप देणारे नव्हते. हे इतकं क्षुल्लक असतं, तर उपनिषदांत या प्रसंगाला कांहीही स्थान नसतं. मी तर असं मानतो, कीं त्यांनी आपल्या मुलावर एक जबाबदारी सोंपवली. त्यांनी मृत्यूच्या रहस्यावर लक्ष देण्याचा कार्यभाग त्याला सांगितला. नचिकेताने त्या समस्येचा एकाग्र चित्ताने तीन दिवस अहोरात्र विचार केला असेल. तेवढ्या वेळानंतर त्याला या रहस्याचं आकलन झालं असेल कीं आत्मा अमर आहे!" देवनाथांनी कथेचं विश्लेषण करताकरता समजावलं. "किती आश्चर्यकारक आहे हे सगळं, नाही?" संदीप खुषींत येऊन म्हणाला.





# वाळूंत लपलेले शहर

**वर्णन : जयंती महालिंगम     चित्र : गौतम सेन**




सोमनाथपुराहून बारा किलोमीटर अंतरावर कबिनी किंवा कपिला नांवाची एक लहान नदी दक्षिणेकडून येऊन कावेरीला मिळते. या संगमावर तिरुमकुडलु नरसीपूर हे गांव वसले आहे. त्याला टी. नरसीपूर असेंही म्हणतात. 'तिरुम' म्हणजे तीन आणि 'कुडलु' म्हणजे संगम असा अर्थ आहे. इथें भूगर्भात स्फटिकसरोवर नांवाचा तलाव आहे, त्याचं पाणी कावेरीला मिळतं असं मानतात.

टी. नरसीपूर हे महत्वाचं तीर्थस्थान आहे. इथे महर्षी अगस्त्यऋषींचे मध्ययुगीन मंदिर आहे.

इथून जरा पुढें गेलं की कावेरीच्या उजव्या तीरावर आज ओसाड पडलेले, वालुकामय झालेले, जुन्या काळांतले तलकाडु शहर आहे. इथें केव्हांतरी गंग राजवंशाची समृद्ध राजधानी होती. नंतर चोळ राजांच्या काळांत याचे नांव राजराजपुरम झाले. त्यानंतर हे होयसळ राजा विष्णुवर्धनच्या ताब्यांत आले. आज मात्र त्या जागीं चारी दिशांना वाळूच्या टेंकड्या आहेत. आणि त्या टेंकड्यांची जागा सतत बदलत रहाते. कांही टेंकड्या तर पंधरा मीटर उंचीच्या आहेत.

त्याची एक रसभरित गोष्ट इथें सांगितली जाते. इतिहास आणि कल्पनारंजन यांची भेसळ त्यांत झालेली आहे. पण तलकाडुची ही दशा कां झाली त्याचा खुलासा आपल्याला या गोष्टींत सांपडतो.

श्रीरंगपट्टणमधें विजयनगर साम्राज्याच्या शेवटच्या राज्यकर्ता तिरुमलराय होता. त्याची साध्वी विधवा पत्नी अलमेलम्मा, हिच्याजवळ खूप मूल्यवान, सुंदर दागिने होते. म्हणून त्याने अलमेलम्माचे दागिने काढून घेण्यासाठीं आपले सैनिक पाठवले. त्यांच्या तावडीतून बचावण्यासाठीं ती नदीच्या दुसऱ्या किनाऱ्यावर मालंगी या ठिकाणीं पोंचली. पण सैनिक तिचा पाठलाग करीत तिथेंही पोंचले. तेव्हां अलमेलम्माने दागिन्यांसकट कावेरींत उडी घेतली. पण त्यापूर्वी तिने शाप दिला, "तलकाडुचे वाळवंट होईल, मालंगीजवळच्या नदींत अनेक भोवरे निर्माण होतील आणि म्हैसूरच्या राजांना संतानप्राप्ती होणार नाही."



**साध्वी अलमेलम्मा ने शाप दिला**

स्थानिक लोकांचा विश्वास आहे कीं तिची ही शापवाणी खरी ठरली. तलकाडु वाळूखाली झांकले गेले, मालंगीतल्या नदींत खोल भोवरे निर्माण झाले आहेत आणि म्हैसूरच्या राजघराण्यांत तर पुन्हांपुन्हां दत्तविधान होते आहे.

तलकाडुमध्यें तीस मंदिरें वाळूखाली गाडली गेली आहेत अशी लोकांची श्रद्धा आहे. फक्त चार मंदिरें त्यांतून वांचली आहेत. ती म्हणजे गंगराजांनी बांधलेली पातालेश्वर व मरुलेश्वर मंदिर, होयसळांनी बांधलेले कीर्तिनारायण मंदिर आणि चोळ राजांनी बांधलेलं वैद्येश्वर मंदिर! आजदेखील या मंदिरांत रोजची पूजाअर्चा होते. दर बारा वर्षांनंतर, नोव्हेंबर - डिसेंबरमध्यें, इथे एकदा पंचलिंगदर्शनाचा मेळा भरतो. त्यावेळेस हजारों यात्रेकरु इथें येतात व तलकाडुच्या वाळवंटात तात्पुरते गांव वसते.

वैद्येश्वर मंदिर, तलकाडु

पाताळेश्वर आणि मरुलेश्वर ही मंदिरें सर्वांत जुनी आहेत. पाताळेश्वराच्या शिवलिंगाचा रंग सकाळी लाल असतो, दुपारी काळा होतो व संध्याकाळीं पांढराशुभ्र दिसतो!

कीर्तिनारायण मंदिरात विष्णुभगवानाची मूर्ती तीन मीटर उंचीची आहे. त्याची रोज पूजा होते.

पण सर्वांत उत्कृष्ट कारागिरीचा नमुना असलेले तलकाडुचे मंदिर आहे वैद्येश्वराचे ! आरोग्यदाता वैद्याच्या रुपांतल्या शिवाची इथें रोज पूजा होते. हे मंदिर चौदाव्या शतकांत बांधलेले आहे, परंतु इथले रहिवासी या मंदिराची सांगड एका पुराणकथेशी घालतात.



पारध्यांनी दत्तींना सावरीची पूजा करताना पाहिले



ते सांगतात कीं भगवान शिवशंकराला प्रसन्न करुन घेण्यासाठीं सोमदत्त नांवाचा ऋषी आपल्या शिष्यांसह इथें राहात होता. परंतु त्याचे तप पुरे होण्यापूर्वींच रानटी हत्तींनी त्या सर्वांना ठार मारले. या सगळ्यांना त्याच जंगलात हत्तीचा जन्म मिळाला. त्यांच्या तपसाधनेंत त्यांना मदत देण्यासाठीं शिवभगवान इथें एका सावरीच्या झाडांत शिवलिंगाच्या रुपांत येऊन लपले. हत्तींना जेव्हां हे रहस्य कळलें, तेव्हां रोज सकाळीं कावेरीमधें स्नान केल्यानंतर ते ताजी कमळें उपटत व त्या झाडाच्या बुंध्यावर वाहात असत.

तल आणि काडु नांवाच्या दोन पारध्यांनी हे पाहिले, आणि उत्सुकतेपोटी त्यांनी ते झाड तोडण्याचा प्रयत्न केला. परंतु, कुऱ्हाडीचा पहिला वार झाडावर पडला आणि त्याच्या खांचेतून रक्त ठिबकूं लागले. ते पाहून दोघेही घाबरले. तेवढ्यांत आकाशवाणी झाली कीं त्याच झाडाची पाने व फळें कुस्करुन त्या घावावर बांधा. तल व काडूने त्याप्रमाणें पानें व फळें कुस्करुन बांधली तेव्हां घावातून रक्ताऐवजीं दूध ठिबकूं लागलं. हत्तींनी व पारध्यांनी ते दूध प्यायले, व ते अमर झाले. त्यानंतर त्या शिवलिंगाच्या चारी बाजूंनी मंदिर रचले गेले आणि त्या स्थानाला तलकाडू नांव पडले.

इथल्या वाळवंटाचा विस्तार कमी करण्यासाठीं वनविभागातर्फे वनराई निर्माण करण्याचा प्रयत्न चालू आहे. परंतु रेताडी दरवर्षी तीन मीटरपेक्षां जास्त वाढते आहे. ही रेती येते कावेरीच्या पात्रांतूनच ! उन्हाळ्यांत नदीच्या कांठावरची माती, गाळ व वाळू सुकून जाते, आणि जेव्हां नैऋत्य मान्सून वारे सुरुं होतात, तेव्हां ही वाळू उडून उध्वस्त तलकाडू शहरावर पसरते. कदाचित मागल्या कांही शतकांमधें कावेरीने आपल्या प्रवाहाची दिशा बदलली असेल आणि त्यामुळेंच इथें इतकी रेती सांठली असेल.

अलमेलम्माचा शाप असो किंवा स्वतः कावेरीची लहर असो, तलकाडू मात्र आज एक उजाड आणि विस्मृतींत गेलेली जागा आहे. क्वचित काळीं एखादा पथिक इथें चुकूनमाकून येतो.

तलकाडूहून नदी उत्तरेकडे वळते. आणि पुढें २५ किलोमीटर अंतरावर कावेरीतले दुसरे महत्वाचे बेट शिवसमुद्रम्



नरसीपुरचा संगम



गगनचुकी प्रपात

दिसूं लागते. शिंशा नांवाची एक छोटी नदी उत्तरेकडून येऊन कावेरीस मिळते. शिवसमुद्रम बेटावर रंगनाथाचं मंदिर आहे. रंगनाथांना इथें मध्यरंग म्हणतात. हे बेट ४.८ किलोमीटर लांब व १.८ किलोमीटर रुंद आहे आणि घनदाट वनराईने भरलेले आहे. किनाऱ्यावरुन बेटावर पोंचण्यासाठीं लुशिंग्टन पुलाचा वापर करावा लागतो. हा १५० वर्षांपेक्षां जास्त जुना दगडी पूल, ४७४ मीटर लांबीचा आहे.

शिवसमुद्रम बेटाला कावेरी जणूं दोन्ही हातांनी जवळ घेते आणि नंतर दोन्ही धारा जवळजवळ १०० मीटर उंचीवरुन खाली कोसळतात. पश्चिमी धारा ९० मीटरवरुन खालच्या दरींत उडी घेते. या धबधब्याला गगन-चुक्की म्हणतात. पूर्व धारेचा धबधबा ६० मीटर उंच आहे आणि त्यांच नांव भरचुक्की आहे. हे कावेरीचे धबधबे हिरव्याकंच, रमणीय प्रदेशांत आहेत. इथें प्रवासी व पर्यटकांची गर्दी बारा महिने असते.

शिवसमुद्रम आणखी एका गोष्टीबद्दल प्रसिद्ध आहे. इथें पाण्यापासून वीज निर्माण करणारा देशांतला पहिला प्रकल्प सुरुं झाला. इथें १९०८ सालापासून वीजनिर्मिती होते आहे. हा प्रकल्प मुख्यतः कोलारच्या सोन्याच्या खाणींना वीजपुरवठा करण्यासाठीं सुरुं केला होता. इथून विजेच्या तारांचे जे जाळे कोलारच्या खाणींपर्यंत विणलेले आहे, ते एके काळीं साऱ्या जगांत सर्वांत जास्त लांबीचे समजले जात असे. विद्युतकेंद्र उंच कड्यावर बांधलेले आहे त्याला 'ब्लफ' म्हणतात. 'ब्लफ' या इंग्लिश शब्दाचा अर्थ आहे - सरळसोट उंच कडा. १३५ मीटर उंचीचा हा कडा, जनरेटरचे टर्बाईन चालविण्यासाठीं लागणारे पाण्याचे पाईप घालण्यासाठीं उत्तम जागा आहे.

शिवसमुद्रमच्या वीजकेंद्राचे नामकरण सर के. शेषाद्रि अय्यर यांच्या नांवावरुन झाले आहे. ते १८९३ पासून १९०१ पर्यंत म्हैसूरचे दिवाण होते आणि त्यांच्याच कारकिर्दीत या वीजकेंद्राची योजना तयार झाली व कार्यान्वित झाली. याची उत्पादन क्षमता ४२,००० किलोवॅट आहे. प्रेक्षकांना ट्रॉलीमधून ४२५ मीटर खाली उतरुन वीजकेंद्राचे कामकाज पहाता येते.

गगनचुक्की धबधब्याची भव्यता पाहण्यासाठीं सर्वांत चांगली जागा म्हणजे पीर हईब नांवाच्या मुसलमान साधूचा दर्गा ! गर्द हिरव्यागार राईत मध्यभागी उभी असलेली ही पांढरी चुनकळी सफेत इमारत, जणूं पाचूंच्या मध्यभागी हिरा जसा शोभून दिसतो, तशी सुंदर दिसते. इथून शिंशाचे वीजकेंद्रदेखील दिसूं शकते. कावेरीचे दोन्ही प्रवाह सतेगाला नांवाच्या स्थानावर पुन्हां एकमेकाला भेटतात व एकत्र जुळतात.





# जांवई व मुलगा

सीताराम आदरातिथ्य करण्याबद्दल प्रसिद्ध होते. रामनगरमधें जे कोणी जात, ते त्यांच्याकडे भोजन केल्याखेरीज परतत नसत. एकदा त्यांच्याकडे सुकाम नांवाचा एक तरुण आला. त्याला शायरीची फार आवड होती. संगीताचीदेखील चांगली जाण होती. लखनौसारख्या कलांचे माहेरघर असलेल्या शहरांत तो आपले नशीब आजमावण्यासाठीं निघाला होता.

सुकामचे बोलणें ऐकल्यावर सीताराम त्याला म्हणाले, "त्या शहरांत माझ्या परिचयाच्या दोन व्यक्ती आहेत. त्यांतला एक आहे मोहन. तो माझ्या ओळखीच्या परंधामचा जांवई आहे. तो फार चांगला कवी आहे. परोपकारी आहे. शहरांत त्याचं नांव चांगलं आहे, दुसरा आहे विशाल - माझा दुसरा मुलगा. तो नामवंत गायक आहे. त्यालाही दुसऱ्यांना मदत करायची इच्छा असते. लखनौमधें त्याचंही नांव प्रसिद्ध आहे. तो मोहनसारखाच आहे असं समज. या दोघांना भेटलास कीं तुझं काम होऊन जाईल."

हे बोलणें ऐकून सुकाम खूष झाला. तो म्हणाला, "लखनौला पोंचण्यापूर्वीच माझं काम सोपं झालंय. आपलं नांव घेऊन मी या दोघांनाही भेटीन. त्यांच्या मार्गदर्शनाखाली मी तिथं बस्तान बसवीन. हे सारं कांहीं आपल्या मदतीमुळें होणार आहे."

लगेचं सीतारामांनी दुसरी बाजूही मांडली व सांगितलें, "मोहन नि विशाल - दोघेही स्वतःला अतिश्रेष्ठ समजतात व त्यांना त्याचा फार गर्व आहे. माझ्या सांगण्यावरुन तूं त्यांचा मोठेपणा जाणला आहेस, म्हणूनं ते तुझा मान राखणार नाहीत. पण माझं नांव न सांगतां तूं चूप बसलास तर ते सर्वप्रकारे तुला प्रोत्साहन देतील, व तुला मदत करतील. दुसऱ्यांचे भले करण्याची त्यांची प्रवृत्ती आहे. तेव्हां

वसुंधरा

त्यांना त्याची घमेंड असली तर ती अनाठायी नाही असं म्हटलं पाहिजे. कारण ते खरोखरच गुणी व रसिक आहेत. म्हणून त्यांच्या या स्वभावाबद्दल तूं किंवा मी त्यांना दोषी ठरवणे योग्य नाही."

सुकाम लखनौला पोंचला. प्रथम तो मोहनच्या घरी गेला. सीतारामांनी दिलेली सूचना त्याच्या लक्षांत होती. त्याने मोहनला म्हटलं, "साहेब, मी ऐकलंय की उत्तम कवितेची पारख करण्यांत व एखाद्या होतकरु कवीला चरितार्थासाठी आवश्यक ती मदत करण्यांत आपल्या तोडीचा कुणी नाही. म्हणून मी आपल्या दर्शनासाठीं आलोय. माझी परीक्षा घ्यावी व मी पात्र ठरल्यास मला इथें स्थायिक होण्यासाठीं सवड द्यावी अशी आपल्याला माझी विनंती आहे.

मोहनने मोठ्या खुषीने त्याला सांगितले, "प्रथम माझे सासरे परंधाम यांच्यावर एक कविता कर. त्यावरून तुझ्या काव्याचा व कुवतीचा अंदाज मी करीन."

परंधामचे कुटुंब व त्याने केलेल्या महान कार्याबद्दल मोहनने सविस्तर माहिती दिल्यानंतर सुकामने एक सुंदर कविता रचून ऐकवली.

"तूं उत्तम दर्जाचा एक उगवता कवी आहेस. तुझ्यासारख्या कविश्रेष्ठाला आणखी दुसऱ्या कोणत्या परीक्षेची जरूर नाही. याच नगरींत कुलशेखर नांवाचे एक कलाप्रिय, भाग्यवंत गृहस्थ आहेत. ते माझे मित्र आहेत. त्यांच्याबरोबर राहून त्यांना कविता ऐकवणाऱ्या एखाद्या कवीच्या ते शोधांतच आहेत. मी योग्य ठरवून पाठवलेल्या व्यक्तीला ते जरूर संधी देतील."

मोहन दिलेले पत्र सुकाम घेऊन गेला. नंतर तो विशालच्या घरीं गेला. ज्या तऱ्हेने त्याने मोहनची भरपूर स्तुती केली होती, त्याचप्रमाणें विशालवरही त्याने स्तुतिसुमनांचा वर्षाव केला. विशाल आनंदाने म्हणाल, "माझ्या मोठ्या भावाने माझ्या वडिलांवर केलेली एक कविता माझ्याजवळ आहे. त्याला रागदारीत छानशी चाल बांधून दे. ती कविता तूं गाऊन दाखवलीस तर तुझे संगीतातले ज्ञान मला पारखतां येईल."





सुकामने एक सुंदर चाल त्या कवितेला लावली व आपल्या गोड आवाजांत ती गाऊनही दाखवली. तेव्हां विशाल खूष झाला व म्हणाला, "तूं खरोखरीच एक प्रतिभावान, प्रज्ञावान कलावंत आहेस. याच शहरात कलाशेखर नांवाचे माझे मित्र आहेत. ते एक कलाप्रेमी सद्गृहस्थ आहेत व धनवान आहेत. ते एकटेच आहेत. म्हणून त्यांच्याजवळ राहून त्यांना गायन ऐकवणारा एखादा मित्र सोबती म्हणून त्यांना हवा आहे. मी शिफारस केलेल्या व्यक्तीला ते जरुर योग्य संधी देतील. त्यांच्याकडे गेलास तर राहाण्याजेवणाची व चरितार्थाची कांहीच अडचण पडणार नाही." असं सांगून त्याने एक पत्र त्याच्याजवळ दिलं.

सुकाम कलाशेखर यांना भेटला. दोन्ही पत्रें वाचल्यानंतर ते म्हणाले, "अनेक सुमार दर्जाचे, स्वतःला कवी नि गायक समजणारे लोक माझ्याकडे येतात, आपल्या फालतू कवितांना उत्तम साहित्य ठरवतात, गायक रुक्ष स्वरांत, बेसूर संगीत ऐकवतात आणि मला गोंधळवून टाकण्याचा प्रयत्न करत बसतात. हे सगळं पाहून मला उबग आलाय. म्हणून माझ्या विश्वासू मित्रांकडून जो पत्र घेऊन येईल त्यांनाच मी समोर येऊं देतो. त्यांचे काव्य किंवा संगीत ऐकतो. तेव्हां आत्ता तुझ्या कविता गाऊन दाखव बरं!" अशा प्रकारें मिळालेल्या दुर्मिळ संधीचा उपयोग सुकामने मोठ्या हुशारीने केला. कलाशेखरकडून त्याने काव्य व संगीत, दोन्हींमधे प्रशंसा मिळवली व त्याच्या मनांतही स्थान मिळवले.

जीवनांत अशा प्रकारें स्थैर्य आल्यानंतर सुकाम अतिशय समाधानी झाला. आपल्या



उपकारकर्त्यांना एक मेजवानी देण्याचं त्याने ठरवलं. प्रथम तो मोहनकडे गेला व त्यांना म्हणाला, ''रावसाहेब, तुमच्यामुळें मला ही नोकरी मिळाली. मला त्याप्रीत्यर्थ एक स्नेहभोजन करायचे आहे. त्याप्रसंगी आपण सहकुटुंब उपस्थित राहिले पाहिजे. त्याखेरीज आपले किंवा आपल्या कुटुंबियांचे जवळचे नातेवाईक असतील तर त्यांनाही आपल्याबरोबर घेऊन यावे. आपण मला जी मदत केलीत त्याविषयी मला त्यांनाही सांगायची इच्छा आहे.''

''अरे, तूं हुशार आहेस, म्हणून मी तुला मदत केली. त्यांत इतरांना कांही सांगायची कांही गरज आहे कां?'' मोहनने हंसतहंसत विचारलं.

''साहेब, सर्व जीवजंतूंमधे मनुष्य प्राण्याइतका कृतघ्न कुणीही नसेल. तुम्ही माझे भले केलेत म्हणून मी तुमची स्तुती करतो. कदाचित हे तात्पुरतेही असेल. कांही कालानंतर मी तुमचे उपकार एखादे वेळीं विसरेनदेखील! मी समजेन कीं जे झालं ते माझी प्रतिभा व बुद्धिमत्ता यांच्यामुळेंच होऊं शकलं. अप्रत्यक्षपणें, कांही दिवसानंतर, मी आपल्यावर टीका करेन. म्हणून मला मिळालेल्या मदतीचा उल्लेख अवश्य व्हायला हवा. म्हणून मी आयोजित केलेल्या भोजनास आपण आलंच पाहिजे. सर्वांच्या समक्ष मी आपण केलेल्या मदतीबद्दल सविस्तर सांगितलं तर कधीकाळीं मी आपल्याविरुद्ध कांही बोललो तर सर्वजण माझी निर्भत्सना करतील, मला हुडुत करतील. मी उन्मत्त किंवा घमेंडखोर होऊं नये म्हणून स्वतःलाच सावध करतो आहे आणि त्या दिशेने माझे हे पाऊल आहे. कृपया आपण नकार देऊं नये.'' सुकामने अजीजीने सांगितले.

सुकामची दूरदृष्टी व सुस्वभाव पाहून मोहनला आश्चर्य वाटले आणि तो फार खूष झाला. आपले श्वशुर परंधाम ह्यांचे नांव व पत्ता त्याने एका कागदावर लिहिला. त्याच्याखाली आपला मेव्हणा गणपती याचेही नांव व पत्ता त्याने लिहिला. सुकामला हा कागद देऊन तो म्हणाला, ''यांना तू स्वतः भेट व कारण सांगून निमंत्रण दे. मी त्यांना बोलावणे योग्य ठरणार नाही.''

''माझंही तसंच मत आहे. आपण मिळून आता तीन परिवार झाले. मला पांच कुटुंबांना आमंत्रण द्यायचे आहे तेव्हां आणखी दोघाजणांची नांवे सांगावी.'' सुकामने आग्रहाने सांगितले.

तेव्हां मोहनने त्या कागदावर आपले वडील



सीताराम व भाऊ विशाल यांचीही नांवे सांगितली. मोहन सीतारामांचा मुलगा व विशालचा थोरला भाऊ आहे हे पाहून सुकामला खूपच आश्चर्य वाटले. पण तो सीतारामांना ओळखत होता हे त्याने मोहनला मुळींच दर्शवले नाही. कारण तसं केलं असतं तर सीतारामांना दिलेला शब्द मोडला असता. तो मुकाट्याने तिथून निघाला.

नंतर तो विशालच्या घरीं गेला. मोहनला जसे त्याने सांगितले, त्याच तऱ्हेने त्याने विशालला निमंत्रण दिले. विशालने आप्तेष्ट म्हणून आपले वडील व भाऊ मोहन यांची नांवे दिली. सुकामने आग्रह धरताच त्याने आपले सासरे परंधाम व मेव्हणा गणपती यांचीही नांवे दिली.

सुकामच्या आश्चर्याला सीमा राहिली नाही. मोहन व विशाल हे दोघेही परंधामांचे जांवई होते. अशा परिस्थितीत सीतारामांनी मात्र सांगितलं होतं कीं एक त्यांचा मुलगा आहे व दुसरा मित्राचा जांवई! त्यांनी तर म्हणायला हवं होतं की दोघेही माझेच मुलगे आहेत. तसं सांगायची इच्छा नव्हती तर दोघंही परंधामांचे जांवई आहेत असं तरी सांगायचं! तो विचारांत पडला.

थोड्या वेळानंतर त्याला याचं उत्तर मिळालं. आपले दोन्ही मुलगे घमेंडखोर आहेत असं सीतारामांना वाटतं, पण स्वतः सीतारामच जास्त अहंकारी आहेत. त्यांची नाराजी स्पष्ट दिसते, कारण मोहन आपल्या वडिलांपेक्षां आपल्या बायकोच्या वडिलांना जास्त महत्व देतो. म्हणूनच त्यांनी त्याला स्वतःचा मुलगा असं सांगण्याऐवजी



परंधामाचा जांवई असा त्याचा उल्लेख केला.

सीतारामांना निमंत्रण द्यायला सुकाम त्यांच्या घरी जाऊन म्हणाला, ''मी ही मेजवानी ठरवलीय कारण माझ्यांत गर्विष्ठपणा येऊं नये अशी माझी इच्छा आहे. आपल्यासारख्या ज्येष्ठ मंडळींकडून मला खूप कांही शिकायला मिळालं. पण आपण आपल्या एका मुलाला परंधामचे जांवई म्हणता, ते मला फार खटकलं.''

सीतारामांनी हंसून सांगितलं, ''माझ्या दोन्ही मुलांविषयीं माझ्या मनांत राग नाही. माझी दोघांवर सारखीच माया आहे. विशालने चाल बांधण्यास तुला जी कविता दिली, ती दुसऱ्या कुणाची नव्हे, तर मोहननेच लिहीलेली कविता आहे. आत्तापर्यंत तुझ्या लक्षांत आलं असेल, ते दोघेही आपापल्या पायांवर उभे आहेत. त्यांच्या मर्जीनुसार आयुष्य

जगत आहेत.

आपले रितीरिवाज मागील पिढीनुसार असतात. बुद्धाचे अनुकरण करणारे बौद्ध म्हणवतात, शिवाला मानणाऱ्यांना शैव म्हणतात, भगवानाला मानणारे भक्त म्हणतात आणि गुरुचे अनुकरण करणाऱ्यांना शिष्य म्हणतात. त्याचप्रमाणे पित्याचे अनुकरण करणारा मुलगा असतो, आणि सासऱ्याचे अनुकरण करणारा जांवई म्हणवला जातो.

मोहन प्रथम माझा मुलगा आहे, नंतर तो परंधामचा जांवई झाला. परंतु मोहनच्या घरांत सासऱ्याच्या परिवाराचं स्थान पहिलं आहे, महत्वाचं आहे. वडिलांच्या कुटुंबाचं स्थान दुय्यम आहे, सुरुवातीपासूनच! म्हणून त्याला परंधामचा जांवई म्हणणंच योग्य ठरतं.

माणसांचा नांवलौकिक त्यांच्या व्यवहारशैलीशी निगडीत असतो, त्यांच्या जीवनपद्धतीचं प्रतिबिंब त्यांतून कळतं. तूंसुद्धां महाकवींचा संप्रदाय सोडून कलाशेखरच्या आश्रयाला महत्त्व दिलंस तर फक्त त्याचा खास मित्र म्हणून ओळखला जाशील, उत्तम कवी म्हणून नव्हे. तुझे कर्तृत्व व योग्यता मर्यादित राहील.''

सुकाम समजला की सीताराम महाधोरणी आहेत, रागालोभाच्या पलीकडले आहेत आणि त्यांची प्रत्येक कृती अर्थपूर्ण असते. परत जाताना तो म्हणाला, ''साहेब, आपली सूचना मी नीट लक्षांत ठेवीन. आपल्या सांगण्याप्रमाणे माझे धोरण ठेवीन, नशिबवान समजून आंधळेपणाने कुणाची नक्कल करण्याच्या फंदात पडणार नाही. आपले व्यक्तिमत्व स्वतंत्र राखण्याचा अवश्य प्रयत्न करीन.'' एवढं सांगून सीतारामांना मेजवानीला येण्याचा पुन्हां एकदा अगत्यपूर्वक आग्रह करुन, त्याने सीतारामांचा निरोप घेतला.





४८ - कृष्णशिष्टाई - २

# महाभारत

कृष्णाच्या आगमनाची बातमी जेव्हां हस्तिनापुरांत पसरली तेव्हां भीष्म, द्रोण, संजय, विदुर, दुर्योधन व त्याच्या मित्रांना बोलावून धृतराष्ट्राने त्यांना सांगितले, ''कृष्ण इथें येतो आहे असं कानावर आलंय. नगरांत लोक मोठ्या उत्सुकतेने याची चर्चा करत आहेत. मार्गात ज्याज्या सुविधा आवश्यक वाटतील, त्यांची व्यवस्था करा. कृष्णाचे हरप्रकारचे सत्कार व स्वागत करा.''

दुर्योधनाने हस्तिनापुरपासून वृकस्थल-पर्यंतचा सारा मार्ग सजवला. जिकडेतिकडे मंच ठेवले. ही सारी सजावट व मंच न बघताच कृष्ण हस्तिनापुरला पोचला.

दुर्योधनाखेरीज धृतराष्ट्राचे सर्व पुत्र, भीष्म, द्रोण वगैरे प्रमुख व्यक्ती, मोठमोठ्या रथांत बसून कृष्णाच्या स्वागतास निघाले.

धृतराष्ट्राच्या महालासमोर कृष्ण रथांतून उतरला व धृतराष्ट्राच्या दरबारांत सरळ चालत गेला. त्याचा सभेंत प्रवेश होताच धृतराष्ट्रासकट सर्वजण उठून उभे राहिले. कृष्णाने प्रथम भीष्म व धृतराष्ट्रांशी बोलून त्यांची विचारपूस केली, व नंतर इतर सर्व राजांशी वयोमानाप्रमाणें त्यांची खुशाली विचारत तो प्रत्येकाशी बोलला. त्याला बसण्यासाठीं धृतराष्ट्राने सोन्याचे आसन ठेवले होते. कृष्णाने तिथले आदरातिथ्य स्वीकारले, थोडा वेळ गप्पागोष्टी झाल्या व नंतर तो विदुराच्या घरी गेला.

त्यादिवशी दुपारी तो कुंतीला भेटण्यासाठीं तिच्या महालांत गेला. कुंतीदेवीने त्याला जवळ घेतले व आपल्या पुत्रांच्या आठवणीने तिला रडूं





कोसळले. कृष्णाचे रीतसर स्वागत करुन तिने त्याला आसनावर बसवले आणि विचारले. ''कृष्णा, माझे पुत्र मला इथें सोडून वनांत गेले आहेत. माझं शरीर इथें आहे. पण माझं मन मात्र त्यांच्यापाशीच आहे. माझ्या पितृहीन मुलांचं मी मोठ्या मायेने संगोपन केलं आहे. असल्या भयंकर अरण्यांत त्यांनी कसे दिवस काढले असतील कोण जाणे! धर्मराज, भीम, अर्जुन ठीक आहेत ना? नकुल, सहदेव आणि कोमलांगी द्रौपदी कशी आहेत? मी त्यांना केव्हां बघूं शकेन? तूं पाठीराखा असूनदेखील धर्मपरायण मंडळींची ही असली दुर्दशा!'' बोलताबोलता कुंतीला रडूं कोसळले.

कृष्णाने कुंतीदेवीला शांत केले व म्हटले, ''तुझे पुत्र व पुत्रवधू लौकरच तुला दिसतील. शत्रूंना पराजित करुन ते तुझ्याकडे येतील. थोडा आणखी धीर धर ''नंतर कुंतीचा निरोप घेऊन तो दुर्योधनाकडे गेला.'' दुर्योधनाचा महाल इंद्रभुवनासारखा होता. एका मोठ्या दालनांत दुर्योधन रत्नजडित सिंहासनावर बसला होता. त्याच्याजवळ दुःशासन, कर्ण, शकुनी, बसलेले होते. कृष्ण येताच सर्वजण उठून उभे राहिले व त्यांनी आपला आदर व्यक्त केला. कृष्णाने सर्वांची खुशाली विचारली, व खास सजवलेल्या सुंदर आसनावर तो बसला. आपले आदरातिथ्य स्वीकारावे म्हणून दुर्योधनाने कृष्णाला विनंती केली परंतु कृष्णाने आपली असमर्थता व्यक्त केली व त्याची विनंती अव्हेरली.

''तुम्ही आम्हा दोन्ही पक्षांना मदत केली आहेत. आमची मनापासून इच्छा आहे कीं तुम्ही आमचे आतिथ्य स्वीकारावे. पण तुम्ही तर नकार दिलात. याचं कारण काय ते आम्हाला कळेल कां?'' दुर्योधनाने नम्रतेने विचारलं.

''मी दूत म्हणून आलो आहे. ज्या कामासाठी आलोय ते पूर्ण झालं तरच मी तुमचं आतिथ्य स्वीकारुं शकेन.'' कृष्णाने सांगितलं.

तुम्ही ज्या कार्यासाठी झाला आहात, ते पूर्ण होवो अथवा न होवो, त्याच्याशी माझा संबंध नाही. तुमच्या कार्यात माझी कांही मदत होऊं शकेल, असं समजूं नये. तुम्ही हस्तिनापुरला आला आहात म्हणून तुमचं आदरातिथ्य करणं आमचं परमकर्तव्य आहे. तेव्हां तुम्हाला आमचं आतिथ्य जरुर स्वीकारावं लागेल'' दुर्योधनाने पुन्हां औपचारिक विनंती केली.

दुर्योधनाच्या मनांतला भाव ओळखून कृष्ण



हंसून उत्तरला ''दोन प्रकारच्या व्यक्तींबरोबर भोजन करण्यांत आनंद असतो. आपल्या आवडल्या व्यक्तींबरोबर किंवा संकटात सांपडलेल्या लोकांबरोबर ! दुर्योधना, तुझ्या मनांत आमच्याबद्दल प्रेम नाही. तुमच्याच परिवारांतल्या पांडवांबद्दल तुमच्या मनांत यत्किंचित प्रेमभावना नाही. त्यांना तुम्ही अकारण आपले शत्रू मानता आहात. ते सर्व मला प्राणाइतके च प्रिय आहेत. त्यांनी कांही अधर्माचरण केलंय असं आजवर कुणीही म्हटलेलं नाही. तुम्ही त्यांचा द्वेष करता, त्याचा अर्थ असा होतो कीं तुम्ही माझाही द्वेष करता. म्हणून तुमचं आतिथ्य स्वीकारण्याचा मला आग्रह करुं नका.''



असं म्हणून कृष्ण तिथून निघून विदुराच्या घरी गेला व तिथे त्याने भोजन केले. भोजन झाल्यानंतर विदुराने कृष्णाला सांगितलं, ''कृष्णा, तुम्ही इथें येण्याचा कांही परिणाम होईलसं मला वाटत नाही. दुर्योधनाने सर्व नियमांचे उलंघन केलं आहे. त्याच्या मनांत युद्ध करावं असंच आहे. कर्णाला वाटतं कीं तो एकटा पांडवाच्या सामर्थ्यावर नियंत्रण करुं शकेल, म्हणून तो शांतीच्या विरोधांत आहे. कर्णाच्या भरंवशावर दुर्योधन युद्धासाठी उतावीळ झाला आहे. दुर्योधनाजवळ सैन्यबळ भरपूर आहे, त्यामुळें तुम्ही कांहीही सुचवाल, त्याला तो नकार देईल. त्याच्याकडे आलेले अनेक राजे तुमचे शत्रू आहेत. त्यांच्यामधें तुम्ही जावे हे मला रास्त वाटत नाही. असं समजूं नये कीं मला तुमचा प्रभाव किंवा पुरुषार्थ याची कल्पना नाही. केवळ तुमच्यावरच्या माझ्या प्रेमाच्या पोटीच मी हे तुम्हाला नाईलाजाने सांगतो आहे.''

कृष्णाने विदुराला उत्तर दिलं, ''मित्राच्या नात्याने तुम्हाला जे वाटलं ते तुम्ही सांगितलंत. मला निश्चित ठाऊक आहे कीं तुमचे शब्द खरे ठरणार आहेत. तरीसुद्धां शांतीसाठी मी जास्तीत जास्त प्रयत्न करीन. उभय पक्षांचा विनाश होण्यापासून त्यांचे रक्षण करणें हा माझा धर्म आहे. नुसतेच हातपाय गाळून स्वस्थ बसणं योग्य नाही. जर मी हा प्रयत्न केला नाही तर मी निमूटपणें बघत राहिलो असा कलंक माझ्या नांवाला लागेल. माझ्यावर कांहीही संकट येणार नाही. तुम्ही घाबरुं नका.'' त्या रात्रीं कृष्ण तिथेच राहिला.

दुसऱ्या दिवशी आपली नित्यकर्मे उरकून कृष्ण रथाजवळ जाऊं लागला, तेवढ्यांत दुर्योधन व शकुनी तिथे आले. धृतराष्ट्र राजसभेंत असून

कृष्णाची वाट पहात आहे असं त्यांनी कृष्णाला सांगितलं.

बिदुरासह कृष्ण रथांत बसून निघाला. दुर्योधन व शकुनि आपापल्या रथांतून निघाले. त्यांच्याबरोबर इतर अनेक राजे हत्ती व घोड्यांवर बसून येत होते. इतक्या मोठ्या लवाजम्यासह राजमार्गावरुन जाताना, नगरांतले स्त्रिया, पुरुष, आबालवृद्ध, कृष्णाला कौतुकाने पाहात होते.

सभाद्वारासमोर कृष्ण रथांतून खाली उतरला, व विदुर आणि सात्यकीसह त्याने सभेंत प्रवेश केला. सभेंतल्या सर्व उपस्थितांनी कृष्णास आदराने वंदन केले व कृष्णासाठी सजवलेल्या खास आसनावर त्याला बसवले. विदुर व सात्यकी कृष्णाच्या शेजारच्या आसनावर बसले.



सभेंत शांतता पसरली होती. सर्वांची नजर श्रीकृष्णावर खिळली होती. श्रीकृष्णाने सर्वांकडे पाहिले व धृतराष्ट्राकडे बघून त्याला संबोधून म्हटले, "जरी कौरव व पांडव, दोघांनी युद्धाची तयारी केली असली तरीही राजन, मी पांडवाच्यातर्फे आपल्याकडे शांतीचा संदेश घेऊन आलो आहे. पांडवांची शांतीची इच्छा नाही, तरीही युद्धाचे भीषण परिणाम लक्षांत घेऊन, मी त्यांना शांतीसाठी समजावण्याचा प्रयत्न करीन.

"सर्व राजवंशांमधें कुरुवंश अग्रभागी आहे. कौरवांच्या बाजूने आपण प्रमुख आहात. कुणीही कांही दुष्कर्म केले तर त्याला दंड देण्याचे अधिकार आपल्याला आहेत. कुरुवंशाच्या विनाशाबरोबर इतर राजवंशांचाही विनाश होईल व त्याचा कलंक आपल्यावर लागेल. दुर्योधनादि आपल्या मुलांनी धर्म झिडकारला आहे, वाईट कर्मे करण्यासाठी ते सरसावले आहेत, मर्यादेची सीमा त्यांनी ओलांडली आहे. यांत आपण लक्ष घातलं पाहिजे. येणाऱ्या संकटाला कौरवच कारणीभूत होतील. या संकटाला अडवलं नाही तर या भूमीवर राहणाऱ्या जनतेचं अपार नुकसान होईल, त्यांचा विनाश होईल. या आपत्तीतून सर्वांना वाचवण्याची शक्ती आपल्याजवळ आहे महाराज!

"मला खात्री आहे कीं कौरवपांडवांमधे शांती प्रस्थापित होणे शक्य आहे. आणि ही गोष्ट केवळ आपल्या अन् माझ्या हाती आहे. आपण आपल्या पुत्रांना सन्मार्गाकडे वळण्यास प्रवृत्त करा. पांडवांचा क्रोधाग्नि मी शांत करीन. आपल्या कुळांतल्या इतरांना आदेश देण्याचा आपल्याला अधिकार आहे. आपण त्यांना आपली आज्ञा पाळण्याचे बंधन घाला. पांडव व कौरवांमधे तह



करवा. पांडवांना जिंकणें ही इतकी सोपी गोष्ट नाही. आपल्याला त्यांची साथ मिळाली तर आपल्याला जिंकणे हे कुणालाही शक्य नाही. आपण अखिल विश्वाचे महाराज होऊन राज्य कराल. पांडवांशी तह केलात तर त्यांत आपला लाभ आहे. युद्धांत पांडव जिंकले काय किंवा कौरव जिंकले काय, आपल्याला याचा कोणता फायदा आहे? युद्ध झालंच तर जगांतले सारे राजे यांत भाग घेतील व नष्ट होतील. तेव्हां जगांतला हा संहार टाळण्याचं उत्तरदायित्व आपल्यावर आहे. इथें उपस्थित असलेले सर्व राजे एकत्र बसून भोजन करतील, द्वेष, ईर्षा, घृणा, या साऱ्या भावना विसरून आपापल्या घरीं परत जातील, असं ठरवूं या.

"पांडवांना तरी आपल्याखेरीज जास्त वडीलधारं कोण आहे? त्यांच्या अडचणीच्या प्रसंगी आपण त्यांना मदत नाही केलीत तर दुसरं कोण करेल? त्यांच्याकडे आणखी आहे कोण? त्यांची इच्छा होती कीं आपल्याशी मी या गोष्टी स्पष्टपणें बोलाव्यात. या सभेंतल्या सर्व उपस्थितांसमोर आणखी एक गोष्ट सांगायची त्यांची इच्छा आहे. ज्या सभेंत अधर्मपूर्ण निर्णय घेतला जाईल, त्या निर्णयामुळें जे पातक होईल त्याचे उत्तरदायित्व त्यांच्यावरच राहील. हे पाप त्यांना भस्मीभूत करेल. या सर्वांना धर्म व न्याय दाखवून देणें हे माझे कर्तव्य आहे. मी संपूर्ण विचार केल्यानंतरच ही बाब आपणां सर्वांना सांगतो आहे. या सर्व राजांना मृत्यूच्या दाढेतून आपण वाचवा महाराज. पांडवांशी न्यायाने वागून त्यांच्या पित्याच्या वांटणीचा भाग देऊन टाकावा. धर्मराज कशा प्रकारचा मानव आहे ते आपण जाणताच. लाक्षागृह जाळलं तरी तो आपल्याकडे आला. आपण त्याला इंद्रप्रस्थाला धाडलंत, तरी तोंडातून चकार शब्द न काढता तो तिकडे गेला. शकुनिच्या कपटामुळें आपल्या पुत्रांनी त्याचं सर्वस्व लुटलं, तरीदेखील धर्मराज आपल्या वचनापासून ढळला नाही. मी या साऱ्या गोष्टींची उजळणी. आपले व पांडवांचे हित दृष्टीसमोर ठेवून करतो आहे. आपल्या पुत्रांवर अंकुश ठेवा. पांडव आपली सेवा करण्यास अथवा युद्ध करण्यासही तयार आहेत. तेव्हां शेवटीं आपल्याला जे योग्य वाटेल ते ठरवा. मला जे सांगायचं होतं ते मी सांगितलंय."

कृष्णाचे बोलणें संपल्यानंतर सर्वजण स्तब्ध राहिले. तेव्हां परशुरामाने धृतराष्ट्रास सांगितले, "राजन्, नीतीला धरुन मी एक गोष्ट सांगू इच्छितो; जर ते आपल्याला पटलं तर आपण त्याच पद्धतीने व्यवहार करावा.

पूर्वी दंभोद्भव नांवाचा एक राजा होता. तो रोज सकाळीं चारी वर्णाच्या लोकांना जवळ बोलवायचा व त्यांना विचारायचा, "तुमच्यापैकी कुणीही मला जिंकू शकेल?"

ब्राह्मणांनी त्याला सल्ला दिला कीं इतका आत्मविश्वास चांगला नाही, तरीही राजाची घमेंड कमी झाली नाही. शेवटी ब्राह्मण राजाच्या स्वभावाबद्दल निराश झाले व त्यांनी सांगितले, "राजा, नर व नारायण नांवाचे दोन ऋषिपुंगव आहेत. ते दोघे कुणालाही हरवूं शकतात. गंधमादन पर्वतावर ते तपस्येंत लीन आहेत. युद्ध करण्याची इतकी तीव्र इच्छा असेल तर त्यांच्याकडे जावे."

दंभोद्भव आपली सेना घेऊन नरनारायणांच्या तपस्येच्या स्थळीं पोंचला. त्यांनी त्याचे आतिथ्य करण्याचे ठरवले तेव्हां तो म्हणाला, "युद्ध हेच माझे आतिथ्य आहे." ऋषींनी त्याला समजावलें कीं हा प्रदेश युद्ध करण्यास योग्य नाही, तरीही त्याने न ऐकल्यासारखे केले. तेव्हां नर नांवाचे ऋषी चिडले व त्यांनी गवताच्या काड्या मंत्रून दंभोद्भव व त्याच्या सेनेवर फेकल्या. त्या काड्यांच्या प्रभावाने राजा व त्याचे सैनिक सुन्न झाले. ते इतके मरगळून गेले की काय होतंय ते त्यांच्या लक्षांतच आलं नाही. खजील होऊन दंभोद्भवाने ऋषींचे पाय धरले व लोटांगण घालून त्यांची क्षमा मागितली.

"तूं आपले प्रलाप सोडून दे आणि जन-कल्याणकारी राज्य कर" असा उपदेश करुन नरनारायणांनी राजाला तिथून परत पाठवले.

परशुरामाने ही कथा सांगून पुढें म्हटले, "धृतराष्ट्र, त्या नराने हे फक्त करुन दाखवले. नारायण नरापेक्षां खूप श्रेष्ठ आहे. अर्जुन व कृष्ण हे देखील नरनारायण आहेत. तेव्हां अर्जुनाने गांडीव धनुष्य हातांत घेण्यापूर्वीच आपला दुराभिमान सोडून द्या, आणि त्यांना शरण जा. कृष्णाची साथ असल्यावर रणभूमीवर अर्जुनाशी सामना करणें असाध्य कार्य आहे. म्हणून युद्धाची कल्पना विसरा व त्यांच्याशी तह करा."



# खऱ्या सौंदर्याचा शोध

एका राणीची एक दासी होती. राणीचा तिच्यावर खूप विश्वास होता. राणीचा महाल स्वच्छ करताना कधीकधी या दासीला राणीच्या दागिन्यांतून तुटून पडलेले मोती, सोन्याचे मणी सांपडत. ती प्रामाणिकपणें ते उचलून राणीला परत देत असे.

राणीने खूष होऊन तिला त्यांतले कांही किंमती मोती व सोन्याचे मणी बक्षीस दिले, व घरी घेऊन जाण्यास सांगितले. या दासीला एक लहान मुलगा होता. तो दूरच्या एका गांवी आपल्या मामाच्या घरी राहात होता. मामा शिक्षक होते व त्यांच्याकडे इतरांची कांही लहान मुले शिक्षणासाठीं त्यांच्या घरी राहात असत.

एक दिवस हा मुलगा आपल्या आईला भेटायला आला. रात्री त्याने आईजवळचे सोन्याचे मणी व मोती पाहिले. ते चमकणारे दाणे हातावर घेऊन तो म्हणाला.

"वा, वा, किती सुंदर आहेत हे मणी!"

"हे खरंच फार सुंदर आहेत, पण, माझ्या बाळा, जर तू यापेक्षांही किंमती व सुंदर दागिन्यांनी सजलेल्या आमच्या राणीसाहेबांना पाहिलंस ना, तर खरे सौंदर्य म्हणजे काय ते तुला कळेल. मी आजवर खूप सुंदर वस्तू व व्यक्ती पाहिल्या आहेत, त्यांत सर्वांपेक्षां अधिक सुंदर आमच्या राणीसाहेब आहेत." मुलाच्या आईने अभिमानाने सांगितले.

मुलगा शांत बसलेला होता. कुठल्यातरी गंभीर विचारांत गढला असावा असं वाटलं. दुसऱ्या दिवशीं पहांटे तो कुठेतरी गायब झाला. त्याच्या आईवडलांनी त्याचा खूप शोध केला. शेजाऱ्यांनीही त्याचा शोध करण्यास खूप मदत केली. पण मुलगा सांपडला नाही.

अनेक वर्षे उलटली. एक दिवस त्या दासीला आपल्या हरवलेल्या मुलाकडून एक संदेश मिळाला.

"आई, मी मामांकडून ऐकलं होतं कीं सूर्य, चंद्र, तारे, आकाश हे सगळे भगवानाचे अलंकार आहेत. तूं सांगितलं होतंस कीं आभूषणांपेक्षांही जास्त सुंदर ते धारण करणारी राणीसाहेब आहे. मला अंतःप्रेरणा मिळाली की जेव्हां सूर्य, चंद्र, तारे, आकाश इतके सुंदर आहेत, तर ह्या अलंकारांनी सजलेला भगवान किती दिव्य नि भव्य असेल! आणि मी त्या भगवानाच्या शोधांत निघालो. आई, मला तो भगवान सांपडला आहे हे ऐकून तुला आनंद वाटेल. तो इतका भव्य आहे कीं त्याचे अलौकिक सौंदर्य शब्दांत वर्णन करणें अशक्य आहे."

दासीला रडूं कोसळले. परंतु तिच्या मुलाने कुणालाही न मिळणारी अप्राप्य व अमूल्य वस्तू मिळवली याचा आनंदही झाला.







# पित्यासाठीं

गांधार देशाचा राजा धनवंत एकदा आपल्या सरदारांसह मृगयेसाठीं गेला होता. अरण्यांत शिकारीच्या शोधांत बराच वेळ भटकत राहिल्यामुळें तो खूप दमला. शिकार मिळाली नव्हती व त्याचे सरदार मागे राहिले होते. त्यांची वाट पाहात व थोडा वेळ आराम करण्यासाठी म्हणून तो एका मोठ्या वृक्षाच्या सावलीत बसला. त्या वृक्षाच्या फुलांना मादक सुगंध येत होता. तेवढ्यांत त्याला एक अलौकिक सुंदर स्त्री दिसली.

तिचे अप्रतिम लावण्य पाहून राजा तिच्यावर मोहित झाला. त्याने तिच्याजवळ जाऊन तिला विचारले, "हे अपूर्व सुंदरी, तूं कोण आहेस? आणि या निर्जन अरण्यांत कशाला आली आहेस? मी तुला कांही मदत करूं शकेन कां?"

"मी एक गंधर्व कन्या आहे. जेव्हां मी आकाशमार्गाने या प्रदेशावरून जात होते तेव्हां या वृक्षाच्या फुलांचा सुगंध मला फार आवडला व ही फुलें पाहाण्यासाठीं मी खाली पृथ्वीवर उतरले." तिने मृदू आवाजांत उत्तर दिले, व ती त्या सुगंधी फुलांनी बहरलेल्या फांद्यांना हात लावून ती फुलें न्याहाळूं लागली.

राजा तिच्या पाठोपाठ जात म्हणाला, "मी या देशाचा राजा आहे, आणि मला तुझ्याशी विवाह करण्याची इच्छा आहे. मी माझे सर्वस्व तुला अर्पण करीन व तुला सदैव सुखांत ठेवीन. माझी राणी होऊन तूं पृथ्वीवरच राहा नि पुन्हां गंधर्वलोकांत जाण्याचा विचारदेखील मनांत आणूं नकोस."

गंधर्वकन्येला राजाची ही आग्रही मागणी पसंत पडली नाही. पृथ्वीवरील निसर्गसौंदर्याचा आनंद ती उपभोगत होती. त्यांत राजाने केलेल्या या मागणीमुळें तिचा विरस झाला व तिने राजाचा प्रस्ताव नाकारला. पण राजा मात्र तिच्या प्रेमांत पडला होता. त्याने पुन्हांपुन्हां तिला विवाह करण्याची गळ घातली.

त्या सुंदरीने दुःखी होऊन शेवटीं त्याला शाप देऊन सांगितलं, "हे राजा ! तूं मोहाने आंधळा झाला आहेस, विचारशून्य झाला आहेस. आकाश आणि जमीन यांतलं अंतर तूं विसरला आहेस. म्हणून यापुढें तूं आंधळा होशील. ज्या दृष्टीमुळें तूं असा वागतो आहेस. ती तुझी दृष्टीच नाहीशी होईल." एवढं बोलून ती आकाशमार्गे निघून गेली.

ती निघून जाताच राजाच्या डोळ्यांतली चेतना नष्ट झाली. लहान मुलासारखा हळवा होऊन तो रडूं लागला. त्याचे सरदार त्याला शोधत जेव्हां त्याच्याजवळ आले. तेव्हां राजाची ही दीनवाणी अवस्था पाहून त्या सर्वांना



फार वाईट वाटले. राजाने त्यांना घडलेली सारी गोष्ट सांगितली.

सरदारांनी राजाला महालांत परत आणले व राजवैद्यांनी त्याला तपासले. परंतु कांहीही उपयोग झाला नाही. राजवैद्य म्हणाले की शापित रोगावर औषधांचा प्रभाव पडूं शकत नाही. शाप देणारी व्यक्तीच राजाला उःशाप देऊन शापमुक्त करूं शकेल. परंतु गंधर्वलोकांत जाणें कुणाही मानवाला अशक्य होते. परमेश्वराची कृपा झाली तरच राजा व्याधीमुक्त होऊं शकला असता.

राजा धनवंताचा तरुण मुलगा, राजकुमार निरंजन अतिशय शूर, धाडसी व पितृभक्त होता. पित्याचे दुःख त्याला बघवेना. त्याने घोर प्रतिज्ञा केली. कांहीही करून गंधर्वलोकांत जायचे, त्या गंधर्वकन्येला शोधून काढून तिची विनवणी करायची, आणि आपल्या पित्याला शापमुक्त करण्यास तिला सांगायचे. मग त्याच्यासाठी आपले प्राण पणाला लावावे लागले तरी बेहत्तर !

राजकुमाराने वडीलधाऱ्या मंडळीकडून ऐकलं होतं कीं गंधर्वलोक पूर्व दिशेला आहे. म्हणून त्याने पूर्वेकडे वळून चालायला सुरवात केली. बरेच दिवस चालताचालता तो एका निर्जन, घनदाट अरण्यांत पोंचला. त्याने खूप दिवस कांही खाल्ले नव्हते म्हणून थकून जाऊन तो बेशुद्ध पडला.

जेव्हां तो शुद्धीवर आला तेव्हां एक अत्यंत कुरूप स्त्री त्याची शुश्रूषा करताना त्याला दिसली. तिने राजकुमाराला खायला कांही फळें व प्यायला पाणी दिले. स्वतःची ओळख करून देताना तिने सांगितले, "मी या अरण्यांतली एक हडळ किंवा पिशाचिनी आहे. ज्या झाडावर मी राहाते त्याच झाडाखाली तूं बेशुद्ध पडला होतास. म्हणून तुला माझा अतिथी मानून मी तुझे आदरातिथ्य करते आहे. या अरण्यांत माणूस कधीही दिसत नाही. पण तू कोण आहेस आणि इकडे कुठे भटकत आलास?"

राजकुमाराने आपली ओळख करून दिली. पिशाचिनीचे आभार मानून तो म्हणाला, "तूं हडळ नाहीस बरं, माझ्यासाठीं तर तूं देवता आहेस. तूं मला जीवदान दिले आहेस. आता कृपा करून गंधर्वलोकीं जाऊं शकलो नाही तर माझ्यासाठीं हे जीवन मरणापेक्षांही जास्त दुःसह होईल."

"अरे पण तरुण मानवा, गंधर्वलोकांत जायचं तर फक्त आकाशमार्गानेच जाता येतं. आणि ते तर तुम्हां मानवांना जमण्यासारखे नाही. तेव्हां तिथें जाण्याचा हट्ट सोडून दे." तिने सल्ला दिला.

"तर मग माझं जीवन व्यर्थ आहे. माझे कर्तव्य पुरें केल्याशिवाय मी जिवंतपणीं घरीं जाऊं शकणार नाही." इतकं बोलून तो पुन्हां पूर्वेकडे जाऊं लागला. तेव्हां तिने त्याला थांबवून म्हटले, "अरे तरुणा, जरा थांब. जर तूं माझी एक इच्छा पूर्ण करण्याचं वचन दिलंस तर मी तुला गंधर्वलोकाच्या प्रवेशद्वारापर्यंत नेऊन पोंचवीन त्यानंतर आंत प्रवेश करणं माझ्या शक्तीबाहेरचं काम आहे."

"प्रवेशद्वारापर्यंत जरी पोंचवलंस तरी माझ्याकडून शक्य असेल ती तुझी इच्छा मी पूर्ण करीन." राजकुमाराने तिला वचन दिले. तिच्या सांगण्यावरुन राजकुमाराने डोळे बंद केले आणि ती दोघे थोड्या वेळानंतर गंधर्वलोकाच्या सीमेवर पोंचली.

"आता गंधर्वलोकांत प्रवेश कसा करायचा ते तुझं तू बघ. मी बाहेरच तुझी वाट पाहात राहीन" दगाच्या एका टोंकावर बसून पिशाचिनी म्हणाली.

त्याने गंधर्वलोकांत प्रवेश केल्यानंतर या तरुण, सुंदर, परक्या पुरुषाला पाहून गंधर्वकन्यांनी त्याच्याभोवती फेर धरला व त्याला पकडून गंधर्वांच्या राजाकडे त्यांनी त्याला नेले. राजकुमाराने आपली दुःखद कहाणी त्या सर्वांना सांगितली.

गंधर्वराजाला राजकुमार व त्याच्या पित्याची ही दशा पाहून फारच दया आली. त्याच्याजवळच त्याची मुलगी पुष्पोत्तमा बसली होती. गंधर्वराजाने तिला सांगितले कीं राजाला शाप देऊन आंधळा करणाऱ्या गंधर्वकन्येला शोधून काढावे.



"मीच ह्याच्या पित्याला शाप दिला आहे पिताश्री ! कारण त्यांनी माझा अपमान केला. जेव्हां मी पृथ्वीवरच्या अरण्यांत एकटीच पुष्पराज वृक्षाच्या खाली बसून त्या फुलांचा सुगंध अनुभवीत होते तेव्हां राजाने मधेंच हा अडथळा उपस्थित केला होता." पुष्पोत्तमाने नाराजीच्या सुरांत सांगितलं.

आपल्या पित्याच्या वतीने क्षमा मागून राजकुमाराने मोठ्या नम्रतेने सांगितलं, "देवी, माझ्या पित्याने आपले स्वर्गीय सौंदर्य पाहून, त्याचा सन्मान करण्याच्या भावनेने प्रेरित होऊन, आपल्याला तसं सांगितलं. जर यामुळें आपल्या मनाला यातना झाल्या असल्या तर मी त्यांच्या वतीने आपली क्षमा मागतो. आणि त्यांना आपण शापमुक्त करावं अशी आपल्याला विनंती करतो."

राजकुमाराचा नम्रपणा व वागण्यांतला सद्भाव पाहून पुष्पोत्तमा नुसती प्रसन्नच झाली नाही, तर पृथ्वीवरुन हा गंधर्व लोकांत येऊं शकला, हे पाहून त्याच्या या धाडसी यात्रेमुळें ती फारच प्रभावित झाली. तिने राजकुमाराला एक फूल देऊन सांगितलं, "हे फूल तुझ्या पित्याच्या डोळ्यांवरुन फिरव. म्हणजे त्यांची दृष्टी परत येईल. मात्र एक लक्षांत ठेव. ज्या व्यक्तीने आजपर्यंत कधीही वचनभंग केला नसेल अशाच व्यक्तीकडून हे काम व्हायला हवं. जर वचनभंग झालेला असेल तर दृष्टी पुन्हां जाईल."

राजकुमाराने त्या फुलाचा स्वीकार केला व गंधर्वराज आणि पुष्पोत्तमा यांचा कृतज्ञता व्यक्त करून निरोप घेतला. गंधर्वलोकाच्या प्रवेशद्वाराबाहेर ती पिशाचिनी त्याची वाट पहात थांबलेली होती. तिने कांही क्षणांतच त्याला गांधारच्या राजधानीत त्याच्या महालांत पोचवले व ती म्हणाली, "तुझं अशक्य काम मी शक्य करून दाखवलं आहे. आता याच्या बदल्यांत तूं माझी एक लहानशी मागणी पुरी कर. तसं तूं मला वचन दिलेलं आहेस. मला तुझ्याशी लग्न करायचंय."

"ठीक आहे. तुझ्या उपकाराच्या बदल्यांत तर हे कांहीच नाही. तूं इथेंच थांब. मी माझ्या पित्याची दृष्टी त्यांना देऊन परत मी इथें येतो." एवढं बोलून राजकुमार

राजमहालांत गेला. जेव्हां त्याने राजाच्या डोळ्यांना त्या फुलाने स्पर्श केला, तेव्हां राजाला लगेच सारे कांही पूर्ववत दिसूं लागले. साऱ्या राजमहालातले वातावरण उल्हसित झाले.

त्यानंतर राजकुमार निरंजनने राजाला व सर्व परिवाराला आपल्या गंधर्वलोकापर्यंतच्या यात्रेची सारी कहाणी सांगितली. राजकुमाराने एका हडळीला विवाहाचे वचन दिले आहे हे ऐकून राजाला फारच वाईट वाटले. राजाने व त्यांच्या सरदारांनी हा विवाह टाळण्यासंबंधी निरनिराळे पर्याय सुचवले, परंतु राजकुमार आपले वचन मोडण्यास तयार होईना. तो आपला शब्द पाळणारच होता. तो त्या पिशाचिनीजवळ आला आणि म्हणाला, "माझ्या मातापित्याच्या इच्छेविरुद्ध, पण मी तुला दिलेल्या वचनानुसार, मी तुझ्याशी विवाह करतो आहे. पण तूं एक गोष्ट मात्र कर. विवाहानंतर तूं आपल्या महालाबाहेर कधीही यायचं नाहीस. नाहीतर तुला पाहून सगळेजण घाबरून जातील."

हडळीने आनंदाने ही गोष्ट मान्य केली. ती म्हणाली, "तूं जसं सांगशील, तसं मी करीन."

दोघांनी महालाच्या एका एकांतातल्या कोपऱ्यांत गांधर्वविवाह केला. विवाहाचे रितीरिवाज पूर्ण होताक्षणींच एक चमत्कार झाला. त्या हडळीच्या जागी एक सुंदर राजकन्या उभी होती. राजकुमार आश्चर्यचकित होऊन तिच्याकडे एकटक पाहातच राहिला. ती राजकन्या प्रसन्नमुद्रेने म्हणाली,

"राजकुमार, यांत आश्चर्य वाटून घेऊं नकोस. मी आता हडळ नाही. मी खरीखुरी राजकन्या आहे, वत्स देशाची राजकुमारी सुहासिनी! तूं माझ्याशी विवाह करुन मला पिशाच्चयोनीतून मुक्त केलं आहेस. त्याबद्दल मी कृतज्ञ आहे."

"पण तुला पिशाचिनी कुणी बनवलं?" राजकुमाराने विचारलं. आपली कहाणी राजकुमारीने सांगितली. ती म्हणाली, "एकदा एक अतितापट मुनीश्रेष्ठ आमच्याकडे आले. माझ्याशी विवाह करण्याची त्यांची इच्छा होती. ती त्यांनी माझ्या वडिलांना सांगितली. पण मी साफच नकार दिला. तेव्हां चिडून त्या मुनींनी मला "तूं हडळ होशील" असा शाप दिला. माझ्या वडिलांनी त्यांची खूप मनधरणी केली. तेव्हां त्यांनी शापमुक्त होण्याचा उपाय सांगितला, "जर एखादा राजकुमार तिच्याशी ती पिशाचिनीच्या रुपांत असतानाच विवाह करील तर ती शापमुक्त होऊन पूर्ववत होऊं शकेल." आज ती शुभघडी माझ्या जीवनांत आलेली आहे."

राजकुमाराने ही आनंदाची बातमी आपल्या मातापित्याला सांगितली. त्यांनी मोठ्या थाटाने दोघांचा विवाहसमारंभ साजरा केला.

**(२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली कथा)**







## भारत आता आणि तेव्हा



# दिल्लीचे सात जन्म

महाभारताच्या काळांत पांडवांसाठी मय राक्षसाने निर्माण केलेली अतिमोहक मायानगरी इंद्रप्रस्थ, हे त्या जागेवर बसवलेलं पहिलं शहर होतं. तिथेंच आज जगांतल्या सर्वांत मोठ्या लोकशाही देशाची - भारताची राजधानी नवी दिल्ली वसली आहे.

इंद्रप्रस्थ पौराणिक काळांतलं नगर होतं. त्याचे कोणतेही अवशेष आता अस्तित्त्वांत नाहीत. बहुधा यमुना नदीने अनेकवेळां आपला प्रवाह बदलला आणि प्राचीन लोकसंख्येला एकतर नष्ट केलं किंवा ती वसाहत वाहून गेली. परंतु, दंतकथांच्या आधारें, कालक्रमानुसार याच जागी आणखी पांच नगरे वसवली गेली. सध्यांचे नवी दिल्ली हे सातवे नगर आहे.

यामुळेंच दिल्ली (किंवा ढिली - जी नीट बंदिस्त नाही ती) हे नांव पडले असेल कां? पूर्वजांच्या माहितीनुसार हे नगर सर्पराज वासुकीच्या डोक्यावर वसलेले आहे व सर्पराज जेव्हां वेळोवेळीं आपले डोके हलवतात, त्यावेळेस भूकंप होतो आणि शहर उध्वस्त होऊन जाते.

परंतु ही तर एक दंतकथा आहे. युद्धें आणि परकीय आक्रमणें यांनी दिल्लीचा इतिहास भरलेला आहे. इथें प्रत्येक निर्मितीच्या मार्गून विध्वंस तिचा पाठलाग करीत आला आहे.

इतिहास सांगतो कीं या जागेवर प्रथम आठव्या शतकांत अनंगपाल राजाने नगर वसवले होते. त्याच्या महालाला लालकोट म्हणत असत. त्याच्यानंतर चौहान राजांनी ही आपली राजधानी बनवली. त्यांच्यापैकीं सर्वांत प्रसिद्ध होते उदार आणि शूरवीर राजा पृथ्वीराज! कनौजची राजकुमारी संयुक्तावर त्याचे प्रेम होते. तिलाही पृथ्वीराज आवडला होता. पण कनौजचा राजा जयचंद्र याला मात्र या दोघांचा विवाह पसंत नव्हता. त्याने आपल्या कन्येसाठी स्वयंवर आयोजित केले. त्यांत अनेक राजकुमारांना निमंत्रित केले होते. संयुक्ताने आपल्या पसंतीच्या राजकुमाराच्या गळयांत वरमाला घालायची होती.

जयचंद्राने पृथ्वीराजाला निमंत्रण देण्याऐवजीं त्याचा पुतळा बनवून द्वारपालाच्या जागेवर ठेवला. पण संयुक्ता पित्यापेक्षां सवाई हुशार निघाली. ती

सर्व राजकुमारांच्या समोरुन सरळ त्या पुतळ्याजवळ गेली, आणि तिने पुतळ्याच्या गळ्यांत वरमाला घातली. आजूबाजूच्या गर्दीतून पृथ्वीराज पुढें आला आणि उपस्थितांना जेव्हां खरी परिस्थिती लक्षांत आली, तोपर्यंत त्याने संयुक्ताला घोड्यावर बसवले व बघताबघता ती दोघेही नजरेआड झाली.

परंपरेनुसार दोघांनी विधीपूर्वक विवाह केला. ही सन ११७५ मधील घटना आहे.

सन ११९२ मधें घोरचा तुर्की सुलतान महंमद घोरी याने दिल्लीवर आक्रमण केले. परंतु पृथ्वीराजने त्याला पराभूत केले व घोरी पकडला गेला. दुसऱ्या वर्षी घोरीने पुन्हां चढाई केली. जयचंद्राच्या मदतीने त्याने पृथ्वीराजला पराजित केले व त्याला ठार मारले.

त्यानंतरच्या वर्षी घोरीने त्याचा मदतकर्ता जयचंद्र याला ठार मारुन त्याचे राज्य हडप केले. पण लौकरच त्याच्या सैन्यांतल्या बंडखोरांनी घोरीला सुरा भोसकून त्याची हत्या केली.

दिल्लीवर राज्य करणाऱ्या राजवंशापैकीं मोंगल राजे सर्वांत जास्त प्रसिद्ध झाले. सन् १९११ मधें इंग्रजानी दिल्ली ही आपली राजधानी ठरवली. भारताच्या स्वातंत्र्याची घोषणा सन १९४७ मधें दिल्लीतच केली गेली.

या शहरांत असंख्य ऐतिहासिक स्मारकें आहेत. ती फारच आकर्षक व उद्‌बोधक आहेत.

जिला नवी दिल्ली म्हटले जाते, त्या आधुनिक दिल्लीचे क्षेत्रफळ १४८३ किलोमीटर आहे, व लोकसंख्या जवळजवळ ८५ लाख आहे. इंग्लिशखेरीज इथें हिंदी, पंजाबी व उर्दू भाषा बोलणारी जास्त मंडळी आहेत.

राष्ट्राची राजधानी म्हणून दिल्लीचं एक वेगळं केंद्रशासित राज्य आहे. इथें ७० सभासदांची एक विधानसभा आहे व एक मंत्रीमंडळही आहे.

दिल्ली केवळ भारताची राजधानीच नाही, तर उत्तर भारताचे व्यापारी केंद्रदेखील आहे.

शहरांत व आसपास अनेक उद्योगधंदे वाढत्या प्रमाणांत चालू आहेत.

दिल्ली शहरांत कित्येक विद्यापीठे व शिक्षणाची नवीजुनी केंद्रे आहेत. नवी दिल्लीतले वातावरण नेहमी राजनैतिक व सांस्कृतिक हालचालींनी गजबजलेले असते.





# उधारखोराची व्यथा

एका गांवात नरसिंह नांवाचा ग्रामाधिकारी राहात होता. तो अतिशय न्यायी म्हणून आसपासच्या गांवात प्रसिद्ध होता. त्या गांवाच्या मधोमध एक मोठे वडाचे झाड होते. त्या झाडाखाली गांवकऱ्यांची गाऱ्हाणीं ऐकून तो न्यायनिवाडा करीत असे.

एक दिवस हिरालाल नांवाचा एक सावकार त्याच्याजवळ येऊन म्हणाला, "साहेब, मी तर लुटला गेलोय. आपणच न्याय करा आता!"

नरसिंहाने काय झालं ते विचारलं.

हिरालाल म्हणाला, "शेजारच्या गांवात शंकर नांवाचा एक इसम आहे. दोन वर्षांपूर्वी त्याने माझ्याकडून सातशें रुपये उधार घेतले होते. आजपर्यंत त्याने व्याजही दिलं नाही किंवा मुद्दलही दिलं नाही. त्याला बहुतेक माझे पैसे बुडवायचे असावेत. आता काय करायचं ते आपणच ठरवा आणि त्याच्याकडून माझी रकम मला मिळवून द्या."

यावर नरसिंहाने शिपायाला शंकरचे हातपाय बांधून, त्याला घेऊन येण्यास फर्मावले.

शिपायाने शंकरला पकडले व तो त्याच्याबरोबर गांवाकडे येऊं लागला. उन्हाळ्याचा रखरखाट होता. वाटेंतच एक चिंचेचे मोठे झाड होते. शिपाई शंकरला म्हणाला, "बघ, किती कडक उन पडलंय ते. आपण थोडा वेळ या झाडाखाली थांबून नंतर पुढें जाऊं."

हे बोलणें ऐकून शंकर घाबरला आणि म्हणूं लागला, "या झाडाच्या आसपास जितकी गांवे आहेत, तिथल्या सगळ्या लोकांकडून मी उधार रकमा घेतलेल्या आहेत. आणि अजून कुणाचेही कर्ज फेडलेले नाही. त्यांच्यापैकीं जर कुणी मला पाहिलं तर तो मला सोडणारच नाही. म्हणून तूं आपला लवकर मला तुमच्या गांवी घेऊन चल."



# शोधा, सांग, नि जिंका !

या अंकात प्रकाशित झालेल्या प्रश्नावलीची उत्तरें पुढील अंकात दिली जातील. तोपर्यंत 'भारताचा शोध प्रश्नोत्तरी, चंदामामा बिल्डींग्ज, वडपळणी, चेन्नई - ६०० ०२६ या पत्त्यावर आपली उत्तरें अवश्य पाठवा. परंतु या स्पर्धेत भाग घेण्यासाठी कांही गोष्टी तुम्ही करायला हव्यात.

चांदोबाच्या मागल्या अंकात प्रसिद्ध झालेली कांही वचने, अवतरणें किंवा पूरक वाक्यें नीट वाचा. त्यापैकी तुम्हाला कोणती वाक्यें आवडली व कां आवडली हे पानाचा क्रमांक देऊन सुमारे शंभर शब्दांत सांगा. तुमचे शिक्षक किंवा पालक यांचेकडून, तुमची प्रवेशिका प्रमाणित करा. त्यावर तुमचे नांव, सही, वय, वर्ग, विद्यालय (विद्यार्थी असाल तर) व संपूर्ण पत्ता लिहून वरील पत्त्यावर पाठवा.

**पहिलें बक्षीस : रु. १०००/-**
**दुसरे बक्षीस : रु. ५००/-**

**आणि**
**पांच उत्तेजनार्थ बक्षिसें**
**प्रत्येकी रु. २००/-**






**भारताचा शोध प्रश्नोत्तरी :**

एका आक्रमकाने एका राजाचे अपहरण केले व राणीला संदेश पाठवला की जेव्हां राणी आक्रमकाबरोबर विवाह करण्यास तयार होईल तेव्हांच राजाची सुटका करण्यांत येईल. राणी कबूल झाली आणि पालख्यांत बसलेल्या शेंकडो दासींच्या लवाजम्यासह आक्रमकाच्या शिबिरांत पोंचली. पालख्यांतून दासींऐवजी शेकडों दसैनिक शिबिरांत शिरले व त्यांनी शत्रूच्या गोटांत दाणादाण उडवली. वीरांगना राणीने राजाची सुटका केली व त्याच्यासह आपल्या महालीं परत गेली. या ऐतिहासिक कथेतले राजा व राणी कोण होते? आक्रमक कोण होता? ही कोणत्या शतकांतली घटना आहे?




खाली दिलेल्या पौराणि व्यक्तींचे एकमेकांशी कोण नाते आहे?

| | | |
|---|---|---|
| **अ : भीम** | - | **शिशुपाल** |
| **ब : जरासंध** | - | **कंस** |
| **क : भीष्म** | - | **विचित्रवीर्य** |
| **ड : अश्वत्थामा** | - | **कृपाचार्य** |
| **ई : विदुर** | - | **शुकदेव** |




१. जगांतल्या सर्वप्रथम नीतिकथा कोणत्या भारतीय साहित्यकृतींत आहेत? लेखक कोण आहे?
२. जगांतले सर्वप्रथम कथांचे संकलन कोणत्या भारतीय साहित्यकृतींत आहे? लेखक कोण आहे?
३. कोणत्या भारतीय साहित्य कृतींत जगांतला सर्वप्रथम उपदेश, नीती किंवा आध्यात्मिक कथासंग्रह आहे?
४. सर्वांत जास्त वाचला जाणारा भारतीय धार्मिक ग्रंथ कोणता आहे?
५. कालक्रमाने, प्राचीन भारतीय साहित्यांतल्या कोणकोणत्या चार पायऱ्या मानल्या जातात?



**हे लक्षांत असूं द्या !**

**अटी :**

१. चंदामामा इंडिया लि., सिंटास अभिराडीपुरीज इंडिया लि., इनिशिएटिव्ह मिडिया व ब्रिटानिया इंडस्ट्रीजचे कर्मचारी किंवा त्यांचे नातेवाईक किंवा सहकारी यांना या स्पर्धेत भाग घेता येणार नाही.
२. परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील व त्याबाबतीत कोणताही पत्रव्यवहार केला जाणार नाही.
३. गचाळ हस्ताक्षरांतल्या प्रवेशिका रद्द ठरवल्या जातील.
४. मे २००० च्या 'चांदोबा' मधे स्पर्धेचा निकाल जाहीर केला जाईल.
५. प्रवेशिका आमच्याकडे २९ फेब्रुवारी २००० पर्यंत पोंचल्या पाहिजेत.

# खरा चमत्कार

एक दिवस संध्याकाळ झाल्यानंतर दुकानें बंद करायची वेळ झाली. एका व्यापाऱ्याने आपल्या दुकानाच्या दरवाज्याला कुलूप लावले, व दिवसभरांत जमलेली रकम एका छोट्या थैलींत भरुन तो घराकडे वळला.

अचानक एक तरुण कुठूनतरी उपटला आणि त्याची थैली हिसकावून घेऊन पळूं लागला. व्यापारी व रस्त्यावरचे कांही लोक, यांनी त्या चोराचा पाठलाग केला. तो हुलकावण्या देण्यासाठी वांकडातिकडा पळत होता, तरीदेखील तो लवकर पकडला गेला. लोकांनी त्याला शहरांतल्या कोतवालाच्या ताब्यांत दिला. त्या तरुणाने चटकन कोतवालाचे पाय धरले आणि क्षमा करण्याची विनंती केली.

परंतु त्या तापट कोतवालाने त्याला इतक्या जोराने लाथ मारली कीं तो कोलमडत लांब जाऊन पडला. या संधीचा फायदा तो थोडाच सोडणार होता? तो चटकन उठला आणि अंधारातल्या गर्दीत दिसेनासा झाला. कोतवालाचे शिपाई त्याच्या मागावर निघाले. त्या तरुणाने अनेकवेळा पळण्याची दिशा बदलली व शिपायांना गुंगारा देऊन तो निसटला.

शहराच्या बाहेर पडल्यानंतर तो जंगलाच्या बाजूला जाऊं लागला. पण जेव्हां तो जंगलापर्यंत पोंचला, तेव्हां त्याच्या मागावर असलेल्या शिपायांच्या बुटांचे आवाज त्याने ऐकले. त्या वाटेजवळ एक लहानशी झोंपडी होती. झोंपडीतल्या प्रकाशाचा एक मंद किरण रस्त्यावर पडला होता. तिथपर्यंत पोंचण्याची त्या तरुणाने शिकस्त केली. पण तो अतिशय थकला होता. वाटेंतच तो घेरी येऊन पडला व बेशुद्ध झाला. शिपाई त्याच्या बेहोष शरीराजवळून गेले पण त्याच्याकडे त्यांचे लक्ष गेले नाही.







त्या झोंपडीत एक साधुमहाराज राहात होते. त्यांनी त्या तरुणाला आपल्या झोंपडीत आणलं, त्याची शुश्रूषा केली व कांही वेळानंतर तो शुद्धीवर आला.

"माझी आपल्याला विनंती आहे की आपण मला आपल्याजवळ ठेवावे व आपली सेवा करण्याची संधी मला द्यावी" तरुणाने मोठ्या नम्रतेने साधूमहाराजांना विनवले. तरुणाला वाटलं कीं हे ठिकाण त्याच्या दृष्टीने सुरक्षित आहे. कारण साधारणपणें साधूबैरागी किंवा त्यांचे शिष्य यांना शिपाई त्रास देत नाहीत.

त्या दयाळू साधूने तरुणाला आपला शिष्य म्हणून स्वीकारले. तो तरुण खराच बदलला व साधूचा भक्त बनला. साधूने त्याला ध्यान व योगाचे शिक्षण दिले व इतरही अनेक ज्ञानसंवर्धक गोष्टी शिकवल्या. कांही काळानंतर तो खरोखरच ज्ञानी झाला. कांही वर्षांनंतर त्या साधुमहाराजांनी आपल्या शरीराचा त्याग केला. पण त्यांचा हा भक्तही त्यांच्याइतकाच प्रसिद्ध झाला होता. तो त्याच झोंपडीत राहात होता. गुरुप्रमाणेंच शिष्याचीही सगळीकडे आदरपूर्वक भलावण होत होती. व गुरुच्यानंतर हा आता सत्पुरुष म्हणून गणला जाऊं लागला.

एक दिवस आपल्या भक्तांच्या विनंतीवरुन त्याने नगरांत पदयात्रा केली. पुष्कळ लोक त्याचे दर्शन घेण्यास आले. त्या सर्वांनी अनेक प्रश्न विचारले व त्याने सरळ व योग्य उत्तरें देऊन त्या सर्वांचे समाधान केले.

एक वृद्ध इसम या साधूचे प्रवचन लक्षपूर्वक ऐकत होता. तो पुढें आला व त्याने साधूच्या पायावर लोटांगण घातले व म्हटले, "गुरुमहाराज, मी जरी थोडासा तरी देवाच्या जवळ येऊं शकलो तरी तो एक चमत्कार ठरेल! मी आजपर्यंत लोकांशी फार निर्दय व कठोरपणें वागलो आहे. मी या गांवाचा कोतवाल होतो."

"मित्रा, असे चमत्कार अनेकदा होतात. एक दिवस मी तुझे पाय धरले होते. आज तूं माझे धरतो आहेस. हा एक चमत्कारच नव्हे कां? जर एका चोरावर भगवानाची कृपा होऊं शकते, तर चोर पकडणाऱ्यावर कां होणार नाही?" गुरुमहाराज हंसतमुखाने बोलले.

तो वृद्ध गृहस्थ गोंधळून साधूकडे बघतच राहिला. तेव्हां साधूने निःसंकोचपणे त्या प्रसंगाचे वर्णन केले. ज्यामुळें एका चोराचा साधू बनला त्या प्रसंगाचे कथन केले.

वृद्ध कोतवालाने पुन्हां साधूचे पाय धरले व त्याच्या डोळ्यांतून पश्चात्तापाचे अश्रू झरत होते.






# शतकांतली शेवटची वसाहत

कोणत्या वसाहतीला सशस्त्र किंवा निशस्त्र क्रांतिशिवाय स्वातंत्र्य मिळाले आहे? कोणत्या प्रदेशाने आपले राजे व मालक, यांचे वर्चस्व आंदोलनाशिवाय झुगारुन दिले आहे?

याचे उत्तर आहे मॅकॉव. चीनच्या ताब्यांत हे बेट होतं. परंतु गेली ४४८ वर्षे हे पोर्तुगीजांच्या मालकीचं होतं. आशिया व युरोपमधल्या व्यापाराचं हे एक समृद्ध केंद्र होतं. याचा सर्वांत जास्त फायदा चीनला होत होता. असंख्य चिनी उत्पादने युरोपला मॅकॉवमार्फत विक्रीसाठी जात होती.

भारतांतली गोवा ही देखील छोटीशी पोर्तुगीज वसाहत होती. पण तिथें मात्र शस्त्रबळावरच भारताला ती ताब्यांत घेता आली होती. आता काळ बदलला आहे. पोर्तुगाल चीनला मॅकॉव देऊन टाकतो आहे. आणि गंमत म्हणजे, चीनला हे बेट ताब्यांत घेण्याची बिलकूल घाई नाही!

४,३६,००० लोकसंख्येचे मॅकॉव, ही या शतकांतली स्वतंत्र होणारी शेवटची वसाहत आहे. यापूर्वी जगांतल्या इतर साऱ्या वसाहती गुलामगिरीतून मुक्त झालेल्या होत्या. १९ डिसेंबरच्या मध्यरात्री, बरोबर बाराचे टोले पडल्यानंतर, मॅकॉव सुरक्षादलाच्या चार अधिकाऱ्यांनी त्यांचा ध्वज उतरवून त्याची व्यवस्थित घडी केली आणि तो ध्वज पोर्तुगीज गव्हर्नर, मि. वास्कोरोजा व्हिएरा यांना भेट दिला. त्यांनी तो राष्ट्रध्वज छातीशी धरला आणि तिथल्या राजभवनाकडे अखेरचा दृष्टीक्षेप टाकला. १९९१ च्या एप्रिलपासून ते त्या भवनांत गव्हर्नर म्हणून राहात होते. एका सरकारी प्रवक्त्याने सांगितले कीं गव्हर्नरसाहेब तो राष्ट्रध्वज लिस्बनला घेऊन जातील आणि तिथें तो मॅकॉव सांस्कृतिक संशोधन संस्थेत प्रदर्शित केला जाईल.

पोर्तुगालचे राष्ट्राध्यक्ष पोर्तुगालचे राष्ट्राध्यक्ष जॉर्ज-सॅंपियो म्हणाले, "माझ्या मनांत अनेक विचार येत आहेत. ५०० वर्षांचा इतिहास एखाद्या चित्रपटा-सारखा कांही सेकंदात डोळ्यांसमोरुन जातो आहे." असंही घडतं कधीकधी!





# या शतकाची उपयुक्त भेट







एखाद्या काळांत जी नवलाईची गोष्ट असते, ती कांही काळानंतर सर्वसामान्य ठरते. १९१४ साली जेव्हां पनामा कालवा सुरुं झाला, तेव्हां इतिहासांतले एक महान आश्चर्य म्हणून त्याचा गौरव करण्यांत आला होता.

पनामा प्रदेशांतून वाहणारा हा कालवा फक्त ५० मैल लांबीचा आहे. त्याच्यामुळेंच पॅसिफिक व अटलांटिक हे दोन महासागर एकमेकाला जोडले गेले आहेत. हा कालवा खोदत असताना सुमारे ६००० कामगार मरण पावले. या कालव्यामुळें न्यूयॉर्क-सानफ्रान्सिस्को यांच्यामधले समुद्र-प्रवासाचे अंतर ८००० मैलांनी कमी झाले. त्यामुळें सामानाची कमी वेळांत होणारी नेआण शंभरपटींनी वाढली.

अमेरिकेचे प्रेसिडेंट रुझवेल्ट ह्यांना ही कालव्याची कल्पना सुचली. कालवा तयार झाल्यानंतर त्यांनी स्वतः जहाजांतून हा कालवा पार केला होता. तोपर्यंत अमेरिकेचे कोणतेही अध्यक्ष पदावर असेपर्यंत देशाबाहेर गेलेले नव्हते.

आज अगदी वेगळी परिस्थिति आहे. पूर्वी कालव्याची व्यवस्था व कारभार अमेरिकन लोक पहात असत. कारण कालव्यावर त्यांची मालकी होती. कालव्याच्या किनारपट्टीवर लहानलहान वसाहती वाढत गेल्या. अमेरिकन सैन्याने लष्करी शिक्षणासाठीं म्हणून कालव्याच्या किनाऱ्यावरचा जंगलाचा एक भाग वापरायला सुरवात केली. पण त्यामुळें तिथें राहणारे लाकूडफांटा गोळा करणारे बरेच जंगलनिवासी मारले गेले. पनामांतल्या नागरिकांना हे अजिबात आवडले नव्हते.

आता या कालव्याचे महत्त्व बरेच कमी झाले आहे. आज मालाची वहातूक विमानाने किंवा देशांतल्या खुष्कीच्या मार्गाने होते. अनेक अत्याधुनिक बोटी, आकाराने खूप मोठ्या असल्यामुळें, या कालव्यांतून जाऊं शकत नाहीत. पनामाचे नागरिक, कालव्यावर त्यांचा अधिकार असावा अशी मागणी करत आहेत. १९७७ साली प्रेसिडेंट जिमी कार्टर यांनी कालव्याचे अधिकार पनामा देशास देणाऱ्या तहनाम्यावर सही केली. त्यानुसार ३१ डिसेंबर १९९९ या दिवशीं औपचारिक समारंभात हा कालवा पनामा देशास मिळाला आहे.

# खास बातम्या

## खिशातलं पिशाच्च

ज्या ज्या खिशात एक सिगरेटचं पाकीट असतं, तो खरोखरच खिशात एक पिशाच्च बाळगत असतो. जेव्हा कोणी सिगरेट ओढत असतो, तेव्हा त्याला माहीत नसतं की प्रत्येक सिगरेट त्याच्या आयुष्याची ११ मिनिटं शोषून घेत असते. २० सिगरेटींचं एक पाकीट आयुष्यमानाचे तीन तास अन् चाळीस मिनिटं कमी करत असतं.

नोव्हेंबर १९९९ मधे अनुमान काढल्याप्रमाणे, पूर्ण



जगात १.२ बिलियन इतकी माणसं बिडी-सिगरेट ओढणारी आहेत. वर्षाच्या शेवटी त्यांच्यापैकी ४ मिलियन माणसं तंबाखूशी संलग्न रोगांमुळे मेलेली असतील.

## दीर्घतर आयुष्यासाठी त्या वाटेवर हसत रहा

तंबाखू ओढणं हे जसं माणसांना मारतं, तसंच हसणं हे त्यांच्या आयुष्याची काही वर्षं वाढवतं ही गोष्ट जगन्मान्य झालेली आहे. (हे सिद्ध करण्यासाठी आपणाजवळ गणिती पुरावा नसला तरी.) कसंही असलं तरी हास्य जीवन आनंदी करतंच. १ जानेवारी रोजी



संपूर्ण जगातल्या ५०० हास्यमंडळांनी जागतिक-हास्य-दिन साजरा केला.

## संपूर्ण विश्व हे एक घर आहे

आपण ज्या इमारतीत रहातो, ती इमारत म्हणजे 'आपलं घर' असे काहीजण मानतात, अन् दुसरे काही त्यांचे गाव किंवा शहर म्हणजेच 'आपलं घर' असे मानतात. आणखी काहीजण संबंध देशाला 'घर' मानतात; तर आणखीही काही असे आहेत, की ते पूर्ण पृथ्वीलाच 'आपलं घर' मानतात. 'वसुधैव कुटुम्बकम्''. तरल कल्पनाशक्तीवाला माणूस किंवा स्त्री सगळ्या



सूर्यमालेकडेच 'आपलं घर' म्हणून पाहू शकेल.

पण आता ब्रिटीश अंतराळतज्ञांना असे आढळले आहे की आपल्या सूर्यमालेबाहेरील एका ग्रहाकडून प्रकाश येत असतो. निराळ्या शब्दात सांगायचं, तर आपल्याला ठाऊक असल्यापेक्षा आपलं आयुष्य फार अज्ञात अशा शक्तीने प्रभावित झालेले असते. खरोखरच संपूर्ण विश्व हेच 'आपलं घर' आहे.



# चालू महिन्यात जन्मलेली विशेष व्यक्ती

## सत्याच्या शोधाचे चिन्ह

महान् मोगल सम्राट, बादशहा शहाजहान आणि त्याची बेगम मुमताज यांना पुत्रजन्म म्हणजे सहाजिकच एक आनन्दाचा प्रसंग. तो दिवस होता २० मार्च १६१५. राजमहाल आनन्दोत्सवात मग्न झाला.

दारा शुकोह नाव मिळालेला हा शहाजादा मोठा होऊन एक बुद्धिमान तरुण बनला. तो दयाळू असून सर्वांशी नम्रतेने वागे. पण विशेष म्हणजे इतर शहाजादे, किंवा राजपुत्र जसे करमणूक अन् चैनबाजीत वेळ वाया घालवतात तसा दारा शुकोह कधीही आपला वेळ वाया न घालवता, तो जास्तीत जास्त वेळ वेद, उपनिषदे यांसारख्या पवित्र ''ग्रंथां'' च्या पठणात घालवत असे. तो नेहमी विद्वान पंडितांना आपल्या महालात बोलावून घेऊन आठवडेचे आठवडे त्यांच्याशी तत्वज्ञान व आध्यात्म यांविषयी चर्चा करत राही.

### दारा शुकोह



दारा शुकोहने काही उपनिषदे व गीता यांचा अनुवाद पर्शियनमधे केला. जीवनाच्या आध्यामिक ध्येयाचा विचार करायचा, तर हिन्दु अन् मुस्लिम मतांमधे कोणताही विशेष फरक नाही, अशी त्याची खात्री पटलेली होती. या दोन मतांमधील साम्यांवर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न म्हणून त्याने 'समुद्रसंगम' (दोन समुद्रांचा संगम) नावाचे पुस्तकही लिहिले.

दुर्दैवाने, शहाजादा दारा अशा योग्य कार्याच्या मागे लागला होता, तेव्हा त्याचा धाकटा भाऊ औरंगजेब त्याच्याविरुद्ध एक खुनशी कारस्थान रचत होता. शहाजहान आजारी पडला, तेव्हा औरंगजेबाला संधी मिळाली. दाराचा एका लढाईत पराभव झाला. आणि त्याने जीवन खान [illegible] घरात आश्रय घेतला. हा अफगाण दादारचा गव्हर्नर होता. दाराने एकदा त्याचे प्राण वाचवले होते. पण या कृतघ्न माणसाने आपले प्राण वाचवणाराला औरंगजेबच्या हाती सोपवले. औरंगजेबने आपल्या हिडीस महत्वाकांक्षेच्या पूर्ततेसाठी आपल्या [illegible] थोरल्या भावाची-जो सिंहासनाचा वारस होता-दिल्लीच्या रस्त्यांवरून पायी चालवत मिरवणूक काढली. ३० ऑगस्ट १९५९ रोजी दाराला मारून टाकण्यात आले. त्याचा मुलगा सुलेमान याची तो कैदेत असताना १६६२ मधे कत्तल करण्यात आली. औरंगजेबने नंतर आपले आणखी दोन भाऊ मुराद व शुजा यांनाही मारून टाकले.

### दाराशुकी हचे लिखाण

या जगात नव्हे तर पुढल्या जगात च (परलोकात) देवाचे अस्तित्व जाणवू शकते-या कल्पनेला काही आधार नाहीय. कारण तो जर सर्वव्यापी असेल, तर ही गोष्ट नक्कीच की, कुठल्याही प्रकारे, कुठेही अन् कुठल्याही वेळी तो स्वतःचे अस्तित्व दाखवण्यासाठी प्रकट होऊ शकतो. जो कोणी त्याचे अस्तित्व (या दुनियेत) अनुभवू शकणार नाही, त्याला तिथे (नंतरच्या-दुसऱ्या दुनियेत) ते अनुभवायला फार त्रास होईल.

मी, स्वतःच स्वयं विष्णु असणाऱ्या, आपल्या आत्म्याच्या इच्छेने आपल्या मनाला मंदार पर्वत (रवी) व आपल्या संकल्प-विकल्पांना देव व दानव (दोन बाजूंनी मंथन करणारे) बनवून शास्त्रांचा सागर घुसळून काढला. त्यातून मी असं ज्ञान-रत्न मिळवलं, की जे देवांना व दानवांनाही मिळू शकले नाही. (तशी तर मंथनातून त्यांनी चौदा रत्ने काढली होतीच)

केवळ परमात्म्याच्या आराधनेतून व त्याच्या ज्ञानातूनच मला ''समुद्रसंगम'' किंवा 'दोन समुद्रांचे मिलन' हा ग्रंथ पुरा करायची शक्ती प्राप्त झाली.

# चांदोबा

## फेब्रुवारी, २०००



### अुत्तरे

१. राणी पद्मिनी व मेवाड (अुदेपुर)चा राजा रतनसिंह. हल्लेखोर होता - अल्लाअुद्दीन खिलजी. ही घटना १३०२ मधे घडली.

२. अ. पहिला चुलत भाअू.
   ब. कंस हा जरासंधाचा सासरा.
   क. सावत्र भाअू.
   ड. कृपाचार्य अश्वत्थामाचे मामा.
   इ. सावत्र भाअू.

३. १. विष्णुशर्माकृत-पंच तंत्र
   २. गुणाढ्यकृत बृहत् कथा - ज्यातून सोमदेवकृत कथासरित् सागर घेतलेले आहे.
   ३. बुद्धाच्या जातक-कथा
   ४. भगवत्गीता
   ५. वेद, अुपनिषद, महाकाव्ये (रामायण व महाभारत) व पुराणे.

# नव्या स्पर्धा

## चांदोबाचे

### वाचकांस आवाहन

निरनिराळ्या क्षेत्रांत शोधबोध व कल्पनाविलास यांना चालना देणाऱ्या स्पर्धांमधें भाग घ्या.





## छायाचित्र

### शीर्षक स्पर्धा

१. नवोदित छायाचित्रकारांनी या स्पर्धेसाठीं एकमेकांशी संबंधित असलेल्या दोन छायाचित्रांची जोडी पाठवावी. दोन्ही चित्रांबद्दल छायाचित्रकाराने आपले स्पष्टीकरण सोबत दिले पाहिजे.

**निवडलेल्या चित्रांच्या जोडीस**
**रु. ५००- चे पारितोषिक**
**या स्पर्धेसाठीं केव्हांही छायाचित्रें पाठवा !**



२. चांदोबात जाहीर केलेली म्हण किंवा वाक्प्रचार यांचा अर्थ सांगून स्पर्धकाने १५०-१७५ शब्दांत एखादा विनोद, स्वानुभव किंवा नवीजुनी गोष्ट सांगावी. तुमच्या लेखांत गोष्टीचे तात्पर्य जरूर असावे. परंतु ज्या मूळ कथेमधून ती म्हण प्रचलित झाली, ती कथा मात्र नसावी.

या महिन्यांतली स्पर्धा
**''गाढवाला गुळाची चव काय**
**किंवा दुरून डोंगर साजरे''**
तुमचे लेख ३१ मार्च २००० च्यापूर्वी आमच्याकडे आले पाहिजेत.
बक्षीसपात्र लेख मे २०००च्या चांदोबा मधें प्रसिद्ध होईल.

बेतालाच्या गोष्टी

# प्रतिभेला आश्रय

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा त्या झाडाजवळ गेला. नेहमीप्रमाणे प्रेत झाडावरून अुतरवून आपल्या खांद्यावर टाकले आणि निडर होअून तो स्मशानाकडे चालू लागला. तेंव्हा प्रेतात लपलेला वेताळ म्हणाला, ''राजा, तुझा संकल्प आणि साहस अदम्य आहे. कठीणात कठीण असं कोणतंही काम करायची तुझ्यात अद्भुत अशी शक्ती आहे. आणि अुच्चतम ध्येय गाठण्यासाठी अपेक्षित इतकं धैर्य आणि सामर्थ्यही आहे. जगात तुझ्यासारखा माणूस विरळाच, पण तू आपली शक्ती आणि सामर्थ्याचा जो अुपयोग करत आहेस, तो मात्र वाया जाणार असं वाटतंय. तू



वाटतंय. तू जे ध्येय साधायला अर्ध्या रात्री या निर्जन स्मशानात इतके घोर परिश्रम करत आहेस, त्याची नीट माहिती तुला आहे का? नसेल, तर हे सारे प्रयत्न फुकटच ना? तूही विवेक शर्माप्रमाणेच सर्व काही मिळूनही क्षणभरात सारं घालवून टाकशील. तुला सचेत करण्यासाठी त्याचीच गोष्ट तुला सांगतो म्हणजे ऐकताना वाटचालीचा थकवाही दूर होईल."

इतके बोलून वेताळ गोष्ट सांगू लागला-

साहित्यपुरात विवेक शर्मा नावाचा एक कवी रहात असे. त्याने अनेक काव्य-ग्रन्थ रचले. त्याच्या रचनेत एका महाकवीची सगळी वैशिष्ट्य होती. तरीही महाकवी म्हणून यश व ख्याती मिळवायची त्याची थोडीही इच्छा नव्हती. त्याची फक्त इतकीच अपेक्षा होती की आपलं काव्य जास्तीत जास्त लोकांनी वाचावं अन् त्यातून प्रेरणा घेऊन देश व समाजासाठी काही तरी करावं. पण तसं घडलं नाही आणि त्याच्या रचना सामान्य जनतेपर्यन्त पोचू शकल्या नाहीत."

"सामान्य लोकांपर्यन्त तुझं काव्य पोचावं यासाठी त्याचा प्रचार होणं आवश्यक आहे. त्यासाठी तुला एकाद्या साहित्यप्रेमी धनिक शेठच्या आश्रयाची आवश्यकता आहे. त्याच्या साह्याने एक विराट साहित्य-संमेलनाची योजना कर. त्यात राष्ट्रीय पातळीवर तुझा सन्मान केला जावा. तुझ्या काव्याचं श्रेष्ठत्व जाणून समीक्षक आपले विचार व्यक्त करतील. वर्तमानपत्रातून तुझ्या फोटोसह भेटवार्ता प्रसिद्ध होतील. तेंव्हा कुठे सामान्य लोकांना तुझ्या रचनांबद्दल जिज्ञासा वाटेल." विवेक शर्माच्या एका शुभचिन्तक मित्राने त्याला सल्ला दिला.

पण विवेक शर्माचे विचार अगदीच निराळे होते. त्याने म्हटले, "प्रचाराशिवायच माझ्या काव्यांचे श्रेष्ठत्व लोकांना कळेल, तेंव्हाच मला संतोष वाटेल. श्रेष्ठ काव्याची ख्याती सूर्यकिरणांप्रमाणे स्वतःच पसरायला हवी. तू सांगितलेल्या मार्गावर चालणं, माझ्या सिद्धांताविरुद्ध आहे."

इतक्यातच राजा प्रगल्भवर्माने देशभरात घोषणा केली की, ते स्वतः महाकवी असूनही दुसऱ्या एका प्रतिभाशाली कवीबरोबर त्यांना एका महाकाव्याची रचना करायची आहे. ज्या कवीची या सृजन कार्यासाठी निवड होईल, त्याचा राष्ट्रीय पातळीवर सन्मान व प्रसार केला जाईल.

विवेक शर्माच्या मित्राने ही घोषणा ऐकून त्याला पुन्हा म्हटले, "ही तर तुला सुवर्णसंधी आहे. कोणत्याही कवी किंवा कलाकाराची ओळख होण्यासाठी राजाश्रय अनिवार्य आहे. ही संधी तू वाया घालवू नयेस. तावडतोब राजधानीला जायला तयार व्हायला हवंस."



मित्राची प्रेरणा अन् प्रोत्साहनामुळे विवेक शर्मा राजधानीला जाऊन राजाला भेटला. राजाने आपल्या काही रचना विवेक शर्माला दिल्या अन् त्याच्या काही रचना वाचण्यासाठी घेतल्या. आणि म्हटले, "मी तुमचं काव्य अभ्यासून आपला विचार सांगेन. तुम्हीही माझ्या काव्यांची समीक्षा करून आपलं मत मला सांगा. एका आठवड्यानंतर आपापल्या विचारांची देवाण-घेवाण करायला आपण पुन्हा भेटू."

विवेक शर्माची रहाण्याची व्यवस्था अतिथी-भवनात केली गेली. राजाबरोबर काव्य-रचनेची अपेक्षा बाळगून आलेले आणखी काही कवीही तिथे होते. शर्माने राजाचे काव्य एकाच दिवसात वाचून काढले आणि बाकीच्या दिवसात तो इतर कवींशी बोलत राहून त्यांची काव्य-प्रतिभा पारखत राहिला.

त्या कवींशी बोलल्यानन्तर विवेक शर्मा त्यांना म्हणाला, "तुम्हा सर्वांच्या काव्यांतले भाव अन् त्यात दडलेलं ज्ञान तर अद्भुत आहे. पण भाषा-शैलीत भावनांना अनुकुल परिपक्वता नाहीय, अन् सादरीकरणात चमत्काराचा अभाव आहे. काव्याच्या आत्म्याला अनुकूल असं त्याचं बाह्यांगही सुन्दर असायला हवं. ते नसेल तर अंगावरील चिंध्यांमुळे राजा जसा बरोबर दिसणार नाही, तशीच कविताही चमकणार नाही. अशी



योग्यता मिळवायची असेल, तर काही दिवस एकाद्या गुरूच्या छत्रछायेखाली साधना केली पाहिजे.

विवेक शर्माने आपणाबद्दल केलेल्या टीकेचा त्या कवींवर काही विशेष परिणाम दिसला नाही, जणू काही स्वतःबद्दल त्यांना प्रथमच माहिती होती! परन्तु ते विवेक शर्माच्या काव्याबद्दलच्या सूक्ष्म दृष्टीमुळे प्रभावित मात्र नक्कीच झाले. त्यांच्यातला एकजण कवि शर्माला म्हणाला, "तुम्ही वर्णन केलेली महाकवीबद्दलची वैशिष्ट्य आमच्या गुरुत मात्र आहेत. पण ते स्वतः आले नाहीत. त्यांनी आम्हाला पाठवलं."

"तुमचे गुरुदेव स्वतः आले असते तर किती छान झालं असतं! आपले महाराज एकाद्या प्रतिभावान महाकविबरोबर एक महाकाव्य रचू



इच्छित आहेत. त्यात तुमच्या गुरूसारख्या महाकवींच्या सहयोगाची अपेक्षा होती. राजाची घोषणा ऐकून स्वतः न येता गुरूने या अर्ध्याकच्च्या अयोग्य शिष्यांना पाठवल्याचे विवेक शर्माला फार आश्चर्य वाटले.

"ती तर त्यांची केवळ घोषणाच तर होती. वास्तविकता काही निराळीच आहे. ते वास्तव्य जाणूनच आमचे गुरुजी स्वतःआले नाहीत. राजाबद्दल तुम्हालाच पूर्ण माहिती नाहीय, असं आम्हाला वाटतंय." एक कवी बोलला.

त्या कवींनी विवेक शर्माला राजाबद्दल काही अशा अंतस्थ गोष्टी सांगितल्या की ज्या विवेक शर्माला अगदी नव्याच वाटल्या. त्या ऐकून राजाबद्दलच्या त्याच्या भावनांना धक्का बसला. त्या कवींनी असे सांगितले की प्रगल्भ वर्मा स्वतः उच्च कोटीचा कवी मुळीच नाहीय, पण महाकवी म्हणवून घ्यायची इच्छा मात्र त्याला फार आहे.

विद्यार्थी-दशेत तो फार कष्टाळू होता. पण जन्मजात त्याच्यात प्रतिभेचा अभावच होता. कठोर परिश्रमांनी त्याने काही काव्य-प्रकारात थोडे-बहुत प्राविण्य मिळवले. युवराज असल्यामुळे त्याला थोड्याशा सफलतेबद्दलही खूप प्रशंसा, आणि प्रोत्साहन मिळे. पण त्यामुळे तो स्वतःला सर्वच काव्य-प्रकारात असाधारण प्रवीण मानू लागला. तो जेंव्हा-जेंव्हा साहित्य गोष्ठींमधे अन्य महाकवींना भेटला, तेंव्हा कुठे आपण महाकवी पदापासून शेकडो मैल दूर असल्याचे त्याने जाणले. तेंव्हापासून प्रतिभावान कवींसमोर तो हीन भावनेचा शिकार बनला अन् त्यामळे फार चिंतित अन् उदास राहू लागला.

प्रगल्भवर्मा राजा झाल्यावर त्याच्या महामन्त्र्याने चिन्तामुक्त होण्यासाठी त्याला असा सल्ला दिला - सध्या तर राज्यात शान्तता आहे, अन् कसली समस्या नसल्यामुळे खास योग्य माणसांची आवश्यकता नाहीय. त्यामुळे विशेष प्रतिभावानांना आपल्या अधिकारात कसलंही पद देऊ नका. अन् बेताच्या बुद्धिवन्तांनाच आपल्या जवळ बाळगा. त्यामुळे तुमचा आत्मविश्वास वाढीस लागेल. आणि हीन भावना आसपासही फटकणार नाही. पण हां, प्रतिभावान व्यक्तींसाठी एक निराळं शरणालय जरूर बनवा. त्यांना उत्तम वेतन आणि सर्व सुखसोयी प्राप्त करून द्या. आराम मिळेल असं पहा आणि विशेष परिस्थितीत त्यांच्याकडून फक्त सल्ला आणि युक्त्या विचारत रहा. त्यांच्या प्रतिभेचा यामुळे तुम्हाला लाभ



मिळत राहील अन् राज्यकारभाराबद्दल त्यांना काही अधिकार नसल्यामुळे तुमच्या रोजच्या कामात त्यांची कसली लुडबूडही रहाणार नाही. -

राजाने महामन्त्र्याच्या सल्ल्याप्रमाणे एका प्रतिभा आश्रयाची स्थापना केली. त्यात कित्येक योग्य कवी अन् कलाकारांना आश्रय दिला गेला. तिथे ते आनन्दाने, कसल्याही परिश्रमाविना अन् कसल्याही अडचणीवाचून निश्चिन्तपणे राहू लागले. या आश्रयात प्रतिभेची कमतरता नसली, तरी प्रजेला वाटे की, त्यांना या लोकांच्या प्रतिभेचा काहीच फायदा मिळत नाहीय. त्यामुळे प्रजेच्या मनात त्यांच्याबद्दल आदर नव्हता. तरीही प्रतिभावन्तांसाठी राजाने आश्रय-स्थापना केल्यामुळे प्रजा राजाची प्रशंसा करत असे.

राजाने एका मन्दबुद्धीला आपला नवा मन्त्री बनवले आणि एका सामान्य अयोग्य शिपायाला आपला सेनापती बनवले. याला राजापेक्षाही युद्ध-कौशल्याचे कमी ज्ञान व अनुभव होता.

हे सगळे जाणल्यानन्तर विवेक शर्मा आश्रयात जाऊन तिथल्या प्रतिभावन्तांना भेटला व त्यांचे सखोल ज्ञान व पांडित्य पाहून फारच प्रभावित झाला. आपल्या काव्यकृती त्यांच्या हातात पाहून त्याला आश्चर्य वाटले. चौकशी केल्यावर विद्वानांनी त्या कृतींची खूप प्रशंसा करून म्हटले की, 'राजानेच यांची समीक्षा करून आम्हा लोकांचे मत जाणून घ्यायची इच्छा व्यक्त केलीय. आम्हा सर्वांच्या दृष्टीने या रचना म्हणजे सर्वश्रेष्ठ काव्याचा नमुना आहेत, या काव्यांचा रचयिता व समोर उभा पाहिल्यावर त्यांना फार आनन्द वाटला.

विवेक शर्माने त्या विद्वानांच्या प्रतिभेची प्रशंसा करत त्यांना विचारले की, "आपण इतके योग्य असूनही असा अज्ञातवास का पत्करत आहात? या शरणालयाच्या चार भिंतींत स्वतःला का कोंडून घेतलं आहात? तुमच्याबद्दल देशाच्या प्रजेला काही माहितीही नाहीय अन् त्यांना तुमच्या प्रतिभेचा





लाभही मिळत नाहीय?"

अुत्तरादाखल त्या कवींनी पहिले कारण सांगितले की, "इथे केवळ पंडीत, विद्वान, साहित्यकार आणि कलाकारांनाच जागा मिळत असल्याने त्यांच्या संगतीत रहायची संधी मिळते."

दुसरे कारण त्यांनी असे सांगितले, "आम्ही आमची खरी ओळख आणि कीर्तीबाबत अधिक चिन्ता करत नाही. आमचा सल्ला अन् युक्त्या यांच्या साह्याने राजा अन् प्रजा दोन्हींना लाभ मिळतोय एवढ्यावर आम्ही संतुष्ट आहोत."

"याशिवाय इथे सर्व सुखं अन् आराम आम्हाला मिळत आहे."

राजाबद्दल हे सर्व जाणूनही विवेक शर्मा ठरल्या वेळी राजाकडे गेला अन् त्याच्या कृतींबद्दल आपले मत देत तो म्हणाला, "आपल्या काव्याची भाषा प्रांजळ आहे, व्यंजनात्मक आहे; पण तिच्या भावात सखोलता नाही अन् नाविन्यही नाही. म्हणूनच याला अुच्च कोटीचं काव्य म्हणता येणार नाही."

विवेक शर्माच्या या स्पष्टोक्तीमुळे राजाला जराही वाईट वाटले नाही. त्याच्या रचनांची प्रशंसा करत विवेक शर्माला राजा म्हणाला, "ही एका प्रतिभावान कवीची अगदी निस्संदेह सर्वोत्तम कोटीची रचना आहे. अशा प्रतिभावन्ताचे आमच्या शरणालयात कायम स्वागत आहे." याबरोबरच राजाने विवेक शर्माला एक रत्नहार भेट दिला.

परन्तु राजाचा प्रस्ताव नाकारत विवेक शर्माने शरणालयात रहाण्यास नकार दिला. कारण त्याला कळून चुकले होते की, राजाने त्या चार अयोग्य कवींबरोबर काव्यरचना करण्याचा निर्णय अगोदरच घेतलेला होता. शरणालयात केवळ आराम व सुखसोयींचा लाभ घेत रहाणं त्याला आवडलं नाही. म्हणूनच राजाचा निरोप घेअून तो आपलं गाव साहित्यपुर इथे परत आला.

ही गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, "राजा! विवेक शर्माने जाणून-बुजून हाती आलेली सुसंधी वाया घालवली. शरणालयात त्याला प्रतिभावन्तांबरोबर रहायची संधी मिळाली असती. तेंव्हा त्याचा निर्णय म्हणजे अविवेकच नव्हे काय? अुत्तर माहीत असूनही सांगायचं टाळलंस, तर तुझ्या मस्तकाचे तुकडे-तुकडे होतील."

राजा विक्रम यावर म्हणाला, "विवेक शर्मा केवळ एक असाधारण प्रतिभेचा कवीच नव्हे, तर त्याचे विचारही अुदात्त अन् महान् होते. तो अुच्च सिद्धान्ताचा व्यक्ती होता. स्वस्त लोकप्रियतेची लालसा त्याला नव्हती अन् महाकवी म्हणून यशाचाही तो भुकेला नव्हता. धन किंवा सत्तेच्या आश्रयाखाली आपली प्रतिभा वाढावी अशीही इच्छा नव्हती. अन् भयामुळे सत्य नाकारून सुख-सुविधाच्या लोभाने असत्य आणि खोट्या प्रशंसेला आश्रय द्यायचीही त्याची इच्छा नव्हती. शरणालयात रहाणारे कवी मेधावी अन् प्रतिभावान असले तरी त्यांच्या जीवनाला कसलाही अुच्च अुद्देश नव्हता. आपल्या प्रतिभेने एखादं महान प्रयोजन सिद्ध ते करू इच्छित नव्हते. केवळ राजाश्रयाने राहून सुखोपभोग भोगणं इतकाच त्यांचा अुद्देश होता. असे लोक भयामुळे राजाबद्दलचे आपले सत्य अन् निर्भिड विचार कधी प्रकट करू शकत नव्हते. अुलट विवेक शर्माने निःसंकोचपणे राजासमोरच त्याच्या काव्यावर कटु टीका केली. अन् सत्य व्यक्त करताना त्याच्या परिणामाची थोडीही पर्वा केली नाही.

अतिथिनिवासात रहाणाऱ्या कवींकडून त्याला राजाबद्दल जेंव्हा हे माहीत झाले की तो फक्त आपल्यापेक्षा श्रेष्ठ अन् फक्त आपली खोटी प्रशंसा करवण्यासाठीच शरणालयात त्यांनाआश्रय देत असतो; तेंव्हा त्याला समजून चुकले की, प्रतिभेचं खरं प्रयोजन इथे सिद्ध होणार नाही.

त्याची इच्छा होती की कविच्या रुपात आपली ओळख जनजीवनात त्याची प्रतिभा व काव्यगत गुणांच्या आधारावर व्हावी अन् आपण जनजनाचा कवि बनावे, लोकांनी आपल्या काव्याला आपल्या जीवनाची शैली बनवावं, आपल्या दैनिक जीवनात अुतरवावं - तेंव्हाच त्याच्या कवित्वाला एक प्रयोजन मिळेल - आणि त्याच्या प्रतिभेचं औचित्य सिद्ध व्हावं.

हे सर्व राजदरबारातला लाळघोटा कवी बनून तो कधीच करू शकला नसता. म्हणूनच राजाश्रय ठोकरून विवेक शर्माने आपल्या दृष्टीने एक मोठा विवेक दाखवून दिला, विवेकहीनता नव्हे."

राजाचे अशारीतीने मौन भंग झाल्यामुळे वेताळ त्या शवासह अदृश्य होअून पुन्हा झाडावर जाअून बसला.





# चूक कुठे घडली?

गावच्या शिवमन्दिरातल्या भगवान शंकराला अर्पण केलेला वळू मोठा गर्विष्ठ प्राणी होता. कोणी जवळून जाईल, तर त्याच्यावर हल्ला करायला त्याला फार आवडे. पण त्यानं कधी कुणाचं शारीरिक नुकसान केलं नव्हतं. त्याला घाबरून जे वेगाने पळून जाऊ शकत नसत, त्यांच्यातले काही जण धुळीत किंवा रस्त्याकडेच्या झाडीत कोलमडून पडत असत.

गावच्या जमीनदाराचा मुलगा शिवशंकर हा गावापासून कित्येक मैल दूर आपल्या मामाकडे रहात असे, कारण तिथे औक चांगली प्राथमिक शाळा होती. तो सध्या आपल्या गावी आला होता अन् शिवमन्दिराजवळ नदीकिनारी समवयस्क मुलांबरोबर खेळत होता.

बैलाजवळून जात असताना स्वतःची काहीही चूक नसूनही त्याच्याकडून अपमानित झाल्यामुळे तो चिडला होता. तरी बरं, की भाग्याने त्याच्या मित्रांनी त्याची फजिती पाहिली नव्हती. मित्रांनी त्याला सावधगिरीचा इशारा दिला. "हा देवाला सोडलेला वळू मोठा गर्विष्ठ आहे. आम्हाला तर त्याच्या खोड्यांची सवय आहे, वाईट वाटून घेत नाही. अन् शिवाय भगवान शंकराचं वाहन असल्याने याला कोणी मारपीट करू शकत नाही."

एक भिकारी त्या बैलाजवळून जात होता. कपड्यांच्या नावाखाली त्याच्या अंगावर काही चिंध्याच होत्या अन् हातात भीक मागण्यासाठी एक जुनी पिशवी लटकावून ठेवली होती. मुलांना वाटले की याला पाहून बैल नक्की अुत्तेजित होईल अन् हल्ला करील. बिचारा भिकारी पळू तर शकणार नाही. अन् आपल्याला मजा पहायला मिळेल.

मुलं श्वास रोखून वाट पाहू लागली. आपण सर्वांपेक्षा निराळे आहोत, बहादुर आहोत असे दाखवण्यासाठी जमीनदार पुत्र तमाशा जवळून पहाता यावा म्हणून बैलाच्या जवळ पोचला. पण त्याने काळजी घेतली की आपण बैलाच्या मागेच राहू म्हणजे तो आपल्याला पाहू शकणार नाही.

भिकाऱ्याला बैलाची सवय ठाअूक असल्याने, त्याने आपली चाल हळू केली, अन् "शिवशंकर, शिवशंकर" असे पुटपुटत तेथून निर्विघ्नपणे निघून गेला.

बैलाच्या जास्त जवळ असल्याने फक्त जमीनदाराचा मुलगाच फक्त भिकाऱ्याने पुटपुटणे ऐकू शकला होता. दोन कारणांमुळे त्याला आनन्द वाटला. पहिलं म्हणजे त्याला बैलाला शान्त करण्याचं तन्त्र ठाअूक झालं, अन् दुसरं म्हणजे 'शिवशंकर' हे त्याचंच नाव होतं.

"भिकारी खरोखरच बहादुर आहे." मुलं म्हणाली. शिवशंकर मित्रांजवळ जाअून बोलू लागला, "मी या बैलाजवळून जाअू शकतो पहा. तो मला काहीही करणार नाही."

"नाही, नाही, बाबा! असं नको करूस" मुलांनी त्याला सावध केले.

पण शिवशंकरची पक्की खात्री होती की, आपल्याला बैलावर नियंत्रण ठेवायचं रहस्य कळलेलं आहे. त्यामुळे त्याच्या जवळून जात तो, "मी स्वतः, मीच; मीच;." असे पुटपुटू लागला. कारण 'शिवशंकर' तर तो स्वतःच होता ना!"

बैल आधीपेक्षा जरा जास्तच अुत्साहाने त्याच्यावर तुटून पडला. शिवशंकर जीव घेअून तेथून पळाला अन् एका दगडाला ठेचकाळून झाडीत कोलमडला!

भिकारी फार दूर गेलेला नव्हताच. त्याने धावत येअून मुलाला झाडीतून बाहेर काढले. शिवशंकरचे मित्रही धावत आले.

शिवशंकरच्या डोळ्यातून पाणी वाहू लागले. आणि तो यासाठी हैराण होता, की अखेर त्याच्या हातून चूक तरी कोणती झाली?



# जिगरदोस्त

गोकुळ व गोपाळ दोघे एकाच गावचे रहिवासी होते. दोघेही एक दिवस आपापल्या कामासाठी शेजारच्या गावी गेले होते. आपल्या गावी परत फिरताना ते दोघे बरोबर येत होते.

गोपाळला स्वतःबाबत बढाया मारण्याची सवय होती. गोष्ट बनवून आपला अपमान, आपल्या स्तुतीत बदलणे, हा त्याच्या डाव्या हातचा मळ होता.

आपल्या गावात पोचताच, समोरच्या गल्लीतून कुणालातरी घोडागाडीतून येताना त्याने पाहिले. ते पहाताच तो गोकुळला म्हणाला, "आज तर मी चांगलाच अडकणार आहे. समोरून घोडागाडीतून येणारा, गावचा सर्वात श्रीमंत माणूस कृष्ण यादव ह तर माझा जिगरदोस्त आहे. लहानपणी आम्ही दोघे बरोबरच शिकत असू, अन् तऱ्हेतऱ्हेचे खेळही खेळत असू. त्यानं मला पाहिलं, तर तो जबरदस्तीनं मला पकडून आपल्या घरी घेऊन जाईल, तऱ्हेतऱ्हेची पक्वान्नं खायला घालून तासन्तास लहानपणाच्या गोष्टी सांगत बसेल, आणि मनात नसूनही मला सगळं ऐकून घ्यावं लागेल. माझ्याजवळ कुठंय इतका वेळ? ताबडतोब आत्ता घरी जाऊन मला कितीतरी कामं करायची आहेत! त्यानं मला पहावं आणि माझा अुगीचच वेळ खावा, हे आत्ता मला आवडणार नाही. तेंव्हा आता मी त्या भिंतीमागे लपून बसतो." असे म्हणून तो एका घराच्या भिंतीमागे लपून बसला.

इतक्यात घोडागाडी जवळ आली. त्यातून पांढरी रेशमी वस्त्रे व किंमती चप्पल धारण केलेला व हातात छडी घेतलेला एक धनवान माणूस खाली अुतरला. क्रोधाने तो आपल्या नोकराला म्हणाला, "पकड त्या भिंतीमागे लपलेल्या बदमाशाला अन् चांगला पिटून काढ."

नोकर भिंतीमागे लपलेल्या गोपाळला पकडणार, इतक्यात तो तेथून जीव घेऊन पळत सुटला, अन् कोपऱ्यावर अुभा राहून गोकुळ येण्याची वाट पाहू लागला. हा सारा तमाशा पाहून गोकुळ हैराण झाला होता. गोपाळजवळ जाऊन तो म्हणाला, "कृष्ण यादवनं रागानं आपल्या नोकराला तुला पिटून काढायला सांगितलं होतं, पण तू तर म्हणत होतास की..."

त्याचं बोलणं मधेच थांबवत गोपाळ म्हणाला, "कि तो माझा जिगरदोस्त आहे; हेच नं? लहानपणीही आम्ही असला खेळ खेळत असू. पहायला माझ्या मित्राचं हे वागणं विचित्र वाटतं, पण मला त्याचा स्वभाव माहीत असल्यानं मी त्यात काही वाईट मानत नाही."

**- सुधाकर कीर्तने**





# सुवर्ण सिंहासन

(३)

(आतापर्यन्त: - खूप पूर्वी दक्षिण भारत चार राज्यांत विभाजित होता - कौंडिन्य, कालिन्दी, चम्पक व कुन्द. कौंडिन्यचा राजा पौरस्वत याने आपली बुद्धी व बाहुबलाने चारी राज्यं एकत्र करून एका मोठ्या साम्राज्याची स्थापना केली. पण त्याच्या मृत्यूनन्तर सर्व राजे पुन्हा स्वतन्त्र झाले. कितीतरी पिढ्या होऊन गेल्या. कौंडिन्यचा वर्तमान राजा श्रीदत्त आणि कालिन्दीचा राजा माधवसेन यांचे मैत्रीपूर्ण संबंध होते. एक गोष्ट जवळजवळ निश्चित होती की, कौंडिन्यचा युवराज विजयदत्त याचा विवाह कालिन्दीची राजकुमारी श्रीलेखाशी होणार. चम्पकराजा मरालभूपती याची कौंडिन्यच्या सम्पत्तीवर कुदृष्टी होती. अन् त्याचा पुत्र चक्रभूपती याची नजर श्रीलेखावर. मरालभूपतीने आपल्या कूटनीतीने माधवसेनला आपल्या बाजूने वळवून कौंडिन्यवर हल्ला करायची योजना बनवली आणि श्रीलेखाचा विवाह आपल्या राजपुत्राशी करून देण्याबद्दलही त्याला तयार केले. परन्तु माधवसेनची राणी वसुमती हिची इच्छा अशी होती की, श्रीलेखाचा विवाह विजयदत्तशीच व्हावा, म्हणून तिने तिला गुप्तपणे कौंडिन्यनरेशाकडे पाठवले. दोघांनी गांधर्व पद्धतीने विवाहही केला...)

यापुढे -

इकडे विजयदत्त श्रीलेखाशी विवाह करत होता अन् तिकडे कालिन्दी राज्यात श्रीलेखाचा पिता दिशाहीन अन् निस्सहाय होऊन बसला होता.

दुसऱ्या एका भवनात चंपकप्रभु मरालप्रभु व त्याचा पुत्र भुकेल्या सिंहाप्रमाणे संधीची वाट पहात होते.

तो ज्येष्ठ एकादशीचा दिवस होता. श्रीलेखा व चक्रभूपतीच्या साखरपुड्याच्या मुहूर्ताचा दिवस होता तो. त्यापूर्वीच दोन दिवस आधी आपल्या सेनेसह मराल अन् चक्रभूपती दोघेही कालिन्दीत आले होते. पूर्वीच्या योजनेप्रमाणे साखरपुड्याचा कार्यक्रम संपल्यावर ते बहुल दशमीपर्यंत कालिन्दीतच राहून त्याच रात्री कौंडिन्यवर आक्रमण करणार होते. ही योजना मराल व माधवसेन दोघांनी मिळून निश्चित केली होती. माधवसेन रथोत्सवासाठी गेला होता, तेंव्हाच हे

**लक्ष्मी गायत्री**



ठरले होते.

त्या दिवशी मरालभूपती माधवसेनला म्हणाला, "मित्रा, माझ्या बोलण्याने गैरसमज करून घेऊ नको. हे विषय अंतःपुरातल्या स्त्रियांपासून गुप्तच राख. स्वतः महाराणी का असेना, शेवटी एक स्त्रीच आहे ना ती? अशा गोष्टी शेवटी आपल्याला धोकादायक ठरू शकतील."

माधवसेन मरालच्या गोड बोलण्यात अडकलेला होता. त्याला त्याचे सारे बोलणे बरोबर वाटले. मुलीला न सांगता तिचा विवाह ठरवणे त्याला गैर वाटले नाही. मराल मनमानी करत आहे हा विचार करायची त्याची शक्तिही नाहीशी झालेली होती. मराल आपल्या कन्येच्या जीवनाशी खेळत आहे हे न समजून त्याने विवाहाची गोष्ट आपली पत्नी व कन्या यांच्यापासून लपवली.

कालिन्दीराजा माधवसेनला आपली कन्या श्रीलेखा रहस्यमय पद्धतीने नाहीशी झाल्याचे कळताच त्याचे धाबेच दणाणले! धन-लोलुप असल्यामुळे कौंडिन्यच्या विरुद्ध मरालभूपतीच्या कारस्थानात तो अगोदरच सामील झालेला होता, चक्रभूपतीशी श्रीलेखाच्या विवाहासाठी तयार झाला होता. वास्तविक मरालभूपती व चक्रभूपती त्याच्या महालात हजर होते, आणि वाङ्निश्चयाचा समारंभ कोणत्याही शुभमुहूर्तावर होणारच होता. माधवसेनने आपला नवा मित्र मरालभूपतीच्या सल्ल्याने सारी योजना आपली पत्नी वसुमती हिच्यापासून गुप्त ठेवली होती, कारण तिला विरोध करायला संधीच मिळू नये.

परन्तु वसुमतीने आपली बुद्धी व युक्ती वापरून आपल्या पतीवर मात केली होती. ज्यादिवशी मरालभूपतीने माधवसेनला निमन्त्रण देऊन त्याला अचानक इतका मान सन्मान दिला, त्याचवेळी तिला मरालभूपतीच्या उद्देशाबद्दल शंका आली होती. तिला आपल्या पतीची कमजोरी ठाऊक होती. मरालभूपतीने कौंडिन्यकडून मिळणाऱ्या लुटीचा एक चांगला हिस्सा त्याला द्यायची लालूच दाखवली होती. अन् कौंडिन्य जिंकल्यावर राज्याचाही एक मोठा हिस्सा द्यायचे कबूल केले होते.

"मित्रा, कौंडिन्यचा खजिना म्हणजे आपल्या सर्वांचीच संपत्ती आहे. आपल्या पूर्वजांनीच महाराज पौरस्वत यांना भेटीदाखल मोठ्या प्रमाणात धन-दौलत दिली होती. आता आपल्याच पूर्वजांची गेलेली संपत्ती पुन्हा मिळवण्यात वाईट काय आहे?" मरालभूपतीचे हे बोलणे माधवसेनला



योग्यच वाटले.

राणी वसुमतीने आपला पती व मरालभूपती यांच्यात होणारी गुप्त वार्ता जाणून घेण्यासाठी काही गुप्तचर नेमले होते. त्यांचं कारस्थान जेंव्हा राणीला कळले, तेंव्हा ती विचलित झाली; राजकुमार चक्रभूपती अशिष्ट व स्वार्थी असल्याचे ही तिला कळले. अशा दुष्ट राजकुमारच्या हाती आपल्या सुसंस्कृत व संवेदनशील कन्येचा हात कधीही द्यायला ती तयार नव्हती.

कसेही करून हे कारस्थान मोडून काढायचे तिने ठरवले. आपल्या पतीला कसे समजावणार? त्याला मरालभूपतीच्या कुतंत्रांबद्दल कसे सांगावे? तो तर आता त्याच्या भविष्यातल्या कारस्थानात भागीदार होऊन चुकला होता. राज्य आणखी विस्तृत करण्याची अन् जास्त संपन्न होण्याची स्वप्नं तो पहात होता. मरालभूपती ज्या राजावर आक्रमण करू पहातहोता, तो आपला हितचिंतक व निकटबंधु आहे, हेही तो विसरला होता.

वसुमतीने श्रीलेखाला विश्वासात घेतले अन् पित्याची सारी गुप्त योजना तिला सांगितली. ती ऐकून श्रीलेखा स्तंभित झाली. पण धैर्य एकवटून ती म्हणाली, "आई, मी मरून जाईन, पण चक्रभूपतीशी लग्न कदापिही करणार नाही. तुला तर माहीतच आहे की, मी अन् विजयदत्त एकमेकांकडे आकृष्ट आहोत. माझं लग्न फक्त विजयदत्तशीच होईल; दुसऱ्या कुणाशी करायचा प्रश्नच उरत नाही. माझ्या मनांत दुसऱ्या कुणाला मुळीच स्थान नाही. पिताजींनी असा निर्णय कसा घेतला हेच आश्चर्य आहे. ते मार्ग चुकलेत. शत्रूच्या जाळ्यात अडकलेत. त्यांच्यावर सार्वभौम



बनायचं भूत स्वार झालंय. ते तर हेही विसरलेत की विजयदत्त त्यांचे शुभचिंतक असून त्यांना मान देतात. त्यांच्याशीच संबंध जोडणं आपल्या हिताचं आहे. पिताजी स्वतःच मला नरकात ढकलायला उत्सुक असतील, तर मी का जगावं? कुणासाठी जगावं?"

"तू असलं काहीही करणार नाहीयेस माझ्या बाळा! आपण दोघी मिळून हे कारस्थान उलथून पाडू शकतो." राणी तिला उत्साहित करत म्हणाली. अन् गुप्त रूपाने आपल्या मुलीला कौंडिन्यकडे पाठवायची तिने व्यवस्था केली. काही खास विश्वासपात्र दासी सोडल्या, तर बाकी कुणाला याबद्दल काहीसुद्धा कळले नाही.

आणि शेवटी, जेंव्हा वाङ्निश्चयाच्या निश्चित शुभदिनापूर्वी माधवसेनने राणीला श्रीलेखाच्या



प्रस्तावित विवाहाबद्दल सांगितले, तेंव्हा त्याला असे सांगण्यात आले की राजकुमारीचा महालात कुठे पत्ताच नाहीये. आता तो किंकर्तव्यमूढ झाला. मरालभूपती अन् चक्रभूपती तर दोघेही त्याच्या महालात अतिथि म्हणून राहिलेले होते. अन् वाङ्निश्चयानंतर कौंडिन्यवर आक्रमणही करायचे ठरले होते.

माधवसेनच्या महालात बसलेल्या मरालभूपतीला गुप्तचरांकडून सूचना मिळाली की विजयदत्तला त्याच्या पित्याने गुरुकुलातून तबाडतोब बोलावून घेतलं आहे. मरालभूपती व चक्रभूपती या दोघांसाठीही ही वार्ता वाईट होती, कारण त्यांना ठाऊक होते की विजयदत्त फारच बुद्धिमान अन् बहादुर आहे. त्यांना तर त्याच्या अनुपस्थितीत कौंडिन्यवर आक्रमण करायचे होते.

"आपल्याला आता तावडतोब कौंडिन्यवर आक्रमण करायला हवे, म्हणजे श्रीदत्त आणि विजयदत्तला युद्धाच्या तयारीला वेळच मिळायचा नाही." मरालभूपती आपल्या पुत्राला म्हणाला, आणि त्याने या आशयाचा निरोप माधवसेनलाही पाठवला.

आता काय करावे, हे माधवसनेला समजेना! इतक्यात गुप्तचरांकडून त्याला सूचना मिळाली की, त्याची कन्या श्रीदत्तच्या देखरेखीखाली सुरक्षित आहे. त्याने आता विचार केला की, कौंडिन्यावर आक्रमण करणे म्हणजे आपल्याच मुलीला धोक्यात टाकणे.

या बदललेल्या परिस्थितीत मरालभूपतीचा रोख काय असेल याबद्दल विचार करून तो भयभीत झालेला होता. त्याने स्वतःच्या लाभाकरताच आपल्याशी दोस्तीचा हात पुढे केला होता. चक्रभूपतीची श्रीलेखाशी विवाह करायची इच्छा होती, पण त्याला माहीत झालं की श्रीलेखा पळून कौंडिन्यला गेली आहे, तर तो काय माफ करेल मला? हे सर्व होऊनही मरालभूपती माझा मित्रच बनून राहिला, अन् आम्ही दोघांनी मिळून श्रीदत्तचा पराभव केला, तरी त्यानन्तर काय घडेल? आपला उद्देश पूर्ण झाल्यावर तो माझी चिन्ता कशाला करेल? चक्रभूपतीचा श्रीलेखाशी विवाह झाला असता, तर परिस्थिती नक्कीच थोडी निराळी असती. पण आता तर ते अशक्य आहे. सध्याच्या परिस्थितीत आपण मरालभूपती अन् श्रीदत्त दोघांचीही मैत्री घालवून बसणार, अन् आपण एकटे पडणार. मग कोणीही येऊन आपलं राज्य हडपेल. आपल्या पुत्राचा श्रीलेखाशी विवाह न झाल्यामुळे



कदाचित मरालभूपतीच आपली हत्त्या करेल.

अशा प्रकारे विचार केल्यानन्तर आता वास्तविकता त्याच्या नजरेसमोर स्पष्ट दिसू लागली. मरालभूपतीच्या गोड बोलण्याला फसून आपण केवढी चूक करून बसलो, याची त्याला आता कल्पना आली. त्याला वाटू लागले की, अजूनही आत्ता या क्षणापासून आपण सावध राहिलो नाही, तर आपलं पतन नक्कीच आहे! त्याबरोबरच आपण आपल्या प्रिय कन्येवर अन्याय करणार होतो असे त्याला वाटले. तिचं जीवन आपण पार तुडवून टाकणार होतो. आता त्याच्या मनात पश्चात्तापाची भावना उत्पन्न झाली. तो गंभीरतेने विचार करू लागला.

माधवसेन या विचारात हरवून गेलेला असताना, वसुमतीने त्याच्या दालनात प्रवेश केला अन् त्याला धीर देत बोलू लागली, "मरालभूपतीच्या दुष्ट इरादांच्या प्रभावात फसून तुम्ही जे काही केलतं, ते आता विसरून जा. चूक सुधारली, केव्हाही सुधारली, तरी तो उशीर मानू नये. माझा तर असा विश्वास आहे की, केवळ विजयदत्तच दक्षिणेची सर्व राज्यं जिंकून सम्राट बनण्याच्या योग्यतेचा आहे. चक्रभूपती तर त्याचा सेवकही बनण्याच्या लायकीचा नाहीय. विजयदत्तच्या नेतृत्वाखाली त्याची सेना मरालभूपतीचा नक्कीच पराभव करील." राणी हे मोठ्या विश्वासाने बोलली.

"पण श्रीदत्त अन् विजयदत्त दोघांनाही आता माझ्याबद्दल घृणा वाटत असेल. त्यांच्या मनात जो शत्रुभाव उत्पन्न झाला असेल, तो आता आपण कसा बदलू शकू?" माधवसेन बोलला.



"त्यांना खरी गोष्ट साफ-साफ सांगून टाका. सांगा की, आमची कन्या तुमच्याजवळ असल्यामुळे आता आमच्या शुभकामना तुमच्या बरोबर आहेत. विजयदत्त अन् श्रीलेखा यांना आपला आशिर्वाद पाठवा. आपला संवाद एकाद्या दूताकरवी नव्हे, तर कबुतराकडून कळवा. ते अधिक निष्कंटक अन् शीघ्रगामी होईल." राणी वसुमतीने माधवसेनला सल्ला दिला.

राजाने हा सल्ला मानला.

राणी पुन्हा म्हणाली, "हा कपटी मरालभूपती एक असे राज्य लुटून नष्ट करू पहात आहे, की ज्याने त्याचं काहीच बिघडवलं नाहीय. त्याला चांगला धडा शिकवायला हवा. म्हणून आता आपल्या सैन्याला अशी आज्ञा द्या की, मरालभूपतीने कौंडिन्यवर हल्ला केल्याबरोबर



तावडतोब आपल्या सैन्याने त्याच्या सैन्यावर आक्रमण करावे. दोन सैन्यांच्या मधे कचाट्यात सापडल्याने मरालभूपतीचे पायच अुखडले जातील! थोडा वेळपर्यन्त श्रीदत्त अन् विजयदत्त नक्कीच भ्रमात पडतील, पण लवकरच ते परिस्थिती ओळखून या प्रयत्नातला तुमचा सद्‌भाव ओळखून तुमची प्रशंसा करतील.''

''मी खरोखरच मरालभूपती अन् त्याच्या मुलाच्या कपटात अडकलो होतो. त्यांचे गोड बोलणे अन् माझी राज्य-आकांक्षा यांनी मला आंधळं बनवलं होतं. मी स्वप्नात रमून सत्याकडे पाठ फिरवली होती. कसा बाप मी तरी! आपल्याच मुलीचा गळा घोटायला निघालो होतो की! तूच माझे डोळे अुघडलेस! मी त्वरित संवाद पाठवतो आता!'' भय आणि ग्लानी यातून मुक्त होअून माधवसेन हसत बोलला.

प्रातःकालीन सूर्याचे सौम्य किरण महाराज श्रीदत्तच्या महालाच्या वरच्या कक्षात त्यांच्या पलंगावर चमकू लागले. इतक्यात एक पांढरे कबूतर येअून त्याच्या खांद्यावर बसले. त्याच्या गळ्यात एक पत्र लटकत होते. कौंडिन्य अन् कालिन्दी यांच्यात पूर्वी नेहमीच संवादांचं आदान-प्रदान चालू असे. त्यासाठी त्यांनी काही कबुतरांना शिकवून ठेवले होते.

श्रीदत्तने काळजी वाटून कबुतराच्या गळ्यातून पत्र काढून वाचले. तावडतोब त्याच्या चेहऱ्याच्या चिंतेच्या रेषा जाअून त्यावर हसू अुमटले. त्याने विजयदत्त अन् श्रीलेखाला बोलावून पत्र देत म्हटले, ''अभिनन्दन मुलांनो!''

विजयदत्त आपली प्रसन्नता लपवू शकला नाही आणि खुशीने अुड्या मारत म्हणाला, ''पिताजी, माधवसेनकाकांच्या हृदयपरिवर्तनाची मी आतुरतेनं वाटच पहात होतो. शेवटी त्यांचंही श्रीलेखावर फार प्रेम आहे नं! अन् वसुमतीमावशीही माझ्यावर किती प्रेम करते.''

''आजचा दिवस आपल्याला शुभ दिसतोय. पाहूया आपल्या खोदकामात काय होतंय.'' साशंकतेनं श्रीदत्त बोलला.

तिघेही भरभर तयार होअून राजमहालाच्या पूर्वेला असलेल्या खोदकामाच्या ठिकाणावर जाअून पोचले. राजगुरू शिवानन्दांच्या देखरेखीखाली खोदकामाची सुरुवात होणार होती.

पवित्र अशा शान्त वातावरणात राजगुरूने निश्चित स्थानी एक वर्तुळ काढले अन् त्याच्या केन्द्रावर पवित्र जलाचा अभिषेक केला. साठ मजुरांनी तावडतोब खोदकाम सुरू केले.

दुपारपर्यन्त काम चालू राहिले. राजा श्रीदत्त, राजकुमार व श्रीलेखा तिघेही तिथे हजरच होते.

दुपारी जेवणानन्तर पुन्हा काम सुरू झाले, तेंव्हा राजगुरूने राजा व राजकुमार यांना तावडतोब तेथे बोलावण्यासाठी माणूस पाठवला. तिथले दृश्य पाहून ते दोघेही आश्चर्यचकीत झाले! तेरा फूट खोलपर्यन्त खोदकाम झालेले होते. अन् त्यात पंधरा-सोळा फूट लाम्बीचा एक नाग वेटोळं घालून अन् फणा पसरून बसलेला होता. तो जिवन्त असला तरी अगदी निश्चेष्ट होता.

राजगुरूने महाराज अन् राजकुमारला एकीकडे घेअून जाअून सांगितले की स्वप्नात आपण हाच साप पाहिला होता. हा सामान्य सर्प नव्हे, पण तो गुह्य किंवा मंतरलेला आहे. पूर्वी संपत्ती जमिनीत गाडून ठेवणारे लोक तान्त्रिकांची मदत घेअून अशा सर्पांचे सृजन करत असत. हे सर्प त्या गुप्त धनाचे रक्षण करत असतात. आणि सृजन करणाराचे आदेशही पाळतात.

''आश्चर्य!'' राजकुमार विस्मयाने अुद्‌गारला.

राजा म्हणाला, ''तुमची भविष्यवाणी खरी होत आहे गुरुवर! भविष्यात आमचं शुभ शुभ होणार असं दिसतंय. आमच्या शत्रूचं पतन नक्कीच आहे.''

''निःसंदेह हे सारं विस्मयकारक आहे! आम्ही भोजनानन्तर खोदकाम सुरू केलं न केलं तोच एक भयंकर फुत्कार करत हा सर्प प्रकट झाला महाराज! मजूर तावडतोब खड्ड्यातून बाहेर आले. मी जवळ जाअून अूष्णता पहाण्यासाठी त्याच्याजवळ गेलो तेंव्हा त्याच्या श्वासातून असह्य अूष्ण हवा बाहेर येत होती. मी तावडतोब ओळखलं की हा मंतरलेला सर्प आहे. तेंव्हाच निरोप देअून आपणा दोघांना इथे बोलावलं महाराज!'' राजगुरु सर्व स्पष्ट करत बोलले.

या भयानक रक्षकापासून आपण कसे मुक्त होअू शकू?'' राजाने चिन्ता व्यक्त केली.

''अशा रचना तर मन्त्रानेच अुघडकीस आणता येतात. पण जर तो खजिना-ज्याचा हा रक्षक आहे - एकाद्या खास व्यक्तीचा असेल तर त्याच्या सांगण्यानेच हा निघून जाईल. दुसऱ्या कोणाचंही आज्ञापालन हा करणार नाही. तरीही आपण शुभाचीच आशा करू या.'' इतके बोलून राजगुरु गप्प झाले. नंतर विजयदत्तकडे वळून पुन्हा म्हणाले, ''माझ्या अुदात्त अन् वीर पुत्रा! सापाला तोंड देण्यासाठी अन् एकाद्या अचानक घडणाऱ्या घटनेसाठी तयार रहा.''

**क्रमशः**



एक महान् संस्कृति
सत्यासाठी युगा-युगात याचा गौरवमय शोध

# भारत-गाथा

**२. पावसाळ्याच्या एका रात्रीत ....**

"आजोबा, ही खोड्याळ मुलगी-आर्यांनी भारतीयांवर आक्रमण केलं नसल्याचं - सिद्ध करण्यासाठी मला आव्हान देते आहे." आपल्या लहान छानशा बहिणीला देवनाथच्या खोलीत खेचून आणत संदीपने तक्रार केली.

दृष्टी अुचलून त्यांच्याकडे पहात देवनाथांनी समोरचं अुघडं पुस्तक मिटवून ठेवलं.

"संदीप, चमेली एक दिवस होनोलुलू किंवा मादागास्कर इथून या घरात अचानक टपकली नाहीय असं सिद्ध करायला, तूच तिला आव्हान का देत नाहीस?" आजोबांनी सुचवलं.

"मी नेहमी इथेच होते; या घरचीच आहे मी." चमेलीने ठासून सांगितले.

"एकदम बरोबर! तू एक दिवस होनोलुलू किंवा मादागास्कर इथून या घरात टपकलीस, अन् तू या घरची रहिवासी नाहीस असं मी म्हणालो, तर ते मला सिद्ध करावं लागेल. हीच गोष्ट भारतीयांनाही लागू पडते. ते कायम इथेच होते. कोणत्याही गोष्टीवरून असा इशारा नाही मिळत, की ते हिमालयापलीकडून इथे आलेले आहेत. विश्वभरातलं सर्वात प्राचीन असं त्यांचं स्वतःचं साहित्य एकदाही कुठे असं सांगत नाहीय, की - त्यांचं आणखी कुठेतरी असलेलं घर मागे टाकून ते इथे आले. एकादं आख्यान, एकादी परंपरा किंवा एकादा ऐतिहासिक पुरावासुद्धा या दिशेने इशारा करत नाही. अुलट असा विश्वास प्रस्थापित करण्याची अनेक कारणं सापडतात की - भारतीयांनी पुष्कळ दूरदूरच्या देशांचा शोध केला अन् त्यांच्या संस्कृतीवर आपली संस्कृती अन् आपल्या धर्माचा प्रभाव पाडला." आजोबा देवनाथ बोलले.

"पण आजोबा, आर्य दुसऱ्या कुठल्यातरी दूर देशातून भारतात आले या मताला पाठिंबा तरी कसा काय मिळाला?" चमेलीने विचारले.

"आपल्यावर शासन केलेल्या इंग्रजांनी या मताचा प्रसार केला. कदाचित त्यांना असं सांगायचं असावं की - बाहेरच्या आर्यांचं भारतात येणं अन् इथे राज्य करणं मुळीच अस्वाभाविक नव्हे, कारण त्यावेळी भारतीय लोकसंख्येचा एक फार मोठा भाग दुसऱ्या देशांतूनच इथे आलेल्यांचा होता. दुःखाची गोष्ट अशी की - आपल्या स्वतःच्या इतिहासकारांनीही कधी या सिद्धान्ताला आक्षेप घेतला नाही." आजोबा दुःखाने म्हणाले.

संदीपला अचानक त्याचे मित्र बोलवायला आले. ते सर्वजण आपल्या शाळेच्या वार्षिक समारंभाची तयारी करत होते. त्यांना त्यांच्या शिक्षकांसमवेत बैठकीत आपल्या योजनेवर शेवटचा हात घायचा होता.

"आजोबा, काल तुम्ही संदीपला नचिकेताची गोष्ट सांगितलीत अन् त्यानं मोठ्या प्रौढीनं ती मला सांगितली. आज तुम्ही मला तशी एकादी पौराणिक गोष्ट सांगा, अन् तो परत आल्यावर मीच त्याला ती सांगेन" चमेलीने आग्रह केला.

"ठीक आहे. प्राचीन भारतातले शिक्षक अन् विद्यार्थी यांची माहिती देणारी एक गोष्ट सांगतो. खरं तर ती नुसती गोष्ट नसून एका विद्यार्थ्याच्या जीवनातली खरी घटना आहे. हा विद्यार्थी नंतर खूप मोठा ऋषी बनला."

असे म्हणून देवनाथ यांनी सांगायला सुरुवात केली :

धौम्य नावाचे एक मोठे गुरु होते; ते एका रम्य खोऱ्यात एक विद्यालय चालवत असत. विद्यालयाच्या मागे सुन्दरशा टेकड्या होत्या अन् समोर जंगल विस्तारलेलं होतं. त्यावेळी विद्यालयांना गुरुकुल किंवा गुरुचं घर म्हटलं जाई. विद्यार्थी आपल्या आचार्यांबरोबर आपल्या घरापासून दूर, नैसर्गिक सौन्दर्याने भरलेल्या वातावरणात रहात असत. ही गुरुकुलं बहुधा एक आश्रम म्हणवल्या जाणाऱ्या एकाद्या मोठ्या संस्थेचा भाग असत. गुरु, हा आश्रम अन् गुरुकुल दोन्हींचा प्रमुख असे. विद्यार्थ्यांशिवाय योगाभ्यास करणारे आश्रमवासीही तिथे असत.



चमेलीने मधेच विचारले, "आजोबा, योग म्हणजे काय, ते सांगाल? पण आत्ताच नको. संदीप येण्यापूर्वी मला गोष्ट ऐकायची आहे."

देवनाथ हसून म्हणाले, "फार छान! तुझा भाऊ आल्यावर मी योगाबद्दल सांगेन. म्हणजे तुला ते त्याला सांगायचा त्रास पडणार नाही."

"हं, ठीक आहे. आपण परत गोष्टीकडे वळू. धौम्य ऋषींच्या आश्रमाजवळील जंगलाच्या मधोमध एक सरोवर होतं. या सरोवराजवळच आश्रमाची काही शेतजमीन होती. यात आश्रमवासी आणि विद्यार्थी काही पिकं घेत असत."

"एक दिवस खूप पाऊस पडला. दुसऱ्या दिवशी अन् रात्रीही पाऊस थांबला नाही. तेंव्हा आचार्य धौम्य चिन्तेने म्हणाले, "सरोवराचं पाणी बांधाच्या वरपर्यन्त पोचायचं नाही अशी आशा आहे, म्हणजे पीक बुडून जाणार नाही."

आश्रमातला आरुणी नावाचा विद्यार्थी सर्वांहून अधिक होतकरू अन् गुरूंच्या विश्वासातला होता. शस्त्रज्ञानात त्यानं प्राविण्य मिळवलं होतं आणि तो तत्वज्ञानाच्या टीकेतही निष्णात होता. योगासनातही तो प्रवीण होता.



पण आचार्यांनी त्याला अजून घरी जायला परवानगी दिलेली नव्हती. आरुणीला गुरूच्या चिन्तेबद्दल कळल्याबरोबर तावडतोब तो शेताची देखरेख करायला बाहेर पडला. पाऊस जरासा थांबला होता. दोन काळ्या ढगांमधून चन्द्र चमकताना दिसला. त्या चन्द्रप्रकाशात आरुणीनं शेतांच्या खऱ्या परिस्थितीचं अनुमान केलं.

सरोवराचा बांध एका जागी तुटला होता. अन् शेतात पाणी भरू लागलं होतं. आरुणीने पटकन शेतातली माती काढून त्या जागेची दुरुस्ती करायचा प्रयत्न केला. पण बांधाची चीर वाढतच गेली अन् पाणी जास्तच वेगाने शेतात भरू लागलं.

आश्रमातल्या अन्य साथीदारांना बोलावून बांधाची दुरुस्ती करायचा विचार आरुणीच्या मनात आला. पण त्याच्याजवळ इतका तरी वेळ कुठला? एक एक क्षणानं संकट वाढतच होतं. त्यानं क्षणभर परिस्थितीच्या गंभीरतेचा विचार केला; मन एकाग्र करून त्यानं एक निर्णय घेतला.

तुटलेल्या मेरेवर तो स्वतःच आडवा पडला. पुन्हा ढग भरून येऊन पाऊस सुरू झाला, वादळवारा सुरु झाला; तरी सरोवरातलं पाणी शेतात जायचं बंद झालं. पावसातली थंड हवा अन् पाण्यामुळे आरुणीचं शरीर आखडून जाऊन तो बेशुद्ध झाला.

सकाळपर्यन्त आरुणी परत न आल्यामुळे अन्य शिष्यांसह गुरुजी शेतावर पोचले अन् तुटलेल्या बांधाच्या जागी बेशुद्धावस्थेतल्या आरुणीला पाहून ते चकित झाले.

त्याला तावडतोब आश्रमात आणून काही विद्यार्थ्यांनी त्याची शुश्रुषा केली अन् इतर शिष्यांनी बांध दुरुस्त केला. गुरुजींच्या देखरेखीखाली आरुणी शुद्धीत आल्यावर गुरुजी त्याला म्हणाले, ''वत्सा, तुझं शिक्षण पूर्ण झालंय. आज तू विशेष रीतीतं पदवी प्राप्त केली आहेस.''

आरुणी कृतज्ञतेनं गुरुजींसमोर नतमस्तक झाला.

''काय सुन्दर चरित्र!'' चमेली विस्मयानं अुद्गारली.

''गोष्ट तुला आवडली, हे छानच झालं! मला आशा आहे की - आरुणीनं परंपरागत शास्त्रांची परीक्षा न देता एका निराळ्याच पद्धतीनं ती अुत्तीर्ण केली - हे तुला समजलं असेल. त्याच्या कार्यामुळे असं लक्षात येतंय की. विद्वान असूनही तो किती विनम्र आहे ! आवश्यक पडलं, तेंव्हा तो शारीरिक कष्टालाही तयार झाला. त्याचं अुद्देश्य म्हणजे - पिकाचं रक्षण - हे अनुकरणीय आहे. खरं शिक्षण हे आपल्याला आदर्शवादी आणि यथार्थवादी दोन्ही बनायला शिकवतं. आपल्याला आपल्या अहंकाराने सीमित व्यक्तित्वाहून वर अुठायला शिकवतं अन् आपल्या हृदयात त्याग आणि बलिदानाची भावना जागृत करतं. आरुणीच्या सहज आणि विनायास कृतीमुळे असं वाटतं की, हे सारे गुण त्यानं आपल्या वर्तणुकीनं सिद्ध करून दाखवले. कळलं का तुला?''

''होय आजोबा; धन्यवाद. मी आता आपल्या दादाला ही गोष्ट सांगू शकेन.'' आनन्दाने अुड्या मारत चमेली म्हणाली.

''पण मी काय एवढ्यासाठीच तुला ही गोष्ट सांगितली? आरुणीचे गुण आपल्यात अुतरवायचा प्रयत्न नाही करणार तू?''

''करीन, नक्की करीन आजोबा; खूप खूप धन्यवाद!''



# आळशी

गंधार नावाच्या गावी एक साधासा शेतकरी रहात असे. त्याचं नाव होतं पवन. त्याची फक्त दोनच एकर जमीन होती. त्यातून मोठ्या कष्टानंच तो आपल्या खाण्यापुरते धान्य पिकवत असे. तसा स्वभावानं तो आळशी होता, अन् कष्ट करायचा त्याला कंटाळा असे.

चाळीस वर्षांचा असताना अचानक त्याची बायको मृत्यू पावली.त्याला दोन अुपवर मुली होत्या. गावच्याच दोन युवकांशी त्याने त्यांची लग्नं लावून दिली. दोन्ही लग्नात त्याला भरपूर हुंडा द्यावा लागल्यामुळे त्याला दोन्ही एकर जमीन विकून टाकावी लागली.

आता अुदर निर्वाहासाठी पवनला मजुरीशिवाय दुसरा मार्ग अुरला नाही. पण स्वभावतःच आळशी असल्यामुळे त्याला मजुरीचे कामही सहजपणे मिळू शकत नसे. अुतरत्या वयामुळे दिवसेंदिवस त्याची तब्येतही ढासळू लागली. शेवटी घरातल्या वस्तु विकून तो गुजराण करू लागला.

पवनच्या या दयनीय अवस्थेबद्दल त्याच्या मुलींना कळले, तेंव्हा दोघींनीही त्याला आपल्या घरी खाण्या रहाण्यासाठी आग्रह केला. पण ते अपमानास्पद वाटून त्याने जेंव्हा नकार दिला, तेंव्हा दोन्ही मुली आळीपाळीने आपल्या घरून जेवण आणून त्याला खाऊ घालू लागल्या.

एका रात्री पवनच्या घरात एक चोर घुसला. घरातलं सगळं सामान तर त्यानं आधीच विकून खाल्लं होतं, त्यामुळे चोरासाठी काहीच अुरलं नव्हतं. खूप शोधूनही काहीच न सापडल्यामुळे चोर त्रासून बोलला, "शी! कसलं हे दरिद्र्याचं घर! माझा आजचा वेळ मात्र फुकट गेला ! अन् रागानं दरवाजावर लाथ मारत तो अुघडाच टाकून चोर बाहेर निघून गेला.

दरवाज्याचा आवाज ऐकून पवनची झोपमोड झाली. चोराला आवाज देत तो म्हणाला, "अरे बाबा, जरा दार लावून टाकून जा." चोर चिडून म्हणाला, "मी कित्येक घरात चोऱ्या केल्या. पण तुझ्यासारखा आळशी मालक मात्र आजवर कुठेच पाहिला नाही. चोराला पाहूनही असा पडून राहिला आहेस! म्हणून तर तू इतका दरिद्री आहेस.

पवन पडल्या-पडल्याच अुत्तरला, "मेहनत करून तरी अुपयोग काय? मेहनत करून काही कमवलं, तरी तुझ्यासारखे चोर येऊन अुचलूनच नेणार नां!"







# खेळण्याची मजा

सुवर्णगिरीचे राजे रत्नपाल यांना बुद्धिबळाच्या खेळाची अतिशय आवड होती. एरवी आपल्या राज्याच्या कारभारांत ते सदा मग्न असत. पण जेव्हां केव्हां त्यांना कामातून सवड मिळे तेव्हां ते बुद्धिबळाचा पट मांडत. आपले मंत्री सुधाम यांच्याशी हा खेळ ते जास्तवेळां खेळत. कधीकधी महाराणी विनीलादेवी किंवा सेनापती सूर्यवर्मा यांच्याशीही बुद्धिबळें खेळायचे. कोणाच्याही बरोबर ते खेळत असले, तरी सरशी त्यांचीच व्हायची. या जिंकण्याचा त्यांना खूप आनंद वाटत असे.

एकदां खेळताना मंत्री सुधाम यांनी त्यांना हरवलं. आतापर्यंत रत्नपाल कधी खेळांत हारले नव्हते. हा पराजय त्यांना सहन झाला नाही. त्यांचा चेहरा रागाने लालबुंद झाला. रागारागाने दांतओठ खात ते उठले. बुद्धिबळाच्या चौरंगाला त्यांनी जोराने लाथ मारली व ते तडक अंतःपुराकडे निघून गेले.

या अनपेक्षित परिणामामुळें मंत्र्यांना खूप आश्चर्य वाटलं. दुसऱ्या दिवशीं रत्नपालांनी सुधामांना बोलावून घेतले, व आपल्या वागण्याबद्दल दिलगिरी प्रकट केली. दोघांनी पुन्हां डाव मांडला. या खेपेला रत्नपालांची सरशी झाली. त्यांच्या चेहऱ्यावरचा आनंद स्पष्ट दिसत होता. नंतरच्या डावांत सुधाम जिंकले. रत्नपाल पुन्हां नाराज झाले, परंतु आपली नाराजी त्यांनी चेहऱ्यावर दिसूं दिली नाही. ते मुकाट्याने महालांत परतले.

त्या दिवसापासून सुधामची सारखी जीत होत होती. महाराजांना हे सहन झालं नाही. त्यांच्या चेहऱ्यावरचा आनंद लुप्त झाला. ते नेहमी उदासवाणे दिसूं लागले. रोजच्या दिनक्रमांत देखील त्यांना उत्साह वाटेना. तेव्हां महाराजांची मनःस्थिती

लक्ष्मीप्रिया



सुधामनी जाणली.

नंतर एके दिवशी खेळताना सुधाम डाव हरले. महाराजांच्या ओठावर हसूं फुटलें. महाराजांचें हास्य पाहून सुधामांनाही आनंद झाला. त्या दिवसानंतर त्यांनी महाराजांना एक दिवसदेखील खेळांत हरूं दिलं नाही.

कांही दिवस लोटले. महाराज रोज जिंकत होते. पण कां कोण जाणे, महाराजांना खेळण्यांत पहिल्यासारखी मजा वाटेना. हळूंहळूं बुद्धिबळाच्या सोंगट्यांवर ते चिडूं लागले. आपल्या मनांतली ही व्यथा महाराजांनी मंत्र्यांना सांगितली.

महाराजांच्या स्वभावातला हा बदल सुधामांना उमगला. त्यांनी महाराजांना सांगितलं, "महाराज, आपण म्हणता आहात कीं सध्यां आपल्याला बुद्धिबळें खेळण्यांत मजा येत नाही. आनंद नांवाचा एक गृहस्थ बुद्धिबळें खेळण्यांत निष्णात आहे. निरनिराळ्या राज्यांतल्या बुद्धिबळपटूंशी खेळून जिंकल्यानंतर तो आता आपल्या राज्यांत प्रवास करीत आहे. आपली आज्ञा असेल तर त्याला एकवार इथें बोलावता येईल. आपण बुद्धिबळांबद्दल इतके कां विरक्त झाला आहात ते त्याच्याकडून मी विचारुन घेईन. या खेळाबद्दल आपल्याला इतकी अनासक्ती कशी काय निर्माण झाली असावी? तो सांगू शकेल याचं कारण!"

रत्नपालांनी त्याचा प्रस्ताव स्वीकारला. सुधामांनी आनंदला निमंत्रण दिले व ते त्याला घेऊन महाराजांकडे आले.

महाराजांनी सारी कहाणी आनंदला सांगितली त्यावर तो म्हणाला, "महाराज, आपण एकदा माझ्याबरोबर जर बुद्धिबळाचा डाव मांडलात, तर आपली समस्या दूर करण्याचा मार्ग मी दाखवूं शकेन."

लगेच खेळाची व्यवस्था करण्यांत आली. मंत्री उपस्थित होतेच. पहिला डाव महाराजांनी जिंकला. त्यांच्या चेहऱ्यावर संतोष दिसूं लागला. त्यानंतरचे डाव आनंद जिंकला. महाराजांनी पूर्ण तयारीनिशी डाव खेळले, आपली विचारांची ताकद पणाला लावली, पण ते आनंदला हरवूं शकले नाहीत. ते संतापले. पराजयाची भावना त्यांच्या मनाला कुरतडत होती, चेहरा लाल होत होता, पण काय फायदा? जेवढे डाव खेळले गेले ते सर्व आनंदच जिंकत होता. आता मात्र महाराजांची सहनशक्ती संपली.

एकूण रागरंग पाहून सुधाम म्हणाले, "महाराज, मी एक डाव प्रयत्न करुन पाहूं कां?"





रत्नपालांनी निरुत्साही भावनेने मान डोलावून संमती दिली. आणि सुधामांनी अगदी सहजपणें आनंदवर सफाईदार मात केली.

रत्नपालांना समजेना कीं हे स्वप्न आहे कीं सत्य आहे? सुधामांची जीत झाली ती त्यांना फारच संतोषदायक वाटली. त्यानंतर पुन्हां चारपांच डाव खेळताना सुधामच जिंकले. रत्नापालांना आनंद झाला व आश्चर्यही वाटले.

आनंद म्हणाला, "महाराज, आता आपल्या समस्येचे समाधान करुं कां?" तो पुढें बोलूं लागला, "महाराज, खेळाडूंना खेळांत दोन प्रकारचा आनंद मिळतो. एक जिंकल्याचा व दुसरा जय-पराजयाचा विचार न करता दूर राहून, खेळांत रंगून जायचा. प्रत्येक खेळाडूची सुरवातीला इच्छा असते केवळ जिंकण्याची! याचा आनंद अफूसारखा मादक असतो. खेळणाऱ्याला पूर्णपणें निष्प्रभ करुन टाकतो, विचारशक्ती नष्ट होते. खेळांत एकाग्रता नसते कारण सारखा बचावाचा पवित्रा राहातो. आता राहिला दुसऱ्या प्रकारचा आनंद ! हा औषधासारखा असतो. जय-पराजयाशी त्याला कांही कर्तव्य नसतं. आपल्या प्रतिस्पर्ध्याची हर एक चाल मोठ्या तर्कशुद्धतेने तो पाहातो, सावधपणें पारखतो, व एकचित्तपणें डाव खेळतो. अशा खेळाचा खेळाडूला अपार आनंद मिळतो. खेळांत हार खाल्ली तरी तो गंभीर होऊन विचार करुं लागतो ही हार कां झाली, कशा चाली होत गेल्या वगैरे! आपल्या चुका त्याला समजून येतात, तो निर्णयाप्रत येतो, व यापुढच्या खेळांत जास्त तर्क लढवूं शकतो. तो आपल्या पराजयाने हताश होत नाही पण भविष्यकाळी आणखी खूप खेळण्यासाठीं मनाने तयार होतो."

तल्लीन होऊन ऐकणाऱ्या रत्नपालांनी आनंदाने सांगितलं, "थांबलास कां? मला वाटलं, अजून थोडं स्पष्टीकरण शिल्लक आहे." आनंद विजयी मुद्रेने उत्तरला, "महाराज, इतकं विस्तृत विवेचन करुन मी आपल्याला त्रास तर देत नाही ना, अशी भिती मला वाटली."

"असं बिलकूल नाही. माझ्या मते खेळाडूची मनःस्थिती जाणणें अगदी आवश्यक आहे." रत्नपाल उत्साहाने म्हणाले. त्यावर हंसतहंसत आनंदने उत्तर दिले, "महाराज, आपण खेळांतला विजय हाच प्रमुख मानता आहात. यामुळें मंत्रीजींनी जेव्हां आपल्याला प्रथम हरवलं, ते आपल्याला सहन झालं नाही. त्यानंतर मंत्री वारंवार हरत होते. तरीसुद्धां आपल्याला खेळांत स्वारस्य

राहिलं नाही. याचं एक सबळ कारण आहे. जेव्हां एखादा खेळाडू डाव हरायला लागतो, तेव्हां त्याच्या चेहऱ्यावर पसरलेली उदासी व अगतिकता किंवा नैराश्य पाहून विजयी वीराचा चेहरा गर्वाने फुलून निघतो. आणि क्षमा असावी महाराज, हीच सवय आपल्याला लागली आहे. आता मंत्रीजींच्या चेहऱ्यावर दर खेपेला हारले तरी, ना उदासी दिसते ना अगतिकता किंवा निराशा! आणि तो भाव न दिसल्यामुळे आपल्याला आनंद होत नाही. कारण मंत्रीजींच्यामधें आपल्याला हरवण्याची क्षमता आहे, परंतु जाणूनबुजून ते आपल्याकडून पराजय घेतात."

रत्नपालांच्या तोंडून चकार शब्द उमटेना. त्यांनी डोळे बंद केले. पूर्वीच्या आठवणी एकामागून एक त्यांच्या डोळ्यांसमोर येऊं लागल्या. त्यांना पटलं कीं आनंद बोलतो आहे ते अगदीं खरं आहे. रत्नपाल आनंदची हुशारी पाहून आश्चर्यचकित झाले.

डोळे उघडून आनंदकडे पाहात ते म्हणाले, "आपल्या पाहिल्या खेळांत तूं कसा हारलास?"

आनंद हंसून उत्तरला, "मी आपल्याला व आपली खेळायची पद्धत निरखून पाहात होतो. आपण या खेळांत निष्णात आहातच, तेव्हां आपण मला सहज हरवूं शकलात. पण आपली खेळण्याची रीत मला समजली तेव्हां मी सावध झालो आणि नव्यानव्या चालींचा प्रयोग करूं लागलो, परंतु आपले लक्ष मात्र माझ्या खेळीकडे केंद्रित होत नव्हते. म्हणून दर डावांत आपण हरत होतात."

"मग मंत्री दर वेळेला मला कसं हरवत होते? ते कशामुळे झालं?" महाराजांनी पृच्छा केली.

"ते माझे बुद्धिबळ शिकवणारे गुरु आहेत. एवढंच नाही, तर दररोज मला या खेळातले बारकावे शिकवणारे हे माझे वडील आहेत." असं म्हणून आनंदने आपला खरा परिचय करुन दिला. त्याने रत्नपालांच्या पायांस हात लावून प्रणाम केला व आपल्या या धारिष्ट्याबद्दल त्याने माफी मागितली.

रत्नपाल अतिशय खूष झाले. त्यांनी आनंदचे खूप कौतुक केले व त्याला आपल्या शेजारी बसवले.

त्यावेळेपासून फुरसत मिळाली कीं ते सुधाम व आनंदशी बुद्धिबळाचा डाव मांडत, परंतु जयपराजयाबद्दल त्यांनी कधीं विचार केला नाही. खेळाचा खराखुरा निर्भेळ आनंद ते लुटत राहिले.







# बकरी - कूद

वर्णन : जयंती महालिंगम

चित्र : गौतम सेन




शिवसमुद्रमहून पुढे गेल्यावर आर्कावती नावाची एक अुपनदी कनकपुरा इथे कावेरीला मिळते. हे ठिकाण बेंगलोरपासून ११३ कि.मी. अंतरावर आहे. बेंगलोरला पाणीपुरवठा करणारे चामराजनगर धरण या नदीवरच बांधलेले आहे. कावेरी - अर्कावती संगम दाट जंगलांनी झाकलेल्या भागात आहे. या जंगलांमधे रेशमाचे किडे पाळणारे अनेक फार्म्स आहेत. संपूर्ण रस्त्यात आपल्याला बांबूच्या तट्ट्यांवर पाळले जात असलेले रेशमाच्या अळ्यांचे कोश दिसतील.

इथे कावेरीचा प्रवाह खडकाळ भागातून वहातो जशी काही कुणी अवखळ बालिका लपंडाव खेळत आहे. कुठे प्रवाह चित्रविचित्र आकारांच्या खडकांमधून चांदीच्या रेषेसारखा दिसतो; तर कुठे तो एकाद्या खड्ड्यात अचानक गायब झाल्यासारखा दिसून पुन्हा शेकडो मीटर अंतरावर प्रकट होतो. पण जे दृश्य कावेरीपेक्षाही स्वतःकडे अधिक खेचून घेते, ते म्हणजे खडकांनी बनलेली इथली जमीन, हे खडक अनेक रंगांचे आहेत - निळे, गुलाबी, काळे अन् पांढरे. निरंतर वहाणाऱ्या पाण्याने यांना तासून खूप मजेदार आकार दिले आहेत. एकादा खडक हत्तीच्या पायासारखा आहे, एकादा भल्यामोठ्या घड्यासारखा, तर दुसरा एकादा अगदी गोलाकार ! त्या सर्वांचे पृष्ठभाग आरशा सारखे गुळगुळीत व चमकदार आहेत.

नदीच्या वेगवान प्रवाहाच्या मधेच, जरा बाजूला एक खडकाळ डोह आहे. याला तिथले रहिवासी 'हन्नेरडु चक्र' असे म्हणतात. असे मानले जाते की हा डोह अथाह असून, त्यात एकादी वस्तु पडली तर त्या कुंडात १२ वेळा चक्राकार फिरून तिथल्या भोवऱ्यात गडप होते. अर्कावती संगमापासून पुढे ५ कि.मी. वर सुप्रसिद्ध 'मेके दाटु' आहे. मराठीत याचे रूपांतर होईल 'बकरीची अुडी.' इथे कावेरी नदी भिंतीसारख्या दोन सरळ कड्यांमधून १८ मीटर खाली अुडी घेते. एक कडा जरा तुटलेला आहे, पण दोन्हीमधील अंतर इतके कमी आहे की, तेथील रहिवाशांचे असे म्हणणे आहे की एकादी धट्टीकट्टी बकरी

मेके दाटु





होगेनकल धबधबा

अगदी सहजपणे अुडी मारून इथे नदी ओलांडू शकेल.

मेके दाटूनंतर नदी दक्षिणेकडे वळते, आणि कर्नाटकचे म्हैसूर - बेंगलोर जिल्हे आणि तमिलनाडूच्या धर्मपुरी जिल्ह्यांची सीमारेषा बनत ती मलयगिरि पर्वतरांगाच्या डोंगर व दऱ्यांमधून खळाळत, झेपा घेत पुढे जाते. ३० कि.मी. पुढे तमिलनाडूच्या तोप्पुर डोंगरांमधे होगेनकल इथे एक आणखी विशाल धबधबा बनवते. 'होगेनकल' चा अर्थ आहे धुवाँधार खडक. नदी इथे दोन प्रवाहात विभागली जाते. पश्चिमेकडील प्रवाह २२ कि.मी. अुंचावरून खाली पडतो. खाली खडकाचा तळ आहे. त्यावर आपटून पाणी फवाऱ्यासारखे वर अुसळते अन् धुक्यासारखे तुषार आसपास अुसळतात. पूर्वेकडील प्रवाहच्या दोन धारा आहेत. त्यातली एक मेके दाटू सारख्या अरुंद घळीतून जाते. हे स्थान ज्ञानतीर्थ म्हणवले जाते. आणि इथे स्नान करणे शुभ मानले जाते. प्रवाश्यांच्या सुरक्षिततेसाठी इथे साखळदंड बनवले आहेत अन् साखळ्याही अडकवल्या आहेत. आडि पिदनाडु म्हणजे १८ ऑगस्ट व ऐपासी महिन्यात (ऑक्टोबर - नोव्हेंबर) पौर्णिमेला इथे स्नानमेळा भरतो. ऐपासीचा अुत्सव संपूर्ण तमिळभाषिकांचा फार आवडीचा आहे. या दिवशी लोक सहकुटुंब नदीकिनारी पिकनिक साजरी करतात. नदीत स्नान व नदीची पूजा हे या अुत्सवाचे खास भाग असतात. भोजनात तऱ्हेतऱ्हेचे भात-लिंबू भात, चिंच भात, नारळ भात व दही भात इत्यादि खाल्ले जातात.

घाटाच्या वर देवेश्वरचे मंदिर आहे. कावेरीशी घनिष्ट संबंध असणारे महर्षी अगस्त्य यांनी इथे पूजा केली होती असे मानले जाते.

होगेनकल इथे नदी पार करून धबधबा पहाण्यासाठी हरिगोलुचा अुपयोग केला जातो. हरिगोलु ही वेताने बनवलेली एक गोलाकार मोठी टोपली असते. हिचा तळ ताडपत्रीने मढवलेला असतो. अन् तीत एका वेळी सात प्रवासी बसू शकतात. प्रवासी लोकांचे गट अगदी मामुली भाड्यात नदीपार नेण्यासाठी अनेक हरिगोलु तिथे हजर असतात. नाविक लहान लहान वल्ही घेअून हरिगोलु वल्हवत मोठ्या सफाईने नदी पार करतात. हे मोठ्या कलेचे काम आहे, कारण नदीचे पात्र अरुंद असून प्रवाहाला वेग खूप असतो. नदीच्या एका बाजूला अुंच खडकाळ कडा अन् दुसऱ्या बाजूला जंगलांनी वेढलेले डोंगर आहेत.



नटनीची बांबूवरून अुडी



हरिगोलु

धबधब्याच्या बरोबर खाली चिन्नार नावाची एक लहानशी नदी येअून कावेरीला मिळते. चिन्नारचे दुसरे नाव आहे सनत्कुमार नदी. ती ज्या कुंडातून अुगम पावते ते सनत्कुमार ऋषींनी खोदले होते असे मानले जाते.

आणखी एक लोककथा इथे ऐकायला मिळते. एके दिवशी इरुवल-नायक नावाचा एका कबिल्याचा सरदार नदीच्या अुजव्या तटावर झोपाळ्यावर झोका घेत होता. दुसऱ्या तटावर त्या वेळी एक अल्पवयीन नटनी डोंबारीण आपले कौशल्य दाखवत होती. सरदार तिचा खेळ लक्षपूर्वक पहात होता. अचानक त्याने आव्हान दिले की, तू हातातल्या बांबूच्या मदतीने अुडी मारून या किनाऱ्यावर अुडी मारून दाखव, तरच मी तुला कुशल मानीन. मग काय! त्या डोंबारणीने बांबूच्या मदतीने झेप घेतली अन् सरळ येअून ती इरुवल नायकाच्या मांडीवरच धपकन् पडली. म्हैसूरच्या राजाला जेंव्हा ही घटना कळली, तेंव्हा पवित्र तीर्थस्थानी हा असला बालिश खेळ घडल्याबद्दल तो फार नाराज झाला. त्याने पुन्हा कोणी असला प्रकार करू नये म्हणून धडा देण्यासाठी इरुवल नायकाला कडक शिक्षा केली.



कावेरी की माहशीर मछली

होगेलकलमधे मासे पकडण्यातही खास आनन्द वाटतो. इथे या नदीत माहशीर जातीचे मासे मिळतात हे मासे आकाराने खूप मोठे असतात. एक एक चांगले ५० किलो वजनाचे! कधी कधी हे मासे तेथे मोठ मोठ्या कळपाने पोहताना आढळतात. परन्तु हल्ली प्रदूषणामुळे त्यांची संख्या घटली आहे.

आता कावेरी दक्षिणेकडे अुतरू लागते आणि जास्त रुंद बनते. होगेनकलपासून ५० कि.मीटरवर ती जिथे तमिळनाडूमधे प्रवेश करते, तिथेच बरोबर तिच्यावर मेट्टूर धरण बांधलेले आहे. इंग्रज इंजिनिअर आर्थर कॉटन याने १८३४ मधेच याची कल्पना केली होती, पण त्याच्या या स्वप्नाने बरोबर योजनेचा आकार घेतला १९१० मधे. प्रत्यक्ष



**मेट्टूर बांध**

बांधकाम तर आणखी पुढे १९२५ मधे सुरू झाले. पुढे सहा वर्षात ते बांधून तयार झाले. हा एक अुच्चांक आहे. यासाठी म्हैसूर राज्याने वीजपुरवठा केला होता.

मेट्टूर धरण १,५०० मीटर लांब, ५१ मी. रुंद व ६४.२ मीटर अुंच आहे. हे जेंव्हा तयार झाले, तेंव्हा ते जगातले सर्वात विशाल धरण गणले गेले. त्यात जमणाऱ्या ६० वर्ग कि.मी. इतक्या जलाशयाची गणती मानवनिर्मित विशालतम धरणांमधे केली गेली. गव्हर्नर सर जॉन स्टॅनले या नावावरून धरणाचे नाव 'स्टॅनले धरण' असे ठेवले गेले. धरणाच्या खाली बनलेल्या वीजकेन्द्रातून २६,००० किलोवॉट वीज निर्माण केली जाते.

दुष्काळी वर्षांत पाण्याची खोली ८-९ मीटर्सच रहाते. असे १९५२ मधे झाले होते. सन १९७५ मधे तर जलाशय अगदीच कोरडा झाला होता अन् त्यावेळी पांड्य कालातील एक मंदीर प्रकट झाले होते.

इथून कावेरी सेलम व पेरियार जिल्ह्यांमधील सीमारेषा बनून वाहू लागते. अुत्तरेला शिवराय डोंगरांमधून निघून सेलम शहरातून वाहणारी तिरुमणिमुत्तार नदी नामक्कलमधे कावेरीला मिळते. तमिळमधे मोत्यांना 'मुत्तु' म्हणतात. कदाचित केंव्हातरी या नदीच्या प्रवाहात मोती सापडत असावेत. सेलम शहरातील शिवमंदिरातल्या देवीच्या आभूषणात जडवलेला विशाल, चमकदार मोती हा तिरुमणिमुत्तार नदीचीच देणगी होय. पण आज नदीची फारच दुर्दशा झालेली आहे. डबक्यांनी त्यातल्या पाण्याचे वहाणे बन्द केले आहे. शहरातली घाण आणि यांत्रिक कारखान्यांमधून निघालेले घाण पाणी यांनी नदीचे पाणी भयंकर प्रमाणात प्रदूषित केले आहे. फक्त पावसाळ्यातच पाणी वहात असलेले दिसते - अन् तेही मातकट व घाण.

सेलम कपडा विणणे व स्टीलच्या अुद्योग धंदासाठी प्रसिद्ध आहे. इथे विणलेल्या चादरी व जरीकिनारीची धोतरे यांची मागणी पूर्ण द. भारतात असते. सेलम शहराच्या अंगरक्षकाप्रमाणे अुभ्या असणाऱ्या शिवराय डोंगरांमधे येर्काड हे पर्यटन स्थल वसलेले आहे. अुन्हाळ्यात खालचे मैदान भट्टीसारखे तापलेले असते, तेंव्हा येर्काडमधे गरम कपड्यांची जरुरी भासते.





# तीन यक्षिणी - तीन वर

राम आणि राजा केवळ एका गावचे रहिवासी होते असे नव्हे, तर दोघे एकमेकांचे शेजारीही होते.

राम खूप कष्टाळू होता. तो अगदी मनापासून आपल्या शेतांची देखदेख करी आणि त्याचे फळ म्हणून त्याला चांगलं पीकही मिळे. खाअून पिअून वाचणारं धान्य विकून त्याने एक छोटेसे कौलारू घरही बांधले होते. तो काटकसरीने रहात असे अन् आपल्या साध्यसुध्या जीवनात संतुष्ट असे.

राजा मात्र त्याच्यापेक्षा अगदी निराळा होता. तसा तर तो कष्टाला कांकू करी अन् अुलट बाहेरील अवडंबरात खूप खर्च करी. परिणामतः तो कर्जबाजारी झाला. इतका की त्याला आपलं शेतही विकावं लागलं. त्याची म्हातारी आई नेहमी आजारी असे. त्याची बायको नेहमी त्याला रागावत असे अन् पावलोपावली त्याला टोमणे मारत राही. अशा प्रकारे राजाचे जीवन फार दुःखी आणि अव्यवस्थित असे. त्याचे कुटुंब रामच्या कुटुंबाचा नेहमीच हेवा करी. पण राम अन् त्याची पत्नी यांच्या मनात मात्र राजाच्या कुटुंबाबद्दल कसलीच कटुता नव्हती.

राम आणि राजा महिन्यातून एकदा बरोबरच शहरगावी जाअून येत आणि महिनाभराचं आवश्यक सामान घेअून येत. दोघेही जंगलातून जाणाऱ्या छोटा रस्त्यातून जाअून त्याच रस्त्याने परत येत.

एके दिवशी ते दोघे शहरातून आपापल्या थैल्यातून वस्तु घेअून जंगलाच्या वाटेने परत येत होते. वाटेत बोलता बोलता चिन्ता व्यक्त करत राम राजाला म्हणाला, "आपल्या देशच्या राणीच्या नुकत्याच झालेल्या मृत्यूमुळे आपला

लीला जोशी



राजा सध्या शोकग्रस्त आहे. अन् अशा संकटकाळातच शेजारी राजाने अचानक युद्धाची घोषणा केली आहे. आपल्या राजाला चिन्ता पडलीय की युद्धाची पुरेशी तयारी नसल्याने आपला पराजय तर नाही होणार ना?''

यावर राजा हसतहसत बेपर्वाईने म्हणाला, ''राजसिंहासनावर कोणीही राजा बसो; आपल्याला त्याचं काय देणं-घेणं? काही झालं तरी आपल्याला कोणत्याही परिस्थितीत आपला थैला आपणच वाहून जंगलच्या रस्त्यानं पावलं घासटत गावी जावं लागणार! या कामातून कोणताही राजा आपल्याला मुक्ति देऊ शकणार नाही.''

रामने राजाच्या या बोलण्यावर काहीच उत्तर दिले नाही.

श्रावण महिना चालू असला तरी आकाशात कुठे तुरळक ढगाचेही नाव नव्हते. आता दिवसाचा तिसरा प्रहर असूनही ऊन्ह चांगलंच कडक होतं. पुन्हा बोलायला सुरुवात करत राम राजाला म्हणाला, ''चल, तुला देशाची काही चिन्ता नाही; पण हे तर सांग, कि आपल्या गावावर इन्द्रदेवाचा इतका कोप का? पहाना, दोन वर्षात आकाशात कुठे काळे ढगच दिसायला तयार नाहीत?

रामचे हे बोलणेही तितके तितकेसे गंभीरतेने मनावर न घेता तो राजा मोठ्या कोरडेपणाने बोलला, ''तुझ्याजवळ स्वतःचं शेत आहे, म्हणून पावसाची तुला चिन्ता पडलीय. पण माझं काय, इथे पाऊस न पडला, तर आणखी कुठेतरी जाऊन कुणाचं तरी शेत नांगरीन.''

ते दोघं जंगलाची पायवाट तुडवत असताना राजाच्या एका नातेवाइकाने त्याला पायी चालताना पाहून म्हटले, ''अरे, माझ्या बैलगाडीत एक जागा शिल्लक आहे. ये लवकर.'' ''वाईट नको वाटून घेऊ'' असे रामला म्हणत, राजा गाडीत जाऊन बसला.

राम आता एकटाच जंगलातून चालत राहिला. इतक्यात वाटेत तुटून पडलेल्या झाडाच्या एका फान्दीला अडखळून तो कोलमडून खाली पालथा पडला, अन् बेशुद्ध झाला. त्याच्या साऱ्या वस्तूही जमिनीवर पसरल्या.

तो जेंव्हा शुद्धीवर झाला तेंव्हा संध्याकाळ झाली होती. आपल्या पसरलेल्या वस्तु गोळा करून त्याने पुन्हा आपला थैला भरला. इतक्यात त्याला खूप जुन्या काळची तांब्याची एक अंगठी



सापडली. त्याने ती आपल्या एका बोटात चढवली. अन् घराकडे चालू लागला.

अचानक समोरच्या दोन डेरेदार झाडांच्या मधोमध एक दैदिप्यमान भव्य महाल त्याच्या नजरेस पडला. ही वाट त्याच्या परिचयाची होती, अन् या जंगलांत झाडांव्यतिरिक्त कोणतीही इमारत त्याने आजवर पाहिली नव्हती. हे अद्भुत दृश्य पाहून तो अवाक् झाला. हा चमत्कार कसा झाला, हेच त्याला कळेना. डोक्यावरचा थैला खाली उतरवून ठेवून उभ्याने एकटक तो त्या महालाकडेच पहात राहिला! इतक्यात अंगठीवालं बोट दुखू लागलं म्हणून त्याने अंगठी काढून दुसऱ्या बोटात घातली आणि पुन्हा महालाकडे नजर वळवली, तो काय आश्चर्य! तो भव्य महाल अदृश्य झाला होता. त्याच्या आश्चर्याला पारावार उरला नाही!

अंगठी दुसऱ्या बोटात घातल्यामुळे तर महाल अदृश्य नाही झालानं? असे वाटून त्याने पुन्हा ती काढून पहिल्या बोटात घातली. खरंच, तो चमकता महाल पुन्हा समोर उभा होता!

आता त्याला कळून चुकले की, अमूक बोटातच अंगठी घातल्यामुळे महाल प्रकट होतो. आता त्या महालाच्या आत जाऊन पहायची इच्छा रामच्या मनात उद्भवली. महाल बाहेरूनच इतका अद्भुत असेल, तर आतून तो दिव्य असलाच पाहिजे, असे त्याला वाटले. म्हणून मोठ्या सावधपणे तो महालाच्या मुख्य द्वारातून आत पोचला.

समोरील दालनात तीन अतिसुन्दर यक्षबाला हसत-हसत आपसात बोलत होत्या. आपल्या



दालनाकडे एका मानवाला येताना पाहून त्यांना आश्चर्य वाटले. त्याला थांबवत त्या यक्षिणींनी विचारले, ''कोण आहेस तू? तुला काय हवंय?''

आपला परिचय देत रामने सांगितले की, ''मी या अद्भुत महालाचं बाह्य सौन्दर्य पाहून आतील भागाचं वैभव पहायला इथे आलो आहे.''

''मानवांना इथे प्रवेश मना आहे. तू निघून जा इथून. जास्त पुढे जाशील, तर प्राणांस मुकशील.'' एक यक्षबाला म्हणाली.

''इथूनच परत फिरलास तर आम्ही तिघी तुला एकएक वर देऊ.'' दुसरी यक्षिणी बोलली.

''आमची नावं उदया, संध्या अन् निशा आहेत. आमच्यापैकी प्रत्येकीचं नाव सात वेळा जपून नंतर जे मागशील, ते पुरं होईल.'' तिसरी यक्षकन्या म्हणाली.



रामने प्रथम अुदयाचे नाव सात वेळा अुच्चारून म्हटले, ''आमच्या देशावर ज्या शत्रुराजाने आक्रमणाची घोषणा दिली आहे, त्याचं मन परिवर्तित होअून त्यानं आमच्या राजाशी हातमिळवणी करावी.''

नन्तर सन्ध्याचे नाव सात वेळा घेअून तो म्हणाला, ''आमच्या गावात अतिवृष्टीही न व्हावी अन् कोरडा दुष्काळही पडू नये, आमचं गाव नेहमीच खुशाल अन् हिरवंगार रहावं.''

निशाचं नाव घेतल्यावर तो म्हणाला, ''मला स्वतः कष्ट करून जितकं मिळेल, त्यातच माझं कुटुंब सुखी अन् संतुष्ट रहावं.''

रामची देशभक्ती, गावावरचं त्याचं प्रेम अन् व्यक्तिगत जीवन सत्यमार्गानं अन् साधेपणानं जगायचा त्याचा आदर्श पाहून तिघी यक्षकन्या फार प्रभावित झाल्या. त्यांचा निरोप घेअून सकाळ अुजाडता अुजाडता राम आपल्या गावी पोचला.

तो गावच्या सीमेत घुसताच त्याने पाहिले की राजाचा एक दवंडीवाला ढोल वाजवून गावाला ओरडून सांगत होता की, ''ऐका हो ऐका! आनंदवार्ता ऐका! शत्रु राजाने समझोता केला आहे. आता युद्ध होणार नाही.''

हे ऐकून रामला सुटका झाल्यासारखे वाटले. प्रसन्न मुद्रेने त्याने आपल्या अुंबरठ्यावर पाअूल ठेवले, इतक्यात जरासुद्धा न गरजता पाअूस टपटपू लागला. घरात पोचताच त्याने आपल्या बायकोला अंगठीच्या चमत्काराची गोष्ट सांगून म्हटले कि, शत्रू राजाशी हातमिळवणी अन् हा पाअूस हे दोन्हीही अंगठीच्याच प्रतापाचं फळ होय. हे सांगतासांगता बोटातली अंगठी काढून तिच्या हातावर ठेवत तो म्हणाला की ही मोठ्या आदराने अन् पूज्य भावाने ठेवून दे. तिने आदराने अंगठी आपल्या कपाळाला लावून मग देवघरात नेवून ठेवली.

रामचा आवाज ऐकताच गावात पोचायला त्याला अुशीर का झाला हे विचाराला राजा त्याच्या घराकडेच येत होता. पण खिडकीतूनच अंगठीबद्दलचा त्या दोघांमधला संवाद ऐकून तो तिथूनच परत फिरला. बायकोला सारी हकिकत सांगून राजा तिला म्हणाला, ''कसंही करून ती दिव्य अंगठी चोरून घेअून आलीस तर मीही त्या यक्षिणींकडून तीन वर मागून घेईन.''

''एक वर माझ्यासाठी माग बेटा. किती दिवस मी खाटेलाच खिळून आहे.'' कण्हत खाटेवर पडलेली राजाची आई त्याला म्हणाली.

''माझ्यासाठीही एक छानसं घर मागून घ्या.'' बायको बोलली.

''ठीक आहे, ठीक आहे. अगोदर ती अंगठी तर आण. राजा बायकोला म्हणाला. तिने आपल्या परसातून दोन-चार फुलं तोडली अन् ती देण्याच्या मिषाने ती रामच्या घरी गेली.

रामच्या बायकोला आवाज देत राजाची बायको म्हणाली. ''अग, आज शुक्रवार नं, म्हणून पूजेसाठी फुलं आणलीत मी.''

''छान, ठेव ती देवघरात नेअून. मी आत्ता स्वयंपाकात गुंतलेय.'' स्वयंपाकघरातूनच रामची बायको अुंच आवाजात बोलली.

राजाच्या बायकोने फुलं ठेवून त्याच वेळी अंगठी अुचलून लपवली. अन् भराभरा आपल्या घरी गेली.

नंतर रामचे बोलणं ऐकल्याप्रमाणेच राजाने सर्व काही केलं. त्यालाही त्याच ठिकाणी, तोच महाल दिसला. त्यात आत गेल्यावर त्यालाही तीन यक्षबाला दिसल्या. त्यांनी रामला विचारलेला प्रश्न राजालाही विचारला.

''मी तर तीन वर मागायला आलो आहे.'' राजा अुत्तरादाखल बोलला. राजाची मनोवृत्ती आणि बोलण्यावरून यक्षिणींना सत्य गोष्ट कळून चुकली. तेंव्हा त्यांच्यातली एकजण म्हणाली, ''आम्ही तुला वर देअू, पण ती तांब्याची अंगठी आम्हाला परत कर.''

''पण आम्हाला आमच्या घरीच आई अन् बायकोबरोबर वर मागायचे आहेत. वर घ्यायची प्रक्रिया अशीच ना, कि तुम्हा तिघींही नावं सात



सात वेळा अुच्चारून वर मागायचा? बास तेवढंच सांगा, म्हणजे अंगठी परत देतो.''

''हां, हां, तसंच!'' तिघीही बरोबरच काहीशा खिन्न आवाजात बोलल्या.

''बास, मी ज्यासाठी आलोय, ते पुरं झालंय.'' असे सांगून त्याने यक्षिणींना अंगठी परत दिली. अंगठी हाती आल्याबरोबर महालासह त्या यक्षिणी अदृश्य झाल्या. तरीही राजा खूषच होता, कारण त्याला ठाअूक असलेल्या वर घेण्याच्या पद्धतीला यक्षिणींनी अनुमोदन दिले होते. आता त्या असल्या काय, अन् नसल्या काय! राजाला त्याची पर्वा नव्हती

मोठ्या प्रसन्न मुद्रेने तो चालू लागला. घरी आई अन् बायको आतुरतेनं त्याची वाट पहात होत्या. घरी पोचल्यावर सर्व काही त्या दोघींना

समजाऊन सांगितले. तिघांनीही एक एक करून यक्षिणींचं नाव घेऊन काय मागावं याचा विचार करायला सुरुवात केली.

प्रथम आईनं शंभर वर्षं जगायची इच्छा व्यक्त केली. रात्रंदिवस आजारी असणाऱ्या सासूची सेवा करता करता सून वैतागली होती; म्हणून ती सासूला म्हणाली, "शंभर वर्षं आजारी राहून काय कराल? त्यापेक्षा असं म्हणा की जगेन तोपर्यंत प्रकृती ठणठणीत राहून चालतीफिरती राहीन."

बास, असं बोलताबोलताच सासू ठणठणीत होऊन उभी राहिली. बायको आता पस्तावत म्हणाली, "अरेरे, हे काय घडलं! मी तर नोकर-चाकर, सोनं-चांदी अशी आठी ऐश्वर्यं मागणार होते. पण म्हातारीचं निरोगी आयुष्य मागून आपला वर मात्र हरवून बसले! हाय हाय!"

आपली रोगमुक्त आई पाहून राजा खूश झाला, पण बायकोला चिडलेली पाहून नाराज होऊन तो बोलला, "माझ्या धडधाकट आईला पाहून चिडतेस कशाला? त्यामुळे काय आपल्या घरावर आकाश कोसळेल की काय? आपला शेजारी राम करोडपती झाला, तर साऱ्या जीवनभर रडत ओरडत रहाशील."

राजाचे हे बोलणे संपताच घराचे कौलारू छप्पर करकरू लागले अन् भूकंपाप्रमाणे सारे घर कापू लागले. ते सर्वजण घाबरून जाऊन जीव वाचवण्यासाठी बाहेरच्या गल्लीत पोचले. अन् पहाता पहाता घर कोसळून त्याला पडीक अवस्था प्राप्त झाली.

परंतु रामच्या घराच्या जागी मात्र कित्येक मजल्यांची एक भव्य इमारत उभी राहिली. हिऱ्या-मोत्यांच्या आभूषणांनी सारं घर भरून गेलं, रुपयांचे ढीग लागले! राजाची बायको मात्र द्वेषानं जळून रडू लागली.

स्वार्थ, घृणा अन् ईर्ष्येमुळे राजा, त्याची बायको अन् आई त्रासून जे काही बोलले तेच यक्षिणींचे वर बनून त्यांना मात्र शाप ठरले. दुसऱ्यांचं वाटोळं इच्छिणाऱ्यांचं स्वतःचंच वाटोळं होतं याचा राजाने अनुभव घेतला असावा. अन् पुन्हा नवं आयुष्य सुरू करण्यासाठी कुटुंबासह तो कुठल्याशा दूरच्या गावी निघून गेला.





४९ - विश्वरूप दर्शन

# महाभारत

परशुरामांच्या हितोपदेशानन्तर कण्व मुनींनीही दुर्योधनाला खूप समजावलं. ते म्हणाले, "दुर्योधन, धर्मराजाशी तह करणं हे तुझ्या दृष्टीने सर्व प्रकारे हिताचं होईल. यामुळे तुझीच शक्ती वाढेल अन् तुम्ही दोघं मिळून संपूर्ण पृथ्वीवर निष्कंटक राज्य करू शकाल. तूच तेवढा एकटा सर्वात शक्तिशाली आहेस असं तुझं मानणं म्हणजे तुझी चूक आहे. हे स्पष्ट करण्यासाठी मी तुला मातलीची गोष्ट सांगतो, -

देवेन्द्राचा सारथी मातली याची कन्या गुणकेशी ही अपूर्व सुंदरी होती. तिच्या सौन्दर्याला योग्य असा वर पृथ्वी आणि देवलोकातही कुठे नव्हता. मातली आपल्या कन्येला घेऊन नागलोकात गेला. वाटेत त्याची नारदाशी भेट झाली.

वरुणदेवाने दोघांचा स्वागत-सत्कार केल्यानन्तर मातलीचा उद्देश जाणून त्यांना नागलोकात भ्रमण करायला परवानगी दिली. खूप फिरल्यावर भोगवतीपुरच्या एका अतिसुन्दर तरुणाला मातलीने आपल्या मुलीसाठी पसन्त केला. त्याचे नाव होते सुमुख.

"हा युवक गुणकेशीसाठी सर्वथा योग्य असाच आहे. तेव्हा कसंही करून त्याला विवाहासाठी तयार करा." मातलीने नारदाला विनवले.

नारदाने सुमुखचे आजोबा (मातामह)





आर्यक यांच्याशी मातलीचा परिचय करून दिला अन् त्याची इच्छा सांगितली. आर्यकला ते ऐकून आनन्द वाटला, पण आपली विवशता प्रकट करत तो म्हणाला, ''ऋषिवर! नुकतंच गरुडाने माझ्या मुलाला मारून टाकलं अन् माझा नातू सुमुख यालाही पुढच्या महिन्यात खाऊन टाकायची धमकी दिलेली आहे. यामुळे सध्या आम्ही भीतीग्रस्त आहोत. मग या विवाहाला आता संमती कशी देऊ?''

हे ऐकून मातली काळजीत पडला. पुन्हा काही विचार करून तो म्हणाला, ''महाशय! आपण आपल्या नातवाला माझ्या अन् नारदाच्या समवेत देवेन्द्राकडे पाठवा. आम्ही गरुडाचं काय करायचं ते पाहून घेऊ अन् सुमुखला मृत्यूच्या तोंडातून वाचवून आणू. आता हे काम तुम्ही आमच्यावर सोडून द्या.''

आर्यकने मातलीचा प्रस्ताव मान्य केला. मातली व नारद सुमुखाला घेऊन देवेन्द्राजवळ पोचले. त्यावेळी देवेन्द्र विष्णुशी बोलत होते. मातलीने हकिकत सांगून आपली इच्छा व्यक्त केली. मातलीचे बोलणे ऐकून विष्णु इन्द्राला म्हणाला, ''सुमुखला अमृत पाजून देवांप्रमाणे अमर बनव. यामुळे मातली अन् नारद यांची इच्छा पूर्ण होईल.''

पण तसे करून गरुडाचा क्रोध ओढवून घ्यायला देवेन्द्र तयार नव्हता, म्हणून तो विष्णूला म्हणाला, ''तुम्ही स्वतःच आपल्या हातानं सुमुखला अमृत पाजा ना.''

तेंव्हा विष्णु पुन्हा इन्द्राला म्हणाला, ''तुम्ही तर त्रिलोकाचे अधिपती आहात. तुम्हाला कुणाचं भय? अगदी निर्भय होऊन हे काम करून टाका.''

देवेन्द्राने सुमुखला दीर्घायुषी तर बनवले, पण अमृत दिलं नाही. तरीही तात्कालिक भय न उरल्यामुळे सुमुख गुणकेशीशी लग्न करून सुखाने राहू लागला.

गरुडाला जेव्हा सुमुखच्या दीर्घायुषी बनण्याची आणि विवाहाची बातमी मिळाली, तेंव्हा रागावून इन्द्राकडे जाऊन तो म्हणाला, ''तू माझं भक्ष पळवून माझा अपमान केला आहेस. माझी शक्ती माहीत असूनही हे दुस्साहस तुझ्या हातून घडलं आहे. गरुड जेंव्हा कुणाला शाप देतो, तेंव्हा त्यामागे नक्कीच काही कारण असतं.



माझी परवानगी न विचारता तू आता जे कृत्य केलं आहेस, त्याला मी अक्षम्य अपराध मानतो. तुला याबद्दल मी नक्कीच शिक्षा करीन.''

गरुडाच्या या गर्वोक्तीबद्दल त्याला फटकारत विष्णु म्हणाला, ''तू माझ्या समक्षच स्वतःबद्दल इतकं बरचढ बोलतो आहेस. माझं वाहन असल्यामुळे बहुधा तुला गर्व झालेला आहे. पण खरं म्हणशील तर तू मला वाहून नेत नाहीस, तर मीच तुला वाहत असतो. माझं वजन तू वाहू शकतोस असं समजत असशील, तर आत्ता जरा माझ्या डाव्या हाताचं वजन पेलून बघ.''

असे म्हणून विष्णूने आपला डावा हात गरुडाच्या पाठीवर ठेवला. हाताच्या भाराने दबून गरूड खाली पडला अन् त्याचा जीव जाऊ लागला.

गरुडाचा गर्व नाहीसा झाला, अन् त्याने विष्णूची क्षमा मागितली. आपल्या प्राणांचे दान देण्याबद्दल त्याला विनवले.

ही गोष्ट दुर्योधनाला सांगून कण्व म्हणाले, ''दुर्योधन, तू जेंव्हा युद्धक्षेत्रात पांडवांसमोर उभा रहाशील, तेंव्हा तुझी स्थिती त्या अभिमानी गरुडासारखीच होईल. आज तुझ्या रक्षणासाठी कृष्ण स्वतः तुझ्या दारी आला आहे. त्याचं सांगणं ऐकून स्वतःला अन् आपल्या कुळाला सर्वनाशापासून वाचव.''

कण्वाच्या सांगण्याचा उपहास करत कर्णाकडे पाहून हसला अन् कण्वाकडे वळून म्हणाला, ''मी काय करावं अन् काय न करावं हे



उत्तम प्रकार जाणतो. कुणाच्या सल्ल्याची मला मुळीच गरज नाहीय.''

नंतर नारद दुर्योधनाला सांगू लागले, ''दुर्योधन, हिताच्या गोष्टी सांगणारे जगात दुर्मिळ असतात. आपला हट्ट सोडून यांच्या बोलण्याकडे लक्ष दे अन् आपलं हित साध. हट्ट सर्वनाशाला कारण ठरतो. उदाहरणार्थ, विश्वामित्रशिष्य गालव याची गोष्ट ऐकून घे. तोही तुझ्याच सारखा फार हट्टी होता.''

विद्याग्रहणानन्तर आपल्या गुरुला गुरुदक्षिणा द्यायची इच्छा गालवाने व्यक्त केली. गुरुने 'गुरुदक्षिणा नको' असे म्हटले, तरीही तो हट्टाला पेटला.

अप्रसन्न होऊन तेंव्हा विश्वामित्र म्हणाले,



"गुरुदक्षिणा द्यायचा तुझा हट्टच असेल तर एक एक कान काळा असेल असे आठशे शुभ्र घोडे मला आणून दे."

या मागणीमुळे गालव हादरलाच! त्याच्याजवळ इतकं धनही नव्हतं अन् असे अश्व मिळण्याचं स्थानही त्याला ठाऊक नव्हतं. त्याने भगवान विष्णूंचे स्मरण केले.

तेंव्हा गरूड त्याच्यासमोर प्रकट होऊन म्हणाला, "भगवान विष्णूंनी मला आदेश दिलाय की मी तुला तुझ्या इच्छेनुसार हवं तिथं घेऊन जावं."

प्रसन्न होऊन गालव गरुडाच्या पाठीवर बसला अन् त्याला पूर्वेकडे जायची आज्ञा दिली. गरूड खूप वेगाने उडू लागला.

"आता आपला वेग कमी कर. इतक्या वेगामुळे मला काहीच दिसत नाहीय. विशेष प्रकारच्या घोड्यांचा मला शोध घ्यायचा आहे." गालव गरुडाला म्हणाले.

यावर गरुड वृषभ नामक पर्वतावर उतरला. तिथे शांडिली नावाच्या तपस्विनीने त्यांचे स्वागत केले.

गालवाला सल्ला देत गरुड म्हणाला, "घोड्यांसाठी आधी तुला धनाची गरज आहे. नंतरच तू घोड्यांची व्यवस्था करू शकशील. तेंव्हा, म्हणशील तर मी तुला आपला मित्र प्रतिष्ठानपुरचा राजा ययाती याच्याकडे घेऊन जातो. त्याच्याकडे तू घोड्यांसाठी धन माग." गालवच्या संमतीनन्तर गरुड त्याला ययातीकडे घेऊन गेला.

गालवचे बोलणे ऐकल्यावर ययाती म्हणाला, "मित्रा, पण आत्ता तर माझ्याजवळ धन उरलेल नाही. तेंव्हा ते तर मी तुला देऊ शकत नाही. पण आपली कन्या माधवी हिच्याशी मी तुझा विवाह करून देऊ शकतो. तिच्या साह्याने तू घोडे मिळवू शकशील."

गालवाने माधवीचा पत्नी म्हणून स्वीकार केल्यानंतर गरूड म्हणाला, "आता या कन्येच्या साह्याने तू घोड्यांची व्यवस्था कर. मी आता परत जातो."

गालव माधवीला घेऊन आयोध्येच्या राजाकडे गेला व त्याला आपला वृत्तान्त सांगितला. राजा म्हणाला, "ही कन्या माधवी



सर्वगुणसम्पन्न आहे. ती मला दे अन् बदल्यात घोडे घेऊन जा. पण तुला हवेत तसे फक्त दोनशेच घोडे माझ्याकडे आहेत; ते तू घेऊन जा."

माधवीने आता गालवला असा सल्ला दिला की, "अशाच प्रकारे इतर राजांकडे मला सोपवून तू बाकीचे घोडे मिळव."

माधवीकडून एक पुत्र प्राप्त झाल्यावर राजाने माधवीला परत गालवकडे सोपवले. यानन्तर गालव काशी नरेश दिवोदासकडे गेला. त्याच्याकडेही एक काळा कानवाले दोनशेच घोडे होते. त्यानेही माधवीच्या बदल्यात घोडे दिले व तिच्याकडून पुत्रप्राप्ती झाल्यावर तिला गालवकडे परत पाठवले.

अशाच प्रकारे गालवने माधवीच्या बदल्यात भोजनगरचा राजा उशीनरकडून तसलेच आणखी दोनशे घोडे मिळवले. अजूनही दोनशे घोडे कमीच होते. पण आता आणखी ते कुठे मिळू शकतील हे गालवला कळू शकले नाही. म्हणून उरलेल्या घोड्यांच्या बदल्यात विश्वामित्राला त्याने माधवीच सोपवली.

गालवने असेच केले.

ही गोष्ट सांगून नारद दुर्योधनाला म्हणाले, "इतके कष्ट करूनही गालव आपला हट्ट पुरा करू शकला नाही. तेंव्हा आता तू ही आपला हट्ट सोडून दे. अन् आपला हितैषींचे बोलणे मान."

दुर्योधनावर कोणाच्याच उपदेशाचा प्रभाव पडत नाहीसे पाहून निराश झालेला धृतराष्ट्र श्रीकृष्णाला म्हणाला, "कृष्णा, जे काही घडतंय,



त्याच्याशी मी मुळीच सहमत नाहीय. दुर्योधनाला समजावणं आता मला शक्य नाहीय. तू स्वतःच प्रयत्न करून पहा."

तेंव्हा दुर्योधनाला संबोधित करत श्रीकृष्ण म्हणाला, "दुष्ट व्यक्ती करतात तसं करणं, तुझ्यासारख्या पुरुषाला योग्य नव्हे. काय ठीक आहे - हे तू जाणतोस. उचित - अनुचित तुला कळतं. युद्धामुळे सर्वांचाच सर्वनाश होतो. पांडवांचा पराक्रम ओळख. त्यांच्याशी मिळून मिसळून राहिलास तर सर्वांना प्रसन्नता वाटेल."

भीष्म व द्रोण यांनीही श्रीकृष्णाच्या म्हणण्याचे समर्थन केले.

विदुर दुर्योधनाला बोलला, "मला तुझी चिन्ता नाही वाटत. मला तर तुझे माता-पिता



गान्धारी अन् धृतराष्ट्र यांच्या भविष्याचीच काळजी वाटतेय. तुला जन्म दिल्यामुळे ते अनाथ बनत चाललेत.''

धृतराष्ट्राने पुन्हा एकदा दुर्योधनाला समजवायचा प्रयत्न करत म्हटले, ''कृष्णाची मैत्री आपल्याला सर्व दृष्टींनी हितकर आहे. अशी संधी हातची घालवण्यात बुद्धिमानी नव्हे.''

दुर्योधनाला कोणाचेच बोलणे आवडले नाही. तो कृष्णाला अुद्देशून बोलला, ''कृष्णा, सर्वजण माझ्या डोक्यावरच साऱ्या दोषाचं खापर फोडत आहेत. तूही पांडवांचीच री ओढत आहेस, त्यांचंच प्रतिनिधित्व करतो आहेस. तू दोन्ही पक्षांच्या बळ-पराक्रमांच्या बाबत विचार केलेला नाहीस. मला तर हेच कळत नाहीय, की मी असं काय पाप केलंय की सगळेच्या सगळे मलाच अुपदेशामृत पाजत आहेत? पांडव स्वेच्छेने द्यूत खेळले अन् अटीप्रमाणे त्यांनी वनवास भोगला. यात माझा काय दोष? पांडव का आमच्याशी युद्धाला अुभे राहिलेत? ते युद्ध करतील, तर क्षात्रधर्मानुसार आम्ही ही माघार घेणार नाही. पृथ्वीवरच्या राजांनाच काय, पण प्रत्यक्ष इन्द्राशीही युद्धाला डरणार नाही. मी अजाण होतो, तेंव्हा पांडवांना राज्य दिलं गेलं होतं. पण आता मात्र मी जिवन्त असेपर्यन्त त्यांना अर्ध राज्यच काय, पण सुईच्या टोकावर मावेल इतकीही जमीन देणार नाही. आता मला मला कोणी अुपदेश करायचा प्रयत्न करू नका.''

एकदा शेवटची सूचना म्हणून श्रीकृष्ण दुर्योधनाला, सांगू लागला, ''तुझ्या इच्छेप्रमाणेच तुला वीरगती प्राप्त होईल. तू सर्व प्रकारे पांडवांशी कपट केलं आहेस, त्यांच्या विरुद्ध कारस्थान केलंयस; अन् म्हणतोयस की, तू कसलंही पाप नाही केलंयस! आज पांडवांना त्यांचा अर्धा अधिकार द्यायला तुझी तयारी नाहीय. स्वतःच्याच हिताच्या गोष्टी ऐकत नाहीयस. अुद्या ते पूर्ण राज्यच तुझ्याकडून हिसकून घेतील.''

श्रीकृष्णाचे बोलणे ऐकून चिडून दुर्योधन सभेतून अुठून निघून गेला. त्याच्या पक्षाचे राजेही त्याच्या पाठोपाठ गेले.

तेंव्हा श्रीकृष्ण धृतराष्ट्राला म्हणाला, ''महाराज, आपला वंश सर्वनाशापासून वाचवायचा असेल, तर दुर्योधन अन् त्याच्या अनुयायांना कैद करून पांडवांच्या हवाली करी आणि त्यांच्याशी तह करा.''

कृष्णाच्या या बोलण्याने धृतराष्ट्र घाबरला. त्याने गांधारीच्या द्वारे दुर्योधनाला तहाचा प्रस्ताव स्वीकारायचा संदेश पाठवला. पण दुर्योधनावर त्याचा काहीच परिणाम झाला नाही.

कृष्णाने दुर्योधन व त्याच्या मन्त्र्यांना कैद करून पांडवांना सुपूर्त करायचा प्रस्ताव मांडल्याचे दुःशासनाला समजले, तेंव्हा तो दुर्योधनाला म्हणाला की इथे आपणच कृष्णाला कैद करून ताब्यात का घेअू नये? यामुळे दात पडलेल्या सापासारखी अवस्था होईल पांडवांची!

सात्यकीला या कारस्थानाची खबर मिळताच त्याने कृतवर्माला सावध करून सभेत जाअून कृष्णाला सूचना दिली की, त्याला कैद करायची योजना बनवली जात आहे. त्याने धृतराष्ट्र अन् अन्य सभासदांनाही ही गोष्ट सांगितली.

धृतराष्ट्रने ताबडतोब दुर्योधनाला सभेत येण्यासाठी निरोप पाठवला अन् या कारस्थानाबद्दल त्याची चांगली कानअुघाडणी केली. विदुराने भरसभेत दुर्योधनाची निर्भत्सना केली.

श्रीकृष्ण आता दुर्योधनाला म्हणाला, ''तुला काय वाटलं, की मी एकटा आहे? माझ्याबरोबर पांडवांची सेना, अंधकाचे वृष्टि योद्धे, आदित्य, रुद्र, ऋषी सर्वजण आहेत.''

दुसऱ्याच क्षणी सर्वांना असे दिसले की, श्रीकृष्णाच्या दैदिप्यमान हृदयकेन्द्रापासून अग्निज्वाळा निघत आहेत. त्याच्या मध्यावर बुध, वक्षस्थानी अकरा रुद्र, भुजांवर दिक्पाल अन् तोंडावर अग्नि विराजमान आहे!

हे अद्भुत व अलौकिक दृश्य पाहून सर्वांचे डोळे दिपले. दृष्टीपुढे त्यांना काहीच दिसेना, त्यांचे डोळे बन्द झाले. कृष्णाने द्रोण, भीष्म, विदुर व संजय यांना दिव्य दृष्टी प्रदान केली त्यामुळे ते त्याचे विश्वरूप दर्शन करू शकले.

श्रीकृष्णाने तेंव्हा धृतराष्ट्रालाही दिव्यदृष्टी प्रदान केली.

**क्रमशः**





# लाकडी तलवार

पतंग स्थानिक सावकाराकडे कामाला होता. त्याच्या कामावर सावकार फार खूश होता. तो कधी कधी सावकाराच्या समस्यांच्या सोडवणुकीचा मार्गही शोधून काढत असे. त्या शहरात सावकाराचे दोन-तीन प्रतिस्पर्धीही होते. ते नेहमी सावकाराला खाली पाडायच्या प्रयत्नात असत. अशा विचित्र प्रसंगात पतंगच्या सल्ल्यांनी आजवर अद्भुत काम केलं होतं.

पण पतंगचे सावकाराकडे काम करणें त्याच्या आजीला मुळीच पसंत नव्हते. ती नेहमी म्हणत असे की, सरकारी नोकरी चांगल्या दर्जाची असते, ती सुटायची भीतीही नसते. ती वारंवार त्याला असेही म्हणे की सावकाराचा काय भरंवसा! एकाद्या दिवशी तुझ्या सल्ल्याचा काही दुष्परिणाम झाला, तर कदाचित ते तुला नोकरीवरून काढून टाकतील. अन् मग दुःखी होऊन काय उपयोग? त्यामुळे ती पतंगच्या सारखी मागे लागत राहिली की, त्याने ताबडतोब राजाकडे नोकरी मिळवण्याचा प्रयत्न करत रहावा. शेवटी नाइलाजाने तो नोकरी विचारायला राजाकडे जायला निघाला.

पतंग राजाकडे सैनिकाची नोकरी मागायला गेला. पण दिसायला तो किशोर-वयाचा दिसत असल्याने राजाने त्याला सैनिक म्हणून नोकरी न देता राजवाड्याच्या दरवाजावर रात्रीचा पहारेकरी म्हणून नेमले.

राजा कधी-कधी पहारेकऱ्यांच्या कामाची स्वतः देखरेख करत असे. एका रात्री तो जेंव्हा असाच देखरेखीला निघाला, तेंव्हा पतंग राजवाड्याच्या दाराला टेकून झोपलेला त्याला दिसला. राजाने त्याला उठवले नाही, पण हळूच त्याच्या म्यानातली तलवार मात्र काढून घेतली.

पतंगने डोळे उघडले, तेंव्हा म्यान रिकामं पाहून तो घाबरून गेला. त्याला छान माहीत होतं की, एका पहारेकऱ्याची तलवार हरवणं याचा अर्थ काय होतो. त्याला मृत्यु-दंडही मिळू शकत होता. दररोज सकाळी त्याला शस्त्रागारात तलवार जमा करावी लागे अन् त्यापूर्वी सर्व पहारेकऱ्यांबरोबर राजासमोर हजर रहावे लागे. त्यामुळे सकाळपर्यन्त कुठून तरी तलवार पैदा करणं त्याला आवश्यक होतं. नाहीतर त्याची नोकरी जाण्याची शक्यता होती. अन् त्याबरोबरच राजाने दिलेली शिक्षा भोगायला लागली असती.

या संकटसमयी पतंगला अचानक आपल्या सुतार दोस्ताची आठवण झाली. तो राजवाड्याजवळच रहात असे. धावत-पळत त्याच्याकडे जाऊन पतंगने आपली राम-कहाणी त्याला सांगितली. सुतार-मित्र म्हणाला, "मी तर जास्तीत जास्त एक लाकडी तलवार बनवून देऊ शकेन. त्यामुळे एका दिवसापुरतं तरी संकट टळू शकेल. पण शेवटी तर राजाच्या दयेनंच तुझे प्राण वाचू शकतील."

सकाळ होण्यापूर्वी मित्राने पतंगला लाकडाची एक तलवार बनवून दिली. त्याची बाहेर दिसणारी मूठ तर खरोखरीची दिसत होती.

प्रातःकाळी पतंगही इतर पहारेकऱ्यांबरोबर राजाच्या निरीक्षणासाठी ओळीत उभा राहिला.

नेहमी तर राजा या कामासाठी एकटाच येत असे. पण त्या दिवशी राजाबरोबर सैनिकांच्या बंदोबस्तात एका कैद्यालाही आणले गेले होते.

कैद्याकडे निर्देश करत राजा पहारेकऱ्यांना म्हणाला, "हा राजद्रोही आहे आणि याला मृत्यूची शिक्षा सुनावली गेली आहे. माझी अशी इच्छा आहे की तुम्हापैकी एकाच्या हातून ही शिक्षा अंमलात आणली जावी."



**पंचवीस वर्षांपूर्वी चान्दोबात प्रकाशित झालेली कहाणी**

इतके, बोलून सर्व पहारेकऱ्यांवरून राजाने एक नजर फिरवली. पतंगवर राजाची नजर पडताच ती तिथेच थांबली.

"तू आपल्या तलवारीनं याचं डोकं धडावेगळं कर." राजाने पतंगला आज्ञा दिली. पतंगचं हृदय भयाने जणू काही धडधडायचं थांबलं.

त्याच्याजवळची तलवार लाकडी असल्याने पतंग ती म्यानाबाहेर काढूही शकत नव्हता, कारण त्याच वेळी राजाला त्याच्या तलवारीची चोरी कळून चुकली असती. अन् कैद्याऐवजी त्यालाच मृत्युदंड मिळाला असता. त्याला असे वाटले की, राजा कैद्याला नव्हे, तर आपल्यालाच डोकं उडवायची शिक्षा देत आहे.

आता त्याने एकदम धैर्याने काम केले. साहस एकत्र करून तो म्हणाला, "महाराज, कृपा करून हे काम आपण दुसऱ्या कुणावर सोपवा. निःशस्त्र माणसावर हात उचलणं मला नाही जमायचं."

"तू माझी आज्ञा मोडत आहेस. माहीत आहे? यासाठी तुलाही मृत्युदंड मिळू शकतो?" राजा क्रोधाने म्हणाला.

घाबरून आता पतंगने डोळे मिटले अन् हात जोडून विनवणी करत तो म्हणाला, "माते भवानी! माझ्या हातून आत्ता जर पाप होणार असेल, तर माझी तलवार लाकडाची बनव अन् पाप करण्यातून वाचव मला!" इतके बोलून त्याने झटकन म्यानातून तलवार उपसली. ती तर खरंच लाकडाची बनली होती!

पहारेकऱ्यांना एका बाजूला तर हसू आले अन् तेव्हांच दुसरीकडे आश्चर्यही वाटले की तलवार खरोखरीच लाकडाची कशी झाली?

राजालाही आपले हसू आवरेना! संकटातून बाचण्यासाठी पतंगने एका रात्रीत एका लाकडी तलवारीची व्यवस्था केली, इतकेच नव्हे तर आपली लाचारी अनुकूल परिस्थितीत बदलण्याचा हजरजबाबीपणाही दाखवला.

राजाने त्याला माफ केलं, इतकंच नव्हे, तर त्याला स्वतःचा अंगरक्षकही नेमला. पतंगच्या आजीला ही सुवार्ता मिळाली, तेंव्हा तिच्या आनन्दाला पारावार उरला नाही.







# स्वप्न की सत्य

राम, कृष्ण आणि भीम या एकाच गावात रहाणाऱ्या तीन युवकांची एकच समस्या होती.

रामला गौरी नावाच्या मुलीशी विवाह करायचा होता. पण त्याच्या गरीबीमुळे तिचे आईबाप या विवाहाला तयार नव्हते.

कृष्ण चांगला बुद्धिमान अन् सुन्दर युवक होता. आपला मालक गजपती याच्या एकुलत्या एक मुलीशी विवाह करायची त्याची इच्छा होती. मुलगी स्वातीही कृष्णशीच विवाह करू इच्छित होती. पण गजपतीची तर अशी अट होती की, रोज शंभर रुपये कमवून आणणाऱ्या तरुणाशीच आपण मुलीचं लग्न लावून देणार. कृष्णाला तर हे अगदीच अशक्य होते.

भीम अन् कमला यांचं एकमेकांवर प्रेम होते. पण कमलाच्या मातापित्यांना एक घरजावई हवा होता. भीमला तर ते शक्य नव्हतं, कारण त्याचे आईबाप वृद्ध होते अन् भीमशिवाय त्यांची काळजी घेणारं कोणीही नव्हतं.

एके दिवशी तिघेही अचानक एका ठिकाणी भेटले. तिघांनीही आपापली रामकहाणी एकमेकांना सांगितली. तिघं एकमेकांशी बराच वेळ चर्चा करत राहिले अन् शेवटी या निर्णयावर आले की आपल्याजवळ मूलतः पैसेच फार कमी आहेत. तिघांजवळ पुरेसे पैसे असते, तर तिघांच्याही इच्छा पूर्ण झाल्या असत्या. धन कमवायच्या युक्तीचा विचार करता करता शेवटी ते अशा निर्णयावर आले की, पैसे मिळवणं हे आपल्या अकलेपलिकडचं आहे! त्यामुळे तिघांनीही आता आत्महत्या करायचे ठरवले.

एका रात्री ते गावच्या सीमेवरल्या टेकडीच्या शिखरावर उभे राहिले अन् तिथून उडी मारण्यापूर्वी डोळे मिटून प्रार्थना करू

विनोदिनी मराठे



लागले, "हे परमेश्वर! पुढल्या जन्मी आम्हाला धनवान बनव."

प्रार्थनेनंतर आता ते अुडी मारणार, इतक्यात त्यांना एक गंभीर आवाज ऐकू आला, "थांबा, थांबा! नाहीतर भयंकर परिणाम होईल!"

मागे वळून पाहिले, तर तिथे एक महात्मा अुभे असलेले त्यांना दिसले. काहीही न विचारताच ते म्हणाले, "जीवन हा परमेश्वराचा एक अमोल वर आहे. अडचणीमुळे ते असं अकस्मात संपवणं पाप आहे. त्यामुळे अडचण तर दूर होत नाहीच, अुलट अडचणीत आपण अधिकच गुंतत जातो. आत्महत्येनंतर नरकातल्या घोर यातना सहन कराव्या लागतात. यातनांना कंटाळून पुन्हा आत्महत्या कराल तर याहूनही निकृष्ट जीवन पदरात पडेल, ते मात्र अन्तहीन नरकासारखंच असेल. जीवनातल्या अडचणींचं अुत्तर जीवनातच मिळेल, मृत्यूने नव्हे."

महात्म्याच्या बोलण्यामुळे प्रथम ते घाबरले, पण नंतर त्यांना शान्त वाटले. त्यांना वाटले की फार मोठं पाप करण्यापासून आपण वाचलो आहोत. पण आता त्यांना जीवनात काही रुची राहिलेली नव्हती. म्हणून ते महात्म्याला म्हणाले, "महात्मा, आपण आम्हाला मरणापासून वाचवलं आहात, पण आता जीवनात आम्हाला काही रस अुरलेला नाहीय. आता आपण सांगा, की आम्ही काय करावं?"

"तुम्ही सर्वजण स्वतःकडून तर मेलेलेच आहात. तेंव्हा या जीवनावर तुमचा काही अधिकार राहिलेला नाही. देवानंच तुमचं रक्षण केलेलं आहे. म्हणून तुमचं अुरलेलं आयुष्य त्यालाच अर्पण करा. अन् त्याच्याचसाठी जगा. जीवनाचा सारा भार, आपल्या सगळ्या समस्या त्या परम प्रभूला सांगा अन् आपापल्या घरी जा. तुमचं कल्याण होईल." असे सांगून महात्मा तेथून अदृश्य झाले.

ते तिघेही काही विचार न करता एका दिशेला चालू लागले. रस्त्यात त्यांना एक चांगला धट्टाकट्टा माणूस दिसला. त्याच्या मिशा झुबकेदार होत्या त्याने या तिघांना निरखून पाहिले अन् त्यांची कहाणी ऐकून तो जोरजोराने हसू लागला.

"चला माझ्याबरोबर. मी तुम्हा सर्वांना



जीवन जगायची नवी तऱ्हा शिकवीन. आयुष्यात जे हवं ते सर्व तुम्हाला मिळेल-धन-दौलत, कीर्ती, स्त्री."

तिघेही त्याच्या मागे-मागे चालू लागले.

आपल्या घरी नेअून मिशीवाल्याने त्यांना प्यायला पाणी दिले. ते प्यायल्याबरोबर तिघेही बेशुद्ध होअून पडले - जसे काही गाढ झोपेत आहेत.

बेशुद्धावस्थेत रामला स्वप्न पडले की, गौरीशी आपला विवाह झालेला आहे अन् आपण सुखात जगत आहोत.

कृष्णने स्वप्नात पाहिले की गजपतीने आपल्या मुलीचं लग्न लावून देअून आपल्याला घरजावई करून घेतलंय. आता आपण स्वतःच त्या घरचा मालक बनलोय.

भीमला दिसले की आईवडलांना विरोध करून कमलाने आपल्याशी लग्न केलंय अन् ती सासू-सासऱ्यांची सेवा करत आहे - जणू त्यांची मुलगीच!

तिघे शुद्धीत आल्यावर फारच प्रसन्न होते. एक तुष्टता अन् तृप्ती त्यांना वाटत होती. आपल्या इच्छा खरोखरच पूर्ण झाल्या आहेत अन् आपले अनुभव काल्पनिक नसून, खरेच आहेत असे त्यांना वाटत होते. तिघांनीही आपापले अनुभव एकमेकांना सांगितले.

इतक्यात मिश्यावाल्याने येअून म्हटले, "मी तुम्हाला थोडं मादक औषध मिसळून ते पाणी दिलं होतं. त्यामुळेच तुम्हाला ती स्वप्नं दिसली. हे औषध मादक फुलांपासून-अफूच्या फुलांपासून - बनवलं जातं. इथे या फुलांची



एक बाग आहे. त्यात काम करण्यासाठी कष्टाळू युवकांची जरुरी आहे. तुम्ही सर्वजण इथे काम करू शकाल. त्याबदल्यात प्रत्येकाला दरमहा एकेक लाख रुपये मिळतील, अन् रोज हे औषधही प्यायला मिळेल."

हे ऐकून तिघांच्या आनन्दाला पारावार अुरला नाही. ते बागेत काम करायला तयार झाले. मिशिवाला त्यांना अफूच्या बागेत घेअून गेला.

पण नुकते कुठे ते बागेत पोचले होते अन् एक काळा नाग कृष्णाला डसला!

"इथे जवळच एक महात्मा रहातात. याला लवकर त्यांच्याकडे घेअून जा. अन्य कुठेही अुपचार होअू शकणार नाही." असे म्हणून मिशिवाल्याने राम आणि भीमला महात्म्याच्या



आश्रमाची वाट सांगितली. पण तो स्वतः मात्र बरोबर गेला नाही.

महात्माकडे जाताना वाटेतच कृष्ण बेशुद्ध झाला. तीन दिवसांपूर्वी आपल्याला आत्महत्येपासून परावृत्त करणाऱ्या त्याच महात्म्याला आश्रमात पाहून राम अन् भीमला आश्चर्य वाटले अन् महात्म्यालाही त्यांना पाहून आश्चर्य वाटले. त्यांनी विचारले, "मुलांनो, मी तुम्हाला आपापल्या घरी जायला सांगितलं होतं. मग इथं कसे आलात? मला असं वाटतंय की, तुम्ही सर्वजण पुन्हा वाट चुकला आहात."

रात्री महात्म्याचा निरोप घेताना राम अन् भीमने मधल्या काळातल्या साऱ्या घटना त्याला सांगितल्या. महात्म्याने प्रथम एक औषध कृष्णच्या नाकाशी धरलं. या वासाने कृष्ण शुद्धीवर येऊन उठून बसला. मग तिघांनाही तो म्हणाला, "तिघांना भूक लागली असेल तर बोला बरं काय हवं खायला तुम्हाला? ज्या पदार्थाची इच्छा असेल, त्याचं नाव निःसंकोच सांगा - मग तो कितीही दुर्मिळ असो."

हे ऐकून तिघांनी एकमेकांकडे पाहिले अन् नंतर आपापल्या आवडीचं जेवण सांगितलं. महात्म्याने तिघांच्याही कपाळाला आपल्या बोटांनी स्पर्श केला. त्याबरोबर तिघेही अचेत झाले! अचेतावस्थेत त्यांना दिसले की आपण तिथे आपापल्या आवडीची मिष्टान्नं खात आहोत! जेवण झाल्यावर तिघंही आपोआप शुद्धीवर आले.

नंतर तिघांनाही एकएक पेरू अन् केळं देऊन महात्मा म्हणाला, "आपापल्या हातातली फळं खाऊन टाका, कारण माझ्याजवळ तुम्हाला देण्यासारखं दुसरं काहीच नाहीय. नंतर खरी तृप्ती तुम्हाला कशापासून मिळाली हे सांगा - स्वप्नातल्या आवडीच्या पक्वांनांनी, की या खऱ्याखुऱ्या केळ्यानं अन् पेरूनं?"

तिघंही दोन-दोन दिवसांचे उपाशी होते. स्वप्नातली काल्पनिक पक्वान्नं खाऊन त्यांची भूक जास्तच खवळली होती, पण केळं अन् पेरू खाऊन त्यांची भूक भागली होती. तिघांनाही स्वप्न अन् सत्य यातला फरक कळून चुकला.

राम महात्म्याला म्हणाला, "महात्मा ! भुकेपासून तृप्ती अन् भोजनाचा आनन्द तर आम्हाला या साध्या फळांनीच दिला. काल्पनिक पक्वान्नांनी तर भूक जास्तच तीव्र झाली."

"एकदम बरोबर! आम्हालाही तसंच वाटलं."



कृष्ण अन् भीमही म्हणाले.

"बरोबर! साध्या अन् वास्तविक जीवनात - मग ते कितीही साधं-सुधं असो - जगण्याचा खरा आनन्द लपलेला असतो. खोट्या जगाची कल्पना फसवणूक अन् धोकाच असते. तो म्हणजे वाळवंटातल्या पाण्याप्रमाणे केवळ आभास असतो, खरं पाणी नव्हे - मृगजळ असतं."

"जीवनातून निराश होऊन आत्महत्त्या करणं अन् अवास्तविक व खोट्या आनन्दामागे धावणं - हे दोन्ही म्हणजे खऱ्या मार्गापासून चुकणं होय. तुम्ही तिघेही दुसऱ्या वेळीही मार्गच्युत झालात. खोट्या जगाच्या कल्पनेच्या जाळ्यात अडकवणाऱ्या फासेपारध्याच्या जाळ्यात अडकला आहात. तुमच्यासारख्या निराश तरुणांना मादक पदार्थांचे व्यापारी खोट्या जगाच्या अवास्तविक आकर्षणाचा मोह दाखवून त्यांना अन्तहीन नरकयातना भोगायला लावतात. तुम्ही सर्वजण अशाच एका मिश्यावाल्या नरक-दूताच्या जाळ्यात अडकलात. एका नरकातून सुटून दुसऱ्या त्याहीपेक्षा भयानक नरकाच्या वाटेवर चालू लागलात." त्यांना उपदेश करत महात्मा बोलला.

तिघं एकमेकांकडे पाहून बोलू लागले, "महात्मा! आपण पुन्हा एकदा आम्हाला मृत्यूपासून वाचवलंत! खरोखर, दुसऱ्यांदाही आम्ही खरी वाट चुकलो - आगीतून उठून फुपाट्यात पडलो! आता आमचे डोळे उघडले आहेत. आमच्या आता लक्षात आलंय की, वास्तव जीवनातला लहानसा आनन्दही, काल्पनिक जीवनातल्या स्वर्गाच्या मोठ्या कल्पनेपेक्षाही फार श्रेष्ठ आहे. देवानं आम्हाला जितकं दिलंय, त्यातच आता आम्ही संतुष्ट राहू अन् उरलेलं आयुष्य त्याचीच ठेव मानून त्याच्या इच्छेप्रमाणे जगू."

"परम प्रभु, आपल्या मुलांकडून अशाच संकल्पाची आशा बाळगतो," हसत हसत महात्म्याने म्हटले. "देवा, यांना मार्ग दाखव."

तिघांनी हात जोडून महात्म्याला प्रणाम केले अन् आपापल्या घरांकडे वळले. पूर्व दिशेला लालिमा उतरू लागला होता आणि सकाळ होणार होती.



# शोधा, सांगा, नि जिंका !

या अंकात प्रकाशित झालेल्या प्रश्नावलीची उत्तरें पुढील अंकात दिली जातील. तोपर्यंत 'भारताचा शोध प्रश्नोत्तरी, चंदामामा बिल्डींग्ज, वडपळणी, चेन्नई - ६०० ०२६ या पत्त्यावर आपली उत्तरें अवश्य पाठवा. परंतु या स्पर्धेत भाग घेण्यासाठी कांही गोष्टी तुम्ही करायला हव्यात.

चांदोबाच्या मागल्या अंकात प्रसिद्ध झालेली कांही वचने, अवतरणें किंवा पूरक वाक्यें नीट वाचा. त्यांपैकी तुम्हाला कोणती वाक्यें आवडली व कां आवडली हे पानाचा क्रमांक देऊन सुमारे शंभर शब्दांत सांगा. तुमचे शिक्षक किंवा पालक यांचेकडून, तुमची प्रवेशिका प्रमाणित करा. त्यावर तुमचे नांव, सही, वय, वर्ग, विद्यालय (विद्यार्थी असाल तर) व संपूर्ण पत्ता लिहून वरील पत्त्यावर पाठवा.

**पहिलें बक्षीस : रु. १०००/-**
**दुसरे बक्षीस : रु. ५००/-**

**आणि**
**पांच उत्तेजनार्थ बक्षिसें**
**प्रत्येकी रु. २००/-**






**भारताचा शोध प्रश्नोत्तरी :**

एक वादळी रात्र होती. पाऊस व चिखल यामुळे आपादमस्तक लडबडलेल्या एका तरूणाने नदीकिनाऱ्यावरील एका घराचा मागील दरवाजा ठोठावला. हातात दिवा घेतलेल्या एका तरुणीने दार उघडले. "आहा, नाथ! या भयानक रात्री जोराने वाहणारी नदी पार करून माझ्या बाबांच्या घरी येण्याची काय जरूरी होती?" ती म्हणाली.

"तुझ्यावाचून एक पळभरही रहाणं मला असह्य झालं!" तरुण उत्तरला.

"माझ्यावरील प्रेम आणि आकर्षणाचा अर्धा अंश जरी प्रभुबद्दल असता, तर काय छान झालं असतं!" उसासा टाकत ती पुटपुटली.

त्या क्षणीच युवकाच्या जीवनात एका मोठ्या परिवर्तनाची सुरुवात झाली. तो ईश्वरभक्तीकडे वळला अन् कालांतराने फार मोठा संत बनला.

या घटनेशी दोन व्यक्तींचा संबंध आहे. ते दोघे कोण?



खाली दिलेल्या पौराणिक व्यक्तींचे एकमेकांशी कोणते नाते आहे?

| | | |
|---|---|---|
| **अ. अभिमन्यु** | - | **बलराम** |
| **ब. अुग्रसेन** | - | **प्रद्युम्न** |
| **क. घटोत्कच** | - | **शिशुपाल** |
| **ड. कीचक** | - | **परीक्षित** |
| **ई. कर्ण** | - | **सुभद्रा** |



१. आयुर्विज्ञानावरील पहिली भारतीय रचना कोणती? तिचे लेखक कोण? लेखक कोणत्या काळात होऊन गेला?

२. ???

३. इतिहासाबद्दलची पहिली भारतीय रचना कोणती? तिचे लेखक कोण? ते कोणत्या शताब्दीत होऊन गेले?

४. समाज-शास्त्र, राजनीति-विज्ञान व न्याय यावरील पहिली भारतीय कृति कोणती आहे? तिचे लेखक कोण? हे कोणत्या काळात होऊन गेले?

५. नाट्यकलेवरील पहिली भारतीय कृति कोणती? तिचे लेखक कोण? हे कोणत्या काळात होऊन गेले?




**अटी :**

१. चंदामामा इंडिया लि., लिंटास अभिराडीपुरीज इंडिया लि., इनिशिएटिव्ह मिडिया व ब्रिटानिया इंडस्ट्रीजचे कर्मचारी किंवा त्यांचे नातेवाईक किंवा सहकारी यांना या स्पर्धेत भाग घेता येणार नाही.

२. परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील व त्याबाबतीत कोणताही पत्रव्यवहार केला जाणार नाही.

३. गचाळ हस्ताक्षरांतल्या प्रवेशिका रद्द ठरवल्या जातील.

४. मे २००० च्या 'चांदोबा' मधें स्पर्धेचा निकाल जाहीर केला जाईल.

५. प्रवेशिका आमच्याकडे २९ फेब्रुवारी २००० पर्यंत पोंचल्या पाहिजेत.



# भारत : तेंव्हा व आता



## चेन्नै : पाचव्या वेदाचे जन्मस्थान

तमिळनाडूची राजधानी चेन्नै हे नाव नुकतेच प्रचारात आले असले, तरी ते एक विस्मृतीत गेलेले जुनेच नाव आहे. शहराचे नाव मद्रास होते, अन् त्याही आधी मद्रासपट्टम्.

पण चेन्नै अन् मद्रास ही नावे तरी अस्तित्वात कशी आली?

चेन्नै हे बहुधा चिन्न केशवन्‌वरून आलेले नाव असावे. चिन्न केशवन या देवाचे एक जुने मंदीर समुद्रकिनारी होते. ईस्ट इंडिया कंपनीने ते मोडून त्या जागी किल्ला बांधला. दुसरी एक समजूत अशी आहे की इथे ब्रिटीश ठाण्याची स्थापना करणाऱ्या फ्रान्सिस डे याने नाइक दमराला वेंकटप्पा याच्याकडून जागा विकत घेतली. मुख्य वेंकटप्पाने अट घातली की त्या जागेचे नाव आपल्या पित्याच्या नावाचे - चेन्नप्पा नाईक- ठेवावे; म्हणून नाव चेन्नै झाले.



आता मद्रास या नावाचे काय? ते मुसलमान स्कूल - मदरसा - म्हणून मद्रास झाले का? मुस्लिम समाजाचा नेता मदरासन - याच्या नावावरून 'मद्रास' नाव झाले का? एका प्रभावशाली पोर्तुगीज कुटुंबाच्या मदेरा या नावावरून झाले का? आपल्याला काहीच ठाऊक नाही.

दिल्ली, बाराणसी, मदुरा किंवा कांचीपुरम् यांच्याशी तुलना केली तर चेन्नै शहर वयाने लहान असेल, पण तरीही ते एक स्मरणीय प्राचीन स्थान आहे. जवळ जवळ दोन हजार वर्षांपूर्वी, बरोबर सांगायचे म्हणजे मैलापुरला तिरुवल्लुवर रहात असत. त्यांनी तेथे तमिळमध्ये बुद्धि व सूक्ष्म ज्ञान प्रकट करणाऱ्या तिरुकुरळची रचना केली. या ग्रंथाला कधीकधी 'पाचवा वेद' असेही म्हणतात.

तिरुवल्लुवर हा एक संत-कवी म्हटला, तर त्याची पत्नी वासुकी हिला काही चमत्कारी शक्ती अवगत होत्या. एकदा वासुकी विहिरीतून पाणी काढत असताना, नवऱ्याने हाक मारल्यावरून, बादलीचा दोर सोडून देऊन तशीच भरकन तिरुवल्लुरसमोर हजर झाली. एक पाहुणा विहीरीजवळ गेला. तेंव्हा विहिरीतल्या पाण्याच्या पातळीपासून अर्ध्या अंतरावर कसला ही आधार नसलेली ती बादली तशीच लोंबत असलेली पाहून तो आश्चर्यचकित झाला !

येशु ख्रिस्ताचा शिष्य ख्रिस्तगणनेच्या पहिल्या शतकात भारतात येऊन शेवटी मद्रासला पोचला आणि शहरसीमेवरील एका टेकडीवर तो ख्रिस्तवासी झाला. त्या टेकडीला 'सेंट थॉमस' असे नाव पडले. त्याच्या स्मृत्यर्थ असणारे दुसरे स्मारक म्हणजे सेंथॉम कॅथिड्रल. इथे त्याला प्रथम पुरण्यात आले.

१७ व्या शतकात चेन्नै हे ब्रिटीश ईस्ट इंडिया कंपनीचे व्यापारी केन्द्र बनले. सुरुवातीला इंग्रज माणसे समुद्रकिनारी गवताच्या झोपड्या बांधून रहात असत. लवकरच तेथे प्रसिद्ध सेंट जॉर्ज फोर्ट हे स्मारक बांधले गेले.

शहर मैलापुरचे कापालेश्वर व ट्रिप्लिकेनच्या पार्थसारथी यांसारख्या मंदिरांमुळे प्रसिद्ध आहे.





चेन्नैचा एक भाग अड्यार हे अंतरराष्ट्रीय थिऑसॉफिकल सोसायटीचे प्रमुख केन्द्र आहे. हे स्थान ध्यान व अभ्यास करण्यासाठी आदर्श असे आहे.

आजचे आधुनिक चेन्नै हे शहर (लोकसंख्या जवळजवळ ४० लाख) आसपासच्या जुन्या व नवीन प्रेक्षणीय स्थळांसाठी प्रसिद्ध आहे. नव्यांपैकी एक आहे - जन्मजात कलाकारांनी मांडलेल्या, त्यांच्या कृतींचे प्रदर्शन असणारे चोलामंडल आर्टिस्ट्स् व्हिलेज. तिथून फार दूर नसलेलं, अन् समुद्रावर असणारं महाबलिपुरम् किंवा मामल्लपुरम् हे ही आणखी एक. अखंड दगडातून बनवलेल्या शिल्पांचे आणि स्मारकांचे ते आगरच आहे.

चेन्नैमध्ये अनेक विश्वविद्यालये, उत्तम प्रकारे राखलेली उद्याने, एक मोठे पुराणवस्तुसंग्रहालय, एक अंतर्देशीय ग्रंथालय आणि प्राणिसंग्रहालये आहेत. इथे एक फिल्म इंडस्ट्रीही आहे. दक्षिण भारतातले हे सर्वात मोठे शहर होय.




# तिबेटकडे साऱ्या जगाचे लक्ष - पुन्हा एकदा

जगात पशुतुल्य शरीरबळाने बऱ्याच गोष्टी ठरवल्या जात असत, या गोष्टीला फार काळ लोटलेला नाही. पण दुसऱ्या महायुद्धानन्तर (१९३९-१९४५) परिस्थिती बदलली. राजकीय समस्या समजूतदारपणा अन् मध्यस्थांच्या आधारे सोडवल्या जाऊ लागल्या.

परंतु पशुतुल्य शरीरबळ अजूनही आपली भूमिका बजावत आहे. भारतात बरीचशी शाही संस्थाने होती. अशा संस्थानांच्या राजकर्त्यांना भारतात किंवा पाकिस्तानात मिळून जाण्याचा विकल्प दिला गेला होता. इतर शेकडो संस्थानी राजकर्त्यांप्रमाणे, काश्मिरचा राजकर्ता, महाराज हरिसिंग यानेही आपले संस्थान भारतात मिळवण्याचा निर्णय घेतला. पण कुठलाही कायदेशीर हक्क नसताना, पाकिस्तान अजूनही संस्थानाचा एक मोठा भाग व्यापून राहिला आहे. त्याला आपण व्यापलेले काश्मीर म्हणतो.

या प्रमाणेच विसाव्या शतकाच्या सहाव्या दशकात चीनने तिबेट व्यापायला सुरुवात केली. भौगोलिक दृष्टीने चीनला लागून असले, तरी तिबेटची स्वतःची अशी एक संस्कृती आणि आपले सरकार होते. दलाई लामा तिबेट सरकारचा व तिथल्या बौद्ध धार्मिक मताचाही प्रमुख असे. चौदावा दलाई लामा तेनझिन ग्यासो याने भारतात आश्रय घेतला. तो अज्ञातवासात आपले प्रमुख ठाणे धर्मशाला इथे राहून आपले सरकार चालवत आहे.

दलाई लामाच्या खालोखाल असणारा पंचेन लामा हा तिबेटियन जनतेचा नेता होता. या पंचेन लामाची कचेरी चीनने आपल्या पकडीत ठेवली आहे. चीनने हीच गोष्ट तिबेटी जनतेच्या तिसऱ्या-





कर्मापा नावाने ओळखल्या जाणाऱ्या प्रमुखाबाबतही करायचा प्रयत्न केला. याच ओळीतला चालू १७ वा कर्मापा (युग्येन ट्रिले दॉर्जी) हाही भारतात पळून आला आणि जानेवारी ९९च्या सुरुवातीस धर्मशाला इथे पोचला.

या कर्मपाचे वय १३-२० च्या दरम्यान आहे. साहजिकच त्याला चीनची तिबेटवर मालकी असह्य झाली. काही सोबती बरोबर घेऊन तो बर्फ व कठीण काटेरी झुडपे आणि खिंडी यातून शेकडो कि.मी. अंतर पायी तुडवत भयानक वादळी वाऱ्यांना तोंड देत इथे येऊन पोचला.

हेरिटेजला (चन्दामामा मासिकाचे भगिनी प्रकाशन - १९८५ ते १९८९) मुलाखत देताना दलाई लामाने चीनने तिबेटमधे जो अनर्थ केला त्याचे वर्णन केले. तो म्हणाला, "या तथाकथित सांस्कृतिक क्रान्तीच्या काळात बहुतेक सारी धार्मिक व सांस्कृतिक ग्रन्थसंपदा नष्ट केली गेली. आणि त्या हस्तलिखितांचा उपयोग त्यांनी आपल्या बुटांचे तळवे आणि वस्तु बांधण्यासाठी केला किंवा चक्क खताच्या खड्ड्यांमधे फेकून दिली."

"आता त्या प्रकारची वर्तणूक बदलली आहे का?" हेरिटेजने विचारल्यावर "होय. बदलली आहे." असे दलाई लामा म्हणाला.

जगाची अशी अपेक्षा आहे की, ही परिस्थिती अजून सुधारेल अन् तिबेटला कमीत कमी राजकीय



स्वातंत्र्य तरी मिळेल आणि दलाई लामा व कर्मापा यांना आपली राजधानी ल्हासा इथे परत जाता येईल.



समुद्रसपाटीपासूनच्या अधिक उंचीमुळे तिबेटला 'जगाचे छप्पर' असे म्हटले जाते. तिथली अगदी खालच्या पातळीवरची क्षेत्रेसुद्धा समुद्रसपाटीपासून ४००० मीटर उंच आहेत. त्यांचे प्रमुख उद्योग म्हणजे शेती व मेंढ्या पाळणे हे आहेत. याशिवाय ते लोकर, कस्तुरी, सोने, गहू व बार्ली यांचा व्यापार करतात. ते याक या जनावरावर सर्वात अधिक अवलंबून असतात, कारण फक्त हा पशुच तिथली कडाक्याची थंडी सहन करू शकतो. जवळजवळ सर्वच तिबेटी बौद्ध आहेत. ते खूप कामसू आणि निसर्गतः साधे आहेत.

# खास बातम्या

## कॅनडाने मार्गदर्शन केले

मागच्या वेळी आपणाला सांगितले होते की, एक सिगरेट ओढल्यामुळे माणसाचे आयुष्य ११ मिनिटांनी घटते. कॅनडाचा असा प्रस्ताव आहे की, ते सिगरेटच्या प्रत्येक पाकिटावर कॅन्सरपीडित फुफ्फुसे व रोगयुक्त चेहऱ्यांचे रंगीत चित्र छापायला सिगरेट कंपन्यांना भाग पाडतील. यामुळे नव्याने व्यसन करू पहाणारांना दहशत



बसेल. इतर देशही असेच करणार आहेत. पण अशा चित्रात्मक धमक्यांची तरी प्रतीक्षा का करावी? आपण आत्तापासूनच धूम्रपान करणाऱ्यांना निरुत्साहित करायला आरम्भ का करू नये?

## आणखी एका अधिकाऱ्याने वाट दाखवली

मध्यप्रदेशच्या भोपाळ शहरात असणाऱ्या जयप्रकाश हॉस्पिटलमधे एक दिवशी सकाळी-सकाळी सूर्याचा प्रकाश चमकू लागला होता-डॉक्टरांवर, रोग्यांवर, इमारतींवर, वाहनांवर-आणि परिसरात जमलेल्या घाणीच्या ढिगाऱ्यावरही !

परन्तु ही दोन माणसे (एक पुरुष व एक स्त्री) कोण होती? ती तेथे झाडू मारत होती. ती मेहतरांसारखी तर दिसत नव्हती!

ते होते प्रशासक प्रशिक्षण ॲकॅडेमीचे निदेशक श्री.पद्मवीर सिंह (एक वरिष्ठ आय.ए.एस.अधिकारी) व त्यांची धर्मपत्नी!

प्रशिक्षणार्थींनी त्यांना मदत केली, अन् डॉक्टरांनी ही! बरेच दिवस जमलेला कचरा व घाणीचा ढीग पहाता पहाता अदृश्य झाला.

खरोखरच! जी कामं आपण स्वतः करू शकतो,



त्यासाठी दुसऱ्यांची वाट न पाहिली तर आपल्याला खूप काही मिळू शकते. आवश्यकता फक्त आपल्या देशावर व देशवासीयांवर प्रेम व विनम्रतेची! श्री सिंह दाम्पत्य या गुणांचा आदर्श बनले.

## पुन्हा एकदा बिग बँगच्या क्षणी

अमेरिकेच्या एका राष्ट्रीय प्रयोगशाळेने एक



सूक्ष्मआरसा (मायक्रोमिरर) निर्माण केला आहे. आपल्या अत्यन्त संवेदनशील प्रणालीच्या मदतीने तो ब्रह्माण्डाच्या निर्मितीच्या वेळी बिग बँगच्या स्फोटामुळे निर्माण झालेले सुरुवातीचे ग्रह आपल्यात ग्रहण करेल अशी आशा व्यक्त केली जात आहे.



# आमच्या वाचकांच्या मनातील विचार

गेल्या वर्षी डिसेंबर महिन्यात 'चांदोबा' पुन्हा सुरू झाल्यानन्तरचा हा पाचवा अंक तुमच्या हाती येत आहे. आमची पूर्ण खात्री आहे की मागचे चारही अंक तुम्हाला आवडले असतील. तुम्ही पाहिले असेल की, गेल्या ५० वर्षापेक्षाही अधिक काळपर्यन्त हे मासिक ज्या विशिष्ट सुगंधाबद्दल प्रसिद्ध होते, तो याने आजही कायम ठेवला आहे. पण त्याबरोबरच याच्या विषयात खूप बदल व त्याचे रूप, रंग आणि चित्रणातही भरपूर सुधारणा केल्या गेल्या आहेत. याच्या उत्तम प्रकारच्या कागदाबद्दल तर बहुधा आम्हाला काही सांगायची आवश्यकता नाही. आम्ही प्रत्येक अंक त्याच्या मागील अंकापेक्षा जास्त चांगला रंगवण्याचा प्रयत्न केला आहे. निस्संशय गेल्या शंभर दिवसात वाचकांकडून आलेल्या पत्रांवरून असे सिद्ध झाले आहे की, या सुधारणा त्यांच्या ध्यानात आलेल्या आहेत. पण तरीही आम्हाला आपली वही थांबवायची इच्छा नाहीय; उलट असे वाटतेय की, आमचे वाचक आमच्या या मासिकात आणखी जे समाविष्ट झालेले पाहू इच्छित आहेत, अन् त्या बदली जे स्तंभ खरोखरच बन्द व्हावे असे त्यांना वाटत असेल - याबद्दलचे त्यांचे विचार ध्यानात घेऊन आणखी काही सुधारणा करायची आमची इच्छा आहे. आशा आहे की, तुम्ही आपले विचार मोकळेपणाने प्रकट कराल. आमची इच्छा आहे की, तुम्हापैकी प्रत्येकाने खालील प्रश्नांची उत्तरे द्यावी आणि दाखवल्याप्रमाणे कापून शक्य तितक्या लवकर आमच्याकडे पाठवावी. उत्तरे देण्याची पद्धत आम्ही खूप सोपी केलीय. अधिकांश प्रश्नांच्या उत्तरासाठी तुम्हाला त्यासमोर दिलेल्या चौकोनात टिक ✓ चे चिन्ह करायचे आहे.

I. माझ्याकडे मासिक वर्गणीतून येते ☐
मी मासिक वर्तमानपत्रवाल्याकडून घेतो/घेते ☐
मी वर्तमानपत्राच्या दुकानातून खरेदी करतो/करते ☐
मी आपल्या मित्रा/ग्रंथालया कडून घेऊन वाचतो/वाचते ☐

II. मी नियमितपणे/कधी कधी हे ही वाचतो/वाचते :

☐ कॉमिक्स ☐ गोष्टींची पुस्तके ☐ इतर मुलांची मासिके

.............................................................. इथे त्यांची नावेही लिहा

III. मी मासिक खालील भाषेत वाचतो/वाचते :
इंग्रजी/तेलुगु/तमिळ/मलयालम/कानडी/हिन्दी/मराठी/गुजराथी/बंगाली/आसामी/ओडिया/संस्कृत
*(आपल्या पत्रिकेची भाषा अधोरेखित करा.)*

IV. गेल्या चार महिन्यात मी वाचले :
☐ चार अंक ☐ तीन अंक
☐ दोन अंक ☐ एक अंक



V. मी खालील विषयांचे मूल्यांकन या प्रकारे करीन

- ☐ धारावाहिक गोष्ट
- ☐ भिन्न भिन्न देशांच्या गोष्टी
- ☐ विशेष बातम्या
- ☐ भारताचा शोध : प्रश्नावली
- ☐ विश्वाचा झरोका
- ☐ जीवन चरित्र
- ☐ भारताची गाथा
- ☐ न सुटलेली कोडी
- ☐ नद्यांची गोष्ट
- ☐ विक्रम-वेताळ कथा
- ☐ इतर गोष्टी
- ☐ पौराणिक गोष्ट
- ☐ भारत : तेंव्हा व आता
- ☐ चांगले इंग्रजी शिकू
- ☐ या माहीत करून घेऊ
- ☐ कोडी/चढाओढी

*आपल्या पसंतीप्रमाणे क्रम देऊन १ ते १६ आकडे चौकोनात भरा.*

VI. ६ माझी इच्छा आहे की चांदोबा मधे खालील विषय असावेत :
(प्राथमिकता क्रमांकानुसार)

i. .................................... iv. ....................................
ii. .................................... v. ....................................
iii. .................................... vi. ....................................

VII माझी इच्छा आहे की मुखपृष्ठावर हे चित्र असावे.

☐ साहसी धारावाहिकाचा कथाक्रम ☐ पौराणिक कथेतील एक दृश्य
☐ दुसऱ्या एकाद्या गोष्टीतील काही दृश्य

VIII. मला वाटते की एका प्रतीची किंमत रु. १० ☐ फार जास्त आहे मी ☐ देऊ शकतो/शकते
☐ स्वस्त कागद वापरून कमी केली जावी.

IX. i) मी ग्राहक आहे. ii) मी ग्राहक बनू इच्छितो/इच्छिते

नाव .................................................................. वय ....................
इयत्ता .................. विद्यालय ..................................................
पत्ता ..........................................................................
..........................................................................
.................................. पिन कोड .................................. राज्य ....................

iii) मी शाळेत जातो/जाते : ☐ आपल्या सायकलवरून , ☐ स्कूल बसने
☐ सिटी बसने ☐ आपल्या आई/वडिलांच्या वाहनाने

iv) मला किरकोळ खर्चासाठी ☐ शंभर रुपयांपेक्षा कमी रक्कम मिळते
☐ शंभर रुपयांपेक्षा अधिक मिळते

आई/वडिलांची सही                                                  सही




# योग्य निर्णय

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा त्या झाडाकडे गेला. झाडावरून प्रेत खाली उतरवून, आपल्या खांद्यावर टाकून नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाकडे चालू लागला. तेंव्हा त्या प्रेतात रहाणारा वेताळ बोलू लागला, "राजा, तुझं ध्येय काय आहे, अन् कोणत्या उद्देश्याची पूर्ती करण्यासाठी तू इतके कठोर प्रयत्न करत आहेस, हे जाणून घेण्याचा मी खूप प्रयत्न केला. पण मी काहीही जाणू शकलो नाही; कारण तू जेंव्हा तुझ्या उद्देश्यापर्यन्त जाऊन पोचतोस, तेंव्हाच नेमका तू त्याची उपेक्षा तरी करतोस, किंवा ते विसरून तरी जातोस. त्यामुळेच तुझं



ध्येय कधी सिद्ध होऊ शकत नाही. काही अविवेकी माणसं तुझ्याप्रमाणेच परिश्रमाचं फळ अगदी तोंडाशी आलेलं असतानाही ते मिळवण्यात असफल अन् असमर्थ होतात. सुवंती नावाची राजकन्याही अशीच होती. तिची गोष्ट आता लक्षपूर्वक ऐक.''

इतके बोलून वेताळ राजकुमारी सुवंतीची गोष्ट सांगू लागला.

चन्द्रगिरीचा राजा चन्द्रसेन याचे एकुलते एक अपत्य म्हणजे त्याची ही कन्या - राजकुमारी सुवंती. मुलगा नसल्यामुळे राजाने तिचे पालनपोषण आपल्या मुलाप्रमाणेच केले. सुवन्ती एकाद्या राजकुमाराप्रमाणे घोडेस्वारी, खड्गयुद्ध, धनुर्विद्या आणि इतर वीरोचित विद्यांमधे प्रवीण झाली. शिकारीची तिला विशेष आवड होती. आपल्या पित्याबरोबर तीही जंगलात जाऊन हरणं आणि इतर हिंस्र पशूंची शिकार करत असे. तिचं साहस, युद्धकौशल्य अन् वीरता पाहून लोक आश्चर्याने तोंडात बोटं घालत.

राजकुमारी मोठी झाल्यावर राजाराणीला तिच्या विवाहाची चिन्ता सतावू लागली. आता राजाला तिचं पुरुषवेश वापरणं, शिकार करणं आवडेनासं झालं. एकदा शेजारच्या राज्याच्या राजपुत्राशी तिचा ठरलेला विवाह, तिच्या पुरुषी वागण्यामुळे मोडलाही. तेंव्हापासून महाराणी जास्त चिन्ताग्रस्त राहू लागली. तिचं कशातही मन लागेनासं झालं. कोणत्याही कामात तिचं लक्ष लागेना.

एक दिवस सुवंतीने पाहिले, की आपली माता फार अुदास दिसतेय अन् मोठ्या नावडीनेच भोजन करत आहे. तिने आपल्या मातेच्या गळ्यात हात घालून तिचे सांत्वन करत म्हटले, ''माझ्या विवाहाची जराही चिन्ता करू नकोस. पिताजींच्या सिंहासनायोग्य अुत्तराधिकारी निवडून मी स्वतःच त्याला घेअून इथे येईन.''

एकटीनेच जंगलात जाअून शिकार करायची सुवंतीची फार दिवसांपासूनची इच्छा होती. म्हणून एक दिवस सकाळीच पुरुषवेशात तयार होअून, घोड्यावर स्वार होअून ती जंगलाकडे निघाली.

तो कार्तिक महिना होता. त्यामुळे सारं जंगल हिरवंगार होतं अन् झाडंझुडुपं रंगीबेरंगी फुलांनी डवरलेली होती. विरळ विरळ धुकं असल्यामुळे जंगलाचं नैसर्गिक सौन्दर्य स्वर्गासारखं मोहमयी वाटत होतं. शिकारीची गोष्ट विसरून जाअून ती नैसर्गिक सौन्दर्य निहारत जंगलात खूप दूरवर पोचली. जाता जाता ती खूप दमली होती, म्हणून



घोड्याला एका ठिकाणी चरायला सोडून ती स्वतः एका झाडाखाली विश्रान्तीसाठी लवंडली अन् तिला गाढ झोप लागली.

घोड्याच्या खिंकाळण्याने तिची झोप मोडली अन् डोळे अुघडून पहाते, तोच समोरच्या दृश्यामुळे ती घाबरून गेली, सरोवराच्या बाजूने एक वाघ वेगाने तिच्याच दिशेने येत होता! ती आपले धनुष्य-बाण अुचलणार, इतक्यात वाघाने गुरगुरत तिच्यावर झेप घेतली. वाघाच्या पंजाने तिचा दंड रक्तबंबाळ केला. वाघाच्या या अचानक हल्ल्याने भयामुळे तिचे डोळे बन्द झाले. अन् तिची आपल्या प्राणांची आशाही सुटत चालली. पण दुसऱ्याच क्षणी तिला वाघाच्या गुरगुरीऐवजी त्याचे कण्हणे ऐकू आले. धैर्य एकवटून तिने डोळे अुघडून पाहिले, तेंव्हा तिला असे दिसले की, काळजात तीर लागल्यामुळे वाघ दूर गडगडून धडपडत आहे; अन् शेवटचे श्वास मोजत आहे!

तेंव्हाच तिची नजर एका सुन्दर धनुर्धारी युवकावर पडली. तो तिच्याकडेच येत होता. ती त्याच्याशी काही बोलू इच्छित होती, परंतु जखमेतून चालू असलेल्या सतत रक्तस्रावामुळे ती बेशुद्ध झाली.

सुवंती पुन्हा शुद्धीवर आली, तेंव्हा आपण एका पर्णशाळेतील बिछान्यावर पडलेली आहोत असे तिला आढळले. तिच्या डाव्या दंडाला पट्टी बांधलेली असून, तिला खूप वेदनाही होत होत्या. थोड्याच अंतरावर तो धनुर्धारी तरुण कसला झाडपाला वाटून त्याचा लेप तयार करत होता. तिने डोळे अुघडलेले पाहून त्या युवकाने विचारले, ''आता कशी आहेस तू? अजूनही खूप दुखतंय



का?''

''शेवटी वाघाच्या पंजाचाच प्रहार न तो? पंजा गळ्यावर पडला असता, तर तत्क्षणी मरूनच गेले असते ना? तरीही दंडाची जखम बरीच मोठी अन् खोल असल्याने वेदना तर होणारच!'' पट्टीकडे पहात अन् वेदना सहन करत सुवंती बोलली.

''जखम कितीही मोठी असली, तरी मी हा लेप बनवतोय नं, त्यानं जखम महिन्याभरात बरी होईल काय, तिचा वणसुद्धा नाही रहायचा, समजलं?'' असे म्हणत, आपले दोन्ही हात पुढे करत, तो हसू लागला.

सुवंतीने विचारल्यावरून आपला परिचय देत त्याने सांगितले की, आपण कोदंडपाणी नावाचा एक शल्यचिकित्सक आहोत. पित्याच्या मृत्यूनंतर आपला वंशपरंपरागत धंदा आपण



चालवत असतो. बनातले आदिवासी अन् जनजातींची निःशुल्क सेवा करणं हेच आपलं व्रत आहे. वन्यपशूंवर औषधोपचार करणं हेही आपण आपलं कर्तव्य समजतो!

"तुला मी तुझ्या घोड्यावर लादूनच इथे पर्णशाळेत घेऊन आलो. तुझी जखम शिवून पट्टी बांधत असतानाच तू एक स्त्री असल्याचं माझ्या ध्यानात आलं. पुरुषवेषात असण्याचं काही विशेष कारण आहे का?'' स्वतःबद्दल सविस्तर सांगितल्यावर कोदंडपाणीने तिची माहिती जाणायची इच्छा दर्शवली.

आपण राजकन्या असल्याचं या युवकाला कळावं, असं सुवंतीला वाटेना. आपली खरी ओळख छपवून ती म्हणाली, "नोकरीच्या शोधात एकटीच राजधानीकडे निघाले होते ना, म्हणूनच पुरुषवेष वापरावा लागला. तू केलेल्या मदतीबद्दल मी सदैव तुझी कृतज्ञ राहीन. दिवस ढळत आलाय, तेंव्हा मी चलते आता.''

कोदंडपाणी जरूर तेवढा लेप देऊन तिला घोड्यावर बसवत म्हणाला, "जपून जा. मधे कुठे न थांबता गेलीस, तर संध्याकाळपर्यन्त बरोबर पोचशील.''

राजवाड्यात पोचल्यावर सुवंती कोदंडपाणी-बद्दलच विचार करत राहिली. अन् मनातल्या मनात त्याचं साहस व सेवाभाव याबद्दल कौतुक करत राहिली. हिंस्र पशूंबद्दलही त्याला प्रेम व दया आहे असा विचार करत त्याच्या विशाल हृदयापुढे नतमस्तक होत राहिली. तिला असे वाटले की तोच आपल्यासाठी योग्य वर आहे. म्हणूनच जखम बरी झाल्याबरोबर ती त्याच जंगलाकडे चालू लागली.

या वेळी तिने एका गरीब तरुणीचा वेश घेतला होता. तिची इच्छा होती की कोदंडपाणीने एक राजकन्या म्हणून नव्हे, तर एक सर्वसामान्य तरुणी म्हणून आपला स्वीकार करावा. त्याला वैभवाचा मोह वाटू नये. त्यामुळे विवाह होईपर्यन्त ती आपण राजकन्या असल्याचं रहस्य त्याला सांगू इच्छित नव्हती.

यावेळी सरोवराशी पोचतापोचता संध्याकाळ झाली. त्यावेळी तिथे एक शिंगवाला एक राक्षस स्नान करत होता. त्याला पहाताच सुवंतीला भीती वाटली अन् किंचाळत ती परत जाऊ लागली.

तिची किंकाळी ऐकून राक्षस पाण्यातून बाहेर आला अन् एक-दोन टांगा टाकून सुवंतीजवळ पोचला. तिला आपल्या खांद्यावर टाकून तो पर्वतावरल्या किल्ल्यात घेऊन गेला.



"मुली, घाबरू नकोस. मी खाणार नाही तुला! उलट या पुऱ्या जंगलाच्या साक्षीनं लग्न करीन मी तुझ्याशी.'' असे म्हणून त्याने खोलीचा दरवाजा बंद केला अन् स्वतः कुठेसा बाहेर निघून गेला.

सुवंती रात्रभर झोपू शकली नाही. राक्षसाच्या तावडीतून कसं सुटावं याबद्दल ती विचार करत राहिली. शेवटी अन्य काही न सुचून तिने विचार करून ठरवले की याला एकच उपाय म्हणजे - बुद्धिबळ!

दुसऱ्या दिवशी राक्षस एक घडा दूध अन् केळ्याचे कित्येक घड घेऊन आला अन् दारात बसून खाऊ लागला. मधेच ढग गडगडल्यासारखा विकट हसत म्हणाला, "बोल मुली, आपल्या विवाहाचा शुभ-मुहूर्त केंव्हा आहे?''

हे ऐकून जवळ जात अन् मन्द मन्द हसत सुवंती राक्षसाला म्हणाली, "तुम्ही तर अंतर्यामी आहात स्वामी! आपण कसं ओळखलंत की, मी एका योग्य वराच्या शोधात निघालेय अन् तुमच्याशीच लग्न करू इच्छितेय. तुम्ही खरोखरच आवडलात मला; पण....''

"पण काय?'' राक्षसाने पुन्हा तसेच हसत विचारले.

"पण, तुमच्या डोक्यावर मधोमध फक्त एकच शिंग चांगलं नाही दिसत. तुमचं सुन्दर रूप विकृत होतं त्यामुळे! ते काढून टाकलंत तर तुमचं रूप खुलून दिसेल!'' सुवन्ती हसत बोलली.

हे ऐकून राक्षस उदास होऊन म्हणाला, "माझी सारी शक्ती या शिंगातच तर आहे. माझे प्राणच आहेत समज! तुला आवडत नसेल, तर पाहू नकोस त्याकडे!''



"पण स्वामी, वाटलं तर सौन्दर्यासाठी नको, पण कमीत कमी माझ्या सौभाग्यासाठी तरी काढावंच लागेल ते. लहानपणी माझी कुंडली पाहून ज्योतिषी म्हणाला होता की, एक डोळा, एक हात, एक पायवाल्या माणसाशी, एक शिंगवाल्या राक्षसाशी किंवा एकाचा एकुलत्या एक मुलाशी लग्न करशील, तर त्याच दिवशी विधवा होशील. हे शिंग काढायचं नसेल, तर दुसरं शिंगही लावून घ्या. म्हणजे रूपाची विकृती कमी होईल अन् माझ्या कुंडलीतला दोषही दूर होईल.'' सुवंतीने सांगितले.

हे ऐकून राक्षस विचारात पडला. अन् थोड्या वेळाने दुःखी होऊन म्हणाला, "माझ्या पित्याची दोन्ही शिंगं इथे किल्ल्यातच कुठे पडली असतील. पण ती आपल्या डोक्यावर बसवून घेणं शक्य होईल



का?''

सुवंती अशाच संधीची वाट पहात होती कि ज्यात कोदंडपाणीला बोलवायची गरज पडेल. ती झटकन म्हणाली, ''सरोवराजवळच एका झोपडीत कोदंडपाणी नावाचा एक कुशल शल्यचिकित्सक रहातो. त्याला तर हे काम म्हणजे हातचा मळच!''

हे ऐकून प्रसन्न होऊन राक्षस तसंच हो...हो...हो... हसत दरवाजा बन्द करून तिथून बाहेर निघून गेला.

सुवंतीला किल्ल्यात इकडेतिकडे फिरताना एका खोलीत सोन्याच्या मोहोरांचा मोठाच डोंगर दिसला. तो पाहून क्षणभर तिचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना.

संध्याकाळी कोदंडपाणीला घेऊन राक्षस किल्ल्यात परत आला. सुवंतीचा परिचय देत तो कोदंडपाणीला म्हणाला, ''ही माझी भावी बायको आहे.'' कोदंडपाणी सुवंतीला स्त्रीवेशात ओळखू शकला नाही, कारण पूर्वी त्याने तिला पुरुषवेशात पाहिले होते.

''माझ्या भावी पतीच्या डोक्यावर दोन शिंगं जडवण्यासाठी तुम्हाला इथं बोलवलंय'' आपल्याला कदाचित हा ओळखेल अशा आशेने कोदंडपाणीच्या डोळ्यात बघत सुवंती बोलली.

पण तिच्याकडे लक्ष न देता कोदंडपाणीने राक्षसाच्या शिंगाचे परीक्षण केले अन् तो म्हणाला, ''डोक्यावर दोन शिंगं लावण्यापूर्वी हे मधलं शिंग काढून टाकावं लागेल. नंतर दोन्ही शिंगं सारख्या अंतरावर बसवावी लागतील.''

यावर राक्षस घाबरत म्हणाला, ''माझं हे एक शिंग पूर्णतः नैसर्गिक अन् जन्मजात आहे. ते काढल्यावर माझी शक्ती लुप्त होऊ नये.''

''पण मामंजींची जी दोन शिंगं पडलेली आहेत, ती लावल्यावर तर तुमची शक्ती दुप्पट होईल नं!'' सुवंती राक्षसाला प्रोत्साहन देत म्हणाली.

कोदंडपाणीने राक्षसाला आडवं पडायला सांगून त्याला बेहोश करण्यासाठी त्याच्या नाकात औषध घातले. राक्षस घोरू लागल्यावर कोदंडपाणीने त्याचं ते एक शिंग एका हत्याराने झटक्यात काढून कोपऱ्यात फेकले.

''चला कटकट मिटली! याची सारी शक्ती खलास झालीय अन् त्याच्या गुलामीतून माझी सुटका झाली. आता चलूया आपण इथनं.'' सुवंतीने खूश होऊन कोदंडपाणीला म्हटले.

पण कोदंडपाणी दुसरी दोन शिंगं राक्षसाच्या डोक्यावर बसवण्यात इतका मग्न होता की त्याने सुवंतीच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. तेंव्हा सुवंतीने वाघाने केलेल्या जखमेचा व्रण दाखवण्यासाठी त्याच्यासमोर आपला दंड उघडा करून दाखवला. तो ओळखून कोदंडपाणी आश्चर्याने म्हणाला, ''अरे तू? वाघाला नुसतं पाहूनच बेशुद्ध पडणारी तू, आता राक्षसाशी लग्न करायला निघालीस?''

''राक्षसाशी लग्न? अशक्य! यानं जबरदस्तीनं मला कैद केलं होतं. याच्यापासून सुटका मिळवण्यासाठीच मी दोन शिंगं लावायची अट घातली. कामाच्या निमित्तानं तुला बोलवू शकेन अन् या कैदेतून मुक्त होऊ शकेन अशी आशा होती मला! चल, आता किल्ल्यातून बाहेर पडू आपण. मरू दे याला असाच!'' सुवंती कोदंडपाणीला म्हणाली.

तोपर्यंत कोदंडपाणीने राक्षसाला दोन्ही शिंगं लावलीही होती. राक्षस वेदनेमुळे एकदोनदा कण्हला. कोदंडपाणीने बेहोशीचे आणखी थोडे औषध त्याच्या नाकात घातले. तो पुन्हा गाढ झोपला. सकाळी ठीक होऊन तो उठून बसला.

निघण्यापूर्वी कोदंडपाणी त्याला म्हणाला, ''ही मुलगी तुझ्याशी विवाह करू इच्छित नाही. आपल्या शस्त्रक्रियेसाठी जे सोनं द्यायचं तू कबूल केलं होतंस, ते आपल्याजवळच ठेव अन् त्याबदल्यात या मुलीला सोडून दे.

काही विचार करून राक्षस बोलला, ''आमच्या वंशात एकशिंगी राक्षस मी एकटाच आहे, म्हणून सर्वजण माझी चेष्टा करत असत. या एक शिंगामुळेच राक्षसराजाच्या मुलीनं मला लग्नाला



नकार दिला. पण आता दोन शिंगांमुळे ती झटकन् तयार होईल ब्रं!''

असा विचार व्यक्त करून त्याने एकदम आनंदाने उडी मारली अन् तो किल्ल्याबाहेर निघून गेला.

सोन्याच्या मोहोरा एका पोत्यात भरून त्या कोदंडपाणीला देत सुवंती म्हणाली, ''तू दोन वेळा माझे प्राण वाचवले आहेस. म्हणून या नाण्यांवर तुझाच अधिकार आहे.''

इतके बोलून सुवंती राजधानीकडे निघून गेली.

ही गोष्ट सांगून वेताळने विक्रमराजाला विचारले, ''राजा, राजकुमारी सुवंतीची वागणूक अविवेकी अन् मूर्खपणाची नव्हे काय? तिचं कोदंडपाणीवर प्रेम होतं. त्याला मिळवण्यासाठीच ती दुसऱ्यांदा जंगलात गेली होती. पण तो



**अुन्ह दगांवर जशी क्रिया करते - त्यांना इकडे तिकडे अुधळून देते - त्या प्रमाणेच संकटसमयी हसत राहिल्याने क्रिया घडते**

**- श्री माताजी**

मिळाल्यानंतरही त्याच्यापासून आपलं खरं रुप लपवूनच ठेवून तिनं आपलं मन त्याच्यापुढे अुघडं केलं नाही. कोदंडपाणी सुन्दर अन् साहसी युवक होता, अन् त्याबरोबरच एक कुशल चिकित्सकही होता. त्याने दोनदा सुवंतीचा जीव वाचवला होता. सुवंती त्याच्यावर प्रेम करत होती. मग तिनं त्याच्याशी लग्न का नाही केलं? सुवंतीचा हा मूर्खपणाच नव्हे तर काय? अुत्तर माहीत असूनही दिलं नाहीस तर, राजा! तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होअून पडतील.''

राजा विक्रम आपले मौनभंग करून म्हणाला, ''राजकन्या आपल्या पित्याच्या सिंहासनायोग्य पुरुषाशी विवाह करू इच्छित होती. पहिल्या मुलाखतीत तिला असे भासले की कोदंडपाणीत योग्य राजाचे गुण आहेत. पण राक्षसाच्या किल्ल्यातल्या त्याच्या वागणुकीमुळे तिच्या लक्षात आले की तो आपल्या अुद्योगाच्या वर्तुळात कैद आहे. ते तोडून बाहेर येणं त्याला शक्य नाही. वन्यजीवन अन् आपला अुद्योग यांबाबत तो प्रामाणिक आहे नक्कीच. पण एका योग्य शासकाचं विशाल हृदय त्याच्याजवळ नाहीय. म्हणूनच, आपण शोधत असलेला माणूस हा नव्हे, असे जेंव्हा सुवंतीच्या लक्षात आले, तेंव्हा त्याच्याबद्दल कृतज्ञता प्रकट करून, आपला खरा परिचय न देताच ती राजधानीकडे परत गेली. यात सुवंतीचा मूर्खपणा नव्हे, तर तिची खोल दृष्टी, विवेकशीलता व दूरदृष्टी दिसून येते.''

अशा प्रकारे राजाचे मौन भंग झाल्याबरोबर वेताळ प्रेतासह पुन्हा एकदा गायब होअून त्या झाडावर लटकू लागला.







# बहादुर माणूस

नारायण अन् संपूर्णा यांचा दहा वर्षांपूर्वी विवाह झाला, तेंव्हा गाववाल्यांनी मुक्त कंठाने या नवदाम्पत्याची प्रशंसा केली होती अन् त्यांच्या सुखी जीवनाची कामना प्रकट करून अशी आशा व्यक्त केली होती की, या कुटुंबाचे गावासमोर एक 'आदर्श कुटुंब' म्हणून अुदाहरण व्हावे.

पण तसे घटले नाही. हळू हळू नारायण वाईट सवयींकडे ओढला गेला. त्याची तब्येत ढासळू लागली. आर्थिक परिस्थिती बिघडू लागली. बारीक-सारीक गोष्टींवरून तो चिडू लागला अन् कधी-कधी संपूर्णावर हातही अुचलू लागला.

शेजाऱ्यांनी त्याला खूप समजावले की, ''वाईट सवयी सोडून दे. बायकोला मारपीट करणं असभ्यपणाचं आहे. मुलांवरही याचा वाईट परिणाम होईल अन् पूर्ण कुटुंबाचं अनिष्ट होईल.''

परन्तु नारायणवर याचा काहीच परिणाम झाला नाही. अुल्ट नशेत तो म्हणाला, ''आपल्या बायकोला मारीन नाहीतर पिटीन. यात तुमचं काय देणं-घेणं? पाप-पुण्य, स्वर्ग-नरक असलं काहीही नसतं. ती नावं घेअून अुगीच मला भीती घालू नका.'' अशा प्रकारे तो जास्तच शिव्या देई.

एक दिवस संपूर्णा तलावावर कपडे धुवायला गेली होती. तिथे तिची रुक्मिणीशी भेट झाली. रुक्मिणी एक प्रौढ व अनुभवी बाई होती; पारिवारिक जीवनाचे कडु-गोड प्रसंग तिने अनुभवले होते, अन् बायकांच्या अडचणी ती जाणून होती.

गावच्या दुःखी बायका नेहमी तिला आपल्या मनची दुःखं सांगून त्यातून सुटकेसाठी सल्ला मागत असत. संपूर्णानेही आपल्या नवऱ्याबद्दल सांगून तो किती व कसा सतावतो हे सर्व सांगितले. रुक्मिणी तिला म्हणाली, ''तुझ्या नवऱ्याच्या स्वभावाबद्दल अन् वर्तणुकीबद्दल इतरांकडूनही मी ऐकलं आहे. नवऱ्याच्या मारपिटीतून सुटून अुजाडला जाणारा संसार वाचवायचा असेल, तर धैर्यानं घ्यायला हवं. कदाचित हे तुझ्या स्वभावाविरुद्ध असेल, पण याशिवाय दुसरा अुपायही नाही. नाहीतर तथाकथित पतिव्रता बायकांसारखे सारे अत्याचार मुकाट्याने सहन करत रहा, तोंडही अुघडू नकोस अन् साऱ्या आयुष्यभर आपल्या भाग्याबद्दल रडत रहा.''

इतके बोलून तिने संपूर्णाच्या कानात काहीतरी सांगितले. रुक्मिणीचे सांगणे ऐकून तिचा चेहरा गोरामोरा झाला. ती म्हणाली, ''ताई, तुझं बोलणं

**सोनिया बारदके**

तर बरोबर वाटतंय. पण मी असं करू शकेन का? मला कधी-कधी असं वाटतं की या साऱ्या हालांपेक्षा आपल्या माहेरी निघून जावं.''

यावर डोके हलवत रुक्मिणी एकदम म्हणाली, ''नाही नाही! कधीच तसं करू नको! नवऱ्याच्या गैरव्यवहारापासून वाचण्यासाठी माहेरी जाणं कुणाही विवाहितेला योग्य नव्हे. हा काही अडचणीवर योग्य तोडगा नव्हे! याशिवाय, मला तुझ्या माहेराबद्दल चांगली माहिती आहे. ज्या आई-वडिलांनी तुझं पालनपोषण केलं, ते तर आता या जगात नाहीत. भाअू अन् भावज्य यांच्याही काही स्वतःच्या अडचणी असतीलच नं?''

रुक्मिणी आपल्यापेक्षाही आपल्या माहेराबद्दल अधिक जाणतेय असेच संपूर्णाला वाटले. बराच विचार केल्यानंतर रुक्मिणीने दिलेल्या सल्ल्याप्रमाणे वागायचे तिने ठरवले.

त्याही दिवशी नारायण रात्री खूप अुशीरा परतला. आणि दारूच्या नशेत ओरडत घरात घुसला- ''कुठे मेलीस ग पूर्णा? नवरा केंव्हाचा हाका मारतोय, पण तुला कसली काळजीच नाही! आरामात खाअून-पिअून झोपून गेलीस! मी मात्र इथे अुपाशी ओरडत राहिलोय!''

बराच वेळ पूर्णा पुढे आली नाही तेंव्हा रागाने बडबडत कोपऱ्यातला सोटा घेअून तो तिच्या खोलीकडे निघाला.

तेंव्हा चण्डीचं रूप धारण करून आपल्या खोलीबाहेर येत संपूर्णा बोलली, ''आज पुन्हा दारू पिअून आला आहात. मी फार दिवस तुमचं हे वागणं पहात आलेय. तुम्ही वाईट संगत अन् सवयींच्या दलदलीत रुतत चालला आहात. आता तर आपल्या निर्दोष मुलालाही सताव् लागला आहात, त्याचं भविष्य काळं करू पहाताय. हे आता फार दिवस मी सहन करणार नाही. तुमच्या या सवयी सोडवूनच दाखवीन आता.'' असे म्हणून तिने नारायणच्या हातातला सोटा हिसकला अन् त्याला मारू लागली.

बायकोच्या या अकल्पित रुपाला घाबरून नारायण पलंगाखाली दडून बसला. तरीही संपूर्णा त्याला मारतच राहिली. अन् म्हणाली, ''शपथ घ्या, की आजपासून वाईट मित्रांबरोबर रहाणार नाही आणि दारूही पिणार नाही. कारण ही दारूच तुमच्या या दुराचरणाचं कारण आहे.''

पलंगाखाली लपूनच नारायण म्हणाला, ''खरंच शपथ घेतो की मी यापुढे दारू पिणार नाही. तुलाही मारझोड करणार नाही अन् मुलालाही नाही करणार. पण पलंगाबाहेर यायचं की नाही ही माझी मर्जी. शेवटी बहादुर माणूस आहे नं मी!''.

नारायणच्या या बोलण्यावर संपूर्णा खळखळून हसली अन् सोटा फेकून देत म्हणाली, ''चला, आता तरी या ना बाहेर! खरोखरच मोठे बहादुर माणूस आहात तुम्ही. कारण दारूसारख्या राक्षसापासून वाचणं हे बहादुर माणसाचंच तर काम आहे.





# सुवर्ण सिंहासन

(४)

(आता पर्यंत-कौंडिन्य राजा श्रीदत्तने आपला पुत्र विजयदत्त याला, त्याचे शिक्षण पूर्ण होण्यापूर्वीच परत बोलावले. मरालभूपती इतर राजांना आपल्या बाजूला मिळवून कौंडिन्यवर हल्ला करायचे कारस्थान कसे रचत आहे याबद्दलची माहिती त्याने विजयदत्तला दिली अन् सांगितले की आपला नातेवाईक माधवसेनही त्यांना सामिल झालेला आहे. तेंव्हाच अचानक माधवसेनची कन्या श्रीलेखा पुरुषवेषात गुप्तपणे कौंडिन्याला येअून श्री दत्त व विजयदत्त यांना भेटली. श्रीदत्तने तात्काळ तिचा गांधर्वपद्धतीने विजयदत्तशी विवाह करून दिला. राजगुरूच्या आज्ञेवरून पूर्वेकडील मैदानात खोदकाम सुरू केले. खड्ड्यात अूष्ण श्वास सोडत असलेला एक विशाल साप दिसला. विजयदत्तला सावध रहायला सांगून म्हटले की आपण प्रथम त्या सापाला शांत करायचा प्रयत्न करूया. पण ते शक्य झाले नाही, तर सापाला तुलाच तोंड द्यायला हवे.)

शिवानन्दचे बोलणे ऐकताच विजयदत्तचा हात आपोआपच म्यानात ठेवलेल्या तलवारीवर पडला.

यानन्तर शिवानन्द हळूहळू खड्ड्यात अुतरले व हातात पाणी घेअून अुच्च स्वरात मन्त्र म्हणू लागले. नंतर त्यांनी सापावर पाणी शिंपडले. श्रीदत्त विजयदत्त श्वास रोखून हे भयानक दृश्य पहात राहिले होते.

शिवानन्दला आशा होती की, मन्त्राच्या प्रभावाने सर्पराज अदृश्य होईल; पण तसे घडले नाही. हां, इतके मात्र झाले की सापाने गरम हवा सोडत फुटत्कारणे मात्र बन्द केले. शिवानन्दाने पुन्हा मन्त्र जपायला सुरुवात करताच साप म्हणाला, ''हे मंत्रवेत्ता, मांझ्यावर मन्त्रांचा काहीही परिणाम होणार नाही. एका महान मान्त्रिकानेच मला एका खास अुद्देशाने अुत्पन्न केले आहे. जो माझ्या माझ्या प्रश्नाचे योग्य अुत्तर देईल, त्यालाच फक्त मी वश होईन.''

सापाचे बोलणे ऐकून श्रीदत्त व विजयदत्तने चकित होअून एकमेकांकडे पाहिले. खड्ड्याबाहेर



येऊन शिवानन्द विजयदत्तला अुद्देशून म्हणाले, ''पुत्रा! आता सर्पराजाला तूच तोंड द्यायचे आहे. निर्भय होअून पुढे हो अन् सापाच्या प्रश्नाचे अुत्तर दे.''

गुरु व पित्याचा आशिर्वाद घेअून शांत व एकाग्र चित्ताने विजयदत्तने खड्ड्यात प्रवेश केला अन् सर्पराजाला प्रणाम करून तो म्हणाला, ''हे सर्पराज, मी तुमच्या प्रश्नाला अुत्तर द्यायला तयार आहे. विचारा आपला प्रश्न.''

विजयदत्तला चेतावणी देत सर्प म्हणाला, ''हे वीर युवका! माझं बोलणं अगोदर नीट ऐक. माझ्या प्रश्नाचं अुत्तर बरोबर जो देईल, त्याच्या गळयात एक दिव्य हार बनून मी कायम राहीन. पण अुत्तर बरोबर नसेल, तर मात्र त्याला मी कडकडून डसेन अन् यमलोकी धाडीन. धर्मरीतिनुसार मी प्रश्न विचारण्यापूर्वीच तुला इशारा देत आहे. तरीही आता माझ्या प्रश्नाचं अुत्तर द्यायची तुझी इच्छा असेल, तर मी प्रश्न विचारीन. नाहीतर तू इथून जाअू शकतोस.''

सापाच्या बोलण्याने श्रीदत्त घाबरला अन् विजयदत्तला परत फिरायला सांगण्यासाठी खड्ड्याकडे जाअू लागला. पण त्याला रोखत शिवानन्द म्हणाले. ''आपण भिअू नका महाराज! युवराजाच्या योग्यतेवर विश्वास ठेवा.''

विजयदत्तही क्षणभर विचलित झाला, पण तात्कालीच पूर्ण आत्मबलाने तो म्हणाला, ''आपलं धर्मसूत्र-अट-मला मान्य आहे. आपण विचारा प्रश्न.''

''मग सांग बरं, एका राजाने पाळावेत असे तीन योग्य धर्म कोणते?'' सापाने विचारले.

क्षणभर विचार करून विजयदत्त अुत्तरला, ''एका राजाने तीन्ही काळात त्रिकरण शुद्धीसह तीन धर्मांचं पालन करायला हवं. ते म्हणजे- सत्य, धर्म अन् न्याय.''

''अगदी बरोबर राजकुमार!'' प्रसन्न होअून सर्प म्हणाला-''तू माझ्यावर विजय मिळवलास, आत्ता, या क्षणीच पुष्पहार बनून मी तुझ्या गळयाची शोभा वाढवीन. अन् जोपर्यन्त मी तुझ्या गळयात असेन, तोपर्यन्त अत्यन्त, प्रभावशाली विष सुद्धा तुझ्या-साठी अमृत बनेल.''

''आणखीही ऐक, इथे तीन फूट आणखी खोल खोदलंस, तर तुला एक विलक्षण दिव्य बक्षिस मिळेल. विजयी भव!'' असा आशिर्वाद देअून साप अचानक सरळ अुभा झाला अन् पांढरे मोती विखरत एका पुष्पहारात परिवर्तित झाला, हार स्वतःच विजयदत्तच्या गळयात जाअून पडला.





खोदण्याचे काम पुन्हा सुरू झाले. अन् संध्याकाळपर्यन्त तीन फूट खोलीवर पोचताच मजुरांना धातूचा 'खण्ण' आवाज ऐकू आला. मजूर मोठ्या सावधपणे व हुशारीने त्याच्या आसपासची माती अुकरू लागले. विजयदत्तने खोलात अुतरून भूगर्भातून निघणाऱ्या धातूची परीक्षा केली. पण इतक्यात अंधार पसरू लागला अन् गुरु शिवानन्दांच्या आज्ञेवरून मशालीच्या प्रकाशात रात्रभर काम चालू राहिले.

सकाळच्या बालसूर्याच्या सोनेरी किरणांत त्या सर्वांनी सुखद आश्चर्याने पाहिले की, ती वस्तु म्हणजे एक चक्रवर्ती सम्राटाची प्रतीष्ठा, शक्ती व वैभवाचे प्रतीक असे एक विशाल सुवर्ण-सिंहासन होते!''.

त्या अपूर्व अन् अद्भुत सिंहासनाच्या शीर्षभागी हैहय वंशाची कुलदेवी गायत्री हिची प्रतिमा अंकित होती. देवीच्या चरणांखाली एक अुठावदार विशाल पद्म होते. त्याच्या केन्द्रभागी एक माणिक जडवले होते. देवीच्या मुकुटामधोमध जडवलेल्या हिऱ्यातून पांढरे स्वच्छ किरण परावर्तित होत होते. सिंहासनाच्या दोन्ही बाजूंना दोन सिंहाकृति होत्या. त्यांची तोंडे बन्द होती,परन्तु रजोगुणाची सारी शक्ति जिवन्तरूपात दाखवणाऱ्या अग्निपिंडांसदृश त्यांचे डोळे पाहून मात्र दर्शकांची हृदये धगधगत होती.

त्या अद्वितीय सिंहासनावर चढून बसण्यासाठी त्यात तीन ठिकाणी पायऱ्या बनलेल्या होत्या. प्रत्येक ठिकाणच्या पायऱ्यांच्या दोन्ही बाजूंस सोन्याच्या दोन स्त्री-प्रतिमा स्वागत-मुद्रेत झुकलेल्या होत्या. या प्रतिमांची कमनीयता अन् शिल्पांची सूक्ष्मता दोन्हीही



विशेष रुपाने पहाण्या योग्य होती.

सिंहासनाच्या सौन्दर्याची मनोमन प्रशंसा करत महाराज श्रीदत्तने कुलदेवीच्या प्रतिमेला हात जोडून नमस्कार केला व म्हटले, ''माते, आम्ही सर्व तुझीच अपत्त्यं आहोत. आपल्या कुलाचा दीपक अन् भावी सम्राट विजयदत्त याचा राज्याभिषेक याच सिंहासनावर व्हावा अन् आपली कृपा कवच बनून नेहमीच याच्या बरोबर राहील असा आशिर्वाद द्या.''

विजयदत्त आणि श्रीलेखा यांनीही कुलदेवीला नतमस्तक होअून प्रणाम केला. नंतर महाराज श्रीदत्त अधिकाऱ्यांना ते सिंहासन काळजीपूर्वक राजवाड्यात पोचवायची आज्ञा देअून सर्वांसह स्वतःही तेथून निघून गेले.

राजभवनात शिनिमुख नावाचा एक गुप्तहेर महाराजांची वाट पहात होता. शत्रूच्या



हालचालींबद्दल अद्यावत माहिती देत त्याने सांगितले की, मरालभूपती थोडीशी सेना घेऊन कालिन्दी राज्यातल्या अतिथी-भवनात तिथल्या राजकुमारीशी आपल्या कुमाराशी विवाह करण्यासाठी थांबला आहे. त्या दोघांना अचानक समजले की, राजकुमारी श्रीलेखा पुरुषवेशात तिथून पळून गेली आहे. त्यांची खात्री आहे, की ती आपल्याच राज्यात आलेली आहे. कालिन्दी राजालाही हीच शंका आहे.

मरालभूपतीने कालिन्दी नरेशकडे निरोप पाठवलाय की, जे झालं ते झालं, पण युद्धाच्या योजनेत मात्र कसलाही बदल होणार नाही अन् पूर्वनियोजित रणनीतीनुसार कौंडिन्यवर आक्रमण केलं जाईल. कालिन्दीनरेशनेही यासाठी आपली संमती दिली आहे.

चम्पक व कुन्द देशांचे सैन्य आतापर्यन्त आक्रमणासाठी आपल्या देशाकडे चालू लागले असेल. कालिन्दीचे सैन्य मरालच्या थोड्याशा सैन्याबरोबर ज्येष्ठ शुक्ल पंचमीच्या रात्री निघेल, आणि कालिन्दी नदीच्या किनारी तळ ठोकेल. अन् त्याच रात्री आपल्या देशावर हल्ला करील.

गुप्तहेराचे बोलणे ऐकून श्रीदत्त आपल्या पुत्राकडे पहात म्हणाला, "विजय, असं वाटतंय की, तुझे सासरे अजूनही शत्रुपक्षाला मिळालेले आहेत अन् कबुतराकडून पाठवलेला संदेश केवळ आपली दिशाभूल करण्यासाठीच पाठवला गेला होता.

हे ऐकून विजयदत्त विचारात पडला. नंतर म्हणाला, "असंही होऊ शकतं ना, कि शत्रूंच्या घेऱ्यात असल्यामुळे ते सध्या त्यांना साथ देण्याचं नाटक करत असतील?"

मुलाच्या बुद्धीची मनोमन प्रशंसा करत श्रीदत्त म्हणाला, "होय, तशीही शक्यता आहे. युद्धनीतिनुसार संकट समयी शत्रुशी मित्रवत् वागणं हीही एक राजनीतीची चाल आहे. तो जर शत्रुच्या बाजूने असता, तर कबुतराकडून आणखी एक संदेश त्याने पाठवला असता. काहीही असो, आपल्याला आपलं सैन्य युद्धासाठी तयार ठेवायलाच हवं अन् जय-पराजय परमेश्वरावर सोपवून आपल्याला युद्धाच्या ज्वाळेत उडी मारावी लागेल."

थोडे थांबून काहीशा चिन्तित मुद्रेने तो पुन्हा गुरु शिवानन्दना म्हणाला, "गुरुवर! गुप्तहेराच्या बोलण्यातून आपण परिस्थितीची गंभीरता जाणलीच असेल. आपण शत्रूंनी वेढले गेलो आहोत. आता कोणत्याही क्षणी आक्रमण होऊ शकेल. शत्रूच्या सैन्यबळासमोर आपली शक्ती नगण्य आहे. थोड्या वेळापूर्वी सुवर्ण-सिंहासन



पाहून मला वाटलं होतं, की माझ्या पुत्रासारखा अशा दिव्य सिंहासनावर बसणारा दुसरा कोणी भाग्यशाली असूच शकणार नाही. पण आता मात्र परिस्थिती अनुकूल दिसत नाहीय."

तेंव्हाच शिनिमुख पुन्हा म्हणाला, "क्षमा असावी महाराज! आत्ताच दुसऱ्या एका गुप्तहेराकडून कळलंय की, माधवसेनने जेंव्हा चक्रभूपतीला राजकुमारी श्रीलेखाशी विवाह पक्का करण्यासाठी बोलावलं होतं, तेंव्हा त्यांनी ही गोष्ट आपल्या महाराणीपासून लपवली होती. महाराणींना चक्रभूपतीबरोबर श्रीलेखाचा विवाह मुळीच पसन्त नव्हता. पण त्यांनाही राजकुमारी महाराणीच्या मदतीने पळून जाण्यात सफल झाल्याचे नंतर कळले.

महाराणी अन् महाराज माधवसेन यांच्यात श्रीलेखावरून मतभेद झाल्यामुळे माधवसेन काहीसे अडचणीत पडले होते. आता आपण कोणचं तोंड घेऊन चक्रभूपतीसमोर जावे हेच त्यांना कळेना! ज्या राजाने आपला इतका मानमरातब केला, त्याच्याचसमोर कालिन्दीचं नाक कापलं गेलं! माधवसेनसाठी आता केवळ राज्याचीच प्रतिष्ठा पणाला लागलेली नव्हती, तर खुद्द सारं राज्यच धोक्यात आलेलं होतं."

माधवसेन जेंव्हा स्वतः काही निर्णय करू शकेना, तेंव्हा महाराणीच्या सल्ल्याने आपली रणनीतीच बदलली. पण ही गोष्ट त्याने मरालभूपती अन् चक्रभूपती यांच्यापासून लपवून ठेवली त्यांचे सैन्य मरालभूपतीबरोबर अवश्य जाईल, संधी मिळताच आपला पवित्रा बदलून ते कौंडिन्यला मिळेल. हा कालिन्दीच्या महालातला गुप्त संवाद आहे. तरीही महाराज, आपण सावधच रहावं!".



हे बोलणे ऐकून श्रीदत्त हसत विजयदत्तला म्हणाला, "तुझा आतला आवाज बरोबर निघाला रे! परमेश्वर अन् कुलदेवी खरोखरच आपल्यावर कृपादृष्टी ठेवून आहेत. या घोर संकटाच्या अंधारात आशेचा किरण स्पष्ट दिसतो आहे !

महाराजांची आशंका दूर करत राजगुरु शिवानन्द यांनीही त्यांना म्हटले, "मी स्वतः ही आपल्याला हे सांगू इच्छित होतो की ज्योतिषगणने प्रमाणे युवराजांवरील संकटाचा काळ आता निघून गेला आहे. कालपर्यंत त्यांचे प्राण संकटात होते. पण आता त्यांचे ग्रह इतके प्रबल आहेत की, शत्रू त्यांचे प्राण घेणं तर दूरच, पण शत्रूलाच आपल्या जिवासाठी पळापळ करावी लागेल. त्यामुळेच आता त्याचा राज्याभिषेक लवकरात लवकर व्हायला हवा. आणि महाराज म्हणून सेनेचं नेतृत्व त्यानंच



संभाळायला हवं. विजयश्री निश्चितच त्याच्या गळ्यात माळ घालील.''

शिवानन्दांचे बोलणे ऐकून दोघेही काही वेळ गप्प राहिले.

विजयदत्त गप्प राहिलेला पाहून महाराजांना वाटले की, विजयदत्त शिवानन्दांशी सहमत आहे. त्याने पुन्हा हात जोडून नमस्कार करत गुरुदेवांना म्हटले, ''ही सारी देवी गायत्रीची कृपा आहे. गेले काही दिवस इथे घडणाऱ्या घटना म्हणजे देवीचीच कृपा होय. मानव-प्रयासाने घडल्या नाहीत त्या. आपल्या बोलण्यावरून माझ्या असं लक्षात येतंय की माझ्या पुत्रावर कुलदेवीची असीम कृपा आहे. आपल्याला वाटत असेल, तसेच करा गुरुदेव!''.

महाराजांच्या बोलण्यावर हर्ष प्रकट करत शिवानन्द म्हणाले, ''फार उत्तम महाराज! अशा भाग्यशाली पुत्राचे पिता म्हणून धन्य आहात आपण. मी युवराजांच्या सिंहासनारूढ होण्याचा मुहूर्तही काढला आहे. आजपासून बरोबर चार दिवसांनंतर ज्येष्ठ शुक्ल पंचमी शुक्रवारी पहाटे सूर्योदयानंतर दोन पळांनी त्या अनुपम वेळी याच्या राज्याभिषेकाची व्यवस्था करावी.''

''शत्रुदलही त्याच मुहूर्तावर आक्रमणासाठी कूच करेल अन् इथे त्याच वेळी राज्याभिषेक साजरा होईल'', विजयदत्तच्या तोंडून सहजगत्या शब्द बाहेर पडले.

महाराजांनी त्या मुहूर्तासाठी आपली संमती दिली. सर्वांचे असेच मत होते की राज्याभिषेकाचा उत्सव सरळ, संक्षिप्त आणि अवडंबराशिवाय साजरा व्हावा.

राज्याभिषेक व युद्ध या दोन्हींची बरोबरच तयारी सुरू झाली. सुवर्णकार सिंहासन चमकवाच्या मागे लागले. अन् सैनिक आपापल्या तलवारींना धार करू लागले, अन् युद्धाच्या धड्यांची उजळणी करू लागले.

चार दिवस जणू चार क्षणात निघून गेले असे भासले.

सभा-भवन फुलांच्या माळांनी सजवण्यात आले. विविध प्रकारच्या रत्नांनी व मोत्यांनी सिंहासन अधिकच कांतिमान बनवण्यात आले. सिंहासनासमोर जरा खालच्या भागात राजकर्मचाऱ्यांसाठी आसनांची व्यवस्था करण्यात आली. त्या मागे उभे राहून आम प्रजा राज्याभिषेक समारंभ पाहू शकणार होती.

सिंहासनामागे वेदज्ञ पंडित उच्च स्वरात वेदमंत्र म्हणू लागले. सर्वजण राज्याभिषेकासाठी ठरलेल्या शुभ मुहूर्ताची वाट पाहू लागले. इतक्यात शिवानन्दांचा संकेत मिळून विजयदत्त व श्रीलेखाने गुरु व पिताजींच्या चरणांना स्पर्श करून नमस्कार केला अन् सिंहासनाच्या पहिल्या पायरीवर पाय ठेवला, इतक्यात वर्षा ऋतूतील मेघगर्जनेप्रमाणे गंभीर पण मधुर आवाजात कोणीतरी घोषित केले, ''विजयदत्त, थांब जरा!''

या गंभीर आवाजाने सर्वजण दचकले.

श्वास रोखून लोक पुढल्या घटनेची प्रतीक्षा करू लागले. महाराज श्रीदत्तचे मन आशंकित होऊन उठले. त्यांनी मनातल्या मनात कुलदेवीचे ध्यान केले. अन् अज्ञानवश आपल्या हातून अपराध घडला असेल, तर त्याबद्दल क्षमा मागितली. तेथील साऱ्या घटना एकाद्या अदृश्य जीवशक्तीद्वारा घडत असून ते स्वतः मात्र एकाद्या कठपुतळीप्रमाणे त्या शक्तीच्या इशाऱ्यावर नाचत आहेत-हे जाणणारी एकुलती एक व्यक्ती म्हणजे ते स्वतःच होते. पण त्या शक्तीशी संपर्क साधून तिचा संकल्प ओळखायला मात्र ते असमर्थ होते.

परन्तु त्यांचे गुरु शिवानन्द एक उच्च कोटीचे मंत्रवेत्ता असल्यामुळे गुह्य जगताच्या शक्तींशी त्यांचा परिचय होता, इतकेच नव्हे, तर तिच्या कार्यप्रणालीत दखल देण्याची शक्तीही त्यांच्यात होती. महाराजाचा त्यांच्यावर पूर्ण भरंवसा होता.

जिचं संरक्षण गुह्य शक्ती करत आहेत अशी सुवर्णसिंहासनासारखी वस्तु गुरु शिवानन्दांमुळेच प्राप्त झाली होती. सर्व कार्य त्यांच्याच निदर्शनाखाली चालू होते. मग काय कारण असावं, कि ही बाधा...हा विचार मनात येऊन त्यांचं शंकाकुल मन घाबरलं. त्यांनी प्रश्नात्मक दृष्टी शिवानन्दावर टाकली; जणू काही-आमचा काही अपराध घडला आहे का?-असंच त्यांना विचारायचं असावं.

विजयदत्त व श्रीलेखा यांची पावलं यन्त्रवत मागे सरली. जणू काही त्या दोघांनी राजगुरूंकडे पहात नजरेनेच विचारले-''आता आम्ही काय करावं गुरुदेव?''

क्रमशः



*एका महान् संस्कृतीचा शोध:*
*युगायुगांचा गौरवशाली इतिहास*

## ३. गंगावतरण

"हे खरं आहे?" संदीप व चमेलीची आई जयश्री हिने आश्चर्याने विचारले. तिच्या आश्चर्यात काहीसा अुल्हासही होता.

"हे खरं आहे आई, पण प्रामाणिकपणे सांगायचं,तर या निबंधस्पर्धेत मी नव्हे, तर आजोबा पहिले आले आहेत". संदीपने सांगितले. "तीन विषय दिलेले होते:

भारतीय इतिहासातील तुम्हाला सर्वात अधिक आवडणारी व्यक्ती, भारतीय पुराणशास्त्रातील तुम्हाला सर्वात अधिक असडणारी व्यक्ती अन् सर्वांना माहीत आवडणारी तुम्हाला परिचित असणारी व्यक्ती. मी दुसरा विषय निवडला आणि नचिकेताबद्दल लिहिले. परीक्षकांना कहाणीची व्याख्या सर्वात अधिक आवडली. ऋषीने जेंव्हा नचिकेताला म्हटले की, "जा यमाकडे"; तेंव्हा त्यांनी शाप नव्हता दिला. अुलट आपल्या प्रतिभावन्त पुत्राला मृत्यूच्या रहस्यावर ध्यान केन्द्रित करायला अुकसवलं. नचिकेताचं तीन दिवस अन् तीन रात्री यमाच्या दारी वाट पहाण्याचा अर्थ असा-की नचिकेताने तेवढा काळ आपल्याच ध्यानात मृत्यूच्या रहस्याबद्दल विचार केला. नी या कहाणीची व्याख्या अशा प्रकारे केली."

"असं, तर अशी बात आहे संदीप! नचिकेताच्या गोष्टीचा. असा अर्थ आहे, हे मला नव्हतं माहीत!" जयश्री म्हणाली.

"सखोल ज्ञान असं गोष्टीरूपात प्रस्तुत केलं नाही; तर लोक ते विसरूनही जातात. त्याबरोबरच, अशा गोष्टी जर शेकडो, नव्हे हजारो वर्षंपर्यन्त ऐकल्या गेल्या, तर त्या अशासाठी की, त्यात सखोल ज्ञान लपलेलं आहे." आपल्या खोलीतून बाहेर येत आजोबा देवनाथांनी आपलं मत प्रदर्शित केलं.

"आजोबा! तुम्ही फिरायला चाललात का? मी पण सोबत येतो तुमच्या." सन्दीप अुत्साहाने म्हणाला.



"मी पण!" आनन्दाने अुड्या मारत ड्रॉईंगरूम बाहेर येत चमेली ओरडली.

तिघेही नदीकिनारी चालू लागले.

"आपण त्या नदीच्या किनाऱ्यावर रहातो, ती गंगेची एक शाखा आहे. गंगेला इतकं पवित्र का मानतात?" प्रो.देवनाथने विचारले.

चमेली पटकन् म्हणाली, "मला माहीत आहे! कारण गंगा ऋषिकेश, हरिद्वार, काशी अन् कित्येक पवित्र स्थानांवरून वहाते."

"हात् तेरे की! चमेली, याच्या बरोबर विरुद्धही होअू शकतं ना! ही शहरं अशासाठी पवित्र आहेत, की ती पवित्र गंगेच्या किनारी वसली आहेत!" संदीप अुत्तरला.

"जास्त स्मार्ट बनायचा प्रयत्न नको करूस!" चमेली त्याला रागावली.

"मला मुद्दाम प्रयत्न करायची गरज नाही. मी आहेच स्मार्ट! म्हणजे असं, की मी तुझ्यापेक्षा जास्त स्मार्ट आहे." संदीपने तिला चिडवले.

"हे सगळं सोडा रे मुलानो! खरोखर तुम्ही दोघंही स्मार्ट आहात, माझ्यापेक्षा जास्तच!" प्रोफेसर म्हणाले, "आपल्या किनारी वसलेल्या पवित्र स्थानांमुळे गंगा पवित्र नाहीय. अन् पवित्र नदीकिनारी वसल्यामुळेही ही स्थानं पवित्र नाहीत. दोन्ही पवित्र असण्याची निरनिराळी कारणं आहेत. आधी गंगा पवित्र असायचं कारण सांगा."

"तुम्हीच सांगा न प्लीज!" चमेली म्हणाली.

"चमेली, मी म्हटलं नाही, की मी या विषयात जाणू इच्छितो? आता याचं अुत्तर तुम्हा सर्वांनाच द्यायला हवं." आजोबांनी आठवण करून दिली.

"पण आम्हाला नाही माहीत!" संदीप बोलला.

"शोधायचा प्रयत्न कर. जितकं जाणशील, तितकं अुचा सांग आम्हाला" आजोबा म्हणाले.

तरीही आजोबांनी मुलांना अगदीच निराश केलं नाही. कारण काही रोचक व ज्ञानवर्धक गोष्टी ऐकवण्यासाठीच त्यांनी मुलांना बरोबर आणले होते.



**विश्वावसु**

त्यांनी जगातल्या सर्वात लांब नद्यांबद्दल सांगितले- नील (नाईल) आणि ॲमेझॉन. आणि हेही सांगितले की, ॲमेझॉनच्या उगमाचा शोध १९७१ मधे अमेरिकन शोधक लॉरेन मेल्टायरने कसा केला.

"आपल्या सर्वात महान नद्यांबद्दल हे लोक इतके दिवस अनभिज्ञ कसे राहिले?" चमेलीने आश्चर्य व्यक्त केले.

"आपल्याला अनेक विषय माहीत नसतात. समस्या अशी, की माणूस अहंकारामुळे हे कबूल करत नाही. मानव येण्याच्या खूप आधीपासून निसर्ग पर अस्तित्वात होताच. अन् त्यांनी आपलं सामंजस्य प्रस्थापित केलं होतं. पण माणसाने परिणामांचा विचार न करताच पर्वत नष्ट केले, नद्यांच्या प्रवाहांशी खेळ केला. पण आपल्या पूर्वजांनी पर्वत व नद्यांना देव-देवतांच्या रूपात पाहिले होते. ऋषींना असा विश्वास होता की, या प्राकृतिक व गोचर वस्तूंच्या मागे अगोचर परंतु सचेतन संज्ञा अस्तित्वात आहेत. साधारण माणसांच्या 'हे देव-देवता आहेत' या विश्वासामागे एक फार मोठा आशय दडलेला होता. लोक पर्वत व नद्यांकडे आदरभावाने पहात असत". आजोबांनी सांगितले.

"पण त्यांचा दृष्टिकोन बदलला तरी कसा?" संदीपने जिज्ञासा दाखवली.

"माणूस हळूहळू जास्त उपयोगितावादी बनत चालला. तात्कालिक किंवा ताबडतोब मिळणारा फायदाच त्याला महत्त्वाचा वाटत होता. त्याचा 'अहं' जपणारी प्रत्येक गोष्ट अशी अर्थपूर्ण होती. माणसात आज आपल्या भूतकालाबद्दल अवहेलना किंवा तिरस्काराचा भाव असून, भावी पिढ्यांबाबत तो बेपर्वा आहे. तो पर्यावरण प्रदूषित करत आहे. जुनी सुन्दर वनं वेगाने नष्ट करत चाललाय तो. अन् नद्या व अन्य प्राकृतिक साधनांचं शोषण करत चालला आहे." समजावून सांगत आजोबा बोलले.

तिघेही घरी परतले. संदीप अन् चमेलीचे चेहरे गंभीर होते. निसर्गाबाबत मानवाच्या अनैसर्गिक आचरणाबाबत आजोबांनी दर्शवलेल्या निराशाजनक चित्रणाबद्दल ते चिन्तित दिसत होते.

"पण मुलांनो! तुमची पिढी तुमच्या वडलांच्या आणि माझ्या पिढीपेक्षा अधिक बुद्धिमान होईल. पण एका भव्य अशा भविष्याच्या निर्मिती-साठी आपला भूतकाल जाणून घेणं फार आवश्यक आहे. उद्या तुम्ही गंगेबाबत मला काही सांगाल अशी मला आशा आहे!



दुसऱ्या दिवशी संध्याकाळी संदीप व चमेली दोघेही आजोबांना त्यांच्या अभ्यास-खोलीत भेटताना फार प्रसन्न होते. दोघांनीही



आपापल्या परीने गंगेची कहाणी माहीत करून घेतली होती- संदीपने एका पुस्तकातून



अन् चमेलीने आपल्या एका शिक्षकाकडून. दोघांनी मिळून कहाणी सांगितली-

फार प्राचीन काळी एकदा सगर नावाचा एक राजा होता. त्याने अश्वमेध यज्ञ करायचे ठरवले. त्यासाठी एक अश्व सर्व राज्यांतून फिरवला जात असे. जगातल्या सर्व राज्यातून अश्व निरापद परत आला, तर राजा स्वतःला 'सार्वभौम' घोषित करत असे.

पण एक दिवस अश्व रहस्यमय पद्धतीने अदृश्य झाला. खूप शोधल्यानंतरही तो पृथ्वीवर कुठेच सापडला नाही, तेंव्हा राजाने आपल्या शंभर पुत्रांना त्याला शोधण्यासाठी पाताळात पाठवले. पाताळलोकात तो अश्व एका खांबाला बांधलेला होता. जवळच एक ऋषी तपस्येत लीन बसलेला होता. सगरपुत्रांनी ऋषीवर अश्वाच्या चोरीचा आरोप केला. ऋषीने क्रोधित होऊन त्यांना आपल्या शापाने जाळून भस्म केले. ऋषी निर्दोष होते, हे सांगायची गरज नाहीच. इन्द्राने सगराची चेष्टा केली होती.

ऋषीचे नाव होते कपिल. त्याच्यात महान् अलौकिक शक्ति होत्या. शापातून मुक्त होण्यासाठी सगर काहीही करू शकला नाही अन् त्याचा उत्तराधिकारी अन् त्याचा नातू अंशुमान किंवा अंशुमानचा पुत्र दिलीपही काही करायला समर्थ ठरले नाहीत.

दिलीपचा पुत्र भगीरथाने आपल्या पूर्वजांना या शापातून मुक्त करायचा पक्का निश्चय केला. त्याने खूप काळपर्यन्त तपस्या करून कपिल ऋषींना आपल्या पूर्वजांना पुनर्जीवित करायची विनवणी केली.

कपिल ऋषी युवराज भगीरथावर प्रसन्न झाले; परंतु भस्माच्या ढिगाऱ्यातून चौसष्ट हजार राजकुमारांना पुनर्जीवित करणं सोपं नव्हतं. तेंव्हा अशक्य गोष्ट शक्य करायचा एकच मार्ग होता-

स्वर्गातील पवित्र नदी गंगा पृथ्वीवर आणून तिचा प्रवाह भस्मावरून प्रवाहित करणं.

त्यावेळी गंगा ब्रह्मदेवाच्या कमंडलूत होती, हिमालयावर ध्यानस्थ बसून भगीरथाने ब्रह्मदेवाला आवाहन केले अन् त्याला गंगा पृथ्वीवर प्रवाहित करण्याची विनन्ती केली. ब्रह्माने द्रवित होअून त्याची प्रार्थना स्वीकृत केली. पण त्या स्वर्गीय प्रवाहाचा आघात पृथ्वी कशी सहन करु शकेल ही एक नवी समस्या अुभी राहिली.

भगीरथाच्या विनन्तीवरून शिवाने पृथ्वीवर अुभे राहून गंगेचा शक्तिशाली प्रपात आपल्या जटांमधे आत्मसात करणं स्वीकृत केलं. गंगा सर्वप्रथम शिवाच्या मस्तकावर अुतरली. नंतर पर्वतश्रेणीच्या शिलांवरून अुड्या मारत सखल भूमीकडे वाहू लागली.

राजकुमार भगीरथाने शंख वाजवून तिच्या एका धारेला पाताळलोकाची दिशा दाखवली. त्याच्या पूर्वजांची रक्षा पवित्र प्रवाहावर तरंगू लागली अन् तत्काल ते पुनर्जीवित होअून अुठले.

संदीप अन् चमेली कहाणीचा अुपसंहार करत बोलले, "गंगा अशासाठी पवित्र आहे, की ती स्वर्गातली नदी आहे, अन् तिने सगरपुत्रांना पुनर्जन्म प्रदान केला."

कहाणी सांगण्याच्या बहारदार पद्धतीबद्दल अभिनन्दन! गंगा अवतरणाचं आणखी एक आख्यान आहे. ते तितकंसं प्रचलित नाहीय, ते आपल्याला गंगेच्या पृथ्वीवर अवतरणापूर्वीच्या अन् गंगेच्या मूळ अुद्गमाबद्दल माहिती देतं, पण तोपर्यंत हेही लक्षात ठेवा की ही आख्यानं प्रतीकात्मक आहेत. गंगेच्या स्पर्शानं मृत माणसं पुनर्जीवित होण्याचा अर्थ असा आहे की स्वर्गाची कृपा मृत्यूचा अभिशाप नष्ट करते." आजोबा देवनाथ यांनी सांगितले.

"गंगेच्या अुद्गमाबद्दलचं आख्यान काय आहे आजोबा?" आणखी काही माहिती मिळवण्याच्या अुद्देशाने चमेलीने विचारले.

"पुन्हा कधीतरी सांगेन हं लाडूबाई!" प्रोफेसर बोलले.







# चांगुलपणाचे फळ

वीरभद्रचे आईवडील त्याच्या लहानपणीच वारले. त्याचा आजोबा (मातामह) राघव याने आपल्या घरी आणून त्याचे पालनपोषण केले. आई वापांच्या प्रेमाला पारखा असल्याने आजोबांकडून त्याचे जरा जास्तच कोडकौतुक झाले. आजोबा त्याचा प्रत्येक हट्ट पुरा करत अन् आईसारखी त्याची काळजी घेत. थोडा मोठा झाल्यावरही त्यांनी त्याला कसलेही काम करायला सांगितले नाही. परिणामतः तो मनस्वी आणि आळशी झाला. शिक्षणात त्याने जराही आवड दर्शवली नाही. त्यामुळे तो अशिक्षितच राहिला.

राघव आपल्या अर्धा एकर जमिनीत तऱ्हेतऱ्हेचा भाजीपाला पैदा करी. त्याचे अुत्पन्न दोघांना आरामात खायलाप्यायला पुरेसे होई. राघव एकटाच दिवसभर शेतात खपे. मोठा झाल्यावरही वीरभद्र आजोबांना कसलीही मदत करत नसे.

वय झाल्यामुळे अन् म्हातारपणी जास्त कष्ट केल्यामुळे राघवची तब्येत बिघडू लागली. आता तो पहिल्यासारखी मेहनत करू शकत नसे. त्यामुळे हळूहळू त्याची प्राप्ती कमी होअू लागली अन् शेवटी घरात खायलाही काही अुरले नाही.

शेतात काम करण्याऐवजी वीरभद्र आता दुसऱ्यांकडून अुधार पैसे घेअू लागला. राघवचा चांगुलपणा पाहून सुरुवातीला गावचे सर्व लोक त्याला पैसे अुधार देत. पण नंतर वीरभद्रचा आळशीपणा पाहून लोकांनी त्याला मदद करणे बन्द केले.

प्राप्तीचं दुसरं कोणतंच साधन अुपलब्ध नसल्याचे पाहून वीरभद्र आपल्या बरोबरच्या वयाच्या लोकांना धमकावूनभीती दाखवून जबरदस्तीने त्यांच्याकडून पैसे घेअू लागला. लहानपणी पौष्टिक आहार भरपूर मिळाल्यामुळे त्याचे शरीर धट्टेकट्टे होते. आणि दोन-चार जणांना तो एकटा सहज लोळवू शके. त्यामुळे गावचे तरूण भिअून, तो जे मागेल, ते मुकाट्याने देत. न देणारांना तो पिटून काढत असे.

गावात अुगीचच रिकामटेकडं फिरणं अन् लोकांना धमकी देअून पैसे अुकळणं इतकंच त्याचं काम होतं. भूक लागली की कुठेही तो काही खात असे अन् रात्री धर्मशाळेत जाअून झोपत असे. त्याने आजोबांकडे जाणेही बन्द केले.

आजोबांना त्याच्या या अुद्योगांमुळे फार वाईट वाटले. त्याच्या लक्षात आले की, आपल्याच अवास्तव लाडाने नातू बिघडला आहे!

एका रात्री एक तरुण वीरभद्रला बडवून

लक्ष्मीप्रिया



काढण्यासाठी धर्मशाळेत आला. वीरभद्र त्यावेळी झोपलेला होता. तरूणाला पाहून एक कुत्रा भुंकायला लागला, अन् त्यामुळे वीरभद्र जागा झाला. त्याने तरूणाला ओळखले. वीरभद्रने एकदा त्याला मारझोड केली होती आणि त्याचाच बदला घेण्यासाठी तो आता आला होता! दोघांच्या भांडणामुळे धर्मशाळेतले लोक जागे झाले आणि त्यांनी दोघांना एकमेकांपासून दूर केले.

त्या दिवसापासून धर्मशाळेचा कुत्रा वीरभद्रचा जानी दोस्त बनला. वीरभद्र त्याच्यावर खूप प्रेम करू लागला. आणि त्याला खूप खायला घालू लागला. कुत्रा जाडजूड होऊन वाघासारखा दिसू लागला. वीरभद्र त्याला 'शेरू' म्हणून बोलावू लागला. हळूहळू वीरभद्रच्या सवयी जास्तीच बिघडू लागल्या. आता तो शेजारच्या गावी आठवड्याच्या बाजारात जाऊन दुकानदारांकडून पैसे वसूल करू लागला. जो देणार नाही, त्याच्यावर ओरडू लागे, मनात येईल ते बडबडे आणि मारपीटही करू लागे. गावचे काही रिकामटेकडे तरूण त्याचे नवीन दोस्त बनले अन् त्याच्या कामात मदत करू लागले. त्यामुळे लोक या प्रकाराला घाबरून मुकाट्याने पैसे देत असत. त्याचा शेरू कायम पडछायेप्रमाणे त्याच्या बरोबर राहून त्याचे रक्षण करत असे. हळूहळू त्याची प्राप्ती खूपच वाढली. आजोबांना तर तो जवळजवळ विसरलाच.

एक दिवस कुणाकडून तरी आजोबा फार आजारी असल्याचे कळल्यावरून तो त्यांना पहायला गेला. राघव त्याला मिठी मारत म्हणाला, "आता माझा काही भरंवसा नाही राहिला बाळा! केंव्हा प्राण उडून जातील कुणास ठाऊक! मला तुझीच काळजी लागून राहिलेली असते रे! काही काम बीम सुरु कर. अशा तऱ्हेनं आयुष्य कसं जाईल? आपलं शेत संभाळ. सारं आयुष्य सुखान जाईल बघ!"

"माझी काळजी नका करू आजोबा! आयुष्य कंठायला माझ्याजवळ भरपूर धन आहे." वीरभद्र हसत बोलला.

राघवला वीरभद्रच्या साऱ्या खोड्या माहीत होत्या. म्हणून त्याला समजावत तो म्हणाला, "अयोग्य पद्धतीनं कमावलेलं धन कधी वेळेवर कामी येत नाही. धन ही आयुष्याची खरी कमाई नव्हे बेटे! भलेपणानं जे धन मिळेल, तेच खरं धन. संकटात सापडलेल्या व्यक्तीला याच दोन वस्तु वाचवतात भलेपणा अन् भलेपणानं मिळवलेलं धन. तुझ्याजवळ जे धन आहे, ते तुला संकटातून वाचवण्याऐवजी तुला संकटात टाकेल. म्हणून त्यावर भरंवसा करू नकोस आणि या अंधारातून निघून भलेपणाच्या प्रकाशात ये."

राघव त्याला समजावत असतानाच वीरभद्र त्याचे बोलणे कानाबाहेर टाकून निघून निघून गेला.



आजोबांचे बोलणे त्याला नीरस अन् कोरडे वाटले.

एक-दोन दिवसांनंतर शेजारगावच्या सिंह नावच्या तगड्या कुत्र्याने शेरूला फाडून फाडून मारून टाकले. त्यामुळे वीरसिंहच्या मनाला फार यातना झाल्या. त्या शोकात तो कितीतरी दिवस फार खराब अवस्थेत राहिला अन् त्याने काही खाल्ले-प्यायलेही नाही. त्याला असे वाटले की-आता आपला त्राता कोणीच उरला नाही. त्याला कुठे बाहेरही जावेसे वाटेना. त्यामुळे मन्दिरात तो भुकेला-तहानेला तसाच पडून राहिला.

राघवला जेंव्हा हे माहीत झालं, तेंव्हा तो नातवाला शोधत त्याच्याजवळ पोचला अन् त्याला समजावत म्हणाला, "हे बघ बेटे, जेवणखाण सोडून शरीराला त्रास देऊन काही लाभ नाही होणार. जेवण करून घे तू. आणि आपली अयोग्य कृत्यं सोडून दे. लोकांना सतावणं सोड. कित्येक गरीबांचे तळतळाट तुला मिळत आहेत. तुझा ज्याच्यावर इतका खूप भरंवसा होता, तो तुझा प्रिय शेरू मरून गेला. उद्या तुझ्या शरीराचीही अशीच अवस्था होईल. शरीरबळावर भरंवसा ठेवणं हे तितकंच मूर्खपणाचं आहे, जितकं अनुचित धनावर! भरंवशाची एकच वस्तु आहे, तो म्हणजे-भलेपणा! मी तुला वेळो वेळी हेच सांगत आलोय!

आता तरी जागा हो- सकाळी वाट चुकलेला माणूस संध्याकाळी बरोबर घरी परतला, तर त्याला 'चुकलेला' म्हणत नाहीत"

आजोबांच्या आग्रहावरून वीरभद्रने जेवण केले, पण पुढेही कित्येक दिवस तो घराबाहेर पडला नाही. त्याने आता आजोबांच्या बोलण्याचा गंभीरपणाने विचार करायला सुरुवात केली. त्याला त्यांच्या बोलण्यातले सत्य उमगू लागले. तो गप्प, मौन आणि गंभीर बनून घरातच बसून राहू लागला.



एक दिवस त्याचा शेजारी जगत, अंगात ताप असूनही संध्याकाळी आपल्या शेताकडे निघाला होता. त्याला रात्री तिथेच राहून पिकाची राखण करायची होती. त्याला ताप असल्यामुळे त्याची बायको अन् मुलगी शेतावर न जाण्याबद्दल विनवत होत्या, तरीही तो जाण्याबद्दल हट्ट करत होता. कारण अगदी तयार पीक कोणी कापून नेईल, अशी त्याला भीती वाटत होती.

वीरभद्र आपल्या दरवाजात बसून हे सगळं ऐकत अन् पहात होता. त्याला जगतची दया आली. त्याला अगदी मनापासून वाटले की ताप असताना त्याने शेतावर जाणं बरं नव्हे. त्याच्या अन्तरात्म्याने त्याला आवाज दिला की-तू याला मदत कर, याचा शेजारीच आहेस न तू?

"जगतकाका! तुम्ही विश्रान्ती घ्या. तुमच्या शेतावर आज मी जातो. आजारी आहात तुम्ही.मी चांगला ठणठणीत आहे." असे म्हणून वीरभद्र

जगतच्या शेतावर गेला.

जगतच्या मुलीने जेवण एका डब्यात घालून त्याला दिले.

वीरभद्रच्या स्वभावातलं हे परिवर्तन पाहून राघव अन् जगतला फार बरं वाटलं.

दुसऱ्या दिवशी सकाळी उशीरापर्यन्तही वीरभद्र परत न आलेला पाहून राघव घाबरून धावत-पळत जगतच्या शेतावर गेला. तिथे शेताच्या एका कोपऱ्यात वीरभद्र अर्धमेल्या अवस्थेत पडलेला होता. नातवाला अशा अवस्थेत पाहून राघव जोराने किंचाळला! नंतर इतर लोकांच्या मदतीने तो वीरभद्रला घरी घेऊन आला.

जगतचा एक नातेवाईक त्याची मुलगी सुवर्चला हिच्याशी लग्न करून त्याची इस्टेट हडपू पहात होता. पण जगतला हे स्थळ पसन्त नव्हते. म्हणून त्या नातेवाईकाने जगतला मारून टाकून इस्टेट मिळवायचे ठरवले. जगत मेल्यावर बायकांकडून इस्टेट हडपणं कठीण नव्हे-असे त्याला वाटले. त्याला मारण्यासाठीच काही लोकांना बरोबर घेऊन तो शेतावर गेला. कारण त्याला माहीतच होते की शेताची राखण करायला तो तिथे झोपेल.

वीरभद्र अजून झोपला नव्हता, त्यामुळे त्याने त्या लोकांना तोंड दिले. नातेवाइकाला जेंव्हा कळलं, की हा जगत नसून दुसराच कोणी आहे, तेंव्हा ते त्याला बरीच मार-पीट करून परत गेले; त्याचा जीव नाही घेतला.

वीरभद्रच्या या त्यागाने त्याचे जीवनच बदलून टाकले. वीरभद्रच्या औषधपाण्याचा सारा खर्च जगतने च केला. सुवर्चलाने रात्रंदिवस त्याची सेवाशुश्रुषा केली. वीरभद्रच्या घृणा व भयाच्या जागी सर्वांना प्रेम व आदर वाटू लागला.

वीरभद्र पूर्ण बरा झाल्यावर एक दिवस राघव त्याला म्हणाला, "बाळा, जगत आपली मुलगी सुवर्चलाशी तुझ्या लग्नाबद्दल विचारायला आला होता. त्याबरोबर तो सात एकर जमीनही देणार आहे. मी तुझ्यातर्फे 'हो' म्हटलं आहे. तुला काही म्हणायचं आहे यावर?"

"होय आजोबा" "काय" घाबरून राघवने विचारले.

"इतकंच की-थोडयाशा चांगुलपणाचं इतकं मोठं फळ असू शकतं, असं मला माहीतच नव्हतं! तुम्ही बरोबरच सांगता आजोबा!" आजोबाने नातवाला मिठीच मारली!

वीरभद्रच्या डोळयातून झरझर अश्रू वहात होते. हुंदके देत तो म्हणाला, "सकाळी रस्ता चुकलेला माणूस संध्याकाळी घरी परत आला, तर त्याला 'रस्ता चुकलेला' तर म्हणत नाहीत नं आजोबा!"





कावेरीच्या किनारी - ६

# मन्दिरे व दन्तकथा

**वर्णन : जयंती महालिंगम चित्र : गौतम सेन**




सेलमच्या अग्नेयेला एक कसबा आहे - भवानी. भवानी नदीवरून हे नाव पडले आहे. ही नदी केरळच्या वल्लुवनाडू पहाडांमधून निघते व तमिळनाडूमधे कोइमतूर व ईरोड जिल्ह्यांमधून एकूण २१७ कि.मी. वहाते. या नदीला सिरुवाणी, चित्तर, कुन्नूर, कुंदा आणि मोयार सारख्या कित्येक छोट्या नद्या येऊन मिळतात.

भवानी व कावेरी या नद्यांचा संगम हे मोठे पवित्र तीर्थस्थान आहे. अशी समजूत प्रचलित आहे की भवानी आणि कावेरीच्या संगमावर अमुदा नावाची एक अदृश्य भूगर्भीय नदीही त्यांना मिळते. स्थानिक पुराणानुसार कथा अशी की महर्षी पराशरने विष्णूकडून अमृतकलश घेऊन तो भवानी नदीत पुरून ठेवला होता, अशासाठी की तो पळवून नेऊ पहाणाऱ्या असुरांपासून वाचवता येईल. - काही काळानन्तर पराशरने येऊन पाहिले तो त्याचे शिवलिंगात रूपांतर झाले होते. पराशरने तो काढून घ्यायचा खूप प्रयत्न केला, पण ते तो उचलू शकले नाहीत. या प्रयत्नात लिंगातून पाण्याची धार फुटली. ती संगमावर अमुदा नदी या नावाने प्रसिद्ध झाली.

भवानीतील संगमेश्वर मंदिर तमिळनाडूत शैवांचे पवित्र स्थान आहे. हे स्थान दक्षिण प्रयाग, दक्षिण बदरी आणि



भवानीचे संगमेश्वर मन्दिर



महर्षी पराशरने शिवलिंग अुचलायचा प्रयत्न केला

त्रिवेणी संगम या नावांनीही प्रसिद्ध आहे. याच्या चार दिशांना शंखगिरि, तिरुचेनगोडु, पद्मगिरी व वेदगिरी ही मंदिरे आहेत.

सन १९०० च्या आरंभाच्या महिन्यांत मन्दिराच्या भिंतीत एक दरवाजा बनवला गेला - अशासाठी की, इंग्रज कलेक्टर एडमंड गॅरो याला बाहेरून भगवंताचे दर्शन घेता येईल. हा गोरा अधिकारी संगमाजवळच रहात असे. एकदा संगमात अचानक खूप मोठा पूर आला. त्यात त्याचा बंगला अन् त्या जवळ असणारा जुना किल्ला जलमग्न झाला. पण त्या पुरातून हा गोरा अधिकारी दैवयोगाने बाचला; कारण पूर येण्यापूर्वीच बरोबर त्याने बंगला रिकामा केला होता. असे बोलले जाते की, भगवती वेदनायकी देवीने पूर येणार असल्याची चेतावणी स्वप्नात आधीच दिली होती. कलेक्टर गॅरोने देवीचे अुपकार मानून मंदिराला, हस्तिदन्ताची एक पालखी अन् काही जडजवाहीर भेट दिले.

भवानीपासून पुढे दक्षिणेला ईरोड शहर वसले आहे. कावेरीतून काढलेल्या पेरुम्पालयम आणि कलिंगरायन नावाच्या दोन कालव्यांचा इथे अुल्लेख करता येईल. ते तमिळमधे 'ओदई' नावाने प्रसिद्ध आहेत. एका प्रचलित दंतकथेनुसार या स्थानाचे नाव तमिळमधले दोन 'ईर' व 'ओडु' हे शब्द जोडून बनले आहे. याचा अर्थ आहे - ओली खोपडी. देवीभागवतमधे दक्ष प्रजापतीने यज्ञ केल्याबद्दलचा अुल्लेख आहे. या यज्ञात सम्मिलित होण्यासाठी दक्ष प्रजापतीने आपला जावई 'भगवान शिव' याला आमन्त्रण दिले नाही. परन्तु दक्ष प्रजापतीची कन्या दाक्षायणी किंवा पार्वती ही मात्र न बोलावताच तेथे पोचली. तिच्या आई-बापांनी तिची अुपेक्षा केल्यामुळे दुःखी होअून तिने यज्ञकुंडात अुडी मारली. ही बातमी कळल्यावर शिवाला फारच राग आला अन् त्याने आपल्या जटांपासून वीरभद्र आणि भद्रकाली नावाचे दोन गण निर्माण केले. हे दोघे यज्ञशाळेत पोचले. त्यांनी दक्ष व त्याच्या अनुचरांना मारून यज्ञकुंडात फेकले आणि त्यांची हाडे व कवट्या कावेरीत टाकल्या तिथे त्या कायम ओल्याच रहातात.

ईरोडच्या आग्नेयेकडे पश्चिमघाटातून नोय्याल नावाची एक पावसाळी नदी अुगम पावते. ती कोइमतूर अन् तिरुप्पूर शहरातून वाहत जाअून कावेरीला मिळते.

कोइमतूर हे तमिळनाडूचे दोन नंबरचे मोठे शहर आहे. इथे ३००० कारखाने अन् कापडाच्या गिरण्या आहेत. त्यामुळे याला दक्षिण भारताचे मँचेस्टर असे म्हणतात. कोइमतूर 'कोवै' या नावानेही प्रसिद्ध आहे. इथून ७ कि.मी. अंतरावर नोय्याल नदीच्या किनाऱ्यावर शिवाचे पेरूर पट्टीश्वरस्वामी हे मंदिर आहे. याच्या कनकसभा नावाच्या मंडपात फारच कलात्मक मूर्ती बनवलेल्या आहेत. असे म्हटले जाते की, हे मंदिर इ.स.पू. पहिल्या शतकात बांधले गेले. अन् गाभाऱ्यातल्या मूर्ती चोल राजा करिकालनने बनवून घेतल्या होत्या.



करूरमधे अमरावती नावाची तिसरी एक अुपनदी कावेरीला मिळते. २०० कि.मी. लांबीची ही नदी कोइमतूर जिल्ह्यातल्या अण्णामलै पहाडांमधून अुगम पावते. हिच्यावर बनलेल्या धरणांमधे इतके पाणी अुपलब्ध होते की, या जिल्ह्याच्या ५ लाख एकर जमिनीला यातून पाणीपुरवठा होतो. संगमातून काढलेल्या अुय्यकोंडन कालव्यातून तिरुचिरापल्ली शहरालाही पाणी पुरवले जाते.

कावेरी व अमरावती नद्या या चेर, चोल आणि पांड्य राज्यांच्या नैसर्गिक सीमा बनल्या. या तीन राज्यांचे शासक कोणतीही महत्वाची बोलणी करण्यापूर्वी संगमावर बनलेल्या मंदिरात जाअून चेल्लांडिअम्मन देवीचं दर्शन नक्कीच घेत असत. इथेच अगस्ती ऋषींचे मंदिर आहे. लोकांना नदीपार करून नेणारे नावाडी आपल्या मिळकतीचा काही भाग आजही मंदिरात दान करतात. जवळच नेरूरमधे कांचीचे आचार्य परमशिवेंद्र सरस्वती यांचे शिष्य संत-संगीतकार सदाशिव ब्रह्मेन्द्र यांची समाधी आहे. त्यांच्या बाबतीतल्या एका घटनेचा इथे अुल्लेख केला जातो. एकदा ते कावेरीकिनारी कोडुमुडी जवळ ध्यानस्थ बसले असता अचानक पूर येअून नदीचे किनारे पाण्याखाली बुडाले आणि हे स्वामीजी रेतीत रुतले. त्यांना जेंव्हा रेतीतून काढले, तेंव्हा त्यांनी मोठ्या शांतपणे अंगावरची रेती झाडून टाकली अन् चालू लागले. जसं काही काहीच घडलं नाही. असे म्हटले जाते की तिरुवय्यारूमधे कावेरीच्या प्रवाहातून त्यागराजच्या गीतांचे स्वर अुमटतात. त्याचप्रमाणे नेरूरमधे कावेरीच्या प्रवाहातून सदाशिव ब्रह्मेन्द्र यांच्या गीतांचा मधुर नाद अैकू येतो.

**नदी-प्रदूषण**

मेट्टूर व तिरुचिरापल्लीचे क्षेत्र बहुधा तमिलनाडूचे सर्वात मोठे औद्योगिक क्षेत्र आहे. मेट्टूर व भवानी धरणांच्या आसपास आणि कावेरी व तिच्या सहायक भवानी, नोय्याल व अमरावती नद्यांच्या किनाऱ्यांवर कारखाने बनलेले आहेत. त्यात हजारो लोकांना काम

कोडुमुडि येथील मंदीर



मिळालं आहे अन् आर्थिक लाभ झालेला आहे. पण कारखान्यांचा नद्यांवर फार वाईट परिणाम झालेला आहे. त्या जवळजवळ 'घाणेरडे नाले' बनल्या आहेत. मेट्टूर भवानी, ईरोड, कोइमतूर आणि तिरुप्पूर इ. शहरांचा मैला आणि कारखान्यांचा औद्योगिक कचरा दररोज कावेरी व तिच्या अुपनद्यांमधे सोडला जातो. त्यामुळे नदी-किनाऱ्यांवरील पिके व लोकांच्या आरोग्यावर फारच अनिष्ट परिणाम होत आहे.


तिरुप्पूर जवळ नोय्यालचे प्रदूषित जल-क्षेत्र

भवानी नदीच्या किनाऱ्यावर असणाऱ्या कारखान्यांमधून आलेला कचरा इतका विषारी असतो की, शेंगदाणा, धान्ये आणि अुसाचे पीक फारच घटले आहे. एक काळ असा होता की तेंव्हा कारखान्यांच्या पुढे नदीच्या खालच्या प्रवाहावर बनलेल्या भवानी सागर धरणात भरपूर प्रमाणात मासे पकडले जात असत. पण आता या प्रदूषणामुळे माशांच्या काही जाती अजिबात नाहीशाच झाल्या आहेत. या पाण्याचा अुपयोग करणाऱ्या लोकांना फुप्फुसे व आतड्यांचे रोग झाले आहेत.

परंतु अजूनही आशेचे किरण बाकी आहेत. १९९३ मधे भवानी नदीचे प्रदूषण थांबवण्यासाठी आंदोलन सुरू झाले. आणि आता न्यायालयांनी कारखानदारांना आज्ञा दिल्या आहेत. की, त्यांनी कचरा साफ करण्यासाठी कचराशुद्धीकरण प्लांट्स् लावून घ्यावीत. न केल्यास कारखाने बंद केले जातील.

प्रदूषणामुळे नोय्यालला 'काळी नदी' म्हटले जात आहे. कारण केवळ ९७३ कि.मी. लांबीची ही नदी तिरुप्पूरच्या कपडारंगण व धुलाईच्या जवळजवळ ८०० युनिट्स् आणि कोइमतूरच्या कारखान्यातून निघणाऱ्या कचऱ्याने अगदी तुडुंब भरलेली आहे. नोय्याल नदीवर बनलेल्या ओरतपालयम धरणाची निर्मिती १९९२ मधे पूर्ण झाली होती आणि आशा केली गेली होती की, नोय्यालच्या किनाऱ्यावरील ५% जमिनीला पाणीपुरवठा केला जाअू शकेल. परन्तु तिरुप्पूर ते करूर पर्यंतचे शेतकरी आता नदीचे पाणी शेतांना देत नाहीत, कारण आता हे पाणी अुपयोगाच्या लायकीचे राहिले नाही. न्यायालयांनी जनहिताच्या दृष्टीने नुकताच एक निर्णय दिला आहे. निर्यातीद्वारा दरवर्षी २००० करोड रुपये कमवणाऱ्या तिरुप्पूरच्या कारखानदारांना सांगितले आहे, की नदी व धरणाचे पाणी अन् तळ साफ करावे. याबरोबरच असाही आदेश दिला आहे की १९९८ पर्यन्त सर्वांनी मिळून एक कचराशुद्धीकरण यन्त्र बसावे.


ईरोडजवळ कारखान्यांचा सारा कचरा कावेरीत सोडला जातो



# शरणचे बुद्धिबळ

शरण व शाम दोघे घनिष्ट मित्र होते. दोघे एकाच गावात रहात असत. दोघं आपापली कामं मिळून करत. परन्तु शरणचं काम अन् बुद्धी यांची सर्वत्र प्रशंसा होई, आणि शामला मूर्ख अन् कुचकामी मानले जाई. शामला याचं फार वाईट वाटे. शरण बहुतेक वेळा त्याची समजूत घालत म्हणे, "तू दुसऱ्यांच्या बोलण्याकडे लक्षच देअू नकोस. कारण लोकांना सर्वच गोष्टीत काही ना काही बडबडायची सवय असते. तू स्वतः आपल्या कामावर समाधानी असशील, आपलं काम सचोटीनं केलं असशील, तर दुःखी व्हायचं काही कारणच नाही तुला. तू स्वतःला काय समजतोस, तेच महत्वाचं! लोक काय म्हणतात ते नव्हे, समजलं?"

एक दिवस दोघं मिळून आपापल्या बायकोसाठी सोन्याच्या बांगड्या खरीदण्यासाठी शहराकडे निघाले. थोडे अंतर गेल्यावर एका झाडाखाली बसलेले दोन प्रवासी दिसले. ते अुंच आवाजात वाद-विवाद करत होते. आपसात ते भांडत असावेत असे दिसत होते. दोन्ही मित्रांनी त्यांच्याजवळ जाअून भांडणाचे कारण विचारले. दोघांपैकी एकाची अंगावरची वस्त्रे मूल्यवान होती. तो आपली कहाणी सांगत म्हणाला, "मी व्यापारी आहे. व्यापारात मी कोट्यवधी रुपये मिळवले. मला दोन मुली आहेत अन् त्या दोघीही एका विचित्र रोगानं पछाडलेल्या आहेत. त्यांना काय रोग आहे, हे कुठल्याही वैद्य-हकीमाला कळू शकलं नाहीय. शेवटी निराश होअून मी त्यांना एका साधू महात्म्याकडे घेअून गेलो. त्यांनी दोघींना पाहून म्हटले की, या तुझ्या पापांची शिक्षा भोगत आहेत. त्यांच्या साठी रोज सोन्याच्या दोन-दोन बांगड्या बनवून रोज नव्या-नव्या ठिकाणी जाअून अर्ध्या किंमतीला विकत जा. असे करण्याने दहा दिवसात त्या पूर्ण बऱ्या होतील.

त्या साधूबाबाच्या आज्ञेनुसार मी बांगड्या विकायला इथे बसलोय. हा दुसरा माणूस सोनार आहे. याने बांगड्या पारखून पाहिल्या अन् जेंव्हा त्याचा पक्का विश्वास बसला, की या शुद्ध सोन्याच्याच आहेत, तेंव्हा तो स्वतःच विकत घेअू म्हणतोय. पण याच्याजवळ पुरेसे पैसे नाहीयत.

श्रुती तांबे



फक्त तीनशे रुपये आहेत, अन् बांगड्या आहेत पाचशेच्या. बाकीचे पैसे तो आपल्या गावी जाऊन द्यायला तयार आहे. पण याचं गाव माझ्या वाटेच्या विरुद्ध दिशेला आहे. अन् मला तर लवकर आपल्या गावी पोचायचं आहे.

बाकी दोनशे रुपयांसाठी मी याच्या गावी जायला तयार नसलो, तर तो आपली सोन्याची अंगठी द्यायला तयार आहे. पण याची अंगठी शुद्ध सोन्याची आहे की नाही, हे मला कसं समजणार? हा स्वतः सोनार असल्यानं माझ्या बांगड्या खऱ्या सोन्याच्या आहेत हे त्यानं पाहून ठेवलंय.

मी यासाठीच आपल्या बांगड्या याला विकू इच्छित नाही. पण हा तर हट्टाला पेटला आहे. आमचं भांडण हेच.

शरण यावर काही बोलणार, इतक्यात त्याला मधेच थांबवत सोनार म्हणाला, ''आमच्या दोघांच्या मधे तिसऱ्यानं हस्तक्षेप करायचं कारण नाही. सौदा आम्हा दोघात होत आहे. आम्ही आपसात काय ते ठरवून घेऊ.''

''पण आम्ही दोघंही सोन्याच्या बांगड्यांसाठीच शहरात चाललो आहोत. आमचं काम इथेच होऊन गेलं, तर शहरापर्यंत टप्पा कशाला? आम्ही तर पूर्ण रक्कमही द्यायला तयार आहोत.'' शरण दोघांना उद्देशून बोलला.

सोनार पुन्हा म्हणाला, ''पहिलं गिऱ्हाइक तर मीच आहे. या सौद्यावर पहिला माझाच हक्क आहे. किंमत तर मी ही द्यायला तयार आहेना! भीक तर नाही मागत ना? बाकीच्या दोनशेंच्या बदल्यात अंगठी तरी घ्या, नाहीतर माझ्या गावी येऊन रोख पैसे घ्या.''

नाराज होऊन व्यापारी सोनाराला म्हणाला, ''सांगितलं ना एकदा, कि मी बांगड्या तुला विकणारच नाही!''

सोनाराला व्यापाऱ्याने दिलेल्या रोखठोक उत्तराने शरण व शाम फारच खूष झाले. पाचशे रुपये देऊन त्यांनी बांगड्या खरीदल्या. आपल्या भाग्यानेच आपल्याला खऱ्या सोन्याच्या बांगड्या अर्ध्या किंमतीत मिळाल्याच्या खुशीत होते ते. त्यांना सोन्याच्या खरेपणाबद्दल जराही शंका नव्हती. तरीही गावी पोचल्याबरोबर त्यांनी त्या सोनाराला दाखवल्या.

गावच्या सोनाराने प्रथम बांगड्या नीट पारखल्या आणि तो म्हणाला, ''या नकली सोन्याच्या आहेत. एक बांगडी पंचवीस रुपयापेक्षा अधिक किंमतीची-नव्हे, तुम्ही लोकांनी जास्त किंमत तर नाही दिलीत ना?''

''नाही, फार काही जास्त नाही दिले. थोडेसे अधिक मात्र दिलेत.'' खरी गोष्ट लपवत शरण उत्तरला. अन् आपापल्या बांगड्या घेऊन दोघेही घरी गेले.

घरी आल्यावर शरणने सगळी हकीकत बायकोला सांगितली. पण बायकोला शरणच्या या कामात फारशी चूक वाटली नाही. उलट तिने त्याच्या बुद्धिमत्तेची प्रशंसाच केली. ती म्हणाली, ''या बांगड्या खऱ्या सोन्याच्या असत्या, अन् तुम्ही त्या घेतल्या नसत्या, तर एक सुवर्णसंधीच घालवली असती ना! बुद्धिमान माणूस अशी संधी कधीच सोडणार नाही. तुम्ही खरंच फार बुद्धिमान आहात, पण भाग्यासमोर अक्कलवन्ताचं काहीच चालत नाही. अन् भाग्यानं साथ दिली तर मोठमोठी कारस्थानंही विफल होतात. तुम्ही असंच समजा की भाग्य आपल्या बाजूनं नाहीय. पण तुम्ही जे केलंत, ते प्रत्येक अक्कलवन्तानं करावं असंच होतं. तेंव्हा तुम्हाला चिन्ता करायचं काहीच कारण नाही.''

त्यावेळी शामही शरणच्या जवळच होता आणि त्याच्या बायकोचे बोलणेही ऐकत होता. ते सर्व ऐकून शामलाही सान्त्वना अन् शांती मिळाली.

त्यानेही घरी जाऊन आपल्या बायकोला सर्व काही सांगितले. पण त्याची बायको त्याला फटकारत म्हणाली, ''मला माहीतच होतं की तुम्ही फसवले जाल. तुम्हाला तर कोणीही सहज मूर्ख बनवू शकतं, मूर्ख तर आहातच ना! मी बरोबर आले असते, तर बरं झालं असतं. चुकलंच माझं ते.''

थोडा वेळ गप्प राहून नवऱ्याला रागावत ती म्हणाली, ''तुम्ही विश्वासच कसा ठेवलात, की तो खरं सोनं अर्ध्या किंमतीत देईल? मला तर यात बरंच मोठं कारस्थान असावंसं दिसतंय. अन् असंही असू शकतंय की त्यात शरणचाही हात असावा.''

शाम आपल्या दुर्भाग्याबद्दल फार दुःखी होऊन. विचार करत होता की शरण किती भाग्यशाली आहे! तोही तर फसवला गेला, पण त्याच्या बायकोने



तरीही त्याच्या बुद्धीची तारीफच केली. माझ्या बायकोनेही त्याला मूर्ख नहीं मानलं, उलट असंही म्हटलं की, या कारस्थानात त्याचाही हात असू शकेल; म्हणजेच, तो इतका हुशार आहे! शाम आता आपल्या भाग्याला दोष देत, लहान मुलाप्रमाणे मुसमुसून रडू लागला.

तिकडे शरणही आपल्या घरात एकान्तात बसून विचार करत होता. तो आपल्या भाग्याला नव्हे, तर आपल्या बुद्धीला दोष देत होता, कि कसं काय आपण एका अनोळखी माणसाकडून इतक्या सहजपणे फसवले गेलो! तरीही आपली बायको आपल्याला मूर्ख नव्हे, तर बुद्धिमानच म्हटते. त्याने निश्चय केला की खरोखरच आपण आपली बुद्धिमानी सिद्ध करायची अन् आपली घालवलेली रक्कम परत मिळवायची.

खूप विचार केल्यानन्तर त्याला एक गोष्ट

आठवली. गावात काळूशिवाय आणखी कोणालाच माहीत नव्हते, की आपण शामसह सोन्याच्या बांगड्या घ्यायला शहरात जात आहोत. काही दिवसांपूर्वी काळू आपल्या मुलीच्या लग्नासाठी सोनं घ्यायला शहरात गेला होता, म्हणूनच आपण व शामने शहरात जातेवेळी त्याला-खरं सोनं कुठे मिळतं-याबद्दल विचारले होते. त्या ठकांजवळही बरोबर चारच बांगड्या होत्या. असंही असू शकेल की, काळू, बांगड्यांसाठी आमचं शहराकडे जाणं अन् ठगांचं खोटं भांडण-ही सर्व एकाच नाटकाची दृश्ये असतील!

तावडतोब अुठून वेगाने ग्रामपंचायतीच्या प्रधानाकडे जाअून त्याने सर्व गोष्टी सविस्तर सांगितल्या. प्रधानाला काळूची काळी कृत्ये माहीत होती, पण काही पुरावा नव्हता जवळ. तो तर अशा संधीची वाटच पहात होता. त्याने शरणच्या शंकेला अनुमोदन दिलं अन् खरी गोष्ट शोधायचं आश्वासन देअून पाठवून दिले.

प्रधानाने काळूच्या हालचालींवर नजर ठेवण्यासाठी दोन हेर त्याच्या मागे लावले. ते वेशांतर करून त्याच्यावर नजर ठेवू लागले.

त्याच दिवशी, रात्रीच्या वेळी काळू शेजारच्या गावी आपल्या भागीदार-ठकांकडून आपल्या हिश्याची रक्कम वसूल करायला गेला. पंचायत-प्रधानाच्या हेरांनी तिथेच त्याला अन् त्याच्या टोळीला रंगल्या हातीच पकडले. त्यांनी कबूल केले की शरण व शामला नकली सोन्याच्या बांगड्या त्यांनीच विकल्या होत्या. त्या दोघांना आपले पैसे परतही मिळाले.

शामने बायकोला ही खुषखबर सांगितली. त्याने असेही सांगितले की शरण आपल्या बायकोच्या प्रोत्साहनानेच हे सर्व करण्यात सफल झाला. पण त्याची बायको मात्र आपला दृष्टिकोणच बरोबर असल्याचं सांगत म्हणाली, "शरणच्या बायकोनं त्याच्या बुद्धीची खूप प्रशंसा केली, त्यामुळेच त्यानं बुद्धी आणखी तीक्ष्ण बनवायचा प्रयत्न केला. मी कडू बोलले, पण त्याचा काहीच लाभ नाही झाला. अुलट कोपऱ्यात बसून तुम्ही आपल्या भाग्याला दोष दिलात. असं वाटतंय की तुम्हाला कधीच अक्कल येणार नाही."

पण, यावेळी शाम बायकोवर नाराजही झाला नाही अन् दुःखीही झाला नाही. पण त्याला असे पटले की, बायको बरोबरच बोलली. आपल्याला अजून बरंच काही शिकायला हवंय. बायकोच्या दुत्कारात आज त्याला प्रेरणेचा किरण सापडला - काही शिकण्याची प्रेरणा.





# तोंडाची कारवाई

खूप पूर्वीची गोष्ट आहे. एका राजाचा एक फार बुद्धिमान आणि अनुभवी मन्त्री होता. राजाने त्याच्यापेक्षा अधिक बुद्धिमान मन्त्री कुठेच पाहिला नव्हता.

एक दिवस मन्त्र्याने राजाला सांगितले की आता आपला निवृत्त होण्याचा दिवस जवळ आला आहे. आपले आयुष्याचे शेवटचे दिवस आरामात काढायचा आपला विचार आहे.

मन्त्र्याला तीन तरुण पुत्र होते अन् तिघेही सारखेच प्रतिभाशाली आणि कर्तव्यनिष्ठ होते.

"तुम्हाला निवृत्त व्हायचेच असेल, तर मित्रा, मला तुमच्या तीन पुत्रांपैकी कोणाही एकाला आपला अुत्तराधिकारी म्हणून निवडू द्या. मला वाटतं की, तुमचा थोरला मुलगा ठीक होईल नं? तुमचा काय विचार आहे?" राजा मन्त्र्याला म्हणाला.

"महाराज! आपली आपल्या मन्त्र्याकडून काय अपेक्षा आहे, यावर हे अवलंबून आहे. आपल्याला जर निर्भीड अन् दुस्साहसी माणूस हवा असेल, तर माझा ज्येष्ठ पुत्र नक्कीच फार अुपयोगाचा असेल. आपल्याला या पदावर खूप चतुर अन् बुद्धिमान माणूस हवा असेल, तर माझा मधला पुत्र योग्य निवड होईल अन् जर एक सत्यनिष्ठ व्यक्ती हवी असेल, तर त्यासाठी सर्वथा योग्य, माझा धाकटा पुत्रच असेल" मन्त्री अुत्तरला.

आपल्या मुलांच्या स्वभावाविषयी इतकं सुनिश्चित विश्वासानं तुम्ही कसं म्हणू शकता? त्यांच्या विषयातलं तुमचं मत बरोबर आहे, असं पुराव्यानं सिद्ध करू शकाल?" राजाने प्रश्न केला.

"करू शकेन, महाराज!" मन्त्री आत्मविश्वासानं म्हणाला.

राजा अुत्सुकतेनं म्हणाला, "खरंच! तुम्ही सिद्ध करावं अशी इच्छा आहे माझी!"

"छान महाराज!" थोडा वेळ थबकून मन्त्री म्हणाला, "मी तिघांनाही एक आज्ञा देईन.

पाहूया, या तिघांपैकी प्रत्येकजण तिची कशी अंमलबजावणी करतो ते!"

नंतर याने तीन्ही मुलांना एका खोलीत बोलावले. राजा एक गुप्त झरोक्यातून त्यांना पहात होता.

मंत्री सिंह-गर्जने प्रमाणे गंभीर आवाजात म्हणाला, "ऐका पुत्रांनो! राजबागेच्या मध्यावर एक खास प्रकारच्या गुलाबाचं रोप आहे. त्याची फुलं तोडायला मनाई आहे. पकडला गेलात, तर शिक्षेतून वाचण्यासाठी तुम्ही फक्त आपल्या तोंडाचा अुपयोग करू शकता. होय, फक्त आपल्या तोंडाचा! समजलं?"

संध्याकाळची वेळ होती. मुलांनी पित्याच्या पावलांना स्पर्शून नमस्कार केला अन् निरोप घेतला. बागेत घुसून ते लपत-छपत त्या रोपाजवळ पोचले. पण त्यांनी फुलं तोडताच सावध पहारेकऱ्यांनी त्यांना पकडले.

थोरल्या मुलाने ताबडतोब आपल्या तोंडाने गगनभेदी आरोळी ठोकली. अन् पहारेकऱ्याच्या हाताला चावण्यासाठी आपले तोंड अुघडले. भ्यायलेल्या पहारेकऱ्याची पकड यामुळे ढिली होताच तो मुलगा पळून जाण्यात सफल झाला!

मधल्या मुलाने गुलाबाचे फूल पटकन् आपल्या तोंडात लपवले अन् स्वतःल निर्दोष सिद्ध केले.

सर्वात धाकटा मात्र शान्त राहिला अन् पहारेकऱ्यांबरोबर मुकाट्याने राजाकडे गेला. आपला दोष कबूल करत तो राजाला म्हणाला, "मला माहीत आहे महाराज! त्या रोपाला हात लावायची मनाई आहे. पण माझ्या मनात एका गोष्टीबद्दल कसलीही शंका नव्हती कि जर आपल्या बुद्धिमान मंत्र्यानंच फूल तोडायला सांगितलं असेल तर त्याचं नक्कीच काही योग्य असं कारणही असेल."

तिघांचीही वागणूक स्पष्ट करत मन्त्री म्हणाला, "पहा महाराज! पकडलं गेल्यावर प्रत्येकानं आपापल्या तोंडाचाच अुपयोग केला- मी त्यांना तशी आज्ञाच दिली होती ना! पण प्रत्येकाने आपापल्या पद्धतीने, आपापल्या स्वभावानुसार केलं. एकानं तोंडाचा अुपयोग हिंसात्मक पद्धतीनं केला. एकानं चुतराईनं केला अन् एकाने खरं बोलून केला."

प्रसन्न होअून महाराज हसले अन् बोलले, "एकदम बरोबर माझ्या प्रिय मन्त्र्या! पण तिघंही आपापल्या पद्धतीने योग्यच आहेत. तुमचा थोरला पुत्र सेनाधिकारी बनू शकतो, अन् दुसरा माझ्या सल्लागाराच्या रूपात! पण सर्वात धाकटाच, जो बुद्धिमान आहे, तोच आपण सोडणार असणाऱ्या पदाला योग्य आहे."



५० - युद्धाची तयारी

# महाभारत

कृष्णाने दिलेल्या दिव्यदृष्टीच्या साह्याने धृतराष्ट्राने कृष्णाचे विश्व-रूप पाहिले. नंतर तो कृष्णाला म्हणाला, "भगवंता, तू मोठ्या कृपेने मला हे दिव्य नेत्र प्रदान केलेस, ते आता परत घे. ज्या नेत्रांनी मी तुझं रूप पाहिलं, त्या नेत्रांनी मी आता साधारण मानव अन् हे विश्व पाहू इच्छित नाही."

दुसऱ्याच क्षणी सभाभवन पूर्ववत् झाले. कृष्णही साधारण रूपात दिसू लागला. कृष्णाने सभेत अुपस्थित असलेल्या ऋषींचा निरोप घेअून आपला एक हात सात्यकीच्या दुसरा विदुरच्या हाती दिला. अन् ते सभाभवनातून बाहेर पडले त्याच्याबरोबरच कौरव व अन्य राजेही चालू लागले.

सभाभवनाच्या द्वारी दारुक रथ सज्ज ठेवून अुभा होता. कृष्ण रथात बसला, तेंव्हा धृतराष्ट्र त्याला म्हणाला, "कृष्णा, गैरसमज नको करू माझ्याबद्दल! पांडवांबद्दल माझ्या मनात थोडाही द्वेष नाहीय. दुर्योधनाला तर मी तुझ्यासमोरच समजावलं, सर्व सभासदानीही ते ऐकलं."

यानन्तर कृष्ण, धृतराष्ट्र, भीष्म, द्रोण, बाल्हिक, कृप इत्यादी वडीलधाऱ्या माणसांना अुद्देशून म्हणाला, "महात्माहो! सभेत काय झालं ते तुम्ही पाहिलंतंच! दुर्योधन रागाने निघून गेला. धृतराष्ट्र स्वतःला असमर्थ म्हणाले. मी ज्या कामासाठी आलो होतो, ते झालं! मी आता परत युधिष्ठिराकडे जातो. मला आज्ञा द्या." सर्व वडीलधारी माणसं कृष्णाला निरोप देअून आपापल्या घरी परत गेली.

नंतर कृष्ण रथात बसून आपली आत्या कुंती हिच्याकडे गेला. तिला सगळी बातमी देअून





म्हणाला, ''देवी, सगळ्यांनी दुर्योधनाला अनेक प्रकारे सांगून पाहिले, पण त्याने काहीच ऐकून घेतले नाही. कौरवांचा शेवट जवळ आलाय असं वाटतं. अर्जुन दावाग्नीप्रमाणे त्यांना जाळून काढील. मी पांडवांकडे चाललोय. तुला त्यांना काही निरोप द्यायचा आहे?''

''पुत्र, युधिष्ठिरला म्हणावं की धर्ममार्गाचं अतिक्रमण करू नकोस. बाहुबळावर जगणं हा क्षत्रीयांचा धर्मच आहे. त्यासाठी हिंसा करावी लागली तर ती देवाचीच इच्छा असेल. असं ऐकलंय की, प्राचीन काळी मुकुन्द नावाच्या राजर्षीला कुबेर सगळं पृथ्वीमंडळ देऊ करत होता. पण त्याने ते घ्यायला नकार देत म्हटले होते, ''मी आपल्या बाहुबळाने राज्य जिंकू शकेन. तेवढंच पुरेसं आहे मला.'' यावेळी युधिष्ठिर ज्या मार्गाने जात आहे, तो मला मुळीच पसंत नाहीय. तो मार्ग राजा पांडु किंवा भीष्म यांच्यासाठीही स्वीकारयोग्य नाहीय. त्याला सांग की, युधिष्ठिरसाठी मी रोज यज्ञ, दान, तप, वीरता, बळ यांच्या प्राप्तीची इच्छा करते आहे, राज्यशासन धर्मपूर्वक करणं हे उत्तम क्षत्रीय-लक्षण आहे. भिक्षाटन, शेती अन् व्यापार हे क्षत्रीयाला शोभून दिसत नाही. पांडवांनी आपल्या पित्याचं राज्य पुन्हा मिळवायला हवं. परक्यांच्या आश्रयाने जगण्यात कोणतं सुख मिळणार आहे? युधिष्ठिराला सांग, कि त्याने आपल्या पित्याला व पितामहांना उत्तम लोकाच्या प्राप्तीसाठी मदत करावी.''

कृष्ण कुंतीच्या महालातून निघून कौरव प्रमुखांचा निरोप घेऊन सात्यकी व कर्ण यांना आपल्या रथावर बसवून रवाना झाला. रथ नगर पार करून निर्जन प्रदेशात पोचला, तेंव्हा कृष्ण कर्णाला एकांतात म्हणाला, ''कर्णा! तू वेद आणि धर्मशास्त्राचं अध्ययन केलं आहेस. म्हणूनच तू सर्व काही समजू शकशील. कन्येच्या गर्भातून ज्याचा जन्म होतो, त्याला कानिन म्हणतात. अशी कन्या ज्याच्याशी विवाह करील, तोच माणूस त्या कानिनचा पिता असतो. तू कुंतीदेवीच्या गर्भातून कानिन म्हणून जन्मलास. म्हणूनच तू राजा पांडुचा ज्येष्ठ पुत्र आहेस. धर्मशास्त्रानुसार तू राजा बनण्यास योग्य आहेस. पित्याच्या पक्षाकडून पांडव अन् मातेच्या पक्षाचे वृष्णिवंशी लोक तुझे नातेवाईक आहेत. तू माझ्याबरोबर येत असशील, तर पांडव त्यांचे पुत्र, पांडवांच्या पक्षाकडून लढायला आलेले सगळे राजे तुझ्या चरणांना नमस्कार करतील. तुला राज्याभिषेक होईल द्रौपदी तुला आपला सहावा



पती मानेल. युधिष्ठिर तुझा युवराज बनून राहील. तू राज्य ग्रहण केलंस, तर कुंतीदेवीला आनन्द वाटेल.''

यावर कर्ण बोलू लागला, ''कृष्णा, माझ्यावरचं प्रेम अन् स्नेह यांमुळे तू जे काही सांगितलंस, ते मी ऐकलं! मी पांडुराजाचा पुत्र आहे, यात काही शंका नाही. कुंतीदेवीने फक्त मला जन्म देऊन नदीत सोडून दिलं. अधिरथ नावाच्या सूताने मला उचलून नेऊन आपली पत्नी राधा हिच्या हवाली केलं. असंख्य कष्ट उपसून माझं पालनपोषण करणाऱ्या त्या जोडप्याचे श्राद्धादि संस्कार करणं हा माझा धर्म नाही का? त्यांनी मला वसुषेण असं नाव दिलं. मी त्यांच्याच जातीतल्या कन्येशी विवाह केला. मला पुत्र अन् नातूही झालेत.



आता मी त्याच कुटुंबाचा सदस्य आहे. तेच माझं कुटुंब आहे. जन्मदात्या आईपेक्षा जीवन देणारी आईच श्रेष्ठ असते. राधा माझी खरी आई आहे. तिनं आपलं रक्त आटवून माझं पोषण केलंय. माझ्या शरीरातलं रक्त हे तिचंच रक्त आहे. माझ्या शरीरातली एक एक पेशी तिची ऋणी आहे. कुन्तीनं आजपर्यंत माझी काहीच खबरबात घेतली नाही. कोणी आई असं करू शकेल का? तिनं तसं अशासाठी केलं की, तिला आपले पाच पुत्र आहेत. राधाला तर एकच पुत्र आहे. मला माझ्या त्या मातेशी कृतघ्न होण्याचा सल्ला तू देत आहेस काय कृष्ण? गेली तेरा वर्ष धृतराष्ट्राच्या महालात मी दुर्योधनाच्या आश्रयाने राजभोग भोगत आहे. माझ्या बळावरच दुर्योधन पांडवांशी युद्धाला ठाकलाय. त्यानं मला अर्जुनाशी द्वन्द्व युद्ध करायला सांगितलंय. यासाठीच मी भय किंवा लोभामुळेही दुर्योधनाशी अन्याय नाही करणार. मी अर्जुनाशी युद्ध केलं नाही, तर आम्हा दोघांचीही अपकीर्ती होईल. तू तर जाणतोसच कृष्णा, की मी दुर्योधनाचा किती ऋणी आहे! सारे पांडव मला दुत्कारत असताना दुर्योधनानेच मला आदर दिला. त्यावेळी तर तूही माझं जन्मरहस्य अन् माझे जन्मजात गुण जाणत होतास. मग मी कोण हे जगाला तेंव्हाच का नाही सांगितलंस? आज मी जो कोणी, जसा कसा आहे, तो सगळा राधा अन् दुर्योधनामुळेच आहे. मी मन, प्राण अन् शरीराने त्यांच्या ऋणसूत्रात बांधलेला आहे. त्यांच्याशी विश्वासघात मी नाही करू शकणार. तुझं सहाय्य मिळून पांडव नक्कीच विजयी होतील. मी मोठा भाऊ आहे, हे युधिष्ठिराला समजलं तर तो राज्याची इच्छा करणार नाही. मी सगळं विश्व जिंकून घेतलं तरी ते



दुर्योधनालाच देईन. म्हणूनच युधिष्ठिराला साऱ्या पृथ्वीचं शासन करू दे. पांडवांना तुच्छता दाखवत मी दुर्योधनाला प्रसन्न करण्यासाठी आपले विचार प्रकट केले आहेत. त्यासाठी मला आता पश्चात्ताप वाटतो आहे. पण माझं हे बोलणं तू कुणाला सांगू नकोस. अन् अर्जुनाला युद्धासाठी तयार कर."

यावर कृष्ण हसून म्हणाला, "म्हणजे तुला राज्याची इच्छा नाहीय तर! ठीक आहे. हा महिना युद्धाला अनुकुल आहे. एका आठवड्यात अमावस्या येईल. तू भीष्म, द्रोण अन् कृपाचार्य यांना सांग की त्या दिवशी युद्ध सुरू करावं. तूही तयार हो युद्धाला!"

यानन्तर कृष्णाने कर्णाला आलिंगन दिले. आणि कृष्णाचा निरोप घेऊन कर्ण आपल्या रथातून घरी परतला.

कृष्ण निघून गेल्यावर विदुर कुंतीदेवीजवळ जाऊन म्हणाला, "मला जे हवं होतं, तेच घडत आहे. पांडव अन् कौरव मिळून युद्धात लाखो लोकांचा बळी द्यायला निघाले आहेत. कृष्ण आपल्या कार्यात असफल होऊन परत गेलाय."

कुंतीदेवीलाही युद्धात भीष्म, द्रोण आदीसारख्या महापुरुषांचा मृत्यु होणं फारच भयंकर वाटलं. तिला असे वाटले की, आपल्या पुत्रांकडून ज्ञानी लोकांचा वध होऊन विजय मिळण्यापेक्षा दारिद्र्यात धडपडून मरणं बेहत्तर आहे. तिच्या असेही मनात आले की, येणाऱ्या विपत्तींचं मूळ कारण कर्णच आहे अन् पांडवांचा द्वेष करत तो त्यांना मारण्याचा निश्चय करून चुकला आहे. म्हणून तिने कर्णाच्या मनात पांडवांबद्दल अनुकुल भाव निर्माण करायचा निश्चय केला आणि ती गंगाकिनारी पोचली. कर्ण तिथे जप करत होता.

जप संपल्यावर कर्णाला कुंती दिसली तेंव्हा तिला प्रणाम करून तो म्हणाला, "माते मी कर्ण आहे, तुझ्या पायांवर माझे प्रणाम ! बोल, काय कामासाठी आली आहेस माझ्याकडे? माझ्याकडून तुला कसली मदत हवीय?"

"पुत्रा, तू माझाच मुलगा आहेस. राधाचा मुलगा नव्हेस, अन् सारथीकुळातलाही नव्हेस. विश्वास ठेव माझ्यावर. तुझी आपल्या भावांशी ओळख नाहीय. दुर्योधनासाठी महान् पाप करायला निघाला आहेस तू! हे अनुचित आहे. अर्जुनाने आपल्या शक्तीने जिंकलेलं राज्य कौरवांनी हडपलं आहे. ते धृतराष्ट्र-पुत्रांकडून घेऊन तूच त्या राज्यावर शासन कर. बलराम अन् कृष्णा प्रमाणे तू अन् अर्जुन प्रेमाने रहा. तुम्ही दोघं एक झालात तर तुम्हाला काहीही असंभव रहाणार नाही." कुंती प्रेमाने म्हणाली.



हे बोलणे ऐकून जराही विचलित न होता तो कुन्तीदेवीला म्हणाला, "माते, मी तुझं सांगणं ऐकू शकत नाही. तू माझ्यावर महान् अन्याय केला आहेस. पाप केलं आहेस तू! कोणी शत्रू सुद्धा माझ्याबाबतीत असं पाप करू शकणार नाही. मी क्षत्रीय म्हणून जन्म घेऊनही सूतकुलात वाढलो आहे. क्षत्रीयांच्या संस्कारांशी मी अगदीच अपरिचित आहे. आजपर्यन्त माझं कुशलक्षेम जाणून घ्यायचा तू प्रयत्नही केला नाहीस. आज स्वतःच्या हितासाठी मला तू सामोपचाराच्या गोष्टी सांगते आहेस. यावेळी मी पांडवांच्या पक्षात गेलो, तर लोक म्हणतील की मी घाबरून त्यांच्याकडे गेलो. युद्धाची तयारी झाल्यानंतर मी असं घोषित केलं, की मी पांडवांचा भाऊ आहे. तर सगळे राजे माझी निन्दा नाही करणार? धृतराष्ट्राच्या पुत्रांनी मला आश्रय देऊन माझा आदर-सत्कार केला. मी त्यांचा निरादर करू काय? माझ्या शक्तीवर अवलंबून ते युद्धाला तयार झाले आहेत. त्यांचं ऋण चुकवण्यासाठी मला आपल्या प्राणांची आहुती द्यायला हवी. दुर्योधन आदि कौरवांबरोबर मी अन् माझे पुत्र-आम्ही शेवटपर्यन्त लढू. तू आपल्या पुत्रांसाठी भिऊन माझ्याजवळ आली आहेस, तरीही मी तुला निराश करणार नाही. मी तुझ्या पुत्रांपैकी अर्जुन सोडून अन्य कोणाचाही वध करणार नाही. अर्जुनाचा वध करण्यानंच माझं बळ अन् पराक्रम सार्थकी लागतील. युद्धात अर्जुन मारला गेला, तरीही मी धरून तुझे पाच पुत्र जिवन्त रहातील; अन् मी मारला गेलो, तरीही पाच जिवन्त राहतीलच. तुझे सहा पुत्र कधीच जिवन्त राहू शकणार नाहीत; याबद्दल खात्री बाळग!"



दुःखावेगात कर्णाला आलिंगन देऊन कुन्ती बोलली, "पुत्रा, विधीच्या विधानात कौरवांचा विनाश नक्कीच लिहीलेला आहे. पण ही गोष्ट विसरू नकोस, कि तू आपल्या चार भावांचा जीव वाचवायचं वचन दिलं आहेस. तुझं कल्याण असो." कुंतीने कर्णाला असा आशिर्वाद दिला. कुंतीच्या पावलांना स्पर्श करून कर्णाने तिला प्रणाम केला व तो आपल्या घरी गेला. कुंतीही आपल्या निवासस्थानी परतली.

हस्तिनापुराहून उपप्लाव्यला परत गेल्याबरोबर कृष्णाने पांडवांना सगळा समाचार सांगितला. पांडव कृष्णाची मोठ्या आतुरतेने वाटच पहात होते. कृष्णाने त्यांना दुर्योधनाचे कपट, धृतराष्ट्राची कपट-नीती अन् कुंतीच्या दुःखाबद्दल सर्व काही सविस्तर सांगितले. कर्णाशी एकान्तात घडलेल्या

भेटीबद्दलही कृष्णाने युधिष्ठिराला सांगितले. कृष्णाने हेही सांगितले की, दुर्योधनापुढे, द्रोणाचार्य, कृपाचार्य आणि खुद्द पितामहसुद्धा किती विवश आहेत. नंतर बराच वेळ त्याने पांडवांशी चर्चा केली. नंतर आपल्या निवासस्थानी जाऊन विश्रांती घेतली.

त्या दिवशी रात्री पांडवांनी युद्धाची तयारी वगैरेंसंबंधी कृष्णाबरोबर गंभीर चर्चा केली. पांडवांच्या पक्षाकडून लढण्यासाठी सात अक्षौहिणी इतके सैन्य तयार होते. एकेला अक्षौहिणीसाठी एक एक नेता नियुक्त करण्यात आला. विराट, द्रुपद, धृष्टद्युम्न, शिखण्डी, सात्यकी, चेकितान व भीम हे सात जण सात अक्षौहिणींचे नेता नियुक्त झाले. या सात नेत्यांचा एक महानायक असावा, की जो भीष्मांची बरोबरी करु शकेल, असा व्यक्ती कोण बरं असेल? हा प्रश्न युधिष्ठिराने आपल्या भावांना विचारला. यावर सहदेवाने विराटचे नाव सुचवले, नकुलने द्रुपदाचे, अर्जुनाने धृष्टद्युम्नचे अन् भीमाने शिखण्डीचे नाव सुचवले कोणाही दोघांच्या विचाराचा मेळ बसत नव्हता, म्हणून युधिष्ठिराने सल्ला दिला की, श्रीकृष्णाच्या विचाराने महासेनापती नियुक्त केला जावा. यावर कृष्णाने धृष्टद्युम्नालाच पाठिंबा दिला.

सर्व राजांना जेंव्हा कळले की, पांडवांच्या सेनेचा मुख्य सेनापती धृष्टद्युम्न निवडला गेला आहे, तेंव्हा सर्वांनाच खूप आनन्द झाला. सैनिक-संचालन सुरु झाले. रथ पुढे झाले, शंख व दुंदुभींचा निनाद ऐकू येऊ लागला. तेंव्हा पांडवांचे सैन्य महासागरप्रमाणे चालू लागले. सेनेच्या अग्रभागी भीम, नकुल अन् सहदेव चालू लागले. त्यांच्या मागे अभिमन्यु, उप पांडव, धृष्टद्युम्न आणि पांचाल योद्धा चालले. सेनेच्या मध्यभागी युधिष्ठिर होता. सैन्याबरोबर तऱ्हतऱ्हेची वाहने, यंत्रवाली आयुधे, वैद्य व परिचारकही होते. परन्तु द्रौपदी मात्र दास-दासींबरोबर उपप्लाव्यलाच राहिली.

पांडवांनी सैन्याबरोबर रवाना होण्यापूर्वी ब्राह्मणांना गायी व सोने यांचे दान देऊन त्यांचे आशिर्वाद प्राप्त करून घेतले.

सैन्याच्या पृष्ठभागी विराट, कुंतिभोज, धृष्टद्युम्नचे पुत्र, चाळीस हजार रथ, दोन लाख घोडे, पाच लाख पायदळ सैन्य, सात हजार हत्ती बरोबर घेऊन चेकितान, धृष्टकेतु, सात्यकी, कृष्ण व अर्जुनही चालू लागले.

महासेना कुरुक्षेत्रावर पोचताच शंखध्वनी सुरु झाला. सैनिक परमानंदित होऊन सर्व दिशा प्रतिध्वनित करून सिंहनाद करु लागले.

**क्रमशः**





# खरा न्याय

प्राचीन काळी गौतमी नदीच्या किनारी धनगुप्त नावाचा एक दरिद्री माणूस रहात असे. आपलं नाव अगदीच निरर्थक आहे, या विचाराने त्याला फार वाईट वाटे. धन कमवण्यासाठी त्याने खूप प्रयत्न केले. पण एकही सफल झाला नाही. शेवटी जगायचा कंटाळा येऊन त्याने नदीत उडी मारली.

नेमक्या त्याच वेळी तिकडून जाणाऱ्या एका गोसाव्याने त्याला वाचवले अन् विचारले, "तुला मरावंसं का वाटलं?"

धनगुप्तने त्याला आपली सारी रामकहाणी सांगितली. एक ताईत त्याच्या हाती देत गोसावी म्हणाला, "तू हा कायम बांधून ठेवलास, तर तुझं नशीब उघडेल बघ! खूप पैसेवाला बनशील तू." अन् गोसावी आपल्या वाटेने निघून गेला.

आता गोसाव्याच्या ताइताचा प्रभाव, कि धनगुप्तमधे उत्पन्न झालेला आत्मविश्वास याच्यामुळे काय की, पण त्या दिवसापासून धनगुप्त जे काम करु पाही, ते चांगलंच सफल होऊ लागले. थोड्याच दिवसात तो गावातल्या धनवान लोकांमधे गणला जाऊ लागला. त्याने एका सुन्दर मुलीशी विवाह केला अन् काही काळानन्तर त्याला एक मुलगाही झाला. आता त्याचे दिवस आरामात जाऊ लागले. अन् त्याला आता कसल्याही गोष्टीची कमतरता उरली नाही.

हळूहळू त्याने मोठ्या प्रमाणावर सुरू केला. कित्येक शेतं, गुरंढोरं, वाहन सर्व काही मिळवलं धनगुप्तने. आपली ही सारी कामं पहाण्यासाठी त्याने एका मुन्शीचीही नेमणूक केली.

काही दिवसांनी धनगुप्तची बायको वारली. आणखी काही दिवसांनी धनगुप्तही आजारी पडला. आपला मृत्यु निकट येऊन पोचला आहे, असे जेंव्हा त्याला कळून चुकले, तेंव्हा आपल्या मुलाची काळजी घेणारं कोणी उरणार नाही हे जाणून त्याने गावच्या चार वडीलधाऱ्या माणसांना बोलावून घेतले आणि त्यांच्या समोर मृत्युपत्र लिहवून घेतले. मृत्युपत्र असे होते.

**पंचवीस वर्षापूर्वी चान्दोबात प्रकाशित झालेली कहाणी**





"माझ्या मृत्यूनन्तर माझ्या साऱ्या स्थावर जंगम इस्टेटीचा रक्षक मुन्शी असेल अन् तो माझ्या मुलाच्या सगळ्या गरजा पुऱ्या करील. माझा मुलगा सज्ञान झाला, की मुन्शी माझ्या इस्टेटीतलं जितकं स्वतःसाठी पसंत करेल, तितके माझ्या मुलाला देईल. अन् बाकीचं स्वतःसाठी ठेवेल."

हे मृत्युपत्र पाहून सर्वच वडीलधारी माणसं आश्चर्यात पडली. पण मुन्शी फारच खूश झाला. त्याला वाटले की, शेवटच्या दिवसात मालकाची बुद्धी भ्रष्ट झाली.

मृत्युपत्र लिहिल्यावर निश्चिंत होऊन धनगुप्तने कायमचे डोळे मिटले.

धनगुप्तचा मुलगा सज्ञान होईपर्यन्त मुन्शीने त्याला काहीही कमी पडू दिले नाही.

त्याने धनगुप्तच्या मुलाला चांगले शिक्षण देऊन सर्व प्रकारे योग्य बनवायचा प्रयत्न केला. त्याच्या प्रत्येक इच्छेची अन् छंदाचीही कदर केली. कारण पहाणारांच्या मनात 'तो धनगुप्तचा विश्वासपात्र मुन्शी आहे 'अशी प्रतिमा बनून रहावी. आतून तो फारच खूश होता, कारण मृत्युपत्राप्रमाणे धनगुप्तची सारी इस्टेट तर त्याचीच होती. असे तो समजत होता. त्याने धनगुप्तच्या मुलाला सर्व प्रकारे योग्य व समजदार अशासाठी बनवले की आपण त्याला जे देऊ, त्यात तो खूश राहील अन् स्वतःच पैसा कमवेल. अन् तो जर दुष्ट निघाला तर मृत्युपत्राची पर्वा न करता आपल्या पित्याची इस्टेट त्याच्याकडून बळकावून घेईल.

धनगुप्तचा मुलगा जेंव्हा सज्ञान झाला, तेंव्हा त्याने मुन्शीकडे आपली इस्टेटीची मागणी केली.

मुन्शीने एक ताईत त्याच्या हाती देत म्हटले, "या ताइताच्या आधारानेच तुझ्या पित्याने हा सारा जमीनजुमला कमवला आहे. आपल्या पित्याच्या इस्टेटीपैकी हा ताईतच घे तू. बाकी सर्व माझं आहे."

धनगुप्तचा मुलगा आश्चर्यात पडला. त्याने मुन्शीला विचारले, "हा कसला अन्याय? माझ्या पित्याची सगळी इस्टेट तुम्ही कशी घेऊ शकता? त्यावर तर सगळा अधिकार माझाच आहे!"

"तुझ्या पित्यानं मृत्युपत्रात असंच लिहीलं आहे की, त्यांच्या इस्टेटीतून मला जितकं हवं, तितकं मी घेऊ शकतो अन् जितकं मला वाटेल, तितकं तुला देऊ शकतो. पाहिजे तर तू ते पाहू शकतोस." मुन्शी म्हणाला.



**(तुमच्या जीवनात जेंव्हा अडचणींना तोंड द्यावे लागले, तेंव्हा असेच समजा की ही भगवंताची कृपा आहे. अन् खरोखर तसेच घडेल. - श्री माँ**

धनगुप्तचा मुलगा पित्याचं मृत्युपत्र घेऊन काजीकडे गेला. त्याने तक्रार केली, "या मृत्युपत्राच्या आडून मुन्शी माझ्या पित्याची सारी इस्टेट हडपू पहात आहेत. आपण त्याचा न्याय करावा. माझ्यावर अन्याय होऊ नये."

काजीने मृत्युपत्र काळजीपूर्वक वाचले. अन् मुन्शीला बोलवून विचारले, "काय हो! हा मुलगा आता सज्ञान झालाय. आणि आपल्या पित्याची इस्टेट मागतोय. मग इथवर तक्रार आणायची काय गरज? आपण होऊनच त्याला त्याची इस्टेट द्यायची ना!"

"होय हुजूर, मी देणार नाही, असं कधी म्हटलं? माझ्या मालकांनी सगळा जमीनजुमला या ताईताच्या आधारानेच कमावला आहे. म्हणूनच मी त्याला हा ताईत घ्यायला सांगतो आहे; बाकी सारं मी ठेवणार आहे. मृत्युपत्रात तर स्वच्छ लिहीलं आहे की, मी हवं तितकं स्वतःला ठेवू शकतो." मुन्शी बोलला.

"तर मग तो ताईत सोडून बाकी सारी इस्टेट तुला पसंत आहे?" काजीने विचारले.

"होय. मी तर तीच विनन्ती करतोय तुम्हाला!" मुन्शी म्हणाला.

"अच्छा, असं असेल तर ताईत तू ठेव अन् मालकाची सगळी इस्टेट याला दे. या मृत्युपत्रात असंच लिहिलं आहे की, तुला जे पसंत आहे, तेच तू ठेवावेस." काजीने म्हटले.

आता मात्र मुन्शीचा चेहरा पांढरा पडला! त्याने मृत्युपत्र पुन्हा वाचलं. त्याच्या ध्यानात आलं की काजीचं म्हणणं अगदी बरोबरच आहे. मृत्युपत्र समजण्यात आपलीच चूक झालीय. त्याने ताबडतोब धनगुप्तची सगळी इस्टेट त्याच्या मुलाला देऊन टाकली.







# जंगलातला सोबती

गोपाळची आई एक गरीब विधवा होती. तिच्या नवऱ्याने मागे सोडलेली संपत्ती म्हणजे फक्त एक जमिनीचा लहानसा तुकडाच तेवढा होता. या जमिनीतून काही भाज्यांची पैदास करी. तिच्याजवळ एक चरखाही होता. गावचा एक व्यापारी तिला कापूस देऊन तिने कातलेले सूत घेत असे. मजुरी म्हणून व्यापारी तिला थोडे तांदूळ देत असे.

इतक्या सीमित साधनांतूनच ती स्वतः व गोपाळचा उदरनिर्वाह चालवत असे. आपल्या जीवनात दोनच वस्तु तिच्या आवडीच्या होत्या. एक म्हणजे तिचे इष्ट-दैवत कृष्ण (त्याला ती गोपाळच म्हणे) अन् दुसरा आपला मुलगा गोपाळ. आपल्या गोपाळप्रमाणेच इष्ट-देव गोपाळशीही तिची वागणुक असे. त्या दोघांना खाणं खाण्यासाठी अन् रात्री झोपण्यासाठी ती विनवत असे.

थोडा मोठा झाल्यावर गोपाळ शाळेत जाऊ लागला. तो स्वतः रामायण-महाभारत तिला वाचून दाखवू शकेल अशा दिवसाची ती आतुरतेनं वाट पहात असे.

पण एकदा गोपाळपुढे एक अडचण उभी राहिली. घर व शाळा यांच्यामधे कुठे-कुठे तर एकदम निर्जन दाट झाडांनी भरलेलं एक स्थान होतं. तिथून जाताना त्याला भीती वाटे. त्यामुळे शाळेत जायला तो कां-कूं करू लागला.

"अरे बाळा, तुझा मोठा भाऊ त्याच जंगलात रहातो. त्याचं नावही गोपाळच आहे. तुला जेंव्हा भीती वाटेल, तेंव्हा आवाज देऊन तू त्याला बोलाव. तुझी हाक त्याला नक्की ऐकू जाईल. अन् तो तुला सोबत करील." एके दिवशी आईने गोपाळला सांगितले.

"तू कधीच त्याच्याबद्दल बोलली नाहीस माझ्याजवळ! तो एकटाच जंगलात काय करतो?" गोपाळने बालसुलभ उत्सुकतेने विचारले.

"तो गुरांची देखरेख करतो अन् बासरी वाजवतो." आईने सांगितले.

दुसऱ्या दिवशी जंगलातून जाताना गोपाळने एकाग्र चित्ताने बासरीचा आवाज ऐकायचा प्रयत्न केला. अन् खरोखरच एक मन्दसा मधुर स्वर त्याच्या कानी येऊ लागला. हळूहळू आवाज जास्त स्पष्ट होत चालला. यापेक्षा जास्त सुरेल आवाज त्याने



पूर्वी कधीच ऐकला नव्हता.

"गोपाळदादा! मी तुझा धाकटा भाऊ आहे! माझं नावही गोपाळच आहे. कुठे आहेस तू? जंगलातल्या अति शांततेमुळे मला भीती वाटते. तू मला सोबत का करत नाहीस?" गोपाळ हाका मारत म्हणाला.

त्याला ही-ही-ही करत हसणाऱ्या एका बालकाचा आवाज ऐकू आला. अन् ताबडतोब त्याच्यापेक्षा थोडा मोठा असा एक मुलगा त्याच्या समोर प्रकट झाला. छोटा गोपाळ, मोठ्या गोपाळवर जणू मोहित झाला ! अन् मोठ्या गोपाळने त्याला जंगल पार करीपर्यंत सोबत दिली.

"मी नेहमी व्यस्त असतो. तेंव्हा, तुला जेंव्हा खरंच भीती वाटेल, तेंव्हाच फक्त बोलवत जा मला." मोठ्या गोपाळने सुचवले.

"मला आता तू माहीत झाला आहेस, म्हणून आता मला बहुधा भीती वाटणारच नाही. मी नेहमी तुझी आठवण ठेवत राहीन."

"हाँ, हे ठीक होईल."

"पण जंगल पार करताना मी भ्यायलो नाही, तरी कधी-कधी खेळण्यासाठी माझ्याजवळ येणार नाहीस?"

"हा चांगला विचार आहे. मला खेळायला खरंच फार आवडतं." मोठा गोपाळ म्हणाला.

म्हणून कधी-कधी गोपाळ आपल्या गोपाळदादाला बोलवत असे अन् जंगलाच्या अंधुक प्रकाशातून तो अचानक प्रकट होई. नंतर दोघं एकत्र खेळत रहात.

गोपाळ आपल्या नव्या साथीदाराबद्दल आणि त्याच्याशी खेळल्याच्या आनन्दाबद्दल सर्वकाही आपल्या आईला सांगे अन् आई मुलाला नकळत कृतज्ञतेचे अश्रू काढत पुटपुटत आपल्या इष्टमुलाला धन्यवाद देई.

गोपालच्या गुरुजींना आपल्या पित्याचे अंतिम संस्कार करायचे होते. रीतीप्रमाणे सर्व शिष्यांनी आपल्या कुवतीप्रमाणे अशा वेळी काही दान करावे लागे.

गोपाळला माहीत होते की त्याच्या आईजवळ गुरुजींना देण्यासाठी काहीही नव्हते. त्यामुळे त्याने आईजवळ हा विषय काढलाच नाही. तरीही आपण एकटेच शिष्य असे आहोत की, आपण गुरुजींपुढे मोकळ्या हातांनी जाणार आहोत - या विचाराने तो उदास झाला.

"तू उदास का दिसतोस?" जंगलात दोघं भाऊ भेटले, तेंव्हा मोठ्या गोपाळने विचारले. छोट्याने आपली अडचण सांगितली. माझ्याजवळ दुधाने



भरलेलं एक पात्र आहे. ते घेऊन जा तू गुरुजींकडे!" एका स्वतन्त्र जागेतून पात्र आणून देत मोठा गोपाळ म्हणाला.

छोट्या गोपाळच्या आनन्दाला पारावार उरला नाही.

शाळेत गुरुजींना शिष्यांनी भेटीदाखल निरनिराळ्या वस्तु दिल्या - नारळ, तांदूळ, केळी, गूळ इ. काहींनी पैसे दिले.

शेवटी संकोचाने उभ्या असलेल्या गोपाळची पाळी आली. गुरुजींनी त्याच्याजवळचे पात्र घेऊन दूध एका मोठ्या भांड्यात ओतले. पण त्यांच्या हातातले पात्र पुन्हा दुधाने भरून गेले! त्यांनी ते पुन्हा रिकामे केले. पण रिकामे करताच पुन्हा ते काठोकाठ दुधाने भरून गेले!

हा चमत्कार पाहून गुरुजींना चक्कर येऊ लागली. मोठ्या कष्टानेच त्यांनी स्वतःला सांभाळून उभे ठेवले. कोणी पहाण्यापूर्वीच पात्र हातात ठेवून गोपाळला एक निराळ्या खोलीत घेऊन जाऊन ते दूधपात्र कुठे मिळाले याबद्दल चौकशी केली. गोपाळने त्यांना आपल्या गोपाळदादाशी कधीकधी होणाऱ्या मुलाखतींबद्दल सांगितले. हा मोठा गोपाळ कोण, हे समजायला त्या ज्ञानी गुरुजींना मुळीच वेळ लागला नाही.

"अरे माझ्या बाळा, तू जंगलात मला तुझ्या दादाकडे घेऊन नाही जाणार?" गोपाळला विनवत गुरुजी म्हणाले.

"का नाही?"

गोपाळ गुरुजींना घेऊन जंगलात गेला आणि गोपाळदादाला पुढे येण्यासाठी खूपदा हाका मारल्या. पण व्यर्थ! खूप वेळ गेला. तरीही गोपाळदादा आलाच



नाही.

छोट्या गोपाळला वाटले की आज आपला दादा गायींना घेऊन बराच दूर गेला असावा. म्हणून गुरुजींना घेऊन "दादा" "दादा" अशा हाका मारत तो जंगलात बराच खोलवर गेला. पण गायींच्या घंटाही ऐकू आल्या नाहीत अन् गोपाळदादाच्या मुरलीचा आवाजही आला नाही.

सूर्यास्त व्हायला आला होता अन् संध्याकाळचा काळोख हळुहळू जंगलात उतरू लागला. रातकिड्यांचा आवाज वाढू लागला अन् वटवाघळांची चीं चीं सुरु होऊन जंगलाचे वातावरण भयानक होऊ लागले. तरीही हे लक्षात न येऊन गोपाळ जंगलात पुढे पुढेच जात राहिला. गुरुजी मन्त्रमुग्ध झाल्यासारखे त्याच्या मागेमागे जात राहिले - जणू काही आज त्यांना आपल्या गुरुकडून जीवनाच्या सिद्धीचा

महामन्त्रच मिळणार आहे! त्यांच्या डोळ्यातून अविरत अश्रू वहात होते.

निराश छोट्या गोपाळला अपमानित अन् लज्जित झाल्या सारखे वाटले. अन् आपल्या दादाला धमकी देत म्हटले, "तू जर आमच्या समोर प्रकट झाला नाहीस, तर मी पुन्हा कधीही तुझ्याशी खेळणार नाही.

अन् तेंव्हाच त्याला आपल्या दादाचा आवाज ऐकू आला.

"पण तू जितका माझ्याशी खेळतोस, तितकाच मीही तुझ्याशी खेळतो नं! माझी काय चूक आहे, की तू मला खेळाच्या आनन्दापासून वंचित करावंस? आपल्या गुरुजींना सांग की, मी त्यांच्या जिज्ञासेची प्रशंसा करतो, त्यांनी मला पहावं किंवा ऐकावं अशी वेळ अजून आलेली नाहीय. त्यांना वाट पहावी लागेल. मी आश्वासन देतो की ते जेंव्हा खरोखर एक दिवस नक्कीच आपलं ध्येय गाठू शकतील. तेंव्हा लायक होतील. यासाठी तयार होतील.

"गुरुजी, गोपाळदादाचं बोलणं ऐकलंत तुम्ही?" गोपाळने विचारले.

"नाही!"

"नाही? पण मी तर अगदी स्पष्ट ऐकलं." गोपाळ म्हणाला. अन् त्याने ते बोलणं अगदी अक्षरशः गुरुजींना सांगितले.

बालकासारखे हुंदके देत गुरुजी म्हणाले, "मला इतकंच पुरेसं आहे माझ्या बाळा कि मला एका वराचं वचन तर मिळालंय! तुझ्या आईची निष्ठा महान आहे, तुझं प्रेम अपूर्व आहे तुम्ही दोघंही धन्य आहात!"

आतापर्यंत रात्र झाली होती. गुरुजी गोपाळला सोडायला त्याच्या घरापर्यंत गेले. त्याच्या आईला माहीत होतं की, तिच्या छोट्या गोपाळला आपल्या गोपाळदादाशी खेळताना कधीकधी घरी यायला उशीर होतो, म्हणून ती निश्चिन्त होती. गुरुजी गोपाळच्या आईच्या पायांना स्पर्श करत म्हणाले, "आज तुमच्या गोपाळनं मला भक्तीचा असा महामन्त्र दिलाय की, माझ्या आत्म्याचा अंधःकार नाहीसा झालाय. धन्य आहात तुम्ही, अन् धन्य तुमचा गोपाळ!"



# चालू महिन्यात जन्मलेली विशेष व्यक्ती

## तीन यशस्वी गुरु



शिखांच्या दहा गुरूंपैकी तीन गुरुंचा जन्म एप्रिल महिन्यातच झाला. सन १५०४ मधे २३ एप्रिलला गुरु अंगद, सन १५६३ मधे १४ एप्रिलला गुरु अर्जुन व सन १६२१ मधे १२ एप्रिलला गुरु तेग बहादुर या धरातलावर अवतरले.

आपणा सर्वांना माहीतच आहे की शीख धर्माची स्थापना गुरु नानक (१४६९-१५३८) यांनी केली. आपल्या अखेरच्या दिवसात समुदायाला मार्गदर्शन करण्यासाठी आपल्या शिष्यांपैकी कोणा एकाला आपला उत्तराधिकारी बनवणं त्यांना आवश्यक वाटले. त्यांच्या शिष्यांमधे त्यांचे स्वतःचे दोन पुत्रही होते. परन्तु गुरु नानक व्यक्तिगत संबंधापासून बरेच वर उठलेले होते. त्यांच्या दृष्टीने अंगद सर्वांपेक्षा अधिक योग्य होता. म्हणून त्यांनी त्यालाच आपला उत्तराधिकारी बनवले.

आणि खरोखरीच अंगद एक उच्च कोटीचा नेता व उपदेशक सिद्ध झाला.

पाचवे गुरु अर्जुनदेव हे चौथे गुरु रामदास यांचे पुत्र होते. अर्जुनदेवनेच पवित्र ग्रंथ "आदि ग्रंथ" याचे संकलन केले. यात त्यांनी आपल्या अगोदरच्या गुरुंच्या रचना व हिन्दु धर्माच्या वाणीही सम्मिलित केल्या.

त्यांनी आपले पिता सम्राट जहाँगीरच्या विरुद्ध विद्रोह करणाऱ्या राजकुमार खुसरोला मदत केली. त्यांनी खुसरोची राजनैतिक महत्वाकांक्षा प्रोत्साहित करण्या साठी नव्हे, तर त्याच्या संकटग्रस्त स्थितीवर दया आल्यामुळे मदत केली. परंतु जहाँगीरला हे आवडले नाही व त्याने गुरु अंगदला मारून टाकले.

नववे गुरु, गुरु तेग बहादुर हे सम्राट औरंगजेबच्या क्रोधाचे बळी ठरले कारण त्यांनी काश्मीरच्या ब्राह्मणांवर त्याने केलेल्या क्रूर अत्याचाराला विरोध केला. औरंगजेबने त्यांना चर्चा करण्यासाठी बोलावले व कपटाने क्रूरतापूर्वक मारून टाकले.

शिखांच्या इतिहासाने या घटनेमुळे एक वळण घेतले. गुरु तेगबहादुरचे पुत्र वीर गोविन्द सिंह यांनी मोगल शासकाच्या अत्याचारां विरुद्ध शिखांना अनवरत युद्धासाठी प्रेरित केले.



# भारत :

## तेंव्हा व आता



## मुंबई

### सात छोट्या बेटांवर स्वार

केंव्हातरी एकमेकांपासून निराळी असणारी ती लहान बेटं आता आपल्याला दिसू शकत नाहीत. परन्तु त्या सर्वांना मिळून बम्बई म्हटले जात असे. हे नाव नगराची अधिष्ठात्री देवी मुम्बादेवी किंवा मुंबा-बाई हिच्या नावावरून पडले. देवीचं मूळ नाव अम्बा भवानी होते. आता बम्बईला मुंबई म्हटले जाते. हे नाव तिच्या प्राचीन अुपनिवेशिक ओळखीच्या खूपच जवळ आहे.

हिचा अुपनिवेशिक भूतकाळ १६ व्या शतकापर्यन्त मागे जातो. पोर्तुगीज सेनाध्यक्ष अल्बुकर्क याने सन १५१० मधे गोव्यावर अधिकार मिळवला होता आणि १५३४ मधे तो एका खूप मोठ्या क्षेत्राचा जमीनदार बनला होता. यातच 'ब्रिना अुरबिस' म्हणजे 'सुन्दर शहर' हे स्थानही सामिल होते.

त्या क्षेत्रामधे या नावाच्या आधुनिक अर्थाचे कोणतेच शहर नव्हते. परन्तु बाजार किंवा कसबे मात्र नक्कीच होते. कारण ईसवीच्या शतकांपूर्वी ते क्षेत्र सीरिया, पर्शिया आणि रोमच्या व्यापाराचं आकर्षण - केन्द्र होते.

काहीही असो, पोर्तुगीज ही जमीनदारी विशेष महत्वाची मानत नसत. ज्यावेळी त्यांची राजकुमारी कॅथरिन द ब्रॅगांझा हिच्याशी ब्रिटीश राजपुत्र दुसरा चार्लस याने विवाह केला तेंव्हा पोर्तुगीजांनी ही जमीनदारी त्याला आंदण म्हणून दिली.

आणि किंग चार्लसने तरी या भेटीचं काय केलं? जमीनदारीपासून त्यावेळी त्याला दरवर्षी दहा पौंडापेक्षा जास्त अुत्पन्न मिळत नसे, कारण त्याने या दरानेच ही जमीनदारी ईस्ट इंडिया कंपनीला पट्ट्यावर देअून टाकली.

हळूहळू सातही छोटी बेटं मिळून मुख्य भूभागाला मिळून एक मोठा भूखंड बनली.

याची वृद्धी अन् समृद्धी नन्तर मात्र फार वेगाने झाली. कधी काळी आपल्या मालकाला फक्त दहा पौंड वार्षिक अुत्पन्न देणारी आजची महाराष्ट्राची राजधानी भारताची आर्थिक राजधानी आहे. सर्व मुख्य बँकांची प्रमुख कार्यालये मुंबईत असून इथे देशाचा सर्वांत मोठा शेअर-बाजारही आहे. संपूर्ण देशाला आय कराद्वारे मिळणाऱ्या अुत्पन्नाचा ३३ टक्के तर एकट्या मुंबईतूनच येतो!



मुंबईहूनच भारतातली पहिली आगगाडी सन १८५२ मधे आपलं पहिलं गन्तव्य स्थान ठाण्याकडे खाना झाली होती. यूरोपहून येणाऱ्या जहाजांसाठी हेच पहिले बंदर होते. अन् आज देशाचं सर्वात मोठं बंदर आहे. भारताच्या स्वातन्त्र्य संग्रामातही मुंबईचे सहाय्य अशा अर्थाने निराळेच राहिले की भारतीय कॉंग्रेसचे पहिले अधिवेशन सन् १८८५ मधे इथेच घेतले गेले होते.

मुंबईच्या विकासात केवळ महाराष्ट्र, गुजराथ व दक्षिण भारताचाच नव्हे, तर पारशी लोकांचाही फार महत्वाचा हात होता. हे पारशी इस्लामच्या वाढत्या प्रभावात आपला धर्म सोडायला तयार नसल्याने इराणमधून इथे येअून वसले.

मुंबईच्या इतिहासाचा प्रत्येक कालखंड स्मारकांच्या रूपाने इथे आपले पद-चिन्ह सोडून गेला आहे. त्यांच्यात अफगाणी चर्च, गेट वे ऑफ इंडिया, छत्रपती शिवाजी टर्मिनस (पूर्वीचे व्हिक्टोरिया टर्मिनस) व महालक्ष्मी मंदिर ही स्मारकं विशेष महत्वाची आहेत.

मुंबई हे फिल्म अुद्योगाचे जगातले बहुधा सर्वात मोठे केन्द्र आहे. यासाठीच अमेरिकेची फिल्म सिटी हॉलिवुडच्या चालीवर याला बॉलिवुड असे म्हटले जाते.

गणेश चतुर्थीच्या दिवशी संपूर्ण शहराचे वातावरण आनन्दी होअून जाते.

आज बृहन् मुंबईची लोक संख्या ९९ लाखापेक्षा अधिक आहे. नगराचा आतील भाग प्रशासनिक, व्यापारिक, सांस्कृतिक व शैक्षणिक संस्थानी व्यापलेला असून त्याचे अुपनगरीय क्षेत्र लहानमोठ्या अुद्योगांनी भरलेले आहे.

गळ्यातल्या हाराप्रमाणे दिसणारे मरीन ड्राईव्ह आणि हिरवेगार मलबार हिल्स यांसह अरबी सागरावर स्थित असलेली मुंबई, अति संकुलित असूनही, आज जगातले एक सुंदर व मनमोहक शहर आहे.

जगातल्या कोणत्याही आधुनिक महानगराशी मुंबईची तुलना होअू शकेल.



# शोधा, सांगा, नि जिंका !

या अंकात प्रकाशित झालेल्या प्रश्नावलीची उत्तरें पुढील अंकात दिली जातील. तोपर्यंत 'भारताचा शोध प्रश्नोत्तरी, चंदामामा बिल्डींन्ज, वडपळणी, चेन्नई - ६०० ०२६ या पत्त्यावर आपली उत्तरें अवश्य पाठवा. परंतु या स्पर्धेत भाग घेण्यासाठी कांही गोष्टी तुम्ही करायला हव्यात.

चांदोबाच्या मागल्या अंकात प्रसिद्ध झालेली कांही वचनें, अवतरणें किंवा पूरक वाक्यें नीट वाचा. त्यापैकी तुम्हाला कोणती वाक्यें आवडली व कां आवडली हे पानाचा क्रमांक देऊन सुमारे शंभर शब्दांत सांगा. तुमचे शिक्षक किंवा पालक यांचेकडून, तुमची प्रवेशिका प्रमाणित करा. त्यावर तुमचे नांव, सही, वय, वर्ग, विद्यालय (विद्यार्थी असाल तर) व संपूर्ण पत्ता लिहून वरील पत्त्यावर पाठवा.

पहिलें बक्षीस : रु. १०००/-
दुसरे बक्षीस : रु. ५००/-

आणि
पांच उत्तेजनार्थ बक्षिसें
प्रत्येकी रु. २००/-







**भारताचा शोध प्रश्नोत्तरी :**

एक युवक कसल्यातरी गोष्टीबद्दल चर्चा करायला एका ऋषीकडे गेला. ऋषीने तावडतोब उत्तर न दिल्यामुळे तो प्रतीक्षा करत राहिला.

ऋषीची पत्नी विहिरीतून पाणी काढत होती. त्याने तिला हाक मारली आणि ती घडा तसाच दोराला लटकता सोडून तावडतोब धावत आली. घडा विहीरीत न पडता, दुसऱ्या कसल्याही आधाराशिवाय लटकत राहिलेला पाहून युवकाला फार आश्चर्य वाटले. त्याची समजूत झाली की, ही ऋषिपत्नी पतिव्रता तर असणारच, पण तिच्यात चमत्कार करण्याचीही शक्ती असली पाहिजे.

हे ऋषी कोण होते? त्यांच्या पत्नीचे नाव काय?




खाली दिलेल्या पौराणिक व्यक्तींचे एकमेकांशी कोणते नाते आहे?

| | | |
|---|---|---|
| अ. धृतराष्ट्र | : | गान्धार |
| ब. सावित्री | : | शाल्व |
| क. सहदेव | : | मद्रदेश |
| ड. कर्ण | : | अंगदेश |
| इ. बभ्रुवाहन | : | मणिपुर |




१. राजा विक्रम व वेताळच्या २४ कथा असणारी प्राचीन कृति कोणती?
२. कालिदासच्या काळी उज्जैनच नाव काय होते?
३. कालिदासापूर्वी सर्वात प्रसिद्ध नाटककार कोण होता?
४. प्राचीन भारतात कोणता विख्यात कवि राजा होता? पण तो योगी बनला?
५. वाल्मिकी रामायणातल्या कोणत्या सर्गाबद्दल अशी समजूत आहे, की तो मागाहून जोडण्यात आला आहे?




अटी :

१. चंदामामा इंडिया लि., लिंटास अमिराष्ट्रीपुरीज इंडिया लि., इनिशिएटिव्ह मिडिया व ब्रिटानिया इंडस्ट्रीजचे कर्मचारी किंवा त्याचे नातेवाईक किंवा सहकारी यांना या स्पर्धेत भाग घेता येणार नाही.
२. परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील व त्यावाबतीत कोणताही पत्रव्यवहार केला जाणार नाही.
३. गचाळ हस्ताक्षरांतल्या प्रवेशिका रद्द ठरवल्या जातील.
४. मे २००० च्या 'चांदोबा' मधें स्पर्धेचा निकाल जाहीर केला जाईल.
५. प्रवेशिका आमच्याकडे ३१ एप्रिल २००० पर्यंत पोंचल्या पाहिजेत.




## पुन्हा एकदा जगाचे लक्ष तिबेटवर

अगदी अलिकडेपर्यन्त जगातल्या बहुतेक सर्व गोष्टींचा निर्णय केवळ असंस्कृत (अमानवी) शरीर बळानेच ठरवले जात. पण दुसऱ्या जागतिक महायुद्धा (१९३९-१९४५) नंतर परिस्थिती बदलू लागली. राजनैतिक अडचणींची सोडवणूक मिळून-मिसळून व चर्चा करून केली जाऊ लागली.

परन्तु अमानवी-असंस्कृत शक्तीची भूमिका अजूनही अस्तित्वात आहे. तुम्हाला ठाऊकच आहे की स्वातंत्र्यापूर्वी भारतात कितीतरी देशी संस्थाने होती. या संस्थानांच्या राजांना अशी सवलत दिली गेली, की त्यांनी भारत किंवा पाकिस्तान यांपैकी कोणाहीबरोबर आपले संस्थान विलीन करावे. शेकडो संस्थानांप्रमाणे काश्मीरचे राजा महाराज हरिसिंह यांनी भारताबरोबर विलीनीकरण करायचा निर्णय घेतला. परन्तु पाकिस्तानने कोणत्याही कायदेशीर अधिकाराशिवायच संस्थानाचा एक खूप मोठा भाग आपल्या अधिकारात ठेवला आहे. याला 'पाक अधिकृत काश्मीर' असे म्हटले जाते.

याच प्रकारे चीनने विसाव्या शतकाच्या पाचव्या दशकात तिबेटवर कब्जा करायला सुरुवात केली. भौगोलिक दृष्टीने तिबेट जरी चीनच्या जवळ असले, तरी तिबेटची आपली संस्कृती व सरकार होते. दलाई लामा बौद्ध धर्माबरोबरच तिबेट सरकारचा प्रधानही असे. चौदावा दलाई लामा तेनाजिन ग्यात्सो याने भारतात आश्रय घेतला. दलाई लामा धर्मशाला येथील आपल्या मुख्य कचेरीतून निर्वासित सरकारचे संचालन करतो.

दलाई लामाच्या दुसऱ्या स्थानी तिबेटवासीयांचा नेता पंचन लामा होता. या पंचन लामाचे कार्यालय चीनने आपल्या मुठीत घेतले आहे. चीनने तिबेटचा तिसरा महत्वपूर्ण नेता करमपा याच्याशीही असेच करायचा प्रयत्न केला. वर्तमान सतरावा करमपा (नाव-अुग्येन ट्रिनले) पळून भारतात आला आणि जानेवारीच्या सुरुवातीस धर्मशाला इथे पोचला.

करमपा किशोरवयीन आहे. गोष्ट अुद्भुत आहे, की त्याला तिबेटवरील चीनचे वर्चस्व असह्य वाटले. काही साथीदारांसह तो बर्फाळ वादळे व तुफान यांना तोंड देत, बर्फाळ व चिंचोळ्या दऱ्या व खोल खड्डे पार करत शेकडो किलोमीटर रस्ता पायी तुडवून इथे आला.

दलाई लामाने 'द हेरिटेज' (चन्दामामाचे सह-प्रकाशन १९८५-१९८९) ला दिलेल्या एका भेटीत चीनने तिबेटमध्ये किती नासधूस केली आहे ते सांगितले. तथाकथित सांस्कृतिक क्रान्तीच्या नावाने त्यांनी अधिकांश धार्मिक व सांस्कृतिक ग्रंथ नष्ट केले. आणि त्यांनी त्यांची हस्तलिखितं आपल्या बुटांचे तळवे अन् वस्तु बांधायचे कागद म्हणून त्यांचा अुपयोग केला. किंवा खताच्या खड्ड्यात टाकून दिली.

'त्यांच्या वर्तणुकीत काही फरक झालाय का?'' या हेरिटेजच्या प्रश्नाला दलाई लामाने, ''होय, त्यांचा दृष्टिकोन बदलला आहे.'' असे अुत्तर दिले.

जगाला आशा आहे की हे आणखीही बदलेल आणि कमीत कमी तिबेटला स्वायत्तता मिळेल. दलाई लामा व करमपा आपली राजधानी ल्हासा येथे परत जातील.

तिबेटला त्याच्या अुंचीमुळे 'जगाचे छत' म्हटले जाते. याचे सर्वात खालच्या पातळीवरील क्षेत्रही समुद्रसपाटीपासून चार हजार मीटर अुंचीवर आहे! शेती व मेंढपाळी हे त्यांचे मुख्य व्यवसाय आहेत. हे लोक लोकर, कस्तुरी, सोने, गहू व जवस यांचाही व्यापार करतात. सर्वात अधिक ते याक वर अवलंबून असतात कारण हे जनावर अत्यधिक थंडीही सहन करू शकते. जवळजवळ सर्वच तिबेटवासी बौद्ध आहेत. ते कष्टाळू व सरळ स्वभावाचे असतात.

असे मानले जाते की, तिबेट हे तिबेटच्या आध्यात्मिक साधनेचे फार मोठे केन्द्र आहे, आणि बौद्ध मताचे खूपसे सिद्ध योगी इथे रहातात.










# खास बातम्या

## हिमालय विरघळत आहे

मनुष्य जी अुष्णता आकाशात सोडतो, जो कार्बन डायॉक्साईड आणि ग्रीन हाअुस गॅस वर फेकत आहे, त्याला धन्यवाद! हिमालयाच्या अुंचीवर विशाल हिमभरल्या नद्या यामुळे वितळू



लागल्या आहेत. सन १९९९ मधे सिन्धु नदीची जल पातळी पहिल्यापेक्षा अधिक अुंच आढळली. विश्व प्रेक्षण संस्थान (वर्ल्ड वॉच इन्स्टिट्यूट) ने चेतावणी दिली आहे की, जर मानवद्वारा पर्यावरणाला नुकसान पोचवण्याच्या कामात खीळ घालण्यासाठी पावलं अुचलली नाहीत, तर हिमालय क्षेत्राचा एक विशाल असा खालचा भाग वाहून जाईल.

## अपहरणकर्त्यांना वाईट बातमी

एक नवीन क्रमवीक्षण यन्त्र (स्कॅनिंग मशीन) प्रवाशाजवळची प्रत्येक वस्तू (ड्रग पासून विस्फोटकापर्यन्त) त्याने ती वस्तू कितीही सावधपण आपल्या कपड्यांमधे लपवलेली असली तरी बरोबर सांगेल. दुसऱ्या शब्दात




सांगायचं तर, धातु संसूचक (मेटल डिटेक्टर) करू शकणार नाही अशा वस्तूचाही पत्ता लावील.

## बधीर लोकांना खूषखबर



जन्मजात बहिरी मुलं आता निकट भविष्यात श्रवण शक्तीचा विकास करू शकतील. ब्रिटिश वैज्ञानिकांनी एका छोट्याशा कानाचा शोध लावला आहे. हा कान बालकाच्या कानात अडकवता येतो. तो दिसू शकतो. हा कान एका अगदी लहानशा बॅटरीच्या मदतीने काम करू शकतो. अन् कान चोळले की पुन्हा रीचार्ज करता येअू शकतो. हे यन्त्र हियरिंग एड पेक्षा भिन्न आहे.



## आमच्या वाचकांच्या मनातील विचार

गेल्या वर्षी डिसेंबर महिन्यात 'चांदोबा' पुन्हा सुरू झाल्यानन्तरचा हा पाचवा अंक तुमच्या हाती येत आहे. आमची पूर्ण खात्री आहे की मागचे चारही अंक तुम्हाला आवडले असतील. तुम्ही पाहिले असेल की, गेल्या ५० वर्षांपेक्षाही अधिक काळपर्यन्त हे मासिक ज्या विशिष्ट गुणांबद्दल प्रसिद्ध होते, तो याने आजही कायम ठेवला आहे.

पण त्याबरोबरच याच्या विषयात खूप बदल व त्याचे रूप, रंग आणि चित्रणातही भरपूर सुधारणा केल्या गेल्या आहेत. याच्या अुत्तम प्रकारच्या कागदाबद्दल तर बहुधा आम्हाला काही सांगायची आवश्यकता नाही. आम्ही प्रत्येक अंक त्याच्या मागील अंकापेक्षा जास्त चांगला रंगवण्याचा प्रयत्न केला आहे. निस्संशय गेल्या शंभर दिवसात वाचकांकडून आलेल्या पत्रांवरून असे सिद्ध झाले आहे की, या सुधारणा त्यांच्या ध्यानात आलेल्या आहेत. पण तरीही आम्हाला आपली वल्ही थांबवायची इच्छा नाहीय; अुलट असे वाटतेय की, आमचे वाचक आमच्या या मासिकात आणखी जे समाविष्ट झालेले पाहू इच्छित आहेत, अन् त्या बदली जे स्तंभ खरोखरच बन्द व्हावे असे त्यांना वाटत असेल - याबद्दलचे त्यांचे विचार ध्यानात घेअून आणखी काही सुधारणा करायची आमची इच्छा आहे. आशा आहे की, तुम्ही आपले विचार मोकळेपणाने प्रकट कराल. आमची इच्छा आहे की, तुम्हापैकी प्रत्येकाने खालील प्रश्नांची अुत्तरे द्यावी आणि दाखवल्याप्रमाणे कापून शक्य तितक्या लवकर आमच्याकडे पाठवावी. अुत्तरे देण्याची पद्धत आम्ही खूप सोपी केलीय. अधिकांश प्रश्नांच्या अुत्तरासाठी तुम्हाला त्यासमोर दिलेल्या चौकोनात टिक ✓ चे चिन्ह करायचे आहे.

I. माझ्याकडे मासिक वर्गणीतून येते ☐
मी मासिक वर्तमानपत्रवाल्याकडून घेतो/घेते ☐
मी वर्तमानपत्राच्या दुकानातून खरेदी करतो/करते ☐
मी आपल्या मित्रा/ग्रंथालया कडून घेअुन वाचतो/वाचते ☐

II. मी नियमितपणे/कधी कधी हे ही वाचतो/वाचते :
☐ कॉमिक्स　☐ गोष्टींची पुस्तके　☐ इतर मुलांची मासिके
........................................................ इथे त्यांची नावेही लिहा

III. मी मासिक खालील भाषेत वाचतो/वाचते :
इंग्रजी/तेलुगु/तमिळ/मलयालम/कानडी/हिन्दी/मराठी/गुजराथी/बंगाली/आसामी/अुडिया/संस्कृत
*(आपल्या पत्रिकेची भाषा अधोरेखित करा.)*

IV. गेल्या चार महिन्यात मी वाचले :
☐ चार अंक　☐ तीन अंक
☐ दोन अंक　☐ एक अंक

Cut along the dotted line



V. मी खालील विषयांचे मूल्यांकन या प्रकारे करीन

| | | |
|---|---|---|
| ☐ धारावाहिक गोष्ट | ☐ भारताची गाथा | ☐ भारत : तेंव्हा व आता |
| ☐ भिन्न भिन्न देशांच्या गोष्टी | ☐ न सुटलेली कोडी | ☐ चांगले इंग्रजी शिकू |
| ☐ विशेष बातम्या | ☐ नद्यांची गोष्ट | |
| ☐ भारताचा शोध : प्रश्नावली | ☐ विक्रम-वेताळ कथा | |
| ☐ विश्वाचा झरोका | ☐ इतर गोष्टी | ☐ या माहीत करून घेऊ |
| ☐ जीवन चरित्र | ☐ पौराणिक गोष्ट | ☐ कोडी/चढाओढी |

*आपल्या पसंतीप्रमाणे क्रम देऊन १ ते १६ आकडे चौकोनात भरा.*

VI. ६ माझी इच्छा आहे की चांदोबा मधे खालील विषय असावेत :
(प्राथमिकता क्रमांकानुसार)

i. .................................... iv. ....................................
ii. .................................... v. ....................................
iii. .................................... vi. ....................................

VII. माझी इच्छा आहे की मुखपृष्ठावर हे चित्र असावे.

☐ साहसी धारावाहिकाचा कथाक्रम ☐ पौराणिक कथेतील एक दृश्य
☐ दुसऱ्या एकाद्या गोष्टीतील काही दृश्य

VIII. मला वाटते की एका प्रतीची किंमत रु. १० ☐ फार जास्त आहे मी ☐ देऊ शकतो/शकते
☐ स्वस्त कागद वापरून कमी केली जावी.

IX. i) मी ग्राहक आहे. ii) मी ग्राहक बनू इच्छितो/इच्छिते

नाव .................................................................... वय ..................
इयत्ता .................. विद्यालय ....................................................
पत्ता ....................................................................................
..........................................................................................
.............................. पिन कोड .............................. राज्य ..................

iii) मी शाळेत जातो/जाते : ☐ आपल्या सायकलवरून ☐ स्कूल बसने
☐ सिटी बसने ☐ आपल्या आई/वडिलांच्या वाहनाने

iv) मला किरकोळ खर्चासाठी ☐ शंभर रुपयांपेक्षा कमी रक्कम मिळते
☐ शंभर रुपयांपेक्षा अधिक मिळते

आई/वडिलांची सही सही




# ज्ञानी - मूर्ख

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत झाडावरून खाली उतरवले, अन् ते आपल्या खांद्यावर टाकून मौन स्वीकारून तो स्मशानाचा रस्ता कापू लागला. तेंव्हा प्रेतातला वेताळ म्हणाला, "राजा, आपलं ध्येय पूर्ण करण्यासाठी या ओसाड स्मशानात आपला जीव संकटात टाकून कठीणपरिश्रम करतो आहेस, त्यात साफल्य न मिळालं तरी तुला निराशेचा स्पर्शही होत नाही. तुझं साहस अन् धैर्य खरोखर प्रशंसनीय आहे. तरीही मला असं समजत नाही, की तू हे सगळं कोणाच्या प्रेरणेनं करत आहेस - स्वतःच्यातच लपून असलेल्या मूर्ख



व्यक्तित्वाच्या प्रेरणेनं, की ज्ञानी व्यक्तित्वाच्या प्रेरणेनं? कारण एकाच व्यक्तीत एकाच वेळी ही दोन्ही व्यक्तिमत्वें अस्तित्वांत असतात. अन् कधींकधीं त्याचं मूर्ख व्यक्तित्व, ज्ञानी व्यक्तित्वावर कुरघोडी करत असतं. मला तुझ्याबाबत हीच शंका आहे. कारण राजा असूनही मध्यरात्री स्वच्छन्दपणे अशीच कुठेतरी भटकत रहाण्याचं काम कोणीही ज्ञानी माणूस करणार नाही. मी तुला विराज शर्मा नांवाच्या अशाच एका मूर्ख तरुण कलाकाराची गोष्ट सांगतो."

असे म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला -

खूप जुनी गोष्ट. चक्रवाक नांवाच्या राज्यात शशिधर नावाचा राजा राज्य करत होता. त्याची एकुलती एक कन्या शम्पालता देवकन्येसारखी अनुपम - सुन्दरी होती. त्या वेळच्या परंपरेनुसार राजपरिवारातल्या स्त्रियांना परपुरुषांकडे पहाण्याची मनाई होती. त्यामुळे शम्पालता किती सुन्दर आहे, हे चक्रवाकच्या प्रजेला ठाऊक नव्हते.

एक दिवस शम्पालताने आपली एक मूर्ती बनवून घ्यायची इच्छा पित्याजवळ व्यक्त केली. आपल्या एकुलत्या एका पुत्रीची इच्छा पूर्ण करण्यासाठी राजा शशिधरने संपूर्ण राज्यातल्या निपुण शिल्पकारांना आमन्त्रित केलं. राज्यातले मोठे-मोठे कलाकार आपापलं भाग्य आज-मावण्यासाठी आले. त्यांना हेही माहीत होतं की परंपरेप्रमाणे ते राजकुमारीला पाहू शकणार नव्हते अन् तिला पाहिल्यावाचून मूर्ती बनवणंही अशक्य होतं. तरीही त्या शिल्पकारांनी आपल्या कल्पने-प्रमाणे राजकुमारीच्या एकाहून एक सुन्दर मूर्ति बनवल्या. परन्तु त्यातली एकही मूर्ती राजकुमारीचं अनुपम सौन्दर्य प्रतिबिंबित करू शकल्या नाहीत, म्हणून राजकुमारीला एकही मूर्ती पसंत पडली नाही.

तेव्हां राजाने राज्यातल्या आणखी चांगल्या कलाकारांना आकर्षित करण्यासाठी अशी घोषणा केली की, जो कोणी शिल्पकार राजकुमारीची अद्भुत मूर्ती बनवील, त्याला राज्याचा 'प्रमुख शिल्पकार' बनवले जाईल. त्या वेळी विराज शर्मा देशाच्या सरहद्दीवरील वज्रकूट प्रान्तातून स्वदेशी परत येत होता. तो वज्रकूटमधे शिल्पकलेचे शिक्षण घेत होता. त्याला ही घोषणा ऐकून फार आश्चर्य वाटले.

विराज शर्माचा पिता प्रकम्पन शर्मा राजस्तानी शैलीचा एक सुप्रसिद्ध शिल्पकार होता. वृद्धावस्थेमुळे त्याने आता काम करणं बंद केलं



होतं. घरी पोचल्याबरोबर विराजने राजाच्या घोषणेबाबत पित्याशी चर्चा केली. आणि विचारले कीं, राजकुमारीला न पहाताच तिची हुबेहुब मूर्ती बनवणं कसं शक्य होईल?"

मुलाच्या या उद्गारांवर हसत वृद्ध शिल्पकार म्हणाला, "तुझा हा प्रश्न स्वाभाविक आहे. याच मुद्यावर सगळे मूर्तिकार चिन्तित आहेत. हे काम नक्कीच अशक्य आहे. पण योग आणि मन्त्रशक्तीनं हे शक्य करता येतं. कलाकार जर योग आणि ध्यान या क्रियामधे प्रवीण असेल, तर मन केन्द्रित करून नमुन्याचं वास्तविक स्वरूप आपल्या दृष्टीसमोर आणू शकेल. प्राचीन काळचे कलाकार योगाद्वारे ही दिव्य दृष्टी प्राप्त करत असत. म्हणूनच त्यांनी मन्दिराच्या भिंतींवर अवतार अन् देवादिकांच्या मूर्ती अंकित केल्या."

"हे कार्य मन्त्र-तन्त्र जाणणारांना मदत करूनही करता येईल, त्यांच्यात अलौकिक शक्ती असतात. त्या अशक्य गोष्टी शक्य करून दाखवतात. आपल्या राज्याच्या आग्नेयेकडील अरण्य प्रदेशात दर महिन्याच्या अमावास्या यक्ष जातीचे लोक एकत्र होतात. देवगणांपेक्षांही अधिक मंत्रतंत्रनिपुण असतात. त्यांची मदत मिळवून हे शक्य करता येईल. परवाच अमावास्या येते आहे."

"पण त्यांची मदत मिळवणं कसं शक्य होईल? मी राजकुमारीचं शिल्प बनवून प्रधान शिल्पकार बनू इच्छितो." चिन्तायुक्त स्वरात विराज शर्माने विचारले.

"मग उशीर कशाला करतोस? साहस कर. कारण सफलतेची किल्ली म्हणजेच साहस.



माझीसुद्धा राज्याचा प्रधान शिल्पकार बनायची इच्छा होती, पण नाही जमलं! तू जर बनू शकलास तर सर्वात अधिक आनंद मलाच होईल. मी लहानपणापासून ऐकत आलोय की, काही लोकांनी यक्षांच्या कृपेनं अन् मदतीनं आपल्या अशक्य अशा महत्वाकांक्षाही पूर्ण करून घेण्यात सफलता मिळवलीय. तू सुद्धा आपलं भाग्य आजमावू शकतोस." पित्यानं पुत्राला प्रोत्साहन दिलं.

आपल्या पित्याचा आशिर्वाद घेऊन तो दुसऱ्या दिवशीच घोड्यावर स्वार होऊन निघाला. बरोबर अमावास्येच्या दिवशी सूर्यास्त होता-होता तो यक्षांच्या प्रदेशात पोचला.

विराजने तिथे एका सरोवराकाठी एका झाडाखाली बसून घरून आणलेली शिदोरी खाल्ली. आणि सरोवराचं पाणी पिऊन तो विश्रान्ती घेऊ



लागला. मार्गातल्या थकव्यामुळे त्याचा डोळा लागला.

थोड्या वेळाने दोन सुन्दर स्त्रियांचं खळखळ हसणं ऐकून त्याची झोप मोडली. त्या स्त्रियांचे वेष, हावभाव अन् त्यांचे अलौकिक असे फुलांचे अलंकार पाहून त्याची खात्री झाली की या यक्षकन्याच आहेत. हे अलौकिक सौन्दर्य मानवी असूच शकत नाही.

त्याला यक्षकन्यांशी बोलायला संकोच वाटत होता. इतक्यात एक कन्या त्याच्या जवळ येऊन म्हणाली, "तरुण मानवा, या घनदाट अंधाऱ्या रात्री यक्षांच्या वनप्रदेशात येण्याचं तू कसं काय साहस केलंस?"

सविनय प्रणाम करत विराज शर्माने त्यांना आपली कहाणी सांगून आपल्या कार्यात त्यांच्या मदतीची याचना केली.

या यक्षकन्येने दुसरीशी संकेताने बोलून म्हटले, "प्रत्यक्षात न पहाता कोणा मनुष्याची मूर्ती बनवणं खरोखरच अशक्य गोष्ट आहे. पण आम्ही दोघी यक्षकन्या हे काम एका अटीवर शक्य करून दाखवायला तयार आहोत. माझं नाव चपला आहे, अन् या माझ्या सखीचं चंचला. आम्ही दोघी या जंगलाचं सौन्दर्य वाढवण्यासाठी आमची एकएक मूर्ती बनवू इच्छित आहोत. तू जर आमच्या मूर्ती घडवू शकलास, तर तुझ्यासाठी तुझी राजकुमारी आम्ही इथे हजर करू."

विराज शर्माने त्यांची अट कबूल केली.

तेव्हां चपलाने चुटकी वाजवून काही मन्त्रोचार केला आणि चंचलाला स्पर्श करत ती म्हणाली, "घे. ही बघ तुमची राजकुमारी शंपालता. आता तू हिला बघून हिची मूर्ती बनव."

दुसऱ्याच क्षणी चंचलाच्या स्थानी राजकुमारी शंपालता उभी होती. विराज शर्मा हे पाहून स्तंभित झाला.

"पण चंचला कुठंय?" आश्चर्यचकित विराजशर्माने विचारले.

"मीच चंचला आहे, पण राजकुमारीच्या रूपात. माझ्या आवाजावरून नाही लक्षात आलं?" राजकुमारी रूपातल्या चंचलाने म्हटले.

"वा! अद्भुत चमत्कार! तुम्हा यक्षिणींना काहीच अशक्य नाही. पण आता राजकुमारीची मूर्ती घडण्यासाठी मला संगमरवर हवा अन् त्याही पेक्षा अधिक आवश्यक आहे प्रकाश. म्हणजे मी राजकुमारी अन् संगमरवराचं शिल्प पाहू शकेन!"

चपलाने पुन्हा चुटकी वाजवून मन्त्रोचार केला



अन् दुसऱ्याच क्षणी संगमरवराचा दगडही आला, आणि राजकुमारीवर चांदण्यासारखा प्रकाश पसरला. विराजशर्माने ताबडतोब आपल्या-बरोबरची हत्यारं काढून मूर्तीचं काम सुरूं केलं.

त्याच्या कामाची धीमी गती पाहून चंचला म्हणाली, "तुझी गती धीमी आहे, म्हणून तुझ्या उपकरणांमधे मी शंभरपट अधिक गती मी भरतेय. जमेल तितक्या लवकर काम पुरं कर."

विराजशर्माने तल्लीनतेनं काम करून एका तासात मूर्ती पुरी केली. नंतर दोन्हीं यक्षिणींना आपली कृतज्ञता व्यक्त करत म्हणाला, "तुम्हां दोघींच्या कृपेनंच हे अशक्य काम आज शक्य झालंय. त्यासाठी कोटीकोटी धन्यवाद! आता आणखी एक कृपा केलीत, अन् ही कलाकृती माझ्या घरी पोचवलीत, तर पुढल्या अमावास्येला येऊन मी तुम्हा दोघींच्याही मूर्ती बनवीन."

"डोळे बन्द कर. हेही होऊन जाईल." दोघी यक्षिणी म्हणाल्या.

त्याने डोळे बन्द केल्याबरोबर राजकुमारीची प्रतिमा त्याच्या आंगणात पोचली. आणि मूर्ती बरोबरच स्वतः लाही तिथे पोचल्याचं पाहून त्याला जास्तच आश्चर्य वाटलं. आतापर्यंत सूर्योदय झालेला होता. अन् सोनेरी किरणांत राजकुमारीचं अनुपम सौन्दर्य जणु जिवन्त झालं होतं. सारा वृत्तान्त आपल्या पित्याला सांगून विराजशर्मा म्हणाला, "बाबा, हे सगळं तुमच्या आशिर्वाद अन् प्रोत्साहनामुळेच शक्य झालंय."

विराजशर्माने यानन्तर राजाला निरोप कळवला की राजकुमारीची मूर्ती तयार आहे, अन् ती राजमहालात मागवण्याची व्यवस्था करावी.



राजाने मूर्ती राजमहालात मागवून सपरिवार पाहिली, तेव्हां तो मूर्तीची अद्वितीय सुन्दरता, परिपूर्णता अन् उच्च कोटीची शिल्पकला पाहून अवाक् झाला. त्याला वाटले की ही आपल्या कन्येची प्रतिमाच नव्हे, तर प्रत्यक्ष शम्पालताच स्वतः सजीव रूपात उभी आहे! शंपालता ती मूर्ती पाहून आनन्दाने किंचाळत म्हणाली, "मी आरशासमोर स्वतःला पहात आहे. ही कोणा मानवाच्या हातची कलाकृती नव्हे, तर कोणत्यातरी जादूच्या बोटांचा चमत्कार आहे!"

राजा शशिधरने आपल्या वचनाप्रमाणे एका शुभ मुहूर्तावर विराजशर्माला 'राज्याचा मुख्य शिल्पकार' म्हणून घोषित केले. आणि त्याला बोलावून त्याच्या कलेची प्रशंसा करीत म्हटले,



''तुझं शिल्प अजोड आहे. तुझ्यासारखा महान शिल्पी जगात दुसरा कचितच असेल! आमच्या बहिनीची मुलगी मंजुळा शामन्तक नगरहून आजच राजकुमारीची मूर्ती पहायला आली आहे. तुझ्या कलाकृतीचं कौतुक करून म्हणाली की - हिचा शिल्पकार विश्वकर्मापेक्षा कमी नव्हे. तिची तीव्र इच्छा आहे की, तू तिचीही एक अशीच मूर्ती बनवून दे. ती पूर्ण झाली की लगेच दोन दिवसांनी तुझी 'प्रधान शिल्पकार' म्हणून नेमणूक होईल.''

राजाचे हे बोलणे ऐकून विराज शर्मा हतबल व अन् निस्तेज झाला अन् थोडा विचार करून म्हणाला, ''आपली आज्ञा शिरोधार्य आहे महाराज! आता मला जायची आज्ञा द्या.''

घरी येऊन त्याने पित्याला सारी हकिकत सांगून म्हटले, ''उद्या सकाळीच आपण दोघंही वज्रकूटला रहाणाऱ्या आपल्या गुरूच्या शिल्पशाळेत जाऊया. ते आपल्या राज्याच्या सीमेबाहेर आहे. अन् तिथला राजा आपल्या शशिधर महाराजांपेक्षा अधिक समर्थ अन् ज्ञानी आहे.''

इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, ''विक्रमराजा, विराजशर्मा आपल्या कलेचा मर्मज्ञ आहे, ज्ञानी आहे. तरीही त्याच्यात एक मूर्ख, बुद्धिहीन व्यक्तिही आहे. त्याच्या प्रभावात येऊन तो हातांत आलेली सफलतेची संधी सोडून देतो आहे.

''एका वेळी तो राज्याचा प्रमुख शिल्पकार बनायचं स्वप्न पहात होता. ते पूर्ण करण्या करता अत्यंत कठिण संकटंही झेलायला तयार होता. अन् आता, तो मुख्य शिल्पकार बनतच होता - अन् त्याची सारी आकांक्षा, सारा उत्साह नाहीसा झाला. त्यानं जराही विचार न करता समोर आलेली सुवर्णसंधी जाऊ दिली.

''ज्या प्रकारे त्याने यक्षिणींच्या मदतीनं राजकुमारीची मूर्ती बनवली, त्याच प्रकारे तो मंजुळाचीही मूर्ती बनवू शकला असता. यक्षिणींच्या मूर्ती बनवल्यानंतर हे काम कठीण नव्हते. यानन्तर तो राज्याचा मुख्य शिल्पकार बनून दुर्लभ अशी राजप्रतिष्ठा आणि अपार संपदेचा स्वामी होऊ शकला असता. परन्तु हे सर्व ठोकरून आपला देश सोडून दुसऱ्या राज्यात निघून जाण्याचा त्याचा निर्णय अविवेकपूर्ण नव्हे काय? माझ्या मते तो ज्ञानी असूनही मूर्ख आहे, कारण त्याने तुझ्याप्रमाणेच साहस अन्





**जी संपत्ती परोपकारासाठी खर्च होत नाही, ती आपली चमक एक क्षणभर डोळ्यांना त्रास देऊन विलीत होऊन जाणाऱ्या विजेप्रमाणे आहे.**

**-कथा सरित्सागर**

परिश्रमपूर्वक हात येणाऱ्या फलाची चिंता केली नाही.

माझ्या या शंकेचं उत्तर माहीत असूनही, ते सांगायचं टाळलंस तर तुझे मस्तक फुटून त्याचे तुकडे होतील.''

राजा विक्रमने आपलं मौन भंग करत म्हटले ''या जगात कित्येक उचित-अनुचित परंपरा चालू आहेत. राजा शशिधरच्या वंशाची ही परंपरा - की शिल्पकाराने राजकुमारीला न पहाताच तिची मूर्ती बनवून द्यावी, हे अनुचित, मूर्खपणाचे आणि अशक्य आहे. तरीही विराजवर्माने आपल्या पित्याच्या सल्ल्यानुसार यक्षिणींची मदत घेऊन हे अशक्य, शक्य करून दाखवलं. पण राजानं हे असाध्य कार्य साध्य बनवण्याचं रहस्य जाणून घेण्याचा प्रयत्नही केला नाही. हा त्याचा मूर्खपणा आहे. विराजशर्मा अजून प्रमुख शिल्पकार बनलाही नव्हता, तरी त्याला मंजुळाची तशीच मूर्ती बनवायची राजाकडून आज्ञा मिळाली. प्रधान शिल्पी बनल्यानन्तर, कुणास ठाऊक अशा कितीतरी स्त्रियांच्या मूर्ती त्यांना न बघताच बनवायला लागल्या असत्या. यक्षिणींकडून पुन्हापुन्हा मदत मागणंही योग्य नव्हतं. त्यामुळे खूप विचार केल्यानन्तर त्याने असा निर्णय घेतला की मूर्ख अन् अविवेकी राजाच्या ताबेदारींत प्रमुख शिल्पकार बनून रहाण्यापेक्षा आपल्या कला मर्मज्ञ गुरूबरोबर राहून कलेची सेवा करणंच अधिक सार्थक अन् संतोषप्रद होईल. अन् यातच त्याचं अन् त्याच्या पित्याचं कल्याण आहे. म्हणूनच विराजवर्माचा हा निर्णय योग्य, विवेकपूर्ण अन् सुख-संतोष प्रद आहे. अयोग्य नव्हे.''

राजाचं अशाप्रकारे मौन भंग होताच वेताळ शवासह अदृश्य होऊन झाडावर जाऊन बसला.



# चालू महिन्यात जन्मलेली विशेष व्यक्ती

## रवींद्रनाथ ठाकूर

या महिन्यांत, ७ मेला आधुनिक भारताच्या जगप्रसिद्ध कवी रविंद्रनाथ ठाकूर यांचा जन्मदिन आहे. त्यांचा जन्म १८६१ साली आला. त्यांचा जन्म कलकत्त्यांत झाला. त्यांचे वडील देवेन्द्रनाथ ठाकूर हे सर्वांचे हित सांभाळणारे एक उमदे व्यक्तिमत्व होते.

रवींद्रनाथ हे वर्णाने गोरे, रुपाने राजबिंडे, हाडापेराने मजबूत आणि प्रकृतिने निकोप होते. रवींद्रांना शिकवण्या-साठी घरीच शिक्षक येत असत. शाळेत त्यांचे मन रमू शकले नाही. मुंज झाल्या-नंतर ते वडिलांबरोबर हिमाल-यांत जाऊन आले. या प्रवासांत त्यांना अनेक चांगल्या गोष्टी शिकायला मिळाल्या. १८७५ मधें त्यांची आई वारली. सन १८७८ मधें ते इंग्लंडला गेले, व सन १८८० मधें कोणताही अभ्यास पुरा न करताच स्वदेशी परत आले.



रविंद्रनाथांनी फारच लहान वयांत साहित्याची निर्मिती करण्यास सुरवात केली होती. वीस वर्षांच्या कोंवळ्या वयांतच, आपले राष्ट्रगीत 'वंदेमातरम्' लिहीणारे श्रेष्ठ कवि व महान कादंबरीकार बंकिमचंद्र यांच्याकडून रविंद्रांच्या प्रतिभा-शक्तीला मान्यता मिळालेली होती.

रविंद्रनाथ जरी जगांतले एक महान कवी म्हणून प्रसिद्धी पावले असले, तरी ते तितकेच श्रेष्ठ कादंबरीकार, कथाकार व निबंधकार होते. सन १९१३ मधें त्यांच्या 'गीतांजली' या कविता संग्रहाला नोबेल पारितोषिकाचा सन्मान मिळाला. बंगाली भाषेतल्या या कवितांचा इंग्लिश अनुवाद त्यांनी स्वतःच केला होता.

ते एक सच्चे देशभक्त होते. जेव्हां भारतीय राष्ट्रीयत्वाचे प्रेषित श्रीअरविंद यांच्यावर इंग्लिश सरकारतर्फे खटला चालवला जात होता, तेव्हां रविंद्रांनी 'हे अरविंद, रविंद्राचा प्रणाम स्वीकार करा' ही प्रेरक कविता लिहीली होती.

त्यांच्या देशभक्तीनेच त्यांना एक नव्या धर्तीचे विश्व-विद्यालय, विश्व भारती, शांतिनिकेतन स्थापन करण्याची प्रेरणा दिली. या आगळ्या संस्थेत राष्ट्रीय शिक्षण व भारतीय संस्कृतीवर भर दिलेला होता.

रविंद्रनाथ बंगाली साहित्यामधें सर्वांत जास्त रमले. भारतीय साहित्य व संस्कृतीवर त्यांचा फार मोठा प्रभाव पडला. सन् १९४१ मधें ७ ऑगस्टला हा भारतीय साहित्यसूर्य अस्तास गेला.





# निखाऱ्यासाठी

थंडीचे दिवस होते. कडाक्याची थंडी पडली होती. म्हणून दिवस कलल्यावरोबर खाणीपिणी उरकून गाववाले आपापल्या घरांच्या आत निघून गेले अन् लवकर झोपून गेले. अजून अर्धी रात्रही झाली नव्हती, पण गावभर शांतता पसरली. कधी-कधी चौकीदाराचा 'सावध रहा' चा आवाज मनात थरकाप उडवत होता.

कित्येक दिवसांपासून जमीनदार आपल्या रयतेचा निवाडा ऐकण्यासाठी कचेरीतच मुक्काम करून होते. त्यामुळेच चौकीदार जरा दक्षतेनं पहारा देत होता. मध्यरात्रीपूर्वी आतापर्यन्त तो गावच्या चार चकरा करून आला होता.

माघातल्या कडक थंडीमुळे त्याला चालवत नव्हतं. वेगवान पश्चिमी हवा हत्याराप्रमाणे हाडात बोचत होती. त्यातं आपला खिसा चाचपला तेव्हां त्यात अजून एक चिरूट पडलेला त्याला आढळला.

त्याने निखाऱ्यासाठी समोरच्या झोपडीचा दरवाजा खटखटवला.

"कोण आहे? काय हवंय?'' झोपेतच दरवाजा उघडत त्रासलेली एक म्हातारी बोलली.

"मी गांवचा चौकीदार आहे आजी, तुझ्या चुलीत थोडा निखारा असला तर आण. चिरूट पेटवाचाय मला. अशी थंडी तर कैक वर्षांनी पडली असेल.'' आपल्या चेहऱ्यावरचा कपडा हटवत चौकीदार म्हणाला.

"अरे बेटे, गेल्या काही दिवसांपासून माझ्याकडे चूलच पेटली नाहीय. जमीनदार जेव्हांपासून कचेरीत आले आहेत, तेंव्हापासून दुपारचं जेवण तिथूनच मिळतं. रात्री देवळांतल्या प्रसादानं पोट भरतं.'' असे म्हणून म्हातारीनं दरवाजा बन्द केला.

चौकीदारानं आता जवळचा दरवाजा खटखटला. बऱ्याच वेळानं एका तरुणानं दरवाजा उघडल्यावर चौकीदार म्हणाला, "भैया, घरात काडेपेटी किंवा निखारा असला तर आण बाबा, चिरूट पेटवायचाय. साली थंडीही फार आहे.''

"दोन्हीही नाहीये भाई, बायकोनं कुणा शेजाऱ्या-

करून विस्तव आणून चूल पेटवली. अन् स्वयंपाक झाल्यावर पाणी ओतून विझवली पण. पुढे बघ बाबा कुठे.'' असं म्हणून जांभई देत तोही दरवाजा बंद करून आत गेला.

''हा कम्बक्त जमीनदार कचेरीत नसता, तर मलाही असं रात्रभर जागावं लागलं नसतं ! असा विचार करत चौकीदारने ''सावध रहा'' ची आरोळी दिली.

कचेरीची आठवण होताच त्याला जमीन-दाराच्या नोकरांची आठवण आली. ''ते पट्ठे अजून झोपले नसतील. तिथे माझं काम होईल'' असा विचार करून ''सावध रहा'' ओरडत तो कचेरीकडे वळला.

कचेरीत अजून दिवाण व गुमास्त्यांमधे काही गप्पा चालू होत्या. चौकीदाराला पाहून त्याला शाबासकी देत दिवाण म्हणाला, ''खूपच छान आपली ड्यूटी करतोयस की! वा, छान, छान! चांगली गोष्ट आहे.''

आपली लाठी अन् कंदील जमीनीवर ठेवून दोन्ही हात जोडून वाकून प्रणाम करून चौकीदार म्हणाला, ''आपला सेवक आहे मालक! आपल्याच दयेनं आपलं काम प्रामाणिकपणे करत असतो मालक!''

''पण इकडे कचेरी-कडे कसा आलास? ही तर गांवाबाहेर पडते ना! अन् पहारा तर गावात द्यायचा. इथे येऊन एकादी झोप काढायचा तर विचार नाही ना?'' गुमास्ता जरा रागावत म्हणाला.

चौकीदार चटकन कान पकडत म्हणाला, ''राम राम! हे काय बोललात मालक! रात्री ड्यूटीच्या वेळी आराम हराम! गावचं रक्षण करणं ही माझी जबाबदारी आहे. अन् ती पूर्ण प्रामाणिकपणे निभावतो मालक!''

पुन्हा जरा थांबून म्हणाला, ''गोष्ट अशी मालक, की थंडी फार आहे अन् मला चिरूट ओढायची लहर आली. म्हणून वाटलं की आपल्या नोकराकडून पेटवायला थोडा निखारा मिळेल.

''अरे पण वेड्या, कंदील तर तुझ्याच हाती आहे ना! त्यानं नाही का चिरूट पेटवता येत?'' दिवाणानं प्रश्नभरल्या नजरेनं विचारलं.

हे ऐकून मात्र चौकीदाराचा चेहरा पांढरा झाला.

''खरंच की, माझी अक्कल कुठे चरायला गेली काय? हातात विस्तव घेऊन तो शोधत राहिलो. किती मूर्ख मी तरी! यालाच म्हणतात 'खाकेंत कळसा, अन् गावाला वळसा!'' शरमून असं म्हणत आपली काठी अन् कंदिल घेऊन चौकीदार चटकन तिथून चालू लागला.

''सावध रहा SS!'' शांततेला चिरत असलेला हा आवाज ऐकून दिवाण अन् गुमास्ता गडगडून हसू लागले.







# सुवर्ण सिंहासन

(९)

(आतापर्यंत : हैहय वंशाच्या कौंडिन्य अधिपती पौरस्वतने दक्षिणापथची राज्ये जिंकून एका बृहत् साम्राज्याची स्थापना केली. त्याचे अयोग्य अुत्तराधिकारी या साम्राज्याची अखण्डता राखू शकले नाहीत. कालिन्दी, चम्पक आणि कुन्दचे राजे स्वतंत्र झाले. व कौन्डिन्य पुन्हा एकदा छोटेसे राज्य राहिले. चम्पकच्या राजाने बाकीच्या राजांना आपल्या पक्षात घेअून कौन्डिन्यवर आक्रमण करायचे कारस्थान रचले. कौन्डिन्यराजा श्रीदत्तने आपला मुलगा विजयदत्तला गुरुकुलाचा अवधी पुरी होण्यापूर्वीच परत बोलावून घेतले अन् त्याला अन्य राजांच्या कारस्थानाबद्दल सांगितले. श्रीदत्तने आपल्या राजगुरूंच्या आदेशानुसार खोदकामातून प्राप्त झालेल्या सुवर्ण-सिंहासनावर आपला पुत्र विजयदत्त याला राज्याभिषेक करण्याची योजना बनवली. विजयदत्त सिंहासनावर चढू लागला, तेंव्हा अचानक कुठूनसा एक प्रेमळ आवाज झाला :- 'थांब, विजयदत्त! थांब!' यानन्तर:)

विजय या अनपेक्षित आवाजाने दचकला अन् त्याचे पाय आपोआप मागे हटले. वेद म्हणणारे ब्राह्मण अवाक् झाले. वाचकार एकदम शान्त झाले. दर्शक भयभीत झाले. संपूर्ण समारंभ मंडपात सुई पडली तरी आवाज व्हावा, इतकी शान्तता पसरली. आवाज कुठून आला, हे कुणाला कळेना. राजगुरु शिवानन्दही या अनपेक्षित प्रकाराने दचकले. त्यांना राजा श्रीदत्तचा चेहराही चिंतित अन् निस्तेज झालेला दिसला. विजयदत्तच्या कुंडलीच्या आधाराने त्यांना जरी खात्री असली की सर्व अडचणी दूर करत तो अेक दिवस सार्वभौम सम्राट नक्की बनेल, तरीही त्या रहस्यमय सिंहास-नावर मान्त्रिकाने कसली प्रक्रिया करून ठेवली होती हे माहीत नसल्याचे त्यांना दुःख वाटत होते.

स्वतः मन्त्रविद् असल्यामुळे त्यांनी इतके तर नक्की ओळखले की हे सिंहासन म्हणजे एका फार सिद्ध अशा मान्त्रिकाच्या हातचे सृजन असून त्याचा कणन् कण सजग व सचेतन आहे. त्याची रचना-प्रणाली अशी स्वयंचलित आहे की कोणी अयोग्य व अनाधिकृत शासक व अपवित्र आत्मा

लक्ष्मी गायत्री



असणारी व्यक्ती सिंहासन प्राप्त करूंच शकणार नाही. केवळ अगदी सुयोग्य असा अुत्तराधिकारीच यावर आरूढ होअू शकेल.

पण ते स्वतःच्या मन्त्रशक्तीच्या बळावर सिंहासनाचे रहस्य शोधायला असमर्थ होते. म्हणूनच तेही इतर प्रेक्षकांप्रमाणेच या रहस्यमय घटनेचे मौन प्रेक्षक बनले होते. त्यामुळेच विजयदत्तने मार्गदर्शन आणि सहाय्यासाठी त्यांच्याकडे पाहिले, तेंव्हा त्यांनी मूक संकेताने आपली असमर्थता प्रकट करत जणू असे सांगितले, कीं या रंगमंचाचा धीरोदात्त नायक तर तूच आहेस. सिंहासनावर विजय मिळाला, तर युद्धभूमीवरही तूच विजयी होशील. त्यामुळे आपली अंतःप्रेरणा अन् आत्मा यांच्याकडून जी सूचना मिळेल, तसंच कर. राजगुरुकडून काही सूचना मिळाली नाही, तेव्हां स्वतःला संयत करत विजयदत्तने गंभीर आवाजात प्रश्न केला, "कोण? वेदमन्त्रांच्या द्वारे आवाहन केलेल्या देवांच्या साक्षीनं सुरु झालेल्या या शुभ समारंभात अडचण अुपस्थित करणारं कोण आहे ते?"

तिथे अुपस्थित असणारे सर्वजण श्वास रोखून प्रश्नाच्या अुत्तराची अपेक्षा करू लागले. इतक्यात आकाशवाणीप्रमाणेच प्रेम अन् माधुर्य ओतप्रोत भरलेला एक स्वर पुन्हा ऐकू आला, "विजयदत्त, तुझ्यासमोर या अद्‌भुत सिंहासनाच्या पहिल्या पायरीवर अुजव्या बाजूच्या मूर्तीतली मी सालभंजिका आहे. मी तुला सिंहासनाकडे पुढे जायला अडवलं आहे."

विजयदत्तने हात जोडून आपल्या अुद्धट-पणाबद्दल शरमून म्हटले, "हे दिव्य मातृशक्ती! मी अुच्च स्वरात आपल्याला प्रश्न विचारून मोठाच अपराध केलाय; त्यासाठी क्षमा मागतो. या दिव्य सिंहासनाच्या शिखरावर आपल्या वंशाच्या कुलदेवीची प्रतिमा पाहून मला धैर्य आलं अन् मी सिंहासनावर आरूढ होण्यासाठी पुढे झालो. आपल्याच वंशाचं सुवर्ण सिंहासन समजूनच मोठ्या विश्वासानं सिंहासनावर आरूढ होण्यासाठी पुढे होत होतो, इतक्यांत आपण मला अचानक रोखलंत. मी तर कधी अशी कल्पनाच नव्हती केली. आता माझं मन अनेक शंकांनी जड झालंय. मी जरी याचा रक्षक सर्पराजे याच्यावर विजय मिळवला असला अन् तो पुष्पमालेच्या रूपात अष्टौप्रहर माझ्या गळ्यांत रुळत आहे, तरीही माझ्या मनात एक प्रश्न घुमत आहे, की हे सिंहासन आमच्या वंशाचं नाहीच आहे कां? अन् जर असेल,



तर आपल्या या रोखण्याचा अर्थ काय? आपण कृपा करून सांगाल काय?"

सालभंजिका प्रेमळ आवाजात म्हणाली, "पुत्र विजयदत्त, तुझ्या विनम्रतेवर मी प्रसन्न आहे. ज्या अुद्देशासाठी या सिंहासनाची निर्मिती झालीय तो अुद्देश तू नक्कीच पुरा करशील !

"शेकडों वर्षांपासून जमिनीत दबलेलं हे अपूर्व सिंहासन तुझ्याच वंशाची ठेव आहे. खूप वर्षांपूर्वी महाराज पौरस्वत तुझ्या वंशाचे पूर्वज होते. त्यांची कीर्ती चारी दिशांना पसरलेली होती. तुला माहीत असेल, की त्यांनी पूर्ण दक्षिण भारत एका सूत्रांत बांधून एका सार्वभौम साम्राज्याची स्थापना केली होती. अपत्यहीन असल्यामुळे त्यांनी आपल्या भावाचा मुलगा हयग्रीव याला आपला वारस बनवले. परंतु अयोग्य असल्यामुळे तो सर्वत्र अपमानित होअू लागला. त्यामुळे सर्वांत चिन्तित होते पुलिन्द भट्टारक.

"पुलिन्द भट्टारक एक कुशल महामन्त्री होते. ते हयग्रीववर पुत्रवत प्रेम करत. त्यांनी हयग्रीवला योग्य बनवण्यासाठी खूप प्रयत्न केले, पण ते सफल होअू शकले नाहीत. त्यांनीच या सिंहासनाची संकल्पना केली अन् त्यासाठी आवश्यक ते सोनं अन् जवाहीर विश्वास पात्र सोनारांच्या हवाली केलं. पण ही गोष्ट त्यांनी हयग्रीवला सांगितली नाही.

"हे सिंहासन तयार झाल्यावर पुलिन्द भट्टारकने आपल्या अुच्च कोटीच्या मन्त्रशक्तीचा अुपयोग करून तीन महाशक्तींचं आवाहन केलं अन् अुजव्या बाजूच्या तीन पायऱ्यांवर असणाऱ्या तीन सालभंजिकांची निर्मिती केली. या दिसायला निष्प्राण वाटतात, पण खरोखर त्या सचेतन आहेत.



त्यांच्या त्या तीन शक्ती म्हणजे आम्ही तिघी. मी सत्य आहे. मधल्या पायरीवरची सालभंजिका धर्म अन् तिसऱ्या पायरीवर आहे न्याय. आमच्या समोरच्या पायऱ्यांवरच्या सालभंजिकासुद्धा सत्य, धर्म अन् न्यायाच्याच शक्ती आहेत, पण त्या स्थूल शक्ती आहेत. पण आम्ही तिघी सूक्ष्म शक्ती आहोत.

"राजधर्म फार सूक्ष्म असतो विजयदत्त. सत्य, धर्म आणि न्याय यांची सूक्ष्म रूपं जो राजा अुत्तम प्रकारे समजून आचरण करतो, त्यालाच अुच्च कोटीचा राजा म्हणतात. राज्य व्यवस्था एका अशा प्रकारची इमारत असते, की जिचे आधाराचे तीन खांब सत्य, धर्म आणि न्याय असतात. या तीन्हींचं पालन करणारा अुत्तम राजा हाच इमारतीचा चौथा खांब होय. जर हा चौथा खांब दुर्बल असेल तर



बाकीचे तीनदेखील कमजोर होतात अन् राज्य-व्यवस्थेची इमारत उध्वस्त होऊन जाते. प्रजेवर पुत्रवत् प्रेम करणारा राजाच सत्य, धर्म आणि न्याय यांच्या सूक्ष्म रूपांचं पालन करू शकतो. प्रजेसाठी हरप्रकारे व्यक्तिगत स्वार्थाचा त्याग करणें अन् त्याचं हृदय सागरापेक्षा विशाल अन् विचार आकाशापेक्षा उंच असायला हवेत.

"तुझा पूर्वज महाराज पौरस्वत यांनी राज-धर्माची सूक्ष्म आणि स्थूल अशी दोन्ही रूपं आपल्या जीवनांत उतरवली होती. परन्तु, हयग्रीवला राजधर्माचं केवळ स्थूल रूपच समजलं होतं. त्यामुळे त्याला मदत करण्यासाठी पुलिन्द भट्टारकने आम्हा सालभंजिकांचं सृजन केलं. पण हे अद्भुत सिंहासन पूर्णतः तयार होण्यापूर्वीच हयग्रीव अचानक मृत्यु पावला. हयग्रीववर पुलिन्दचं इतकं प्रेम होतं की, त्याच्या मृत्यूनन्तर त्यांना राजकाजाबद्दल वैराग्य उत्पन्न झालं अन् त्यांना संन्यास घ्यावासा वाटू लागला. पण असलं अपूर्व अन् अलौकिक सिंहासन तसंच सोडून जावंसंही वाटेना त्यांना. म्हणून त्यांनी एक अशी योजना बनवली, कीं हे कुणा अयोग्य राजाच्या हाती येऊ नये, अन् भविष्यात त्याच वंशाच्या एकाद्या समर्थ राजाला याची प्राप्ती व्हावी. तोच योग्य राजा दुसरा पौरस्वत असेल. त्यांनी मन्त्रशक्तीने असा एक कार्यक्रम बनवला, की त्यामुळे भविष्यांत सिंहासनायोग्य राजाची आपोआपच निवड होईल आणि सिंहासनाचा निर्माता अन् त्याच्या योग्य राजांचं नाव इतिहासात अमर बनून राहील.

"त्यांनी आपल्या मन्त्रशक्तीने एका महासर्पाची रचना करून त्याला सिंहासनाचा रक्षक बनवले. त्याने विचारलेल्या प्रश्नाला बरोबर उत्तर देणाराच याचा योग्य असा उत्तराधिकारी बनेल. अन् बरोबर उत्तर तोच देऊ शकेल, जो धर्मसूत्रांचा ज्ञाता असेल. सिंहासन प्राप्त केल्यानन्तर तीन पायऱ्यांवरच्या सालभंजिका त्याची परीक्षा घेतील.

"पहिल्या परीक्षेत तर तू उत्तीर्ण झालाच आहेस. आता आमची पाळी आहे. आम्ही तिघीही तुला एक-एक गोष्ट सांगून त्याबद्दल प्रश्न विचारू. त्यांची बरोबर उत्तरं दिल्यावरच तू सिंहासनावर बसूं शकशील. पुलिन्द भट्टारकने हयग्रीव साठी आणखी एक खास वस्तुची - चन्द्रहासची - मन्त्रद्वारा रचना केली होती. आमच्या परीक्षेत सफल झाल्यावर ही वस्तूही तुझ्या मालकीची होईल. तूं आमच्या कोणत्याही प्रश्नाचं उत्तर देऊं शकलास,



तर तुझ्या गळ्यातली श्वेत प्रकाश पसरणारी माळ अदृश्य होऊन जाईल, अन् सिंहासनही अदृश्य होऊन आपल्या जुन्या स्थानी पोचेल."

तिथे उपस्थित सर्वजण श्वास रोखून असलेले सालभंजिकाचे बोलणे ऐकत होते.

स्वतःच्या मुलाच्या भाग्याबद्दल अत्यन्त खुष असणारा राजा श्रीदत्त, सिंहासनासारखा खजिना हाती लागल्यानन्तर जितके प्रसन्न होते, तितकेच आता ते दुःखी दिसू लागले. आपला पुत्र विजय याला अभिमन्यूप्रमाणे दुःस्थितीच्या गराड्यात सापडलेला पाहून ते अतिशय दुःखी होत होते. विजयदत्तच्या डावीकडे उभ्या असणाऱ्या श्रीलेखाच्या चेहऱ्यावर कधी चिन्तेच्या रेषा उमटत होत्या, तर कधी बुजत होत्या. पण या सर्वांच्या मधे अगदी खडकाप्रमाणे स्थिर, निश्चिन्त आणि निर्भय होऊन कोणी उभा असेल, तर तो होता विजयदत्त!

त्याने मागे वळून पिता श्रीदत्त अन् गुरु शिवानन्द यांना पदस्पर्श करून नमस्कार केला अन् पहिल्या पायरीवरच्या सालभंजिकेला उद्देशून बोलला, "हे सत्यरूपिणी माते! मी आपल्या परीक्षेसाठी तयार आहे. आणि त्यात सफलता मिळावी म्हणून आपल्या आशिर्वादाची प्रार्थना अन् याचना करतो आहे."

"तुझ्या धीरोदात्त आचरणाबद्दल मी तुझं अभिनन्दन करते. आणि एक गोष्ट सांगते. ऐक नीट." असे म्हणून पहिल्या पायरीवरली सालभंजिकाने गोष्ट सांगायला सुरुवात केली.

"त्रिपुरांतक देशावर कालकेतु नावाचा एक मूर्ख राजा राज्य करत होता. तो राज्यकारभारांत कधी



कोणत्याही बुद्धिमान माणसाचा सल्ला घेत नसे. त्याची पक्की समजूत होती की, जो कोणी सिंहासनावर बसतो अन् ज्याच्या हातात राजदण्ड असतो, तो साक्षात् भगवन्तापेक्षा जराही कमी नसतो. म्हणूनच कुणाचा सल्ला वगैरे विचारायची त्याला गरज नसते.

"त्यामुळे तो आपल्याच मनाने राज्यशासन चालवी. परिणामतः त्याचे निर्णय चुकीचे होऊ लागले. अन् देशाच्या व्यवस्थेची पातळी खाली जाऊ लागली. खुशामत करणोर अन् भ्रष्ट अधिकाऱ्यांचे नशीब फळफळू लागले. ते राजाची खोटी स्तुती करून आपला स्वार्थ साधू लागले. प्रजेच्या भल्यासाठी दिलेल्या खजिन्याच्या मुद्रा अधिकारी स्वतःच हडप करू लागले. राजकोष रिकामा होऊ लागला तेव्हां प्रजेकडून मोठा कर



घेतला जाऊ लागला.

पाऊस कमी पडू लागला, तेव्हां विहिरी अन् तळी आटून गेली. पाण्यासाठी पाऊस हाच एकमात्र मार्ग उरला !

"कला व साहित्याच्या क्षेत्रात भ्रष्टाचार पसरू लागला. फक्त सुन्दर स्त्रियांनाच नृत्य प्रदर्शनाची संधी मिळू लागली. अर्धकच्च्या आणि निम्न रुचीची चित्रं अन् काव्य यांना प्रोत्साहन दिलं जाई. योग्य कलाकार आणि साहित्यकारांचा अनादर केला जाई. देशभक्तीच्या नावावर दुसऱ्या देशांत जाण्यावर प्रतिबंध लावला गेला. त्यांच्या दृष्टीने कविताच रचणाऱ्या आणि गाणाऱ्यांना अत्यन्त कडक शिक्षा दिली जाई.

"कालकेतुच्या असल्या शासनामुळे सर्वात अधिक दुःखी तर त्याची राणी हेमावतीच होती. ती स्वतः कवियित्री अन् आपल्या मातृभाषेबरोबर संस्कृतचीही विदुषी होती. पतीचा मूर्खपणा तिला असह्य वाटे, तरीही ती गप्प बसत असे.

"तिचं सांसारिक जीवनही दुःखमय होतं. राजाला पहिल्या राणीपासून अपत्यलाभ न झाल्याने त्याने आणखी दोन विवाह केले. तो आपल्या तीन्ही राण्यांशी अगदी सामान्य स्त्रियांसारखी वागणूक ठेवी.

"राजाच्या अत्याचारांमुळे निसर्गही क्रोधित झाला. दोन वर्षं पाऊसच पडला नव्हता. त्यामुळे देशात सर्वत्र दुष्काळ पडला. राजाला नाइलाजाने इतर देशांतून धान्य मागवावं लागलं. अन् ते धान्यही फार अधिक किंमतीनं विकून तो अनुचित पैसे कमवू लागला."

"ज्यांच्याजवळ धान्य घ्यायला पैसे नसत, ते चोऱ्या करू लागले, डाका घालू लागले. बुरखेवाल्याच्या नेतृत्वाखाली हरतऱ्हेचे अपराध वाढू लागले.

"बुरखाधारीचं खरं नांव चित्ररथ होतं. भगवान चित्ररथाच्या कृपेनं जन्मलेला हा बालक जरी शस्त्र-शास्त्रांत निपुण असला, तरी अपराध्यांचा नेता कसा बनला हे कुणालाच माहीत नव्हते. चोरीचा माल किंवा धन तो स्वतःसाठी उपयोगात आणत नसे. उलट गरीबांच्यात वाटत असे. लोक त्याला चित्ररथाचा अवतार मानत. त्याच्याबाबत तऱ्हेतऱ्हेच्या गोष्टी पसरू लागल्या.

अशांतच एक विचित्र घटना घडली.

"एका शुक्रवारी महाराणी हेमावती कुलरीतीप्रमाणे चित्ररथस्वामीच्या मंदिरात पूजा करायला गेली. मंदिरातून येतेवेळी तिची दृष्टी एका वृद्ध साधूवर पडली. तिने सहजच त्याला हात जोडून नमस्कार केला. साधूने हसून तिला आशिर्वाद दिला. आणि एक संस्कृत श्लोक ऐकवला. त्याचा भाव असा होता - सुगंध पसरणाऱ्या मनोहर फुलांनी लगडलेली जाईलता, तिचंच रक्षण करण्यासाठी बनवलेल्या मांडवाला - तो कांटेरी असला तरी - मोठ्या प्रेमाने मिठी मारते. पण त्यामुळे जाईच्याफुलांचा नैसर्गिक सुगन्ध नाहीसा होत नाही. पण उलट तो मांडवही लोकांना आकृष्ट करतो.

"हा श्लोक ऐकून हेमावतीचे डोळे भरून आले. ती आपली भावनावशता रोखू शकली नाही. अन् तिने साधूला चरणस्पर्श केला.

"राजाला जेव्हां ही बातमी कळली, तेव्हां साधूचा श्लोक ऐकल्याबद्दल अन् त्याच्या पायांना हात लावल्याचा अपराध म्हणून त्याने राणीला एक महिन्याच्या कारावासाची शिक्षा दिली अन् साधूलाही कैद करून त्याला उन्हात उभा करून स्वतःच चाबकाने मारून बेशुद्ध केले.

"पूर्वीचा सेनापती व देशभक्त श्रीमल्ल याला हे सर्व अनुचित व असह्य वाटले. त्याचं हृदय क्रोधाने पेटून उठले. त्याने आपला देश व त्याच्या दुस्थितीचं वर्णन करून शेजारचा राजा चन्दनवर्मा याला खालील पत्र लिहिलं.

"आमच्या मूर्ख राजामुळे आमच्या देशांत मानवीय चेतना दिवसेंदिवस लुप्त होत चालली आहे. प्रत्येक माणूस आपल्या बचावासाठी कोणालाही मारायला तयार असतो. प्रत्येकजण स्वार्थी झालेला आहे. याचं कारण असं, की स्वतः राजाच अत्यन्त स्वार्थी आहे. त्याच्या आचारामुळे देशात अन्न अन् पाणी यांचा दुष्काळ पडला आहे. नद्या, सरोवरं, तलाव सर्व काही कोरडं पडलं आहे. अनेक वर्षं पाऊसही पडला नाही. भूक भागवण्यासाठी लोकं चोऱ्या अन् लूटमार करत आहेत. ही स्थिति आणखी काही काळ अशीच राहिली तर लोक आपल्या देशाचं नुसतं नाव घेतलं तरी घृणा करू लागतील. अशा स्थितीत देशांत सुधारणा करणारा अन् जनतेला जागृत करणारा या देशात कोणीच नाही. एकच समर्थ माणूस होता, तो तर बुरखाधारी बनून चुकीच्या मार्गाने चालला आहे. मी वृद्ध, अशक्त अन् असमर्थ आहे. केवळ आपणच या देशाला सध्याच्या दुःस्थितीतून मुक्ती देऊ शकाल.

"त्याने हे पत्र आपल्या पाळीव पोपटाकडून शेजारचा राजा चन्दनवर्मा याच्याकडे पाठवले."

**क्रमशः**



# भारत- गाथा

*एका महान् संस्कृतीचा शोध*
*युगायुगांचा गौरवशाली इतिहास*

## ४. पावन नदीची अुत्पत्ति

रविवार असल्यामुळे संदीप व चमेली यांना शाळा नव्हती आणि त्यांना संध्याकाळ होण्याची वाट पहाण्याची गरज नव्हती, अन् तशी त्यांची इच्छाही नव्हती. देवनाथने वर्तमानपत्र वाचणं संपवलं, इतक्यात चमेली खळखळ हसत येअून धपकन् त्यांच्या मांडीवर स्थानापन्न झाली. सन्दीपच्या वागणुकीत संयम असे. तरीही त्याची अुत्सुकता चमेलीपेक्षा कमी नव्हती! पण त्याच्या चेहऱ्यावरून तसे दिसत नव्हते.

देवनाथचा व्यापार कार्याधिकारी असणारा पुत्र श्रीकुमार आपल्या पित्याच्या खोलीत आला. त्याला आपल्या मुलांबरोबर घालवायला फक्त रविवारीच वेळ मिळत असे. "असं वाटतंय की तुम्ही बाबांबरोबर युद्ध करायला आला आहात." मुलांवर रागावल्याचं नाटक करत तो म्हणाला.

"हां डॅडी, त्यांचं ज्ञान लुटण्यासाठी युद्ध !" चमेलीनं सांगितलं.

"या विशेष स्थितीत आजोबांना लुटण्यानं ते गरीब होणार नाहीत, हे माहीत नसतं, तर मी चमेलीला कधीच साथ दिली नसती." संदीप बोलला.

श्रीकुमारने मनोमन मुलांच्या हजरजबाबी पणाचं कौतुक केलं. तो हसला आणि आपल्या पित्याकडून वर्तमानपत्र घेअून बाहेर गेला.

"आपण आता पावन गंगेत डुबकी मारूंया." खिदळत चमेली म्हणाली, "ती पावन आहे, ते सांगायचा तुम्ही वायदा केला होता."

आजोबांनी सांगायला सुरुवात केली -

"तुम्हाला माहीतच आहे, की हिमालय पर्वत युगानुयुगे भारताचं गौरवस्थान बनून राहिला आहे. हे खरोखरच एक विचित्र क्षेत्र आहे. गूढवाद्यांची खात्री आहे की इथे अदृश्य शक्तींचा निवास आहे. हा स्वतःपुरता एक लोकच आहे. कदाचित, असं म्हणणंच जास्त अुचित होईल की हिमालयात कितीतरी लोक लपलेले आहेत."

"कितीतरी लोक या शब्दांचा अर्थ काय?" संदीपने विचारले.

"केवळ दृश्य जगताचंच अस्तित्व नसतं. तर कांही असेही जग असते कीं जे आपण पाहू शकत नाही. त्यांच्या अस्तित्वासाठी भौतिक जागांची जरूर नसते. एकाच देश-कालात अनेक लोकांचं अस्तित्व असू शकतं."





क्रमशः - विश्वावसु

"न पहाताच आपल्याला हे जाणवू शकतं का?" चमेलीने विचारले.

"तू तर माझं मन, इतकंच नव्हे तर तुझं स्वतःचं मनही पाहू शकत नाहीस. पण तरीही अनुभवानं आपण जाणू शकतो, की मनाचं अस्तित्व आहे. असे ऋषी-मुनी आहेत, की ते आपल्या अनुभवानं अदृश्य जगताबाबत जाणू शकतात." आजोबा म्हणाले अन् त्यांनी ही गोष्ट सांगितली.



"खूप पूर्वीची गोष्ट! एकदा नारदमुनी पृथ्वीची सहल करून आपले स्वामी भगवान विष्णूंच्या निवासी स्वर्गलोकाकडे परत येत होते. त्यांचा जाण्याचा मार्ग हिमालयातून जात होता. म्हणजे त्या पर्वताच्या भौतिक, स्थूल रूपातून नव्हे, तर त्यात छपलेल्या सूक्ष्म लोकांच्या मधून."

सर्वांना हे छान माहीत आहे की, नारद हे वीणा वाजवणारे एक असामान्य संगीतज्ञ होते. गायक होते आणि नेहमी भगवंताचं गुणगान करत रहात. संगीतात मग्न होअून ते विशाल अन् दिव्य अशा हिमालयाच्या दोन्ही स्थूल व सूक्ष्म दृश्यांचा आनन्द घेत हळूहळू वर चढत होते. चांदणी रात्र होती. ते अुंचावरच्या एका सुंदरशा दरीवरून जात होते, इतक्यात त्यांची दृष्टी अनेक सुंदर आकृतींवर पडली - काही बसलेल्या. काही फिरत असणाऱ्या, आणि काही चन्द्रकिरणांनी धुतलेल्या हिमशिलांवर आडव्या पडलेल्या.

नारदांनी गाणं बन्द केलं अन् त्या आकृतींकडे बारकाईनं पहात अुभे राहिले. त्यांच्या रूप-रेषा आणि मोहक हसण्याने ते चकित झाले होते!

नारदांना नक्कीच माहीत होतं की त्या अलौकिक शक्ती आहेत. पण खूपच विविधता असल्याने या कोणत्या प्रकारच्या शक्ती आहेत, हे त्यांना कळू शकले नाही.

ते त्यांच्या आणखी जवळ गेले. त्या सर्वांनी अुभे राहून अन् हात जोडून नारदांना प्रणाम केला.

"आपण कोण आहात?" नारदाने विचारले.

आम्ही सर्वजण राग-रागिणींचे आत्मे असणारे गंधर्व आहोत.

नारदाने ताबडतोब पाहिले की त्या शक्तींमध्ये काहीतरी विकृती आहे. काहींच्या गालांवर ओरखडे होते, तर काहींच्या शरीरावर कोडाचे डाग आणि काहींच्यावर दणके खाल्ल्याच्या खुणा होत्या!

"हे सारं काय आहे? तुम्हा लोकांना कोणी असं क्षत-विक्षत करून ठेवलंय?" नारदाने आश्चर्याने विचारले. गन्धर्वांनी त्याला खरी गोष्ट सांगून टाकली. केव्हांही गायक जेव्हां अहंकाराने किंवा रागाबद्दल प्रेम नसताना गातो, किंवा गाताना बेसावधपणें कांही चूक करून बसतो, जेव्हां संगीतकार आपलं वाद्य

वाजवताना रागाच्या आत्म्याला आघात पोचतो, तेव्हां तेव्हां त्याला असा ओरखडा अुठतो अशा प्रकारे अनेक वर्षांत त्यांची अशी स्थिती झालीय.

नारदाचे मस्तक शरमेने खाली झुकले, कारण ते तर संगीतज्ञ होते ना!



थोडा वेळ शांतीत गेल्यावर नारदाने विचारलें, "हे अुदात्त गंधर्वगणहो! कृपा करून आता सांगा बरं, कीं ही क्षती भरून काढण्यासाठी काय करायला हवं?"

"आम्हाला जर अत्यंत परिपूर्ण व शुद्धतम संगीत ऐकायची संधी मिळाली, तर आमचे जखमी अवयव पुन्हा ठीक होतील."

"पण परिपूर्णतम संगीत कुठे मिळू शकेल? आपण काही मार्ग दाखवू शकाल?"

"होय, भगवान शिव परिपूर्णतम गायक आहेत. परन्तु, आपणा लोकांसाठी गायला त्यांच्याजवळ वेळ कुठला? त्यांना काय आपली पर्वा?" गन्धर्वांनी आपले मत स्पष्ट केले.

"अरे, भगवान शिवाची करुणा अनन्त आहे. मी त्यांना गाण्यासाठी विनवतो ना!" असे म्हणून नारदाने त्यांचा निरोप घेतला.

नारदाला गाण्यासाठी भगवान शिवाला विनवावं लागलं नाही. ते लगेच तयार झाले, पण ते म्हणाले "माझी अडचण आहे की श्रोत्यांमधे एकही परिपूर्ण श्रोता नसेल, तर मी तिथे गाअूच शकत नाही."

"परिपूर्ण श्रोता तरी कोण आहे?" नारदाने विचारले.

परिपूर्ण श्रोता केवळ दोनच आहेत - ब्रह्मा अन् विष्णु!" भगवान शिवानं रहस्य उलगलं.

नारद तावडतोब त्या दोन देवांकडे रवाना झाले. दोघेही म्हणाले की, शिवाचं गाणं ऐकायला मिळणं म्हणजे अलभ्य लाभ आहे! तो कोण सोडू इच्छील?

या कार्यक्रमासाठी एक मुहूर्त निश्चित झाला. भगवान शिवाचा निवास कैलास येथे ब्रह्मा - विष्णु आले. सारं वातावरण संगीतमय झालं! सर्वत्र परमानन्दाचा वर्षाव होअू लागला. सर्व देव-देवता चुपचाप त्या स्थानी लवकरच पोचले. शिव गाता गाता जणू समाधी-अवस्थेत पोचले. गन्धर्वांच्या शरीरावरील जखमांच्या खुणा अदृश्य झाल्या.

अन् एकदम अचानक एक अकल्पित घडले! भगवान विष्णु संगीताच्या प्रवाहात इतके गुंग झाले, की त्यांच्या शरीराचे ज्योतिर्मय तेजोवलय विरघळले अन् प्रवाहित होअू लागले.

ब्रह्मदेवांनी हे पाहिले अन् कुणाच्या ध्यानात येण्यापूर्वीच विष्णूचं तरल प्रकाश-मंडल आपल्या कमंडलूत भरून घेतले. तो दुर्लभ पदार्थ कमंडलूत किती काळ राहिला हे कुणालाच ठाअूक नाही. पण



नन्तर तो स्वर्गातच नदीच्या रूपाने प्रवाहित केला गेला असावा. पुढे राजकुमार भगीरथाने ते पृथ्वीवर अुतरवला."

"आश्चर्यजनक!" हातात वर्तमानपत्र घेअून दारांतच अुभ्या असणाऱ्या श्रीकुमारच्या तोंडून अुद्गार बाहेर पडला. "बाबा, तुम्ही गोष्ट सांगत असताना मी वर्तमानपत्र वाचायचं विसरून दारातच अुभा राहिलो. बसायला सुद्धा विसरलो पहा. गंगेच्या अुत्पत्तीच्या मागे इतकी रोचक कहाणी असेल, अशी कल्पनाच नव्हती मला!"

प्रो. देवनाथ म्हणाले, "अरे बेटा, तू लहान असताना, मी आपलं जीवन बनवण्यात अन् शोधकार्यात इतका अडकलो होतो, की तुला गोष्टी सांगायला कधी मला जमलंच नाही. त्या कमतरतेचं मला वाईट वाटतं, म्हणून आता तुझ्या मुलांना गोष्टी सांगून मी त्याचं प्रायश्चित्त घेत असतो."

"नाही, नाही आजोबा! आम्हाला गोष्टी सांगणं हे प्रायश्चित्त होअूंच शकत नाही." चमेलीने विरोध केला.

"मी शब्दाचा ज्या अर्थानं वापर केला, तसंच तुम्ही समजायला हवं. 'प्रायश्चित' शब्दांत काय दोष आहे? तो तर माणसाला पवित्र बनवतो, अुंचावर नेतो." आजोबा अुत्तरले.

"बाबा! गंगेच्या अुत्पत्तीची कहाणी प्रतीकात्मक आहे. मी बरोबर बोलतोय ना?" श्रीकुमारने विचारले.

"तू बरोबर बोलतोयस! यात अनेक पातळीवर प्रतीक-तत्वें आहेत. भगवान शिवाला सर्व कला, संगीत, नृत्य इत्यादींचा मूळ स्रोत मानलं जातं. त्यांच्यात संगीत आपल्या अगदी शुद्ध रूपात निवास करतं. संगीत म्हणजे विश्वात व्याप्त असणाऱ्या आंतरिक समरसतेची अभिव्यक्ती आहे. समरसतेमुळें विषमरस समाप्त होतात. म्हणूनच गन्धर्वांना आपलं मूळ रूप प्राप्त झालं."

या कहाणीत संगीताच्या शक्तीचं किती छान चित्रण झालंय!

परिपूर्ण श्रोता संगीताशी तल्लीन होअू शकतो, संगीताबरोबर प्रवाहित होअू शकतो. भगवान विष्णु म्हणजे अमर्त्य चेतना आहे. गंगेच्या रूपाने त्यांचं विरघळलेलं प्रकाश-मंडल मृतकांना पुनर्जिवित करण्यांत समर्थ होअू शकलं यांत काही आश्चर्य नव्हे!"

इतक्यात आजोबांच्या सुनेनं नाश्त्याची वेळ झाल्याचं सांगितलं आणि ते अुठून अुभे राहिले.



# ताईत आणि डांस

कोहली एकदा काही कामासाठी शहरात गेला होता. तिथे राजमार्गावर एका चिंचेच्या झाडाखाली काही लोकांची गर्दी जमलेली त्याला दिसली-अुत्सुक होअून तोही तिथे गेला. गर्दी हटवत तो थोडा पुढे गेला, तेव्हां त्याला एकजण व्याघ्रचर्मावर बसलेला दिसला. त्याला लांब सफेत दाढी असून कपाळावर कुंकवाचा मोठा टिळा लावलेला होता. गळ्यात रुद्राक्षमाळही लोंबत होती. दिसायला तर तो मोठा सिद्ध मांत्रिक दिसत होता.

गर्दीत काही माणसांच्या बोलण्यावरून त्याला समजले की, हा मांत्रिक दोन दिवसांपासून तिथे बसून आहे अन् तो सर्व अडचणी किंवा रोग दूर करणारा ताईत पांच रुपयात देत असतो. त्याचं तसं आव्हानही आहे. विंध्य पर्वतातल्या एका मंदिराचा जीर्णोद्धार करण्यासाठी तो हे पैसे जमवत आहे.

कोहली आपल्या परसात विहीर खोदवत होता. पण खूप खोल खणूनही गोडं पाणी त्याला मिळालं नाही. विहिरीसाठी खूप खर्च करूनही त्याच्या पदरी निराशाच पडली. त्यामुळे तो खूप त्रासलेला होता. ताइताबद्दल ऐकून त्याला आशा वाटली. वाटलं, कीं हा आपलीही अडचण निवारेल. झटकन खिशातून पांच रुपये काढून तो पोचला.

इतक्यात अचानक एक म्हातारा वेगाने धावत येअून गर्दीत घुसला अन् मांत्रिकाजवळ जाअून म्हणाला, "महाराज! तुम्ही हा डांस पळवून लावायचा ताईत असं सांगून मला दिलात. हा खोलीत ठेवलास, तर डांस तिथे यायचं धाडस करणार नाहीत. पण तिथे तर अजूनही डांसांचंच राज्यं आहे! मी तर मिनिटभरही झोपू शकलो नाही! तुमचा ताईत बेकार अन् कुचकामी ठरला."

मांत्रिक अगदी सहज व शान्त स्वरात म्हाताऱ्याला म्हणाला, "मी सांगितल्याप्रमाणे तू प्रयोग केला नसावास. मी तर सांगितले होतं ना, की ताईत मच्छरदाणीच्या आंत ठेव म्हणून? पण तू तसं केलं नसशील ना?".





# अपकारांतून उपकार

खूप जुनी गोष्ट. भुवनगिरि देशावर हेमशंकर राजा राज्य करत होता. तो एक कुशल शासक होताच; पण याशिवाय अनेक कलांमधे निष्णात असा अुच्च कोटीचा एक कलाकार व कला-संरक्षक होता. 'कला व कलाकारांना आश्रय देणारा' अशी, त्याची ख्याती दूरवर पसरलेली होती.

तो दरवर्षी आपल्या राणीसह देशाच्या निरनिराळ्या भागांत जाअून राही व तेथील निसर्गरम्य ठिकाणें व दृश्यें यांचा आनन्द लुटे.

एका वर्षी शरदऋतूत तो अरुणाचल प्रदेशात फिरायला गेला. दोन पर्वतांमधे वसलेल्या या प्रदेशाचे अपूर्व असे सौन्दर्य स्वर्गावरही मात करील असेच होते. अुंच अुंच वृक्ष जणूं कांही आकाशाला स्पर्श करत होते. रंगीबेरंगी फुलांच्या असंख्य रांगा इन्द्रधनुष्याचा आभास निर्माण करत होत्या. धबधब्यांचे संगीत तेथील नैसर्गिक सौन्दर्य अधिकच खुलवीत होते. तिथे एक सरोवरही असून त्यात विविध रंगांचे मासे क्रीडा करत असत. शरद ऋतूंत विविध जातींचे देशी-विदेशी पक्षी तिथे मुक्कामाला येत. त्यांच्यामुळे तेथील शोभा जास्तच वाढत असे.

तेथील सौन्दर्याने राजा हेमशंकर मुग्ध झाला. राजा व राणी यांना कायमचे तिथेच रहावे असे वाटू लागले. पण राजधानीला परतणे भागच होते. त्यामुळे कांही दिवस तिथे घालवून दोघेही राजधानीला परत आले.

राजा आपला दरबारी अधिकारी चपल याच्या आग्रहानेच अरुणाचल प्रदेशात गेला होता. त्यामुळे परत आल्याबरोबर त्याला बोलावून राजाने त्याला शंभर मोहोरा बक्षिस दिल्या.

चपल हा रोचक व मनोरंजक गोष्टी सांगण्यात पटाईत होता, म्हणून राजाचे त्याच्यावर फार प्रेम होते. तो स्वतः मूळचा अरुणाचलचाच रहिवासी होता. आणि नोकरीच्या शोधात भुवनगिरीला येअून तिथेच राहिला होता. त्याचे आपल्या प्रान्ताच्या नैसर्गिक सौन्दर्यावर भारी प्रेम होते. त्यामुळेच त्याने राजाला एकदा तरी तिथे जाअून त्याचा रसास्वाद घेण्याबद्दल आग्रह केला होता.

वसुन्धरा




राजालाही अरुणाचलचे सौंदर्य इतके पसंत पडले की, तो प्रत्येकाला तेथील सौन्दर्याबद्दल सांगत सुटला! ते ऐकून बरेच लोक अरुणाचलला जाऊनही आले.

अरुणाचलच्या वैशिष्ट्याची चर्चा करताना एक दिवस चपल राजाला म्हणाला, "तिथलं सौन्दर्य नुसतं पाहिलं तरी आपोआपच प्रत्येकाला कविता स्फुरते."

"तू बरोबर बोललास चपल! अरुणाचल पाहून माझ्या मनात उठलेल्या भावनांबद्दल मी लिहून ठेवलंय. ते वाचून राणी तर म्हणाली की - "हे लेखन काव्यासारखंच आहे!" तिनं सुद्धा तेथील रम्यतेचं वर्णन करणाऱ्या कांही कविता लिहिल्या आहेत." हेमशंकर हसत बोलला.

हे ऐकून चपल फार खूष झाला. तो म्हणाला, "प्रभु! आपण तर जन्मजात कवी आहात. अरुणाचलच्या वातावरणात आपल्या भावना स्वाभाविकच प्रफुल्लित झाल्या. इथून तिकडे गेलेल्या इतरांनाही हाच अनुभव आला असेल अन् त्यांनीही आपल्या भावनांना शब्दरूप दिलं असेल. अशा लोकांचं एक संमेलन घडवून त्यांच्यापैकी श्रेष्ठ कवीचा सन्मान कां नाही करत?"

चपलला स्वतःलाच कविता रचणं अन् ऐकवण्याची आवड होती. या संमेलनात आपल्यालाही कविता ऐकवण्याची संधी मिळावी. आपला श्रेष्ठ कवि म्हणून सन्मान व्हावा अशी त्याची इच्छा होती. म्हणूनच त्याने संमेलनाचा प्रस्ताव राजासमोर मांडला होता.

त्याने एकदा आपलं काव्य स्थानिक कवी चतुरमती, याला ऐकवलं होतं. त्याच्या कवितांबद्दल चतुरमतीने आपलं मत दिलं होतं, - "तुझ्या कवितेत काव्यगुण नाहीय. तुझी बोलण्याची शैली अन् गप्पा यांच्यामुळे अजून तरी लोक प्रभावित होतात. राजाही तुला हुशार समजून तुझा आदर करतो. पण ते जेव्हां तुझं काव्य ऐकतील तेव्हां हसतील तुला! तुझं काव्य त्यांच्या मनात तुला छोटं बनवील."

परंतु चपलला वाटले की, चतुरमती केवळ आपल्याबद्दलच्या ईर्ष्येमुळे असे बोलत आहे. आपली कविता श्रेष्ठ दर्जाची असल्याबद्दल त्याची खात्री होती. म्हणूनच तो अशा संधीच्या शोधांत तो होता. एकदा राजाला आपण आपलं काव्य ऐकवू शकू.

अरुणाचलमधे फिरून परत आलेल्यांचे कविसंमेलन भरवले गेले. यात भाग घेण्यासाठी



पहिली अट अशी होती, की, यात केवळ नव्या कवींनीच भाग घ्यावा. अगोदरच प्रसिद्ध असणाऱ्या कवींना यात भाग घेता येणार नव्हता. कवितेचा विषय असावा अरुणाचलच्या नैसर्गिक सौन्दर्याचे चित्रण! सर्वश्रेष्ठ कवीला दहा हजार मोहोरा बक्षिस देऊन त्याचा सन्मान केला जाईल.

जुन्या कवींना प्रवेश नाही - हे ऐकून अनेक नव्या कवींनी सम्मेलनात भाग घेतला. श्रोतेही खूप उल्हसित होते.

राजाने स्थानिक कवि चतुरमतीला परीक्षक बनवले. व पंडीत स्वतः उच्च श्रेणीचा कवि असल्याने चतुरमतीने कदाचित नवकवींच्या कविता पसंत केल्या नसल्या.

"महाराज, आपण स्वतः कवि आहात अन् अरुणाचलच्या सौन्दर्याशी परिचित आहात. तेव्हां सर्वश्रेष्ठ कवि कोण, हे आपणच ठरवावे." या प्रस्तावाला चतुरमतीने अनुमोदन दिले.

राजा विचारांत पडला. शेवटी अन्तिम निर्णय आपल्या हातीं ठेवून कवितेचे गुण-दोष सांगून प्राथमिक निर्णय घेण्याचा अधिकार त्याने चतुरमतीवरच सोपवला.

संमेलन सुरू झाले. सामान्य माणसांनी अरुणाचलवर आपल्या कविता ऐकवून श्रोत्यांना चकित करून सोडले. चपलनेही आपले काव्य ऐकवले.

संमेलन संपल्याबरोबर चतुरमती म्हणाला, "महाराज, माझी एक विनंती आहे. आपण आत्ता सामान्य लोकांच्या असामान्य कविता ऐकल्या. अपेक्षेपेक्षा अधिक सुन्दर कवितांचा आस्वाद घेतला. अरुणाचलच्या हवेतच कविता गुणगुणत



असते आणि नुसतं तिथे गेल्याने कोणीही सहज कवि बनून जातो हे खरोखर सिद्ध झालंय. परन्तु ज्याचा जन्मच तिथे झालाय, त्याच्या तर नसेनसेतून कविता प्रभावित होत असणार. म्हणूनच त्याला सुपरिचित व जुन्या कवींच्या श्रेणीचा मानायला हवे आणि पूर्वीचा निर्णय व घोषणेनुसार, त्याची कविता चांगली असली तरी, त्याला स्पर्धेच्या बाहेरचा मानला जावा." त्या कवींमधे चपलच एकटा होता, की जो अरुणाचलमधे जन्मला अन् तिथेच पालनपोषण होऊन मोठा झाला.

राजा चतुरमतीच्या चातुर्यावर फार खूष झाला अन् त्याच्या बोलण्याशी पूर्णतः सहमत झाला.

घोषणेप्रमाणे सर्वश्रेष्ठ नव्या कवीला दहा हजार मोहोरा देऊन सन्मानित करण्यात आले. इतर

भावपूर्ण व सारगर्भित कवितांना उत्तेजनार्थ पारितोषिके मिळाली.

चपलला वाटले, ईर्ष्येमुळेच चतुरमतीने मोठ्या चातुर्याने आपल्याला स्पर्धेबाहेर काढून त्याला 'सर्वश्रेष्ठ कवी' म्हणून बक्षिस मिळू दिले नाही. त्यामुळे तो चतुरमतीवर फारच रागावला अन् राजाकडे त्याची तक्रार करून त्याला शिक्षा देववण्याचा निश्चय केला.

त्याचवेळी त्याला 'राजाला तावडतोब भेटा' अशी आज्ञा मिळाली.

चपलशी भेट होताच राजा हेमशंकर म्हणाला, ''तू आपल्या मनोरंजक अन् रोचक बोलण्याने माझं मनोरंजन करतोस, म्हणून तू मला फार प्रिय वाटतोस. त्यासाठीच एक आवश्यक गोष्ट सांगण्यासाठी मी तुला इथं बोलावलं.''

''अंगाला अत्तर लावण्याने त्याचा सुगन्ध थोडावेळ रहातो. फुलाचा परिमलही ते एकदा झाडापासून दूर झाल्यावर थोडाच वेळ टिकू शकतो. अरुणाचली जाऊन आलेल्यांना हीच गोष्ट लागू पडते. जे लोक आत्ता नुकतेच परतलेत, त्यांच्याबाबत हेच लागू पडतं. जे लोक आत्ता-आत्ताच अरुणाचलहून परतलेत, त्यांच्या कवितांमधे तिथल्या हवेंतला सुगन्ध अन् ताजेपणा होता. तू जरी तिथे जन्म घेतलास, तिथेच वाढून मोठा झाला असलास, तरी अरुणाचल सोडून बरेच दिवस झाल्यामुळे तुझ्या कवितांमधे थोडा सुद्धां गंध अन् रस उरलेला नाही. तुझ्या कवितांना बक्षिस देणें म्हणजे केवळ श्रेष्ठ कवींशी अन्याय नव्हे, तर श्रोते आणि काव्यपरीक्षकांच्या दृष्टीने, राजाचा पक्षपाती निर्णय झाला असता. चतुरमतीला ठाऊक होतं की मी पक्षपाती निर्णय कधीच घेणार नाही. अन् तू पुरस्कारयोग्य नसल्यामुळे अपमानित होशील. लोकांच्या मनात तुझा मान कमी होईल.

''मी जरी श्रेष्ठ कवीचं पारितोषिक तू मला प्रिय असल्याने, तुलाच देऊ इच्छित होतो, पण तुझ्या काव्याची पातळी इतकी खालची होती की, लोक माझीही टर उडवू लागले असते! म्हणून मीही धर्मसंकटात पडलो होतो.

''चतुरमतीनं मोठ्या चतुराईने केवळ तुलाच अपमानित होण्यापासून वाचवलं असं नव्हे, तर मलाही धर्मसंकटातून सोडवलंय.''

आता चपलनेही जाणले की चतुरमतीने आपल्याला स्पर्धेतून हटवून अपकार नव्हे, तर उलट आपल्यावर उपकारच केलाय.



कावेरीच्या किनारी - ७

# शेवटचे बेट

**वर्णन - जयन्ती महालिंगम**

**चित्र - गौतम सेन**



**तेप्पाकुळम तलावावरून शैलदुर्ग व शिखरस्थित मंदिराचे दृश्य**

सेलमच्या नन्तर कावेरी नैऋत्येकडे वळून तिरुचिरापल्ली जिल्ह्यात प्रवेश करते. श्रीरंगमपर्यन्त पोचता पोचता नदीचे पात्र इतके रुंद होते की तमिळनाडुवासी श्रद्धेने तिला 'अखंड कावेरी' असे म्हणतात. हा जिल्हा तमिळनाडूच्या अशा भागात येतो, की जिथे सर्वात अधिक भात पिकते. भात आणि ऊसाची हिरवीगार शेते आणि केळी, विड्याची पाने आणि नारळाच्या बागा नदीच्या दोन्ही किनाऱ्यांवर नजर पोचेपर्यंत दूरवर पसरलेल्या आहेत.

असे मानले जाते की तिरुचिरापल्लीचे नांव तीन डोक्यांचा राक्षस त्रिशिरा, याच्या नावावरून पडले आहे. त्याचा या ठिकाणी वध झाला होता. ३४४ पायऱ्यांची ऊभी चढण चढल्यावर त्रिचीच्या डोंगरावर असलेल्या किल्ल्याच्या शिखरावरून संपूर्ण कावेरीचे भव्य दृश्य पहाता येते. किल्ला ८३ मीटर ऊंच नैसर्गिक कड्यावर बनलेला आहे. लोकांचे असे म्हणणे आहे, की भूगर्भ शास्त्राच्या दृष्टीतून हा खडक जगांतला सर्वात प्राचीन, म्हणजे जवळजवळ ३८० कोटी वर्षे इतका जुना आहे. हा किल्ला मूलतः चोल राजांनी जवळ जवळ इ.स.पू. दुसरे शतक आणि इ. सनाच्या दुसऱ्या शतकाच्या मधल्या अवधीत त्या काळीं बनवला होता. त्यावेळी त्रिची शहर त्यांची राजधानी होते. स्थानिक लोक त्याला मलैकोट्टै असे म्हणतात. हा किल्ला कित्येक लढायांना साक्षी आहे. त्यांतच सन १७५१ मधे इंग्रज व फ्रेंच यांच्यातील कर्नाटकच्या लढायाही आहेत. त्रिचीचा वेढा जवळजवळ ३ वर्षे चालू होता. शेवटी लॉर्ड क्लाईव्हचा जय झाला. हल्लीं हा किल्ला मोडकळीस आलेला आहे. केवळ त्याचे मुख्य द्वार



**शिळेवरील गणेश-मंदिर**

शाबूत आहे.

शिखरावर भगवान गणपतीचे देअूळ आहे. त्याला अुचिपिळ्ळैयार म्हटले जाते. डोंगराच्या अुतारावर खालच्या बाजूच्या भिंतीत इतर अनेक मंदिरे बनवली गेली आहेत. यांच्यात सर्वात प्राचीन असे पल्लव गुफा मंदिर आहे. ते दक्षिणेकडील भिंतीत बनवलेले आहे. त्यात खोदलेल्या लेखांवरून निस्संदेह सिद्ध होते की ही मंदिरे पल्लव राजा पहिला महेन्द्रवर्म याच्या शासनकाळात सन ६०० ते ६३० मधे बनवली गेली होती. त्यांच्यात हिन्दूंचे देव-देवता यांच्या मूर्ती आहेत व गंगाधराच्या मूर्तीच्या खाली खोदलेल्या लेखांत कावेरीच्या सौन्दर्याचे काव्यात्मक वर्णन आढळते. ही नदी पल्लव राजांना फार प्रिय होती. आणि अधिकाराच्या दृष्टीने त्यांचीच होती. नदीचे दृश्य फारच लोभस आहे. तिच्या किनाऱ्यावरील हिरवळ अन् फुलें म्हणजे जणू तिच्या गळ्यातला हारच आहे.

खडकाच्या खाली अर्ध्या अुतारावर १०० खांबवालं शिवाचं मातृभूतेश्वर मन्दिर आहे. हे 'तायुमनावर' या नांवानेही प्रसिद्ध आहे. त्याचा ठोकळपणे अर्थ असा - 'जो आई बनला.' एका गोष्टीच्या आधारे पूम्पुहार येथे रहाणारी रत्नावती आईच्या येण्याची प्रतीक्षा करत होती. पण नदीला पूर आल्यामुळे आई नदी ओलांडू शकली नाही. अशातच रत्नावतीला प्रसववेदना सुरू झाल्या. त्यावेळी खुद्द भगवान शिवाने तिच्या आईचे रूप धारण केले आणि आई त्रिचीला पोचेपर्यन्त एक आठवडाभर रत्नावतीची सेवा केली. या स्थानी एक साधू रहात असे. त्याने भक्ति रसपूर्ण अशा पदांची रचना केली. ती "सिबन सेच्याल" या ग्रंथात संकलित



**श्रीरंगम मंदिराचे सोनेरी विमान**





**श्रीरंगम मंदिराचे गोपुर**

आहेत.

त्रिचीपासून जवळजवळ सात किलोमीटर दूर कावेरी दोन शाखांमधे विभागली जाते. आणि दोन प्रवाहांमधे एक बेट तयार होते. हेच श्रीरंगम किंवा अंत्यरंग होय. श्रीरंगम् मधे रंगास्वामी (विष्णु)चे एक भव्य मन्दिर आहे. यात भगवान. विष्णु आदिशेषाच्या शय्येवर पहुडलेले आहेत. हे मंदिर जवळजवळ तिसऱ्या किंवा चौथ्या शताब्दीत बांधले गेले होते. पौराणिक दन्तकथेनुसार असे म्हटले जाते की, विभीषण अयोध्येहून पुन्हा लंकेला परत निघाला, तेंव्हा रामाने त्याला एक देवायतन दिले. ते घेअून जात असताना वाटेत विभीषण थकला अन् कावेरी तीरावर विश्रान्तीसाठी पहुडला. झोपेतून अुठल्यावर त्याने देवायतन अुचलायचा प्रयत्न केला. पण ते अुचलले जाईना! तेंव्हा त्याला आढळून आले की ते जमिनीत घट्ट रुतले आहे! तो मोठ्याने विलाप करू लागला. विलाप ऐकून चोल राजा त्याच्याजवळ आला अन् त्याला शान्त करायचा प्रयत्न करू लागला. भगवान रंगनाथ स्वतः प्रकट होअून विभीषणाला म्हणाला, की आपण स्वतः दक्षिणेला लंकेकडे तोंड करून मागे टेकून विराजमान होअू. त्यानन्तर या देवायतनाच्या चारी बाजूंनी घेरून मन्दिर बनवले गेले.

श्रीरंगमचे मन्दिर 'तिरुवरंगम्' नावानेही प्रसिद्ध आहे. हे भारतातील सर्वात मोठे मन्दिर असून ते ६,३१,००० वर्ग मीटर एवढ्या क्षेत्रावर पसरलेले आहे. गर्भागार सात तटांच्या मध्यावर आहे. बाहेरच्या तीन तटांमधे दुकाने व रहाण्याची घरे आहेत. ते आपल्यापुरते एक शहरच असून, तिथली लोकसंख्या १० लाखांहून अधिक आहे. २१ गोपुरे किंवा अनेकमजली दरवाजे आहेत. गोपुरांवर सुन्दर कलाकृति बनवलेल्या आहेत. त्यातील एक राज-गोपुर होय. हे दक्षिण भारतातील सर्वात अधिक अुंचीचे गोपुर होय. हे ७२ मीटर अुंच असून त्यावरून चारी बाजूंचे मैलोमैल सुंदर दृश्य पहाता येते. या तीन मजली गोपुराचे बांधकाम खरे म्हणजे १८व्या शतकात सुरु झालं होतं. परन्तु इंग्रज व फ्रेंच यांच्यात लढाई सुरू झाल्यामुळे ते थांबवावे लागले. शेवटी ते १८९७ मधे पुरे झाले. गर्भागार छोटे आहे. त्याची लांबी व रुंदी अनुक्रमे ७२ मीटर व ५४ मीटर आहे. यात तेलाचा दिवा लावून ठेवलेला असतो. याचा प्रकाश अंधुक असतो. त्यामुळे पुजारी जेव्हां कापूर लावून आरती करतो, तेव्हांच फक्त भक्तगणांना भगवन्ताचं स्पष्ट दर्शन होतं.

मन्दिरात बारा अलवारांच्या मूर्ती आहेत. हे अलवार प्रसिद्ध वैष्णव संत कवी होअून गेले. त्यांच्या गीतांचा शोध घेअून त्यांचा एक संग्रह तयार करण्याचं काम वैष्णव संप्रदायाचे संस्थापक नाथमुनी यांनी केले. तो 'नलेयरा प्रबंध' नावाने प्रसिद्ध आहे. त्यांचे शिष्य रामानुजाचार्य हे एक महान वैष्णव गुरु व तत्वज्ञानी होते. त्यांची मूर्तीही श्रीरंगमच्या मंदिरात आहे.

चौथ्या तटात वेणु गोपाल कृष्णाचे होयसाळ शैलीचे एक सुन्दर मंदिर आहे. हा शिल्पकलेचा एक अजब नमुना आहे. त्यामुळे हे मन्दिर म्हणजे दक्षिण भारताची सर्वात सुन्दर कृति असे मानले जाते. या मंदिरातही हजार खांबांचा एक

हॉल आहे. तिथे यात्रा-रथ ठेवलेला असतो. खांबाचे आणखीही एक दालन (हॉल) आहे.



मदुरा व तंजावरच्या नायक राजांनी आपल्या शासनकालात श्रीरंगम मंदिराला जमीन व धर्मादाय भेटी उदारपणें दिल्या आहेत. मंदिराचा पुनरुद्धार केला गेला व कित्येक नव्या इमारती बनवल्या गेल्या. अच्युत अप्पा नायक राजा मोठ्या अुदार वृत्तीचे होते व त्यांचे कुशल प्रधानमंत्री गोविन्द दीक्षित हे कल्याणकारी कार्यांमधे त्यांना मदत करत असत. त्यांच्या शासनकाळात विमानावर सोन्याचा मुलामा चढवला गेला होता. नायकांच्या शासनकाळात खडकावर बनलेल्या किल्ल्याची दुरुस्ती करवली गेली, व लढाऊ दृष्टीने तो मजबूत केला गेला.

एक मुसलमान राजकुमारी श्रीरंगनाथाची अनन्य भक्त होती. इथे तिची कबर पाहून मनात कुतुहल जागृत होतं. ती तुलुक्का नचियार (मुसलमान सेविका) या नावाने प्रसिद्ध होती. रंगनाथला रोज चपाती, लोणी, दूध व हिरवे चणे यांचा जो नैवेद्य अर्पण केला जातो, त्यांतला काही भाग या कबरीला अर्पण केला जातो.

डिसेंबर - जानेवारीतील वैकुंठ एकादशीच्या दिवशी मंदिरात मोठा अुत्सव साजरा केला जातो. या निमित्ताने भगवंताची शोभायात्रा काढली जाते. हजारो भक्तगण हा रथ ओढतात. या भक्तगणांमधे रथ ओढण्याचा मान मिळवण्यासाठी जणू चढाओढ लागते. मार्च-एप्रिल महिन्यात आणखी एक रथ-यात्रा काढली जाते. ही यात्रा चोल राजांची भूतपूर्व राजधानी त्रिचीजवळील अुरैयुरच्या नचियार मन्दिरात समाप्त होते. इथे भगवान आपल्या भार्येला भेटतात व नअू दिवसपर्यंत अुत्सव साजरा केला जातो. यात पुजाऱ्यांच्या दोन दलांकडून भगवान व भार्या यांच्यात भांडण झाल्याचे नाटकही रंगवले जाते. तमिल नववर्षाच्या दिवशीं वार्षिक अुत्सवही साजरा होतो. मंदिराचा खजिनदार आपल्या विशिष्ट पोशाखात भगवन्तासमोर हजर होतो. तो काल्पनिक व्यावसायिकांना मालगुजारीवर गाव देण्याचे नाटक करतो. अशा प्रकारे भगवान रंगनाथ अजूनही जमिनी व गावांचे खरे स्वामी आहेत व पुढेही कायम रहातील या गोष्टीला पुष्टी दिली जाते.



श्रीरंगम मंदिराच्या हजार खांबवाल्या दालनाची शिल्पकला

श्रीरंगम बेटाला कावेरी नदीने घेरले असले तरी, नदीच्या दोन्ही शाखा श्रीरंगमच्या पूर्वेकडील टोकाला एकमेकींना मिळत नाहीत. एक शाखा अुत्तरेकडे वळते. ही मुख्य अुपनदी कोलरून किंवा कोळीडम नावाने प्रसिद्ध आहे. कावेरी जिथे दोन भागात विभागली जाते, तिथे कलाने किंवा अनैकट्टू नावाचे एक अजब धरण आहे. ते जवळजवळ १६०० वर्षांपूर्वी चोल राजा कारीकलान याने बनवले होते.





# शिवचा विवाह

शरचंद्रिका देशाचा राजा चन्द्रसेन व त्याची महाराणी चूडामणी हे दोघे बरेच दिवस संतानप्राप्ती न झाल्याने चिंतित होते. खूप पूजा-पाठ, यज्ञादि अनुष्ठानें अन् ऋषि मुनि वगैरेंची सेवा-सुश्रुषा केल्यानंतर त्यांना एका सुन्दरशा कन्यारत्नाची प्राप्ती झाली. राजदम्पतीला पुत्राची अपेक्षा होती, म्हणून त्यांनी या कन्येचे लालन-पालन पुत्राप्रमाणे केले आणि कालक्रमात पुत्र नसल्याचं दुःख ते विसरून गेले.

राजकुमारीचे नाव मधुमिता ठेवले गेले. राजमहालात खूपशा दासी असल्या, तरी मधुमिता जास्त वेळ बहुधा सर्वात वृद्ध दासी शान्ता हिच्याचजवळ राही.

मधुमिता पांच वर्षांची झाल्यावर तिला आपल्याबरोबर खेळायला बरोबरचे कोणी मित्र-मैत्रिण नसल्याचे जाणवूं लागले, अन् त्यामुळे ती फार अुदास राहू लागली. तिचं मन रमवण्यासाठी शान्ता तिला तिच्याच वयाच्या आपल्या नातवाबद्दल - शिवबद्दल - कांही ना कांही सांगत असे. मधुमिता अगदी लक्षपूर्वक शिवबद्दल ऐके अन् तेवढाच वेळ खूप आनन्दी दिसत असे.

एक दिवस मधुमिताने शान्ताला म्हटले, ''अुद्या आपल्याबरोबर शिवलाही घेअून ये धात्री आई! आम्ही दोघं बरोबर खेळू-नक्की आण हं!''

शान्ताच्या मनात भीती होती की शिवला अंतःपुरात आणले तर महाराज नाराज होतील. तरीही ती राजकुमारीचा आग्रह टाळू शकली नाही. दुसऱ्या दिवशी आपला नातू शिव याला अंतःपुरांत बरोबर घेअून आली. यावर कोणीही आक्षेप घेतला नाही. मधुमिता शिवला भेटून खूप खुष झाली अन् दिवसभर त्याच्याशीच खेळत राहिली. मधुमिताला शिवबरोबर खुष पाहून महाराज अन् महाराणीही खुष दिसले. आता तो रोजच राजकुमारीबरोबर खेळू लागला.

एक दिवस राजकुमारीला शिवबरोबर पाहून महाराणीच्या मनात आलं की, आतां ही काही लहान मुलगी राहिलेली नाही. अन् आता महाराजांना हिच्या विवाहाबद्दल विचार करायला हवा. ही गोष्ट

रामावतार शुक्ला



तिने महाराजांना सांगितली. दुसऱ्याच दिवसापासून शिवचे येणे बन्द झाले. अन् राजदम्पती राजकुमारीच्या विवाहाबद्दल गंभीरपणे विचार करू लागली.

शिवचे येणे अचानक बन्द झाल्यामुळे मधुमिता दुःखी राहू लागली. अन् दासदासींकडून तिने जेंव्हा स्वतःच्या विवाहाबद्दल ऐकले, तेंव्हा ती शान्ताला म्हणाली, "धात्रीआई, मी शिवशिवाय दुसऱ्या कुणाशीही लग्न करणार नाही. अन् तसं न झालं, तर मी जिवंतही रहाणार नाही."

हे ऐकून शान्ता थरकापली. शिव अन् राजकुमारी यांचं एकमेकांवर प्रेम आहे, हे तिला ठाऊक होते. पण राजकुमारी शिवशी लग्न करण्याचा हट्ट करील असा विचार तिच्या मनात कधी आलाच नव्हता. तसं घडलं तर तिच्या नातवासाठी अनर्थ माजला असता.

शान्ताला समजेना की आता काय करावे! ती आपल्याच कृतीचा पश्चात्ताप करू लागली, की शिवला अन्तःपुरात आणल्यामुळेच हा सारा अनर्थ ओढवला आहे.

तरीही खूप विचार करून मधुमिताला सल्ला देत ती म्हणाली, "मग तू एक काम कर बाळ! महाराज महाराणी यांना सांग की आपल्याला इतक्यांत विवाहच नाही करायचा! या वेळात मी काही अुपाय शोधते."

राजकुमारी मधुमिताने शांताचे हे बोलणे मानले.

आपल्या आजीकडून ही बातमी ऐकून शिवचा आनन्द गगनात मावेना!

"पण या क्षणिक आनन्दानं तुझ्या समस्येला तोडगा मिळणार नाही." नातवाला समजावत शान्ता बोलली. "तुला राजकुमारीयोग्य बनायला हवं. धन व शक्ति मिळवायला हवी. यासाठी बुद्धीचा अुपयोग करायला हवा. तुला एखाद्या राजकुमारापेक्षाही अधिक योग्य बनायला हवं. इतकं योग्य, की महाराज स्वतःच राजकुमारीशी विवाहाबद्दल तुझ्याजवळ इच्छा प्रकट करतील."

हे ऐकून शिव गंभीर झाला. अन् दुसऱ्याच दिवशी सकाळी धन, शक्ती व योग्यता प्राप्त करून घेण्याचा संकल्प करून त्याने घर सोडले. चालतचालत तो जंगलात पोचला. तिथे हातात बाजा घेअून अुदासपणे एका झाडाखाली बसलेल्या एका व्यक्तीशी त्याची गाठ पडली.

शिवच्या विचारण्यावरून आपला परिचय देत तो म्हणाला, "माझं नाव राग! मी खूप काळपर्यन्त आपल्या गुरूची सेवा केली. त्यांनी मला हा बाजा दिलाय. हा वाजलवल्यावर विकृत स्वर वाजतात, ते ऐकून डोकेदुखी सुरू होते. जो कोणी हा बाजा ऐकेल तो मारपीट करून मला हाकलून देतो. हा



बाजा मला निरर्थकच ठरलाव."

"धीर धर! बुद्धीचा अुपयोग करून यातूनच लाभ मिळवू शकशील तू! चल माझ्याबरोबर." त्याला प्रोत्साहन देत शिव बोलला अन् त्याला बरोबर घेअून पुढे निघाला.

आणखी काही अंतर पुढे गेल्यावर एक असा माणूस भेटला की तो आपले मस्तक चिखलात घालून शीर्षासन करत होता. त्याने डोकं बाहेर काढल्यावर शिवने विचारले, "कोण आहेत तू? अन् असं चिखलात डोकं का घालत आहेत?"

"माझं नाव आहे नेत्र! मी पृथ्वीच्या गर्भात लपलेलं धन पहातो आहे." तो म्हणाला.

आश्चर्यानं शिवने विचारले, "दिसलं का काही मग?"

"हो, मला साफ दिसलं की जवळजवळ शंभर फूट खोल अफाट सोनं पडलेलं आहे. पण मी एकटा ते खोदून बाहेर काढू शकत नाहीय." नेत्र दुःखी आवाजात म्हणाला.

"काळजी नको करूस! सगळं ठीकच होईल. पण आधी सांग की ही शक्ती कशी प्राप्त झाली?" त्याचं सान्त्वन करत शिव म्हणाला.

"एक मुनी एका झाडाखाली ध्यानस्थ होते. तेंव्हा त्यांच्यावर एका वाघाने झडप घेतली. मी आपल्या तलवारीने वाघाला मारून टाकले. अन् मुनीने प्रसन्न होअून मला ही दिव्यदृष्टी प्रदान केली.

"मग आता चिंता सोडून दे अन् माझ्याबरोबर चल. वेळ आली की सारं काही ठीक होईल." असे म्हणून शिवने नेत्रलाही आपल्या बरोबर घेतले.

पुढे गेल्यावर त्यांना एक शिकारी दिसला. त्याच्या हातात एक खेळण्यातले छोटेसे धनुष्य होते. तो झाडाखाली बसून कसला तरी विचार करत होता.



शिव त्याला म्हणाला, "मुलांच्या या छोट्या धनुष्यानं काय करतोस तू? यानं तर एकादा पक्षीही मारता येणार नाही!"

"अरे हे खेळातलं धनुष्य नव्हे, पण एक अद्भुत शक्तीवालं सचेतन धनुष्य आहे! बलवानात बलवान शत्रूलाही हे एका क्षणांत पराजित करू शकतं! बास, लक्ष्यावर मन एकाग्र करून, देवीचं ध्यान करून बाण सोडावा लागतो इतकंच." धनुष्याचा महिमा सांगत शिकारी बोलला.

"पण तुला हे दिव्यास्त्र कसं मिळालं? अन् तुझं नाव काय?" शिवने विचारले.

आपला परिचय देत शिकारी म्हणाला, "माझं नाव आहे बल. एक मान्त्रिक निष्पाप लोकांना फसवून दुष्ट शक्तींच्या सिद्धीसाठी त्यांचा बळी देत असे. मी त्याला फसवून देवीच्या पायावर त्याचाच बळी दिला. देवीने प्रसन्न होअून मला हे दिव्य धनुष्य



दिलं. पण याचा अुपयोग कसा करू, हेच मला कळत नाही."

"चिंता सोड अन् चल माझ्याबरोबर." असे म्हणून शिवने बललाही बरोबर घेतले अन् चौघंही पुढे निघाले.

आणखी थोडं पुढे गेल्याबर त्यांना कठोर कर्ण नावाचा एक नरभक्षक राक्षस दिसला. रस्त्यावरून जाणाऱ्या लोकांना तो खाअून टाकत असे. शिव अन् त्याचे दोस्त पाहून तो आनन्दाने ओरडला. अन् दिशेने झेपावला.

शिवने पटकन् रागचा बाजा घेअून जोरजोरात वाजवायला सुरुवात केली. त्या कर्णकटु आवाजाने राक्षसाचं डोकं फुटू लागलं. पण शिव वाजवतच राहिला. शेवटी वेदनेने तळमळत राक्षस म्हणाला, "हा बाजा प्राणघातक आहे. तुला कुठून मिळाला हा? तावडतोब आवाज बन्द कर, तुझ्या पाया पडतो मी! मी आता तुम्हाला कुणाला खाणार नाही. आणि तू म्हणशील ते करीन."

बाजा बन्द करून शिवने राक्षसाला सोन्याच्या खाणीची जागा दाखवून तिथे खणून सोनं बाहेर काढायला सांगितलं. राक्षसानं आपलं सारं बळ एकवटून त्या खाणीतलं सगळं सोनं बाहेर काढून दिलं.

शिव नंतर आपल्या मित्रांसह सारं सोनं घेअून राजाला भेटला अन् ते त्याला भेट देअून म्हणाला की आवश्यकता पडेल तेंव्हा प्रजेच्या कल्याणासाठी आम्ही आणखीही सोनं भेट देअू शकतो.

राजा चन्द्रसेनने प्रसन्न होअून शिवला राजकीय सन्मान दिला! आणि राजभवनाच्या एका विशिष्ट अतिथीगृहात मित्रांसह त्याच्या रहाण्याची सोय केली.

तेंव्हांच राजा चन्द्रसेनकडे शेजारच्या राजा श्रीचन्द्रकडून एक विचित्र प्रस्ताव आला. तिथल्या दूताने अशी खबर आणली की, एक तर राजा चन्द्रसेनने आपली राजकुमारी मधुमिता हिचा विवाह त्याच्या एकुलत्या एक पुत्राशी करून द्यायचे कबूल करावे; नाहीतर तो स्वतः शंभर हत्ती, दहा हजार घोडेस्वार अन् पन्नास हजार इतकं पायदळ घेअून शरचन्द्र देशावर आक्रमण करण्यासाठी येणार आहे.

ही बातमी ऐकून राजा चंद्रसेन फार घाबरून गेला. त्याची श्रीचन्द्रच्या मुलाशी मधुमिताचा विवाह करून द्यायची इच्छा नव्हती अन् त्याच्या विशाल सैन्याला तोंड देण्याइतकी त्याची तयारीही नव्हती. श्रीचन्द्रचा मुलगा विलासी, दुराचारी व अयोग्य होता. अन् मधुमिताच्या लायकीचा तर मुळीच नव्हता. पण दुसरीकडे त्याच्याकडे इतके सैन्यही नव्हते, त्यामुळे युद्ध करणंही शक्य नव्हतं. राजा किंकर्तव्यमूढ झाला.



महाराजा चन्द्रसेनने ही गोष्ट राणी व मधुमिता यांनाही सांगितली. मधुमिताकडून राजाची ही अडचण शिवलाही कळली.

शिव राजाला एकान्तात भेटून म्हणाला, "महाराज! अशा अपमानजनक स्थितीत कोणीही प्रतिष्ठित राजा आपल्या मर्यादेच्या रक्षणासाठी युद्धच करणं स्वीकारेल, मग परिणाम काही का होईना! प्रतिष्ठा संभाळून युद्धात मृत्यूला कवटाळणं, हे अपमानित जिण्यापेक्षा लाख वेळा श्रेयस्कर! मग ते कितीही सुखकर असलं तरी! तेंव्हा आता चिन्ता सोडून युद्धाची तयारी करा. अन् त्यांच्या दूताकरवी आपण युद्ध करायला तयार असल्याचं कळवा."

"शेजारचा राजा दुष्ट आहे, आसुरी प्रवृत्तीचा आहे - हे त्याच्या निरोपावरून स्पष्टच दिसतंय. त्यामुळेच त्याचा मुलगाही लम्पट, विलासी अन् दुराचारी निघालाय. माझी खात्री आहे की, या दिव्य धनुष्याच्या साह्याने दुष्ट शक्ती - मग त्या कितीही विशाल असल्या तरी - नक्कीच पराभूत होतील."

"आपलं सैन्य कितीही लहान असलं तरी, आपण ते माझ्याबरोबर पाठवा आणि राजभवनात निश्चिंतपणे रहा."

राजाची थोडीसी सेना अन् आपले मित्र बरोबर घेअून शिव युद्धासाठी निघाला.

शिवच्या हातातलं ते छोटं धनुष्य पाहून हत्तीवर बसलेला श्रीचन्द्र गडगडून हसला अन् म्हणाला, "अरे मूर्खा, मुलांच्या खेळातलं धनुष्य घेअून इथे कशाला आलायस? हे खेळाचं नव्हे, लढाईचं खरंखुरं मैदान आहे."

शिवने तेंव्हांच मन शान्त करून देवीचं ध्यान केलं अन् एकाग्रचित होअून श्रीचन्द्रचं हृदय हेच आपलं लक्ष्य बनवलं अन् बाण सोडला!

बाणाने आपले काम अचूक केले. या आकस्मिक आघाताने राजा जखमी होअून हत्ती-वरून खाली कोसळला अन् गतप्राण झाला. इकडे रागने शत्रुसैन्यात घुसून आपला बाजा वाजवायला सुरुवात केली, कठोर कर्ण पळणाऱ्या शत्रु सैनिकांना पकडून गिळून टाकू लागला. युद्ध सुरू होण्यापूर्वीच श्रीचन्द्रच्या सैन्यात पळापळ झाली. 'शिव की जय' च्या घोषणा सर्वत्र निनादू लागल्या. युद्धात श्रीचन्द्रचा मुलगाही मारला गेला.

राजा चंद्रसेनने मोठ्या थाटामाटांत मधुमिताचा विवाह शिवशी करून दिला अन् जिंकलेलं शेजारचं राज्य जांवयाला आंदण दिलं. शिवने आपल्या मित्रांना निरनिराळे मन्त्री बनवलं अन् तो 'शिवसेन' नावाने प्रसिद्ध राजा झाला.



# सृजनात्मक पद्धती

या स्तंभामधील वाक्प्रचार केन्द्रीय भावना बनवून गोष्ट लिहीण्याचा एक नमुना आमच्या बालवाचकांच्या मार्गदर्शनासाठी इथे दिला जात आहे.

## कोल्ह्याला द्राक्षं आंबट

एका गावात रामनाथ नावाचा एक व्यापारी रहात असे. गावात त्याची चांगली प्रतिष्ठा होती. त्याला अुपवर असणारी एक सुन्दर मुलगी होती - सुकन्या. खेड्यात राहिल्यामुळे ती जास्त शिकू शकली नव्हती, पण घरकामात मात्र ती खूपच तरबेज होती. रामनाथ व त्याची पत्नी दमयन्ती, आता तिच्या विवाहाबद्दल चिन्तित होते.

पूर्वी त्या गावात राहणारा, रामनाथचा एक मित्र श्यामसुंदर आपला व्यापार वाढवण्यासाठी शहरात जाअून राहिला होता. त्याचा मुलगा मनोहर डॉक्टर बनून नोकरीसाठी परदेशांत गेला.

''तुमचा मित्र श्यामसुन्दर याच्या मुलाचा अजून विवाह झालेला नाहीय. असं ऐकलंय तोही मुलासाठी योग्य मुलीच्या शोधात आहे. तुम्ही का नाही त्याच्याशी बोलणी करत? मुलगा होतकरू आहे, डॉक्टर आहे, परदेशात नोकरी करतोय, असा मुलगा हातात मशाल घेअून शोधायला गेलं तरी सापडायचा नाही. जमूनही जाईल एखाद्या वेळी! मुलगा-मुलगी लहानपणापासून एकमेकांना ओळखतही आहेत.'' रामनाथला रात्री चिन्तित पाहून दमयन्तीने सल्ला दिला.

रामनाथना विचार पटला. सकाळी अुठून श्यामसुंदरला भेटायला तो शहरात गेला. श्यामसुन्दर एक दिवस मुलीला पहायला गावात आला. त्याला मुलगी पसन्त पडली. परन्तु घरी गेल्यावर त्याची बायको म्हणाली, ''खेड्यातली ही मुलगी मनोहरबरोबर परदेशात जाअून राहू शकेल? त्याला तर चांगली शिकली - सवरलेली शहरी मुलगी हवी. पहा, नंतर तिला सोडून-बिडून दिलं जाअू नये! तसं झालं तर समाजात नाक कापलं जाईल आपलं!''

नंतर दोघांनी आपसात विचार करून रामनाथला पत्र लिहिलं की, मुलगा विदेशात कुणा मुलीशी आमच्या मनाविरुद्ध लग्न करू म्हणतोय म्हणून आम्हाला तुमच्या स्थळाशी कर्तव्य नाही.

हे ऐकून रामनाथचं मन खट्टू झालं. तो फारच काळजीत राहू लागला. गाववाल्यांनाही कानोकान बातमी कळली होती की, त्याच्या मुलीचं लग्न श्यामसुन्दरच्या मुलाशी ठरत आहे. आता गाववाल्यांना तो काय सांगणार? कसं तोंड दाखवणार?

सुकन्याही हे ऐकून खूष होती की आपलं लग्न मनोहरशी होणार, अन् त्याच्याबरोबर आपण परदेशात जाअून रहाणार. पण आता ही बातमी कळून तिच्या मनालाही मोठाच धक्का बसला. पण पित्याला चिन्तित अन् त्रासलेला पाहून ती म्हणाली, ''हे तर छानच झालं ना बाबा! की त्या लोकांनी 'नाही' म्हटलं. नाहीतर मीच म्हणणार होते की - मला मनोहरशी लग्न करायचं नाही, जो माणूस भाकरी मिळवण्यासाठी मातेसारखी असणारी आपली मातृभूमी सोडू शकतो, तो अुद्या आपले आई-बाप आणि बायकोलाही सोडू शकेल. म्हणूनच ही काही काळजी करायची गोष्ट नव्हे, अुलट खूष होण्याची आहे. याला तर तुम्ही भगवन्ताची कृपाच म्हणा!''

''हां,मुली, ही द्राक्षं आंबटच आहेत!'' आपल्या छातीतली कळ दाबत अन् अुसासा सोडत पिता म्हणाला.



९१ - युद्धाची तयारी

# महाभारत

पांडवांच्या सेना कुरुक्षेत्रात प्रवेश करताच सैनिक-शिबिरं बनवण्यासाठी अनुकूल जागा शोधली गेली. तिथे गवत, लाकूड आणि पाण्याची चांगली व्यवस्था होती. जवळ कुठे स्मशान, देवळं आणि ऋषींचे आश्रम नव्हते. कृष्ण आणि अर्जुन यांनी अनेक राजांना बरोबर घेअून रथांतून शिबिर निर्मितीचा सारा प्रदेश हिंडून पाहिला. कांही कांही ठिकाणीं कौरव सैनिक गट बनवून बसले होते. कृष्णाने त्यांना हाकलून दिले.

धृष्टद्युम्न, सात्यकी व युयुधान यांनी शिबिर निर्मितीसाठी मापें घेतली. हिरण्वती नदीच्या किनाऱ्यावर पांडवांची शिबिरं तयार झाली. त्यांच्या चारी बाजू घेरून कृष्णाने मोठा खंदक खोदवला. पांडवांच्या शिबिरांसारखी शिबिरं इतर राजांसाठीही बनवली गेली. सर्वच शिबिरांमधे भोजन व पाण्याची सर्व व्यवस्था केली गेली. सैन्याबरोबर कित्येक हजार शिल्पकार व वैद्यही होते. कवच, आयुध, मध, तूप, धूप इत्यादींचे डोंगरासारखे ढीग लावले गेले. युधिष्ठिरने प्रत्येक शिबिरात जाअून सारी व्यवस्था ठीक आहे की नाही हे स्वतः पाहून घेतले. पांडवांकडून शिबिर व्यवस्था झाल्याचं कळल्यावर त्यांचे मित्र राजे आपल्या दल-बलासह तेथे येअून दाखल झाले.

तिकडे कृष्ण हस्तिनापुरहून निघाल्याबरोबर दुर्योधनाने कर्ण, शकुनी व दुःशासन यांना बोलावून म्हटले, ''कृष्णाची तर अशीच इच्छा आहे की माझ्यात आणि पांडवांच्यात युद्ध व्हावं. तो पांडवांना माझ्याविरुद्ध भडकवील, आपल्याला





युद्धाची जंगी तयारी करायला हवी. तेव्हा तुम्ही लोक खूप जागरूकपणाने युद्धाची तयारी करून कुरुक्षेत्रावर शिबिरं तयार करवा. आपल्याला खाद्यपदार्थ ज्या मार्गाने मिळणार, ते शत्रुच्या ताब्यांत न जातील यासाठी आवश्यक तो अुत्तम पहारा बसवायला हवा. शिबिरांना आवश्यक सामानाबरोबरच आयुधंही भरपूर प्रमाणांत अुपलब्ध असावीत. लाखोंच्या संख्येनं पताका अन् ध्वजा तयार करवा. शिबिरांमधले रस्ते समतल बनवून घ्या. अुद्याच सैन्य इथून निघून शिबिरात पोचावे."

कौरवांची शिबिरंही तयार झाली. सैनिकांच्या आवाजांनी हस्तिनापूर दुमदुमलं. कौरवांचे सैन्य ही आपापल्या शिबिरात पोचले.

कौरवांना मारण्यासाठी सारे प्रयत्न करून चुकल्यावर शेवटी युधिष्ठिर चिन्तेत पडला. त्याने कृष्णाला विचारले, "कृष्णा, आपण करत असलेले प्रयत्न धर्मविरुद्ध नाहीत का? आपण आपलेच नातेवाईक, भाअू, आजोबा वगैरेंना मारून आपल्याच वंशाचा सर्वनाश करू पहात आहोत. हे धर्मसंमत आहे? आणखी या नरसंहारात कित्येक निर्दोष व्यक्तींचे प्राण जातील, कित्येक स्त्रिया विधवा होतील, कित्येक मातांची ओटी रिकामी होअून जाईल! यावर धर्मनीती काय म्हणते?"

यावर कृष्ण अुत्तरला, "आपल्याला राज्याचा हिस्सा दिला नाही तर आपण कौरवांशी समझोता करू शकणार नाही. अशा स्थितीत युद्ध अनिवार्य होतं. हे युद्ध न झालं, तर अधर्म आणि अन्याय वाढत राहील, अत्त्याचार आणि पाप वाढेल. हे युद्ध धर्म अन् न्यायाच्या रक्षणांसाठी आहे. हे धर्मयुद्धच आहे. आणि ते आपण टाळू शकणार नाही."

कृष्णाच्या तोंडून हे बोलणे ऐकल्यानन्तर युधिष्ठिरने युद्धाची घोषणा दिली. त्यामुळे सैन्यात अुत्साह संचरला.

यानन्तर युधिष्ठिर भीम व अर्जुन यांना म्हणाला, "वंशाचा विनाश रोखण्यासाठी आपण वनवास आणि अज्ञातवासही भोगला, असंख्य यातना झेलल्या. पण कौरवांनी आपल्या भावनांची किंवा वंश वाचवण्याच्या आपल्या प्रयत्नांची मुळीच कदर केली नाही. अुलट आपलं हे दौर्बल्य आहे असंच ते समजत राहिले. आपण त्यांचं प्रत्येक कपट अन् दुष्ट भावना विसरायचा प्रयत्न केला. परंतु सगळं व्यर्थ झालं. पण वंशाच्या विनाशाचा आता आपण जो प्रयत्न करत आहोत, तो सफल होणार हे निश्चित आहे. मला हे समजत



नाही कीं आपण आपले गुरुजन अन् वृद्धजनांचा वध करून कसला विजय मिळवणार आहोत?''

''आपली माता आणि विदुरकाकांनी आपल्याला ज्या हिताच्या गोष्टी सांगितल्या, त्यापेक्षा अन्य उत्तम धर्म कोणता? द्रौपदीच्या अपमानाचा सूड घेण्यापेक्षां दुसरा कोणता चांगला धर्म आहे? अधर्म अन् अत्याचार नाहीसा करण्यापेक्षा श्रेष्ठ धर्म दुसरा कोणता? युद्धभूमीवर आता सैन्य समोरासमोर उभं असताना क्षत्रियाला युद्धापेक्षा दुसरा चांगला धर्म कोणता? आपला मार्गदर्शक कृष्ण याच्या आदेशपालनापेक्षा मोठा धर्म कोणता? तेव्हां आता युद्ध नक्कीच अटळ आहे.'' भीम-अर्जुन एका सुरात म्हणाले आणि कृष्णाने त्यांच्या विचारांचे समर्थन केले.

दुसऱ्या दिवशी दुर्योधनाने त्याच्या पक्षाकडून लढायला आलेल्या अकरा अक्षौहिणी सैन्याचे त्यांच्या ताकदीनुसार वर्गीकरण केले. त्याने उत्तम सैन्य पुढे, मध्यम शक्तीचं सैन्य मध्यभागी व दुर्बल सैन्य मागे उभं केलं. तुटलेल्या रथांची दुरुस्ती करण्यासाठी लाखोंच्या संख्येनं लाकडं तयार ठेवली. सर्व रथांमधे तुणीर व बाण ठेवले गेले. तऱ्हतऱ्हेची आयुधं, तेलं अन् अन्य सामग्री एकत्र जमवली.

यानन्तर दुर्योधनने आपल्या अकरा अक्षौहिणी सैन्यासाठी अकरा सेनापति नियुक्त केले. ते होते- कृपाचार्य, द्रोण, शल्य, सैंधव, सुदक्षिम, कृतवर्मा, अश्वत्थामा, कर्ण, भूरिश्रवस, शकुनी आणि बाल्हिक.

भर सभेत अशा प्रकारे अक्षौहिणी-पतींची नियुक्ती केल्यानन्तर दुर्योधनने भीष्मांकडे वळून, हात जोडून त्यांना नमस्कार केला आणि म्हटले, ''महात्मन्! कितीही का मोठं सैन्य असेना, योग्य सेनापतीच्या अभावी ते मुंग्यांच्या वारुळाप्रमाणे चिरडलं जाईल. निरनिराळ्या सेनापतींमधे आपसांत स्पर्धा होईल, पण मैत्री नाही होणार! प्राचीन काळी हैहय क्षत्रियांशी ब्राह्मणांनी युद्धाची घोषणा केली. त्यांच्या बरोबर राहून वैश्य अन् शूद्र वंशीयांनीही हैहयांशी युद्ध केलं. अनेक लढाया झाल्या, तरी अल्पसंख्यांक हैहयांचाच विजय होत राहिला. याचं कारण असं की, त्यांचा एकच सामर्थ असा नेता होता. पण बाकी तीन वर्णांच्या सैन्याचे अनेक नेते होते. या रहस्याचा पत्ता लावून ब्राह्मणांनीही एका समर्थ व्यक्तीला नेतृत्व देऊन हैहयांवर विजय मिळवला. आपण तर नीतिशास्त्रात शुक्रासारखे आहात, आमचे हितैषी आहात, धर्मात्मा आहात, अजेय आहात. म्हणून माझ्या सगळ्या सैन्याचे तुम्हीच अधिपती बना आणि





इन्द्राने देवांचं जसं रक्षण केलं, तसं आपण आमचं रक्षण करा.''

दुर्योधनाच्या सगळ्या सैन्याचा सेनापती बनण्यासाठी भीष्मांनी दोन अटी घातल्या - एक म्हणजे, पांडवांपैकी कोणाचीही मी हत्या करणार नाही. अन् दुसरी म्हणजे कर्ण युद्धक्षेत्रात असेपर्यन्त मी युद्ध करणार नाही; कारण तो नेहमी माझ्याशी ईर्ष्या करतो. म्हणून कर्णानं प्रथम युद्धक्षेत्रावर यावं किंवा मी तरी.''

भीष्माच्या तोंडून हे बोलणे ऐकून कर्ण दुर्योधनाला आश्वासन देत म्हणाला, ''राजा, भीष्म जिवन्त असेपर्यन्त मी रणक्षेत्रावर पाऊल ठेवणार नाही.''

यानन्तर दुर्योधनाने शास्त्रविधीप्रमाणे भीष्माला प्रधान सेनापती म्हणून अभिषेक केला. तेव्हां त्याच्या बरोबर त्याचे भाऊ अन् सैन्यही कुरुक्षेत्राकडे चालू लागले.

बलरामने ऐकले की युद्ध सुरू होणार आहे. म्हणून काही यादव वीर बरोबर घेऊन तो पांडवाच्या शिबिरात आला. सर्व राजे, पांडव आणि कृष्णानेही उठून आदरपूर्वक त्याचे स्वागत केले. बलरामने राजा विराट, द्रुपद इत्यादींना नमस्कार केला. नंतर एका आसनावर बसून तो म्हणाला, ''लवकरच महाभयंकर युद्ध अन् प्रजेचा विनाश होणार आहे. हे टाळायचा कांही उपायही दिसत नाही. मी अशी इच्छा करतो की या युद्धांत तुम्ही कोणीही विकलांग न होता किंवा न मृत्यू पावता सहीसलामत परत यावं. आम्हाला पांडव जसे नातेवाईक आहेत, तसेच कौरवही आहेत. मी कृष्णाला अनेकदा दोन्ही पक्षांकडे समान दृष्टीनं पहायला सांगितलं. पण कृष्णाला अर्जुन आपल्या प्राणांपेक्षाही प्रिय वाटतो. म्हणून त्यानं माझं ऐकलं नाही. भीम अन् दुर्योधन दोघंही माझे प्रिय शिष्य आहेत. दोघांनी माझ्याजवळ गदायुद्धाचं शिक्षण घेतलंय. या युद्धांत कृष्णाच्या साह्याने पांडवच नक्की जिंकणार आहेत. पण मला कौरवांचा विनाश पाहवणार नाही. म्हणून मी सरस्वती किनारीच्या तीर्थस्थानांचं भ्रमण करणार आहे.''

असे सांगून बलराम निघून गेला. त्याच वेळी रुक्मिणीचा भाऊ रुक्मी एक अक्षौहिणी सैन्यासह पांडवांकडे आला. युधिष्ठिराकडून अतिथी-सत्कार झाल्यानन्तर तो भर सभेत अर्जुनाला म्हणाला, ''अर्जुन, युद्धात तुला माझी गरज असेल तर सांग. मी तुझ्या शत्रूंचा समूळ नाश करीन. माझ्या पराक्रमापुढे कोणीच टिकू शकत नाही. या सर्व



राजांना इथून जरासुद्धा हलायची जरूर नाही. कृपाचार्य अन् द्रोणाचार्यांचाही वध करून मी तुला तुझं राज्य परत देववीन.''

यावर हसून अुत्तर देत अर्जुन म्हणाला, ''हे वीरश्रेष्ठा, युद्धाचं नाव ऐकून मी भिण्याचा प्रश्नच नाही - कुणाचीही मदत न घेता मी एकट्याने गंधर्वांपासून दुर्योधनाचं रक्षण केलं. खांडव वनाचं दहन केलं. कौरव सेनेकडून विराटाच्या गायी सोडवल्या. तुला मदत करायची असेल, तर दुसऱ्या कुणाला कर. नाहीतर नुसताच आमच्याबरोबर राहून मी कसं युद्ध करतो ते पहा.''

नंतर आपलं भारी सैन्य घेअून रुक्मीने दुर्योधनाकडे जाअून अशीच आत्म प्रशंसा आरंभली. तेंव्हा दुर्योधनानेही त्याची मदत नाकारली अन् रुक्मी आपल्या सैन्यासह आपल्या देशी परतला.

अशा प्रकारे बलराम अन् रुक्मी कुरुक्षेत्रावरच्या या युद्धातून बगळले गेले. बाकी सर्व राजांनी कोणा न कोणाच्या तरी पक्षाकडून लढाई केली.

तिकडे हिरण्वतीच्या किनारी शिबिरात रहाणाऱ्या पांडवांकडे दुर्योधनाने शकुनीपुत्र अुलूक याला आपला दूत म्हणून पाठवले. त्याच्या करवी त्याने युधिष्ठिर, कृष्ण, भीमार्जुन अन् नकुल - सहदेव यांना दंभपूर्ण संदेश पाठवला.

''युधिष्ठिर, तू रुद्राक्ष धारण केलेल्या मांजरासारखा आहेत. तुझा जप म्हणजे बोकेसंन्यासीपणा आहे. जगाला धोका देण्यासाठीच तू वेद आणि सहनशीलता ग्रहण केली आहेस. अजूनतरी क्षात्रधर्माचं पालन करून युद्धांत अुतर! तू माझ्याकडे फक्त पाच गावं मागितलीस. पण ती द्यायला नकार देअून मी तुला युद्धाला प्रवृत्त केलंय. म्हणून आता तरी युद्ध करच!''

''हे कृष्णा, तू आमच्या सभेत कांही जादू करून एक विचित्र रूप दाखवलंस. त्याच रूपांत तू युद्धक्षेत्रांत माझ्या समोर ये. योद्धे असली माया बघून क्रुद्ध होतात, घाबरत नसतात! तू बढाई मारलीस की युद्धात पांडवांना विजयी बनवून तू त्याला राज्य परत देणार आहेस. तेंव्हां दाखवच आता तसं करून!''

''भीमा, तू खादाड आहेस फक्त ! युद्ध करण्यायोग्य नाहीस. मी आपल्या प्रतापानं तुला विराटाचा स्वयंपाकी बनवलं. तू प्रतिज्ञा केलीस की धृतराष्ट्राच्या सर्व पुत्रांना तू युद्धांत पराजित करशील. ती प्रतिज्ञा पाळूनच दाखव.''

अशाच प्रकारे दुर्योधनाने अर्जुन, नकुल, सहदेव व धृष्टद्युम्न यांना संदेश पाठवले. अुलुकने



ते त्यांना पांडवांच्या शिबिरात ऐकवले. दुर्योधनाचा संदेश ऐकून सर्वांनाच खूप राग आला. तेंव्हां ते अुलूकला म्हणाले, ''तू जाअून दुर्योधनाला सांग कीं, तो आम्हाला युद्ध करण्यासाठी भडकवत आहे. त्याची इच्छा नक्कीच पूर्ण केली जाईल.''

अुलूकला पाठवून दिल्यानन्तर युधिष्ठिर व धृष्टद्युम्न यांनी आपल्या वीरांना कौरव योद्ध्यां विरुद्ध नियुक्त केले. कर्णासाठी अर्जुन, दुर्योधना-साठी भीम, शल्यासाठी धृष्टकेतु, कृपाचार्यांसाठी अुत्तमौजा, अश्वत्थामासाठी नकुल, कृतवर्मासाठी शैब्य, सैंधवसाठी युयुधान, भीष्मांसाठी शिखण्डी, शकुनीसाठी सहदेव, वृषसेनसाठी अभिमन्यू, त्रिगर्त राजांसाठी अुपपांडव अन् द्रोणांसाठी तो स्वतः तयार झाला.

अशा प्रकारे कौरव सेनेच्या योद्ध्यांसाठी आपल्या सेनेतले प्रतियोद्धे नियुक्त करून धृष्टद्युम्नाने पांडवसेनेची व्यूहरचना केली. त्याच्या मताप्रमाणे अभिमन्यू हा अर्जुनापेक्षाही सरस योद्धा होता.

तिकडे कौरव सेनेचे नेता भीष्म यांनी दुर्योधनाच्या मागणीवरून दोन्ही दलांच्या महावीरांची श्रेणी अशाप्रकारे ठरवली - कौरवसेनेत कृतवर्मा, शल्य, सैंधव, कृपाचार्य, अश्वत्थामा, द्रोण, बाल्हिक इत्यादी अतिरथी अन् अुत्तम कोटीचे वीर आहेत. अश्वत्थामाला आपल्या प्राणांचा फार मोह आहे. हा दोष नसता, तर दोन्ही सैन्यात मिळून त्याच्यासारखा अुत्तम वीर अन्य कोणीही नसता. वृषसेन अन् अलंबुस नावाचा राक्षस हे महारथी आहेत. सुदक्षिण, नील, शकुनी, विंद, अनुविंद इत्यादी एकरथी आहेत. कर्णाने आपली कवच कुंडलं घालवली आहेत आणि शापाची धनी झालाय म्हणून त्याला रथी लोकांच्या श्रेणीत बसवणं शक्य नाही. म्हणून तो अर्धरथी आहे.

पांडवांच्या सैन्यात, पाचही पांडव अतिरथी आहेत. त्यांच्यात अर्जुन हा अुभय सेनांमधे असामान्य योद्धा आहे. त्याला तोंड देअून लढण्याची शक्ती केवळ भीष्म व द्रोण यांच्यात आहे. पण ते दोघेही वयोवृद्ध आहेत. अभिमन्यू, सात्यकी, अुत्तमौजा, युधामन्यू, शिखण्डी, धृष्टद्युम्न, त्याचा भाअू सत्यजित, घटोत्कच हे सर्वजण अतिरथी आहेत. पाचही अुपपांडवांना महारथी म्हणू शकू. तसेच विराट, द्रुपद, शिशुपालपुत्र धृष्टकेतु इत्यादी महारथी आहेत.

**क्रमशः**





# गोष्ट माहीत नसणारा

एका गांवात एक खेळणीं बनवणारा जिनकर राहात होता. त्याचं नांव होतं शिवराम. हरतऱ्हेची मातीची खेळणी बनवण्यांत तो हुशार होता. त्याच्या खेळण्यांत सर्व प्रकारचे पशुपक्षी, देवीदेवता व माणसें असत. त्याची खेळणीं अगदी सुरेख आणि हुबेहुब दिसत. सणासुदीच्या वेळीं तो आपली खेळणीं जत्रेत विकायला नेत असे. आता दोन महिन्यानंतर दसरा येणार होता म्हणून त्याने बरीच खेळणीं बनवली व ती सुंदर रंगांत रंगवली. जेव्हां दसरा जवळ आला तेव्हां एका मोठ्या हाऱ्यांत सारी खेळणीं नीट रचून तो आजूबाजूच्या गांवांत विकायला गेला.

गांवोगांव हिंडून तो वस्तीकडे जायला लागला तोंवर अंधार पडला. जवळपास एखादी वस्ती दिसेना कीं एखादे गांव. अंधारात तो तसाच चालत राहिला. दूरवर दिव्याचा मंद प्रकाश त्याला दिसला तेव्हां त्याच्या जीवात जीव आला.

एका घरांत हा दिवा तेवत होता. त्या घराजवळ शिवराम आला तेव्हां तिथे त्याला एक म्हातारा दिसला. शिवरामने त्याला विचारले, "बाबा, मी खूप लांबून आलो आहे. वाटेंतच अंधार पडला, मी इथें सकाळपर्यंत थांबलो तर चालेल कां?"

"त्याला काय झालं? तो हारा तिकडे बाजूला ठेव आणि इथें येऊन बैस. गप्पा मारण्यांत माझाही वेळ जाईल. मी आता स्वयंपाकाला सुरवात करतो आहेच. दोघं मिळून जेवूं या."

शिवराम एकदम खूष झाला. म्हातारबाबा भला माणूस दिसतोय. कुठल्यातरी झाडाखाली दगडमातींत झोपावं लागलं असतं ते टळलं. इतकंच नाही तर बाबांच्या मेहरबानीमुळें भोजनदेखील मिळणार होतं.

मनातल्या मनांत तो बाबांची तारीफ करीत होता वा आपल्या नशिबाला दाद देत होता.

बाबा स्वयंपाकघरांत गेला व लवकरच परत आला. "मी चूल पेटवलीय, आता लौकर जेवण तयार होईल. तोपर्यंत एखादं गाणं तरी ऐकव." शिवरामच्या समोर बसत तो म्हणाला.

"मला गाणंबिणं येत नाही" शिवरामने सांगितलं.

**पंचवीस वर्षांपूर्वी चान्दोवात प्रकाशित झालेली कहाणी**

"अरे, तुला गाणं येत नाही? बरं, मग एखादी गोष्ट तरी सांग" बाबा बोलला.

"मला गोष्टीदेखील येत नाहीत." शिवराम म्हणाला.

बाबा चिडला आणि एकदम उठून म्हणाला, "गाणं म्हणता येत नाही, गोष्ट सांगता येत नाही..... आता मी तुला क्षणभरदेखील इथें थांबूं देणार नाही. चल हो बाहेर!"

शिवराम चक्रावला. म्हातारबाबाचं वागणं त्याला फार विचित्र वाटलं. इतका वेळ तो ज्याला देवदूतासारखा समजत होता, तो आता त्याला सैतानासारखा वाटायला लागला. आपल्या कमनशिबाबद्दल त्याला वाईट वाटलं. शिवरामला जर गाणं किंवा गोष्ट ऐकवता आली असती तर ही समस्या उद्‌भवली नसती. पण आता काय करायचं? तो आपला खेळण्यांचा हारा घेऊन बाहेर पडला. त्याला वाटलं बाबा परत बोलावेल. पण म्हातारबाबांनी तसं कांही एक केलं नाही.

शिवरामला पुढें जाण्याची इच्छा नव्हती. कारण रात्रींच्या अंधारात वाट चुकण्याची भिती होतीच. म्हणून ज्या गांवातून तो या बाजूला आला होता, त्या गांवातच कुणाच्यातरी घरी रात्रीपुरतें थांबायचे असे त्याने ठरवले.

खेळण्यांचा हारा डोक्यावर ठेवून तो आल्या वाटेने परत फिरला. थोड्या अंतरावर गेल्यानंतर रस्त्यालगतच कडेला चुलीवर कुणीतरी कांही शिजवत ठेवलेले त्याला दिसले. अंधारामुळे त्या व्यक्तीचा चेहरा नीट दिसत नव्हता.

"तूच शिवराम आहेस ना? ही पळी थोडा वेळ या हंड्यात फिरवत राहा बरं. मी आत्ता येतो" त्या व्यक्तीने सांगितलं.



कोण होता तो कुणास ठाऊक! त्याने आपल्याला ओळखलं कसं हे कांही शिवरामला कळलं नाही. त्याने दिलेली पळी घेऊन तो हंड्यामधे फिरवत राहिला. काय त्यांत शिजत ठेवलं होतं कोण जाणे. पण हंडाभर पदार्थ शिजत होता आणि खाणारी व्यक्ती तर एकटीच होती तिथे. शिवरामला वाटलं की आपल्यालाही जेवण मिळणार आहे.

पळी देणारी व्यक्ती जी निघून गेली. ती येण्याचं चिन्ह कांही बराच वेळ दिसेना. "अरे .... भाऊ....." शिवरामने हांक मारली, पण कांही उत्तर मिळाले नाही.

"कां? इकडेतिकडे काय बघत राहिला आहेस? पळी कां हलवत नाहीस?" चुल्यावरच्या हंड्याने विचारलं.

शिवराम घाबरला आणि पळी खाली फेकून देऊन उभा राहिला. आपण भुतांच्या तावडीत

## कसेही खुष

एकदां कांही साधूंचा जथा फिरतांफिरता एका गांवात पोंचला. गांवाच्या वेशीवर त्यांनी आपले तंबू ठोकले. त्यांच्याबरोबर वीस दुभत्या गायी होत्या. त्या गाईंची ते आनंदाने सेवा करत. दूध, दही तूप, खीर भरपूर खात आणि देवाचे भजन कीर्तन करण्यांत गुंग असत.

गांवातल्या कांही टवाळ मुलांना साधूंची ही आनंदी वृत्ती रुचली नाही. साधूंना त्रास देण्याच्या हेतूने एका रात्री त्यांनी त्यांच्या सगळ्या गायी गांवात आणून लपवून ठेवल्या. सकाळीं उठल्यानंतर साधू कसे चिडतील ते पाहाण्यासाठी ही तरुण मंडळी दूरवर लपून बसली. सकाळी जेव्हां साधूंना गाई दिसेनात तेव्हां ते फार खुष झाले. आनंदाने ते गाऊं नाचूं लागले आणि देवाचे आभार मानूं लागले. "देवा, तूं धन्य आहेस! आमचे झेंगट दूर केलेस. उद्यांच आम्ही आता आपल्या दर्शनासाठीं बद्रीनाथ - केदारनाथाच्या यात्रेला जायला निघूं."

तरुणांना वाटलं कीं गाईमुळे हे साधू जर त्रासलेले आहेत तर त्यांचा त्रास वाढवण्यासाठीं त्यांना आणखी गाई द्याव्यात. त्या रात्री साधूंच्या गाईंबरोबर आणखी वीस गाई आणून त्यांच्या डेऱ्याजवळ बांधल्या.

दुसऱ्या दिवशी सकाळीं साधूमंडळी उठली व आनंदाने नाचूं गाऊं लागली. पुन्हांपुन्हां देवाचे आभार मानत म्हणूं लागली, "धन्य हो प्रभु! तुझी कृपा असीम आहे. दुप्पट लक्ष्मी दिलीस तूं! आता आम्हाला भरपूर दूधतूप मिळेल. आम्ही इथेंच राहून तुझे भजनकीर्तन करीत राहूं, जशी तुझी इच्छा!"

हे पाहून गांवातले वात्रट तरुण बेचैन झाले. हे साधू कुठल्याही परिस्थितीत खुष राहातात हे पाहून ते जास्त व हैराण झाले नि वैतागले.

सांपडलोय असं त्याला वाटलं.

"इतकी मिजास?" असं म्हणत पळी जमिनीवरुन उठली व त्याच्या डोक्यावर जोरात आपटूं लागली.

शिवराम जास्तच घाबरला. इतका घाबरला की त्याला आपल्या हाऱ्याचीदेखील आठवण झाली नाही. पाठीला पाय लावून तो धूम पळत सुटला. पळी त्याचा पाठलाग करुं लागली व त्याच्या पाठीवर आपटूं लागली.

सुदैवाने रस्त्यांत शिवरामला एक घर दिसले. त्या घराचे दार उघडे होते. आंत घुसून त्याने दार बंद केले, व मागे वळून पाहिले तो काय, ते त्या म्हातारबाबाचे घर होते.

"काय रे झालं? इतका कां घाबरला आहेस?" म्हाताऱ्याने विचारलं.

जे घडलं ते शिवरामने म्हातारबाबाला सांगितलं. ते ऐकून बाबा खुष झालेला दिसला. "जर हीच गोष्ट अगोदर सांगितली असतीस तर मी तुला बाहेर घालवलं नसतं. स्वयंपाक तयार आहे ..... आता आपण जेवूं या." त्याने शिवरामला म्हटलं.







# लांकडी दिवा

उपाध्यायजी जनार्दनस्वामीच्या मंदिरात पुजारी होते आणि ते विष्णुस्तोत्राचे पारायण करीत असत. देवाच्या पूजेनंतरचा खास नैवेद्य ते स्वतः बनवत व त्यासाठीं स्वयंपाकघरांतली चूलही ते स्वतः पेटवत असत. अग्नी प्रज्वलित करण्यासाठीं त्यांनी जुन्या लांकडी दिव्याऐवजीं शमीच्या लांकडाचा खास दिवातयार केला होता, व त्यांतून अग्नि निर्माण करण्यासाठी लागणारी अरणीदेखील केली होती.

उपाध्यायजी एक प्रौढ ब्रह्मचारी होते. ते देवस्थानच्या धर्मशाळेंत राहात व तिथल्याच पाकशाळेंत भोजन करत.

त्यांच्या सोबत बारा वर्षांचा एक अनाथ मुलगा राहात होता. तो त्यांना प्रत्येक कामांत मदत करीत असे व वेळ मिळेल तेव्हां त्यांच्याकडून वेदमंत्र शिकत असे.

एकदा उपाध्यायजी आजारी पडले. त्यांना तपासण्यासाठी एका वैद्यांना बोलावणे गेले. वैद्यांनी उपाध्यायजींची नाडी पाहून सांगितले, "विशेष कांही झालेलं नाही. दोन दिवस विश्रांति घेतलीत की तुम्ही ठीक व्हाल. मात्र डोक्यावर पाणी पडणार नाही याची काळजी घ्या." त्यानंतर "पुन्हां येईन" असं म्हणून वैद्य निघाले.त्यावर उपाध्यायजी हंसत म्हणाले, "अहो, वैद्याने आणि कर्ज घेणाऱ्याने 'पुन्हां येईन' असं न म्हणता, "जातो" असं म्हणूनच निरोप घ्यायला हवा."

वैद्यांना त्यांचे हे बोलणें आवडले नाही. त्यांच्या अहंकाराला धक्का बसला होता, व त्यांना तो अपमान वाटला. त्यांनीही हंसत, उपरोधिक स्वरांत सांगितलं, "सर्वांना शकुनअपशकुन सांगणारी पाल स्वतःच खाली आंबोणांत पडते. सर्वांचे रक्षण करणाऱ्या जनार्दनस्वामींचे तुम्ही पुजारी आहात. तुम्ही त्यांनाच मंदिरातून बोलवून घ्यायला हवं होतं. म्हणजे मला "पुन्हां येईन" म्हणण्याची जरुर भासली नसती."

वैद्यांच्या उपहासामुळें उपाध्यायजी दुखावले व म्हणाले, "भगवान तर सर्वव्यापी आहे. तो फक्त मंदिरात राहातो ही तुमची कल्पना चुकीची आहे. आमचा विश्वास आहे की परमेश्वर सर्वत्र हजर असतो. आपणच आपल्या सोयीनुसार त्यांना एका

नरहरी शास्त्री



जागी प्रस्थापित करतो, मूर्त स्वरुपांत आकार देतो. म्हणजे आपले सुखदुख आणि पापपुण्याचा झाडाझडती त्यांच्याजवळ देता येते. त्यामुळें आपल्या मनाला शांती मिळते. ज्यांचा देवावर गाढ विश्वास आहे, त्यांना तो कोणत्या ना कोणत्या रुपांत येऊन मदत करतोच."

उपाध्यायांचा हा उपदेश वैद्यबुवांना मुळींच पटला नाही. अपमानाची वेदना त्यांच्या मनांत अजून ठुसठुसत होती. पुन्हां उपरोधाने ते म्हणाले, "तुमचा वेदांत ऐकायला चांगला वाटतो. पण व्यवहारांत कांही उपयोगी नाही. तो ऐकून तुम्हाला किंवा मला जेवायला कांही मिळणार नाही. तेव्हां बराय, मी जातो."

एवढं बोलून ते जोरांत वळले व जायला निघाले, तेव्हां मंदिरातल्या एका खांबावर त्यांचे डोके आपटले व ते खाली पडून बेहोश झाले. आंबोणांत पडणाऱ्या पालीची गोष्ट त्यांच्यावरच उलटली. उपाध्यायांनी त्यांच्या सोबत असलेल्या मुलाच्या मदतीने त्यांच्यावर उपचार केले. वैद्यराज हळूंहळू शुद्धीवर आले.

सावध झाल्यानंतर ते मोठ्या नम्रतेने म्हणाले, "उपाध्यायजी, असं वाटतं कीं प्रत्येक घटनेच्या मागे कांही ना कांही कारण अवश्य असते. आता मला पटलं की सोन्याच्या थाळीलादेखील दुसऱ्याच्या मदतीची जरूर भासते. मी स्वतः वैद्य असूनदेखील स्वतःची रोगचिकित्सा करूं शकलो नाही. परंतु त्यामुळें वैद्यकशास्त्र कांही निरुपयोगी ठरत नाही."

या प्रसंगानंतर उपाध्यायांची प्रसिद्धी वाढली. सर्वजण म्हणूं लागले की उपाध्यायजी मोठे चमत्कार करूं शकतात. लांकडी दिव्यांतून फक्त तेच अग्नी प्रज्वलित करूं शकतात. आणि जर एखाद्याने त्यांचा अनादर केला तर जनार्दनस्वामी त्याला शिक्षा करतात.

यामुळें उपाध्यायजींच्या मनांत अहंकार निर्माण झाला. ते स्वतःला खरोखरच महान समजूं लागले.

एक दिवस मोठे वादळ झाले व त्यांत देवालयाचा ध्वजस्तंभ खाली पडला. गांवकऱ्यांनी यथाशक्ती पैसे जमवले व ध्वजस्तंभ पुन्हां उभारण्यासाठी एक शुभमुहूर्त नक्की केला. त्या मुहूर्ताला अजून दहा दिवस अवकाश होता. तितक्यांत उपाध्यायांना बातमी कळली कीं दुसऱ्या एक गांवातला त्यांचा जवळचा नातलग मरण पावला आहे. उपाध्यायांखेरीज त्याला इतर कुणीही आप्त नव्हता. त्यामुळें त्याचे अंतिम संस्कार करण्याची जबाबदारी त्यांच्यावर आली.

इकडे तर दहाव्या दिवशीं ध्वजस्तंभाची





प्रतिष्ठापना करायची होती. आणि त्याच्यासाठी लांकडी दिव्यांतूनच अग्नी निर्माण करायचा होता. नेमक्या त्याच दिवशी त्यांना त्या आप्ताचे श्राद्धविधी करावे लागणार होते.

उपाध्यायजी त्यांच्या छोट्या शिष्याला घेऊन त्या दुसऱ्या गांवी गेले व त्यांनी अंत्यविधी पार पाडले. नंतर दहाव्या दिवसाच्या श्राद्ध विधीसंबंधीचे क्रियाकर्म करण्याची संथा त्या मुलाला समजावली व ते आपल्या देवालयांत परत आले. दुसऱ्या गांवात दहा दिवस राहाण्याचे, व अकराव्या दिवशी श्राद्धाचा विधी पुरा करण्याचे वचन त्या मुलाने त्यांना दिले होते. हे सर्व विधी त्याने आपल्या पित्यासाठी करावेत इतक्या श्रद्धेने केले व तो उपाध्यायांकडे परतला.

त्या दिवशी मध्यरात्री ध्वजस्तंभाच्या प्रतिष्ठापनेचा मुहूर्त होता. साऱ्या गांवात उत्साहाचे वातावरण होते. सगळी जय्यत तयारी होती. ऋत्विजांनी यज्ञकुंड तयार केलेले होते. लांकडी दिव्यातून मंत्रोच्चाराबरोबर त्यांत अग्नी प्रज्वलित करायचा होता.

उपाध्यायांनी आपल्या हातांत त्यांचा खास लांकडी दिवा घेतला व ते म्हणाले, "स्थळपुराणांत सांगितलं आहे की नारदाने त्रेतायुगात याची प्रतिष्ठापना केली होती. पहा, आज पण ते इथें आपली वीणा झंकारत येत आहेत. जेव्हां मी अग्निदेवाला आवाहन करीन तेव्हां ऋत्विजांच्या मंत्रोच्चाराबरोबर देवतादेखील इथें प्रकट होतील." असं म्हणून उपाध्यायांनी दिवा अरणीने घासायला सुरवात केली.

एरवीं, इतर दिवशी ते अगदी सहजपणे दिवा घासून काष्ठाग्नि निर्माण करीत असत. परंतु आज मात्र बराच वेळ प्रयत्न करूनदेखील ज्योत उजळेना शेवटीं थकून, निराश होऊन ते तिथून बाजूला सरले.

त्यानंतर तिथें उपस्थित असलेल्या वेदपंडितांनीही प्रयत्न केला पण त्यांना यश आले नाही. गावांतलया पुण्यवंत मानल्या जाणाऱ्या व्यक्तींनीही प्रयत्न केले, पण व्यर्थ!

उपाध्यायांच्या डोळ्यांत अश्रू तरळले. त्यांना अतिशय वाईट वाटले. त्यांच्या मनांत आले." हे प्रभो, माझी कांही चूक झाली आहे कां? मला क्षमा कर. या घोर अपमानातून या तुझ्या सेवकाला वाचव भगवंता!"

त्यांचा छोटा शिष्य त्यांच्यासमोर येऊन म्हणाला, "गुरूजी, मी प्रयत्न केला तर चालेल कां?"

"अरे, तूं तर माझ्या मृत बंधूचं श्राद्ध केलं आहेस. तेव्हां आता वर्षभर तुला यज्ञकर्मांत भाग घेता येणार नाही." असं म्हणून उपाध्यायांनी

त्याला दिव्याला हात लावूं दिला नाही.

त्यावर एक वेदसंपन्न शास्त्री म्हणाले, "या लहान मुलाने खऱ्या ब्राम्हणाचं कर्तव्य पार पाडलं आहे. मृताचे संस्कार हाही एक यज्ञच आहे. व त्यामुळें ह्या मुलाची पुण्याई वाढली आहे."

तेव्हां उपाध्यायजी नम्रतेने म्हणाले, "खरोखर, मी तर विसरलोच होतो. कीं मानवसेवा म्हणजेच माधवसेवा आहे. प्रेतसंस्कारकर्म कोटीयज्ञां इतकंच महान आहे. धन्य आहे हा बालक. मला गर्व होता कीं फक्त मीच हा दिवा लावूं शकतो. परमेश्वराने माझे डोळे उघडले. हा मुलगा जरूर प्रयत्न करूं दे."

त्यावर त्या मुलाने प्रथम आपले गुरु उपाध्यायजी यांना प्रणाम केला. नंतर अग्निदेवाला आवाहन करत तो म्हणाला, "मी नेहमी तुमच्या आज्ञेचे पालन करतो. गुरु हा देवासमान असतो. अगर हे सत्य असेल तर या दिव्यांतून अग्नी प्रज्वलित होईल." हे शब्द दोनवेळां उच्चारुन त्याने दिव्यांत ती अरणी घासली. अचानक ज्योत दिसूं लागली व अग्नी प्रज्वलित झाला. सर्व उपस्थित मंडळींनी व वेदपंडितांनी त्या बालकाची खूप प्रशंसा केली.

यज्ञसमाप्ति झाल्यानंतर वेदघोषांत ध्वजस्तंभाची प्रतिष्ठापना केली गेली. दुसऱ्या दिवशी जनार्दनस्वामींसाठी नैवेद्य बनवायचा होता. उपाध्यायजींनी मुलाला लांकडी दिवा घासण्यासाठी बोलावले.

"मी गुरुचे स्थान घेऊं शकणार नाही. फक्त संस्कारामुळें कोटीयज्ञांचे फळ मिळते हे सिद्ध करण्यासाठींच देवाने मला ही संधी दिली होती." हे सांगून त्या मुलाने दिवा लावण्यास नकार दिला.

तेव्हां उपाध्यायांनी मनःपूर्वक देवाची प्रार्थना करुन दिवा लावण्याचा प्रयत्न केला. आणि आश्चर्याची गोष्ट कीं अगदी सहजपणें अग्नी प्रज्वलित झाला. पण आता मात्र त्यांच्या मनांत अहंकाराचा लवलेशही नव्हता. कृतज्ञतेने जनार्दनस्वामींसमोर ते नतमस्तक झाले.

कांही दिवसानंतर उपाध्यायांच्या जागेवर त्या मुलाची नियुक्ती झाली व त्याला खूप नांवलौकिक मिळाला.





# मनावरचे डाग

त्या गांवच्या वेशीजवळ एक वनराई होती. गांवातली गुरें तिथें चरायला नेत असत. एकदां गांवातला एक शेतकरी दुसऱ्या गांवी लग्नाला जाण्यासाठीं आपल्या मुलाबरोबर त्या रानांतून जात होता.

एक छोटीशी बकरी आपल्या कळपापासून बाजूला जाऊन तलावाकडे पाणी प्यायला जात होती. तलावाच्या कांठी बरीच दलदल होती व पाणी जरासे दूर होते. बकरीने जलाशयाकडे जाताना दलदलींत पाय ठेवला व तिचे पाय त्यांत अडकले. बाहेर यायची जेवढी ती धडपड करायला लागली, तेवढी ती आंत अडकत होती. केविलवाण्या स्वरांत ती केंकाटूं लागली.

शेतकऱ्याने जेव्हां तिची ही दुरावस्था पाहिली तेव्हां त्याला दया आली. धोतर कसून तो दलदलींत उतरला. त्या लहानशा बकरीला त्याने उचलून हातावर घेतले व कांठावर एका कोरड्या जागी आणून ठेवले. बकरीने आपल्या शरीराला झटके देऊन चिखल झाडून टाकला व पळतपळत ती आपल्या कळपांत सामील झाली. पण तिथें जवळच उभा असलेल्या शेतकऱ्याच्या धोतरावर चिखलाचे शिंतोडे उडाले व डाग पडले.

हे पाहून त्याचा मुलगा म्हणाला, "बाबा, उगीचच त्या बकरीला वाचवायला तुम्ही गेलात, आणि आपले कपडे घाण केलेत. आता या अशा कपड्यांत लग्नाला कसं जायचं?"

पित्याने हसून सांगितलं, "बाळ, कपड्यांवर पडलेले चिखलाचे डाग सहज धुता येतात. पण, मदत करणें शक्य असतांना जर मदत केली नसती, तर माझ्या मनावर पापाच्या भावनेचे डाग पडले असते. आणि ते डाग कधीही साफ करता येत नाहीत. अशी सत्वपरीक्षेची वेळ आयुष्यांत केव्हांना केव्हां येतेच, आणि त्यावरच आपली भाग्यरेखा ठरत असते. आता समज, संकटात सांपडलेल्या बकरीकडे न पाहिल्यासारखं करुन आपण पुढें गेलो असतो, आणि योगायोगाने आपण कधीतरी एखाद्या अडचणींत अडकलो, तर देवाकडे कोणत्या तोंडाने मदतीसाठी सांकडे घालायचे? लक्षांत ठेव बाळ, परोपकाराची लहानशी गोष्टच माणसाला देवत्वाजवळ नेत असते."



# शोधा, सांगा, नि जिंका !

या अंकात प्रकाशित झालेल्या प्रश्नावलीची उत्तरें पुढील अंकात दिली जातील. तोपर्यंत 'भारताचा शोध प्रश्नोत्तरी, चंदामामा बिल्डींग्ज्, वडपळणी, चेन्नई - ६०० ०२६ या पत्त्यावर आपली उत्तरें अवश्य पाठवा. परंतु या स्पर्धेत भाग घेण्यासाठी कांही गोष्टी तुम्ही करायला हव्यात.

चांदोबाच्या मागल्या अंकात प्रसिद्ध झालेली कांही वचने, अवतरणें किंवा पूरक वाक्यें नीट वाचा. त्यापैकी तुम्हाला कोणती वाक्यें आवडली व कां आवडली हे पानाचा क्रमांक देऊन सुमारे शंभर शब्दांत सांगा. तुमचे शिक्षक किंवा पालक यांचेकडून, तुमची प्रवेशिका प्रमाणित करा. त्यावर तुमचे नांव, सही, वय, वर्ग, विद्यालय (विद्यार्थी असाल तर) व संपूर्ण पत्ता लिहून वरील पत्त्यावर पाठवा.

**पहिलें बक्षीस : रु. १०००/-**
**दुसरे बक्षीस : रु. ५००/-**

**आणि**
**पांच उत्तेजनार्थ बक्षिसें**
**प्रत्येकी रु. २००/-**




**भारताचा शोध प्रश्नोत्तरी :**

अंधारी रात्र होती.नीरव शांतता होती. पावन नदीच्या कांठावर स्मशानघाटावर कांही चिता जळत होत्या.

एक स्त्री रडत, मुसमुसत, आपल्या मेलेल्या मुलाला छातीशी धरुन स्मशान घाटावर एकटीच पोंचली. तिच्या मुलावर अंतिम संस्कार करण्यासाठी कांही पैसे द्यायला हवे होते. स्मशानघाटाच्या मालकाचा वतीने त्याचा पहारेकरी पैशांची वसुली करत असे.

त्या स्त्रीजवळ पैसे नव्हते. आणि ते दिल्याखेरीज पहारेकरी अंत्यसंस्कारास परवानगी देईना. अचानक त्याने त्या स्त्रीला ओळखले. ती दुसरी कुणी नसून त्याचीच पत्नी होती. आणि मृत बालक त्याचा मुलगा होता.

हा पहारेकरी कोण होता? ती स्त्री कोण होती? स्मशानघाट कुठे होता?




खाली दिलेल्या पौराणि… व्यक्तींचे एकमेकांशी कोण… नाते आहे?

| | | |
|---|---|---|
| अ. कृष्ण | : | विदर्भ |
| ब. बलभद्र | : | कुशस्थळी |
| क. नल | : | निषाध |
| ड. मार्कंडेय | : | पुष्पभद्रतीर्थ |
| इ. गुह | : | शृंगीवरपूर |






१. समुद्रकिनाऱ्यावरच्या पुंपुहार नगराचे वैभव वर्णन करणारी कोणती प्राचीन कृती आहे?
२. असा कोणतालेखक आहे ज्याच्याविषयीं असं मानलं जातं, कीं त्याने प्राचीन काळीं कथांचा संग्रह करताकरता साऱ्या भारतवर्षाची यात्रा केली.
३. सत्यवान व सावित्रीचे आख्यान कोणत्या प्राचीन ग्रंथात आढळते?
४. तामीळ व हिंदी भाषांमधे कोणते दोन कवी आहेत. ज्यांनी रामायण लोकप्रिय केले?
५. कोणता प्राचीन भारतीय तत्ववेत्ता प्रसिद्ध नास्तिक होता?



**हे लक्षांत असूं द्या !**

**अटी :**

१. चंदामामा इंडिया लि., लिंटास अमिराष्ट्रीपुरीज इंडिया लि., इनिशिएटिव्ह मिडिया व ब्रिटानिया इंडस्ट्रीजचे कर्मचारी किंवा त्याचे नातेवाईक किंवा सहकारी यांना या स्पर्धेत भाग घेता येणार नाही.
२. परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील व त्याबाबतीत कोणताही पत्रव्यवहार केला जाणार नाही.
३. गचाळ हस्ताक्षरांतल्या प्रवेशिका रद्द ठरवल्या जातील.
४. जुलै २००० च्या 'चांदोबा' मधें स्पर्धेचा निकाल जाहीर केला जाईल.
५. प्रवेशिका आमच्याकडे ३१ मे २००० पर्यंत पोंचल्या पाहिजेत.

**चांदोबा : भाषा अनेक : परम्परा एक**



# भारत : तेव्हां व आता

## कलकत्ता

### ब्रिटिश भारताची पहिली राजधानी



कलकत्ता की कोलकाता? कलकत्ता शहराचे नांव कोलकाता ठेवायचे ठरलेले आहे. पण यामुळें शहराच्या नांवातल्या अर्थामधें कांही फरक पडतो आहे कां? नाही. कारण कलकत्ता व कोलकातामधें केवळ उच्चाराचाच फरक आहे. आणि त्याचा अर्थ अद्याप रहस्यमय राहिलेला आहे.

१६९८ सालीं ९ नोव्हेंबरला जमीनदार सबर्णराम चौधरी यांनी ईस्ट इंडिया कंपनीला आपली तीन गांवे विकली. ईस्ट इंडिया कंपनी हा एक ब्रिटिश व्यापाऱ्यांचा समूह होता. आणि त्यांना भारताशीं व्यापार करायचा होता. ही तीन गांवे होती - कालीघाट, सुटानाटी आणि गोबिंदपुर. कंपनीतर्फे ज्या व्यक्तीने ही गांवे खरीदली त्यांचं नांव होतं जॉन चारनॉक. या गांवांच्या समूहाला कलकत्ता नांव कसं पडलं कोण जाणे! हे नांव कालीघाटावरुन घेतलं असावं. कारण या तिन्ही गांवामधे कालीघाटचं प्राचीन कालीमंदिर हे सर्वांत जास्त महत्त्वाचं होतं.

चारनॉक हा कलकत्त्याचा संस्थापक मानला जातो. एकदा एक विधवा तरुणी पतीच्या चितेवर सती जाणार होती. पण चारनॉकने तिला आपल्या बरोबर नेले व तिच्याशीं विवाह केला. अजूनही तिची समाधी त्याजागी आहे.

गंगेच्या कांठावर - इथें तिला हुगळी नदी म्हणतात - कलकत्ता शहर वसले आहे. त्याचा विकास फार झपाट्याने झाला. रुडयार्ड किपलिंग यांनी या शहराला 'संयोग-निर्मित, संयोग-निर्देशित शहर' असे म्हटले आहे. ईस्ट इंडिया कंपनीने इथें एक किल्ला बांधायला सुरवात केली ते काम १७१६ मधे पूर्ण झालं. पुढल्याच वर्षी मोंगल बादशाहातर्फे कंपनीला बंगालमधें व्यापार करण्याचे अधिकार दिले गेले. किल्ला हे त्यांचं व्यापाराचं केंद्र होतं. हा किल्ला फोर्ट विल्यम या नांवाने प्रसिद्ध झाला.

आता व्यापाऱ्यांना किल्ल्याची खरोखरीच आवश्यकता असते कां? फक्त सरकारी कामकाजासाठी किल्ला आवश्यक असतो. लवकरच व्यापाऱ्यांच्या या कंपनीने आसपासची जमीनदारी खरीदणें, आणि लष्करी सेवा नियमित पुरवणें, असं करुन वेगवेगळ्या राज्यांतली क्षेत्रें काबीज करण्यास सुरवात केली.

बंगालचे नवाब सिराजुद्दौला आणि कंपनीच्या लष्करामधे एक मोठी लढाई झाली. नवाबाने कंपनीच्या सेनेला १७५६मधें हरवले व कलकत्ता शहराचा कबजा घेतला. परंतु वर्षानंतर क्लाईव्हच्या नेतृत्वाखाली कंपनीच्या सैन्याने हे शहर जिंकलं. पुन्हां एकदां प्लासीच्या मैदानांत दोन्ही सैन्यांमधे एक घनघोर संघर्ष झाला. या युद्धांत सिराजुद्दौला हारला व मारला गेला. सन १७१२ पर्यंत कंपनीने एक गव्हर्नर - जनरल नेमून बरीच राज्यें बळकावली होती. या पदावर नेमणूक झालेली पहिली व्यक्ती म्हणजे वॉरन हेस्टिंग्ज. फोर्ट विल्यम इथून तो राज्यकारभार चालवत होता. भारताचा बराचसा भाग कंपनीतर्फे जिंकून झाल्यानंतरदेखील ब्रिटिश हिंदुस्थानची राजधानी कलकत्ताच होती. सन १९१२ मधे भारताची राजधानी दिल्लीला हलवण्यांत आली.

आजही कलकत्ता ही पश्चिम बंगालची किंवा बंगदेशाची राजधानी आहे. जुन्या कलकत्ता शहरांतली सर्वांत प्राचीन संस्था म्हणजे कालीघाटचे मंदिर. फार पूर्वी जेव्हां इथें जंगल होतं, त्यावेळेपासून इथल्या इष्टदेवतेची उपासना चालू आहे. इथें इतरही प्रसिद्ध मंदिरे आहेत. उदा. सुंदरजैन पूजास्थल, पारसनाथ, मदनमोहन मंदिर, अमेरिकन चर्च, सेंट पॉल्स् कथीड्रल सारखी शेकडो वर्षें जुनी चर्चेस, शहीद मिनार, व्हिक्टोरिया मेमोरियल, अजायबघर, टागोरांचे जन्मस्थान, वगैरे प्रसिद्ध इमारती आहेत. त्याखेरीज इथें अनेक विश्व विद्यालये, व कला आणि संस्कृतीला वाहिलेली केंद्रे आहेत. अजून फक्त कलकत्त्यांतच विजेची ट्रामगाडी चालू आहे. भारतांतले पहिले कृत्रिम नभोमंडळ इथें १९६२ मधे सुरुं झाले. १९९७ मधे कलकत्त्याला "प्रथम विज्ञान नगरी" ही पदवी मिळाली. या शहराची लोकसंख्या ४४ लाखांवर गेली आहे. कलकत्त्याचे जुळें शहर हावडा- त्याची लोकसंख्या २८ लाखांवर आहे. चोवीस परगणा जिल्ह्याचा एक भागदेखील बृहन्कलकत्त्याचा एक हिस्सा मानला जातो.








## एक संस्मरणीय आदान-प्रदान



एव्हांना, राष्ट्राध्यक्ष क्लिंटन यांची भारतयात्रा इतिहासांत जमा झाली आहे. या घटनेला सर्वत्र अवाजवी प्रसिद्धी दिली गेली. राष्ट्राध्यक्षांच्या भेटीपूर्वी कांही महिने सगळ्या भारतीय वर्तमान पत्रांत जवळजवळ रोजच या भेटीबद्दल कमीजास्त मजकूर किंवा चर्चा छापली जात होती. प्रत्येक राजकीय पक्षाच्या नेत्याने याबाबतीत कांही ना कांही भाष्य केलेले होते.

अमेरिकेच्या अध्यक्षांची ही भेट इतकी महत्त्वाची कां होती? अमेरीका हा बलाढ्य देश आहे म्हणून? अनेक कारणांपैकी हे एक कारण होऊं शकते. परंतु सर्वांत मोठे कारण आहे ते म्हणजे अमेरिका हा लोकशाहीची मूल्ये जपणारा देश आहे. आणि भारतवर्ष ही जगांतली सर्वांत मोठी लोकशाही आहे.

सन १९४७ मधें भारताची फाळणी झाली व पाकिस्तानचा जन्म झाला. परंतु पाकिस्तानमधे बराच काळ हुकुमशाही राजवट



होती. पाकिस्तान आपली एकी कायम ठेवूं शकला नाही आणि भयंकर रक्तपातानंतर बांगला देश अस्तित्वांत आला. पाकिस्तानच्या जनतेसाठी लोकशाही हे सत्यापेक्षां एक स्वप्नच राहिलेले आहे. अद्यापही त्या देशांत एका लष्करी अधिकाऱ्याची हुकूमशाही चालूं आहे, व लोकशाही पद्धतीने निवडून आलेला प्रधानमंत्री तुरुंगात बंदी आहे. तरीही अमेरिकेचे अध्यक्ष कांही तासांसाठी पाकिस्तानमधे थांबले. अनेक मुत्सद्यांचं मत होतं कीं त्यांनी तसं करायला नको होतं. कारण त्यामुळे लष्करी राजवटीला मान्यता मिळाल्यासारखीच आहे. इतर कांहीजणांचं मत वेगळं होतं. हे खरं की राष्ट्राध्यक्ष तिथें फक्त कांही तासच थांबले, परंतु भारतांत पांच दिवस राहिले. यामुळें पाकिस्तानला ती केवळ औपचारिक भेट होती असं दिसतं.



परंतु त्यापूर्वी परिस्थिती वेगळी होती. त्यावेळची आणखी एक महाशक्ती सोव्हिएट संघ हा अमेरिकेचा कट्टर शत्रू होता. भारताची रशियाशी मैत्री होती म्हणून अमेरिकेला पाकिस्तानला खूष राखणं आवश्यक समजलं जायचं. आता स्थिती बदललेली आहे. तो कट्टर शत्रू आता राहिला नाही. अमेरिकेने पाकिस्तानशी उगीचच प्रेमाचे नाटक करण्याची जरुर राहिली नाही. परंतु दुसऱ्या बाजूला अमेरिकेंत असे कांही लोक आहेत, जे भारताच्या विशाल आणि कठीण अशा लोकशाहीतंत्राचे पालन करण्याबद्दल भारताची प्रशंसा करत आहेत. त्यांना पुरेपूर ठाऊक आहे कीं भारताचे एका महाशक्तीमधें रुपांतर होण्याची बरीच शक्यता आहे. दोन्ही राष्ट्रे जोडण्यासाठी घट्ट मैत्री ठेवण्याची अमेरिकेची इच्छा राहील.

राष्ट्राध्यक्ष बिल क्लिंटन यांचे आपण किती प्रेमाने स्वागत केले होते ते आपणां सर्वांना ठाऊक आहेच! कांहीही होवो, त्यांच्या भेटीचा परिणाम लवकरच भविष्यकाळांत स्पष्ट होईल.

क्लिंटन यांच्या भारतभेटीच्या वेळींच पाकिस्तानप्रेरित अतिरेक्यांनी काश्मीरमधल्या गुरुद्वारांत प्रार्थना करणाऱ्या त्या निर्दोष शीखांची हत्या केली व आपली भेकड वृत्ती प्रकट केली. आता हीच वेळ आहे जेव्हां अमेरिकेने भारताच्या रचनात्मक कार्यांना मोकळेपणीं महत्व द्यायला हवे! आणि मूर्खासारखी अनिष्ट कृत्यें करण्यांत मशगुल असलेल्या इतर दुष्टशक्तींचा तीव्र निषेध केला पाहिजे.

# खास बातम्या

## शेक्सपीयर इटालियन होता कां?



सिसिलीचे ७१ वर्षांचे प्रा. मार्टिनो लुवारा यांचा दावा आहे कीं विल्यम शेक्सपियर हा इटॅलियन होता आणि त्याचे मूळ नांव मायकेलअँजेलो होते. वयाच्या चोविसाव्या वर्षी त्याने लंडनला स्थलांतर केले. शेक्सपियरच्या ३७ नाटकांपैकीं १५ नाटकांची कथानकें इटलीत घडतात, याचं हे मूळ कारण असावं असं त्यांचं मत आहे.

## वाघ नष्ट होत आहे

ब्रिटनचे पर्यावरण मंत्रालय म्हणते कीं जर वाघाची शिकार थांबली नाही, तर पृथ्वीवरचा एक सुंदर, अजोड वन्य प्राणी, पुढच्या दहा वर्षातच जगांतून नाहीसा होईल. वाघाच्या हातापायांपासून केलेली अनेक औषधें चिनी लोकांत वापरली जातात. आणि त्यासाठी ते भारतीय शिकाऱ्यां वर अवलंबून असतात. आणि



वाघाचं कातडं आपणा भारतीयांना हवं असतंच कीं!

## आईन्स्टाईनला शह

डॉ. जोआव मॅगुईजो हे एक तरुण पोर्तुगीज शास्त्रज्ञ आहेत. आईन्स्टाईनने म्हटल्याप्रमाणें प्रकाशाचा वेग ठराविक असतो. पण डॉ. जोऑव म्हणतात की या वेगांत फेरबदल होऊं शकतो. जर त्यांचा शोधनिबंध शास्त्रज्ञांनी स्वीकारला, आणि त्यांचा आक्षेप मान्य केला, तर विसाव्या शतकांतली एक अति महत्वाची कल्पना साफ बदलावी लागेल.



## एक महान घटना

यंदा मे महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत एक महान आणि दुर्मिळ घटना आकाशांत दिसली. आपल्या सूर्यमालेंतले सर्व मूळ सभासद रवी, चंद्र, मंगळ, बुध



गुरु, शुक्र आणि शनी वृषभ राशींत एकत्र आले होते. अशी युती यापूर्वी सुमारे पंधराशे वर्षांपूर्वी ५८९ साली मे महिन्यांत झाली होती.

यंदाची युती आपल्या पृथ्वीमातेसाठीं चांगली आहे असं मानलं जातं.

# चालू महिन्यात जन्मलेली विशेष व्यक्ती

## ऋषी बंकिमचंद्र



विसाव्या शतकाच्या सुरवातीच्या दशकात, ज्या गीताने स्वातंत्र्यलढ्याच्या कल्पनेला जोरांत चालना दिली व जागृतीची भावना चेतवली, ते गीत प्रत्येक भारतीयाच्या मनांतले एक पवित्र स्तोत्र आहे. ते गीत म्हणजे 'वंदे मातरम्'. त्याचा अर्थ 'मातेला वंदन असो' असा आहे. अर्थात ही माता म्हणजे मातृभूमी, भारतमाता, हे सांगायची आवश्यकता नाहीच!

हजारो देशभक्तांनी 'वंदे मातरम' हा जप करीतच ब्रिटिश राज्यकर्त्यांचा जुलमी छळ सहन केला. संतापलेले ब्रिटिश अधिकारी, मोकाट सुटलेल्या हिंस्र श्वापदाप्रमाणें निशस्त्र, असहाय सत्याग्रहींवर लाठीमार करीत होते, गोळीबार करीत होते. पण देशभक्तांच्या ओठांवर एकच वेदमंत्र होता 'वंदे मातरम्'. फांशीची शिक्षा झालेले क्रांतीवीरही 'वंदे मातरम्' म्हणत फांसावर चढले.

ज्या मंगल क्षणीं कविश्रेष्ठ बंकिमचंद्रांना ही कविता स्फुरली, तो खरोखरच एक अत्यंत महान शुभमुहूर्त होता. त्यांच्या आनंदमठ कादंबरीसाठीं ही कविता त्यांनी लिहीली होती. ईस्ट इंडिया कंपनी, व ब्रिटिश अधिकाऱ्यांविरुद्ध सुरुं झालेल्या स्वातंत्र्यलढ्याचे सूत्र घेऊन, लिहीलेली, ही एक चित्तवेधक कहाणी आहे. हा लढा वेगळा होता, कारण याची सुरवात साधू व संन्यासी यांनी केली होती. बंकिमचंद्रांना वाटलं कीं जे देशप्रेमी या परकीय बलाढ्य सत्तेविरुद्ध लढत आहेत, ते साधू-संन्याशांसारखे निस्पृह व निस्वार्थी असले पाहिजेत. जसे क्रांतिकारक साधू कालीमातेचे भक्त होते, तसे स्वातंत्र्यसैनिकदेखील भारतमातेचे भक्त असायला हवेत. 'वंदे मातरम' या सुमधुर व भावरम्य गीतांत, भारतमातेचे गुणगान त्यांनी अतिशय आदरपूर्वक आणि अभिमानाने केलेले आहे.

बंकीमचंद्रांचा जन्म २८ जुन १९३८ ला बंगालमधें झाला. कलकत्ता विद्यापीठांतून पदवीधर होणाऱ्या पहिल्या दोन विद्यार्थ्यांपैकी ते एक होते. नंतर ते मॅजिस्ट्रेट म्हणून काम पाहूं लागले. त्यांच्या कामांत ते फार हुशार होते. आणि त्यापेक्षांही जास्त महत्वाचं म्हणजे ते मातृभूमीचे परमभक्त होते.

आधुनिक बंगाली गद्य साहित्यांतले त्यांचे योगदान अपूर्व आहे. बंगाली भाषेला त्यांनी एका निराळी झळाळी व चैतन्य दिले. ते उत्कृष्ट श्रेणीचे कवी, कादंबरीकार, पत्रकार आणि निबंधकार होते. त्यांनी इंग्लिशमधेंही लिखाण केलेलं आहे. कांही भारतीय साहित्याच्या इतिहासकारांचं मत आहे कीं त्यांची कादंबरी 'राजमोहन्स् वाईफ' ही भारतीय लेखकाने लिहीलेली पहिली इंग्लिश कादंबरी आहे.

भारताच्या राष्ट्रीयतेचे प्रेषित श्री अरविंदबाबू हे बंकिमचंद्रांना काव्यर्षि - ऋषीकवि म्हणत असत.त्यामुळें भावीकाळांत ते ऋषी बंकिमचंद्र म्हणून ओळखले जात आहेत.

ऋषी बंकिमचंद्रांचे १८९४ मधे निधन झाले.

## चांदोबा

मे, २०००




### अुत्तरे

१. हरिश्चंद्र व तारामती, वाराणसीमधे

२. अ. श्रीकृष्णाने विदर्भची राजकन्या रुक्मिणीशी विवाह केला.

ब. बलभद्राने कुशस्थळीची राजकन्या रेवतीशी विवाह केला.

क. नल निषाध देशाचा राजा होता.

ड. मार्कंडेय मुनींनी पुष्पभद्रतीर्थमधें तपश्चर्या केली.

इ. गुह शृंगीवरपुरमचा राजा होता.

३. १. शिलप्पदिकारम - इळंगो आदिगल कृत

२. बृहत्कथा गुणाढ्य कृत

३. महाभारताच्या वनपर्वामधे

४. कम्बन व तुळसीदास

५. चारवाक

## नव्या स्पर्धा

### चांदोबाचे

वाचकांस आवाहन

निरनिराळ्या क्षेत्रांत शोध, बोध व कल्पनाविलास यांना चालना देणाऱ्या स्पर्धांमधें भाग घ्या.





### छायाचित्र

### शीर्षक स्पर्धा

१. नवोदित छायाचित्रकारांनी या स्पर्धेसाठीं एकमेकांशी संबंधित असलेल्या दोन छायाचित्रांची जोडी पाठवावी. दोन्ही चित्रांबद्दल छायाचित्रकाराने आपले स्पष्टीकरण सोबत दिले पाहिजे.

निवडलेल्या चित्रांच्या जोडीस

रु. ५०० - चे पारितोषिक

या स्पर्धेसाठीं केव्हांही छायाचित्रें पाठवा !



२. चांदोबात जाहीर केलेली म्हण किंवा वाक्प्रचार याचा अर्थ सांगून स्पर्धकाने १५०-१७५ शब्दांत एखादा विनोद, स्वानुभव किंवा नवीजुनी गोष्ट सांगावी. तुमच्या लेखांत गोष्टीचे तात्पर्य जरूर असावे. परंतु ज्या मूळ कथेमधून ती म्हण प्रचलित झाली, ती कथा मात्र नसावी.

या महिन्यांतली स्पर्धा

**''मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात''**

तुमचे लेख ३० जून २००० च्यापूर्वी आमच्याकडे आले पाहिजेत.

पुरस्कृत रचना चांदोबाच्या ऑगस्ट २०००च्या अंकात प्रकाशित होईल.

वेताळ कथा

# अजीब पेय

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा त्या झाडाजवळ गेला. झाडावरुन प्रेत खालीं उतरवून, आपल्या खांद्यावर टाकून, नेहमीप्रमाणे मौन धारण करुन स्मशानाकडे जाऊं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ बोलू लागला, ''इतक्या दाट काळोखांत कांहीच दिसत नाही आहे, तरीही तूं आपला चिकाटीने आणि निश्चयपूर्वक पुढें जातो आहेस. तुझं कांहीतरी इप्सित असेल असं दिसतंय. वाटेंमधल्या घातक आणि भयंकर संकटांची पर्वा न करता, आपले ध्येय साध्य करण्याचा तुझा इरादा आहे. पण त्याच्यासाठीं इतर सुलभ मार्गदेखील असूं शकतात. त्याऐवजी तूं मात्र बिकट मार्ग निवडला आहेस.



"राजाचे पहिले कर्तव्य असते आपल्या शत्रूच्या षड्यंत्राची माहिती गोळा करणें! मग ते शत्रू राज्यांतले असोत, किंवा राज्याबाहेरचे असोत. मयूराक्ष राजाला आपले शत्रू व त्यांची कारस्थानें याविषयी माहिती मिळवण्याचे एक सोपे आणि सुगम साधन मिळाले होते. परंतु केवळ मूर्खपणाने त्याने ते घालवले. कदाचित तूंदेखील आपल्या लक्ष्यापर्यंत पोंचणारा सुगम मार्ग आपल्या अविवेकीपणाने सोडून दिला असशील, आणि म्हणूनच तुला हा अवघड नि बिकट मार्ग स्वीकारावा लागला असेल. तुला मनोरंजनासाठी आणि एक धडा शिकवण्यासाठीं म्हणून मयूराक्ष राजाची गोष्ट सांगतो. त्यामुळें रस्त्यांत तुला येणारा थकवाही दूर होईल."

वेताळाने आपली गोष्ट सुरुं केली. "फार फार पूर्वीची कथा आहे. कम्भोजचा राजा मयूराक्ष याला आगळ्यावेगळ्या व विचित्र वस्तू जमवण्याचा छंद होता. अशा दुर्लभ वस्तू आणणारांना तो सोन्याच्या मोहरा व सरकारी सन्मान बहाल करीत असे. त्यामुळें दूरदूरच्या देशांतले लोक नव्या व अनोख्या वस्तू घेऊन राजाकडे येत असत.

एक दिवस राजाच्या दरबारांत एक विचित्र दिसणारा आगांतुक आला. संपूर्ण शरीर झांकणारा अंगरखा त्याने घातला होता. डोळे भावनाशून्य होते, डोक्याला टक्कल होतं, आणि छोटीशी दाढी होती. त्याच्या हातांत एक सुरई होती.

त्याने राजाला लवून सलाम केला आणि आपला परिचय करुन देत म्हणाला, "महाराज, मी भुतांचा गुरु कलहकेतूचा शिष्य गरलभोगी आहे. बरीच वर्षे गुरुची सेवा केल्यानंतर एक अजीबोगरीब पेय बनवण्याची कृती मी शिकलो आहे. हे पेय प्यायले कीं मनुष्याच्या आंत लपलेला आणखी एक माणूस बाहेर येतो. हा लपलेला माणूसच खरी व्यक्ती असतो."

राजाला आगांतुकाची वेषभूषा निराळी दिसत होतीच. आता त्याची जास्त माहिती कळल्यावर राजा आणखीनच चक्रावला. त्याने आश्चर्यानें विचारले, "मनुष्याच्या आंत लपलेला आणखी एक मनुष्य? तुला काय म्हणायचंय? एका मनुष्याच्या आत दुसरा माणूस असतो तरी कां? कोडं घातल्यासारखं तुझं बोलणं आहे."

"होय महाराज! प्रत्येक व्यक्तीची दोन रुपें असतात, एक बाहेरचे व दुसरे आंतले! कितीतरी लोक दाखवण्यासाठी वेगळं वागतात, पण त्यांच्या मनांत दुसरंच कांहीतरी असतं. उदाहरणार्थ, आपल्या दरबारांत असे कांही लोक असतीलच कीं जे आपल्यावर भक्ती असल्याचं नाटक करत असतील, परंतु आंतून आपले शत्रू असतील. या पेयाच्या प्रभावामुळें व्यक्तीचे आंतले, म्हणजे खरे स्वरूप समोर येते."



"आश्चर्यच आहे" राजा विस्मयाने बोलला. "पण हे तूं सिद्ध करुन दाखवूं शकशील कां?" राजाने भुवया उंचावून प्रश्न केला.

"होय महाराज आपल्यासमोर दारावर उभा असलेल्या पहारेकऱ्याला हे पेय पाजून पाहावं. हातच्या कांकणाला आरसा कशाला?" आगांतुक म्हणाला.

राजाने लगलीच पहारेकऱ्याला बोलावून आगांतुकने आणलेले पेय पिण्याची आज्ञा केली. आगांतुकने सुरईतले थोडेसे पेय त्याला प्यायला दिले.

कांही क्षणांतच पहारेकऱ्याच्या चेहऱ्यावरचे भाव बदलले. राजाच्या उपस्थितींतच तो असभ्यपणें वागायला लागला. राजाच्याजवळ बसलेल्या मुख्य संरक्षकांकडे त्याने रागावून बघितले आणि मोठ्याने ओरडून म्हणाला, "अरे मुख्य संरक्षका, आधी खाली उतर. सगळ्यांच्या देखत तूं माझ्या थोबाडींत मारली होतीस ना, आता दाखवतोंच तुला!" असं म्हणून त्याने आपल्या हातांतला भाला संरक्षकावर फेंकला.

प्रमुख संरक्षकाने मोठ्या शिताफीने त्याच्याकडे येणारा भाला हातांत पकडला. सारा दरबार हे दृश्य पाहून स्तंभित झाला. "तूं ह्याच्या थोबाडींत मारली होतीस हे खरं आहे कां?" राजाने प्रमुख संरक्षकाला विचारले.

"होय महाराज. एक दिवस या पहारेकऱ्याने आपल्या कर्तव्यपालनांत कसूर केली होती. म्हणून नियमानुसार त्याला शिक्षा करण्यासाठी मी तसं केलं होतं." प्रमुख संरक्षकाने खुलासा केला.

"याचा अर्थ असा होतो की पहारेकऱ्याच्या मनांत संरक्षकाच्याबद्दल सूडाची भावना धगधगत होती. आणि या पेयाच्या प्रभावामुळें ती उघडकीस आली." राजाने सांगितलं.

"होय महाराज! आमचं पेय आंत लपलेल्या व्यक्तीला बाहेर आणतं. या पेयाच्या मदतीने एखाद्याचं खरंखुरं व्यक्तीमत्व आपल्याला समजूं शकतं." आगांतुक म्हणाला.

"हे पेय खरंच अगदी विचित्र आणि प्रभावी आहे. असली अद्भुत वस्तू आम्ही आजपर्यंत पाहिली नव्हती. ही वस्तू आमच्यासाठी फार महत्वपूर्ण आणि उपयुक्त ठरं शकेल." राजाने मनांत विचार केला.

त्याने पहारेकऱ्याला तुसंगात टाकण्याचा आदेश दिला आणि आगांतुकाची अतिथीभवनात सन्मानपूर्वक राहण्याची व्यवस्था केली.

त्यादिवशी प्रमुख संरक्षकाने राजाला एकांतात



भेटून सांगितलं, "महाराज, मला संशय वाटतो कीं आगांतुकाने पहारेकऱ्याबरोबर हातमिळवणी करुन हे नाटक केलं आहे. ह्या पेयाच्या परिणामाची परीक्षा मी स्वतः करुं इच्छितो. म्हणून माझी आपल्याला विनंती आहे कीं माझ्यासाठीही थोडंसं पेय मागवावं."

"कल्पना वाईट नाही. पहिल्या प्रयोगाचा प्रभाव एक योगायोग असूं शकेल. किंवा त्याच्यामागे कांही धोकाही असूं शकेल. दुसरा प्रयोग केला की वस्तुस्थिती अधिक स्पष्ट होईल." असा विचार करुन राजाने थोडेसे पेय संरक्षकाखाली मागवले.

प्रमुख संरक्षक ते पेय घेऊन रात्रीं शिवमंदिरात गेला. तिथें एक जटाधारी साधू ध्यान लावून बसला होता. संरक्षकाने त्याला दंडवत घालून नम्रतापूर्वक सांगितले, "महाराज, मी आजच तीर्थयात्रा करीत काशीहून परत आलो आहे. या भांडयात तिर्थजल पवित्र गंगाजल आहे. जर आपण हे प्यायलंत तर मला पुण्य मिळेल."

साधूने त्याला आशिर्वाद देऊन त्याने दिलेलं पेय पिऊन टाकलं. प्रमुख संरक्षक साधूकडे लक्षपूर्वक पाहात होता. त्याच्या वागण्यांत कांही फरक पडतो आहे कां ते बघत होता. अचानक साधू जोरांत उठला व आपला दंड व चिमट्याने त्याने संरक्षकाची खूप पिटाई केली. इतकंच नव्हे, तर साधूने संरक्षकाची सोन्याची आंगठी व गळ्यांतली सांखळी देखील काढून घेतली.

रात्रीच्या गस्त घालणाऱ्या पहारेकऱ्यांनी संरक्षकास वांचवले व साधूला पकडून तुरुंगात टाकले. राजमहालांत जेव्हां ही बातमी कळली तेव्हां संरक्षकाची दुर्दशा व फजिती ऐकून राजा जोरजोरांत हंसायला लागला व नंतर मात्र गंभीर झाला.

"किती गुन्हेगार साधूच्या वेशांत आपल्या राज्यांत लपलेले असतील कोण जाणे! या पेयामुळें सर्वांच्या चेहऱ्यावरचे खोटे पडदे दूर होतील. ह्या पेयाच्या निर्मितीसाठी मी लाखो अशरफ्या खर्च करुं शकेन." राजाच्या मनांत विचार चालले होते.

तितक्यांत राणी तिथें आली. राजाने राणीला त्या विचित्र पेयाची सारी कथा सांगितली या पेयाच्या प्रयोगाच्या मदतीने दोन गुन्हेगारांचं असली रूप बाहेर पडलं. भविष्यकाळांत राज्यांतले सगळे अपराधी पकडण्यासाठीं ह्याचा उपयोग होऊं शकेल हेही राजाने सांगितलं.

राणीला या पेयाच्या विशेष परिणामाबद्दल आश्चर्य जरुर वाटले, पण तितकासा विश्वास वाटला नाही.

"जोपर्यंत मी याची परीक्षा स्वतः केली नाही, तोवर याच्या परिणामामुळें अपराधी सहज शोधून पकडता येतील हे मी कबूल करणार नाही." राणीने आपला संदेह व्यक्त करीत म्हटले.

"तुला हवं तर तूंही प्रयोग कर. मात्र सावध रहा हं! संरक्षकासारखी तुझीही फजिती होणार नाही याची काळजी घे." राजाने विनोदाने म्हटले.

"होय महाराज, खरोखरच, मीही निश्चितपणे या पेयाचा प्रयोग करुन पाहीन. जोपर्यंत मी माझे मत देत नाही तोपर्यंत याबाबतीत आपण मात्र कोणताही निर्णय घेऊं नये अशी माझी आपल्याला विनंती आहे." "ठीक आहे" राजाने म्हटले व राणीसाठी आणखी थोडे पेय मागवले.

राणीने ते पेय आपली खास दासी व सखी सुभाषिणी हिला प्यायला दिले. ते पिऊन सुभाषिणी सरळ पाकशाळेत गेली आणि स्वयंपाक्यास म्हणाली. "काल महाराणींनी इतक्या क्षुल्लक कारणावरुन माझा अपमान केला! मी त्यांना हव्या असलेल्या पारिजातकाच्या सुगंधाने स्नान घालण्याऐवजी चमेलीचे अत्तर वापरले. आता ह्या दिवसांत पारिजातकाची फुलें मिळत नाहीत हा काय माझा दोष? मला नाही हा अपमान सहन होत. मी याचा वचपा जरुर काढीन. आज राणीच्या भोजनांत विष मिसळून द्या. मी स्वतः त्यांचे भोजन घेऊन जाईन व त्यांना आपल्या हाताने भरवीन."

स्वयंपाक्याने सांगितलेली ही बातमी ऐकून राणी हैराण झाली. आणि स्वतःशीच विचार करुं लागली. हे पेय प्यायल्यानंतर सुभाषिणीच्या वागण्यांत वाईट परिवर्तन झाले होते. वास्तविक सुभाषिणीला राणी आपल्या प्राणांपेक्षांही प्रिय होती.

राजाला जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां त्याने राणीला सांगितले, "आता तुझा संशय फिटला आहे ना? या विचित्र पेयामुळें तीन दुष्ट व्यक्ती पकडल्या गेल्या आहेत. आता लाखों अशरफ्या खर्चून मोठ्या प्रमाणावर या पेयाची निर्मिती करता येईल. आपले



सारे अधिकारी, कर्मचारी आणि प्रजाजनांना हे पाजून कोण चांगले नि कोण वाईट आहेत याची माहिती मिळेल. दुष्ट लोकांना शिक्षा दिली जाईल. दुनियेतले लोक म्हणतील की कम्भोजच्या राज्यांत फक्त चांगले लोक राहातात. सर्वत्र कम्भोजची कीर्ती पसरेल."

राणीने राजाचे बोलणें लक्षपूर्वक ऐकून म्हटले, "अजूनही या पेयाच्या परिणामाबद्दल मला शंका आहे. सुभाषिणीचे माझ्यावर आपल्या प्राणांपलीकडे प्रेम आहे. तिच्या मनांत माझ्याविषयीं कोणतीही वाईट भावना किंवा दुष्टपणा नाही. त्यादिवशी घडलेल्या घटनेवरुन स्पष्टच आहे. त्या दिवशी आपल्यासमोरच, बागेत असताना, मला वांचवण्यासाठी, आपल्या प्राणांची पर्वा न करता, केवड्याच्या झाडावरचा नाग तिने हातांत पकडून दूर फेंकला होता."



मनुष्य बनण्यासाठीं नियम व शिस्त असलीच पाहिजे. नाहीतर तुम्ही मनुष्य नसून जनावर व्हाल.

- श्रीमाँ

हे ऐकून राजा झटकन उठला, आणि महालाच्या प्रमुख ध्दारावरची घंटा वाजवूं लागला. पाहता पाहता अनेक सैनिक पळत आले. राजाने त्यांना आज्ञा केली, "तावडतोब जा आणि अतिथी भवनांत राहात असलेल्या अंगरखावाला आगांतुक गरलभोगी याला पकडून चाकूसुऱ्यांच्या विहिरींत फेंकून द्या."

ही गोष्ट ऐकवून वेताळाने विक्रमार्क राजाला विचारले, "राजन्! गरलभोगीला चाकूसुऱ्यांच्या विहिरींत टाकण्याचा राजाचा निर्णय आततायी आहे कीं नाही? पेयाच्या मदतीने त्याला सच्चा मित्र आणि हितचिंतक कोण व शत्रू कोण हे सहज समजूं शकलं असतं. चोर कोण, खुनी कोण, राजद्रोही कोण हे राजाला सहज समजूं शकलं असतं, आणि त्यांना राजा शिक्षा करुं शकला असता. आपल्या प्रजेला दुष्ट व अपराधी लोकांपासून निश्चित वाचवूं शकला असता. परंतु आपला शत्रू ओळखण्याचा इतका सोपा मार्ग व संधी, त्याने राणीच्या सांगण्यावरुन, केवळ भावनेच्या आहारी जाऊन क्षणांत घालवली. हा त्याचा मूर्खपणा आणि अविचारीपणा नाही कां? माझ्या या प्रश्नाचं उत्तर माहीत असूनही तूं गप्प राहिलास तर तुझ्या डोक्याची शकलें होतील, तुकडेतुकडे होतील."

राजा विक्रमार्कने उत्तर दिलं, "विचित्र व अद्भुत वस्तूंच्या मोहांत राजा इतका पडत असे कीं त्यांचे अप्रत्यक्ष व सूक्ष्म परिणाम त्याच्या लक्षांत येत नव्हते. यामुळेंच त्या पेयाच्या बाह्य प्रभावामुळें तो इतका चकित झाला होता कीं भुतांच्या गुरुचा शिष्य गरलभोगी याच्याबद्दल त्याच्या मनांत यत्किंचित विचारसुद्धां आला नाही की गरलभोगीही भूत असेल व साऱ्या राज्यांत दुष्ट व गुन्हेगारांची संख्या वाढवण्याचा त्याचा हेतू असेल. राणीने पेयाबद्दल शंका व्यक्त केल्यानंतर त्याला लगेच समजलं कीं त्या पेयाचा परिणाम चांगल्या व्यक्तींना वाईट बनवण्यांत होतो. म्हणून आगांतुकाला कठोर शिक्षा देण्याचा राजाचा निर्णय अगदी योग्य आहे." राजाचे मौन भंग झाल्यामुळें वेताळ लगेच उडत जाऊन झाडावर बसला.



# शाल

कन्हैया गांवातला एक साधारण व्यापारी होता. आपल्या व्यापारानिमित्त एक दिवस तो शहरांत कामासाठी गेला. काम पुरें झाल्यानंतर जेवायला तो एका भोजनालयांत गेला. तिथें त्याला आपला गांवकरी शंकर भेटला.

"बरं झालं, तुझी भेट झाली - आता आपण बरोबरच गांवी परत जाऊं." शंकरच्या खांद्यावर हात ठेवत कन्हैया म्हणाला. कन्हैयाची भेट झाल्यामुळें शंकरलाही आनंद वाटला.

दोघेही एकत्र जेवले आणि पैसे देऊन बाहेर पडले. पाठीमागून भोजनालयाचा नोकर पळतपळत त्यांच्याजवळ आला आणि म्हणाला.

"आपण आपली शाल विसरुन आला होतात साहेब, ही घ्या," असं म्हणून त्याने कन्हैयाला शाल दिली.

कन्हैयाने आपल्या खांद्यावर शाल टाकली आणि खिशांतून एक अधेली (आठ आण्यांचे जुने नाणें) त्या नोकराला बक्षीस दिली. नोकराने जरा लवून नमस्कार केला व तो आनंदाने परत गेला. "शाल परत दिल्याबद्दल तुम्ही त्या नोकराला आठ आणे कशाला दिलेत? दोन आणे पुरले असते कीं!" शंकरने म्हटले.

कन्हैयाने मोठ्या कौतुकाने ती शाल न्याहाळली व तो म्हणाला, "इतकी किंमती शाल मला आठ आण्यांत मिळाली आहे. हा सौदा तर नुकसानीचा नाही ना?"

शंकर त्याच्याकडे आश्चर्याने पहातच राहिला.

-वंशीधर





# चतुरक्ष

एकदा कृष्णापूरचा जमीनदार घोडयावर बसून गांवाबाहेर रपेट करायला निघाला होता. रस्त्याच्या कडेला गवतांत एक कुत्री आपल्या चार नवजात पिलांना दूध पाजताना त्याला दिसली.

त्याच वेळेला समोरच्या दिशेने बैलगाडीतून एक शेतकरी येत होता. जमीनदाराची स्वारी घोड्यावरुन येत आहे हे पाहून तो बावरला, आणि जमीनदाराला वाट देण्यासाठी त्याने बैलगाडी बाजूला घेऊन गवतांत वळवली. बाजूचा रस्ता ओबडधोबड व खांचखळग्यांचा होता. त्यामुळें गाडी एकदम कलंडली व कुत्री अन तिची पिलें गाडीखाली आली. तीन पिलें तर लगेच मेली. थोडा वेळ तडफडून कुत्रीही मरण पावली. ते करुण दृश्य पाहून जमीनदाराचे मन हेलावले. वांचलेल्या त्या चौथ्या पिलाला घेऊन तो वाडयावर परतला. त्या पिल्लाचा नीट सांभाळ करण्याचा त्याने नोकरांना हुकूम दिला.

जमीनदाराचा पुरोहित त्यावेळेस तिथे हजर होता. त्याने पिलूं नीट पाहिले व म्हटले, "सरकार, याच्या डोळ्यांखालीं दोनदोन ठिपके आहेत. अशा चार ठिपकेवाल्या कुत्र्यांना चतुरक्ष म्हणतात. प्राचीन काळांत असे कुत्रे अनिष्ट सूचक मानले जात असत आणि अश्वमेध यज्ञासाठी दिग्विजय यात्रा सुरुं करण्यापूर्वी यांना मुसळाने कांडून कुटून मारत असत. म्हणून माझ्या दृष्टीने हे पिलूं पाळणें शुभंकर होणार नाही."

जमीनदार हंसून म्हणाला, "असं म्हणतात कीं प्राचीन युगांत सूर्याला नेत्र, चंद्राला मन, दिशांना कान, प्रजापतीला जीवात्मा, आणि वायुदेवाला देहाचे पंचप्राण अर्पण करुन शेळी किंवा इतर एखाद्या प्राण्याचा बळी सोमयज्ञांत किंवा अश्वयज्ञांत दिला जात असे. चतुरक्ष पापाचं प्रतीक मानलं जातं असं आपण म्हणतां आणि कोणत्याही शुभ कार्याला आरंभ करण्यापूर्वी मुसळाने कांडून त्याला ठार मारतात, पण मी याला कसा मारुं शकेन? या अजाण, मूक, असहाय, प्राण्याने माझं कांही नुकसान केलं आहे कां? त्याच्याशी मी असा निष्ठुर आणि क्रूरपणे मुळींच वागूं शकणार नांही.

"आपण पुरोहित आहात. शास्त्रार्थ जाणतां. दुःखी प्राण्यांवर दया करणें हे तर शास्त्रानुसार मोठं पुण्य मानलं जातं. आणि सर्वांना हे ठाऊक आहे कीं माणूस माणसाचा घात करुं शकतो. पण प्राणी कधीं विश्वासघात करत नाही."



पुरोहित निरुत्तर झाले. चतुरक्षाचे पालनपोषण चांगल्या प्रकारें होऊं लागले. वर्षभरानंतर तो चांगला धष्टपुष्ट आणि छान दिसूं लागला. जमीनदाराच्या महालांत, कचेरींत, बागेत - सगळीकडे तो निर्भयपणे आणि स्वच्छंदपणें वागडत असे, कधीकधीं कचेरींत जमीनदाराच्या शेजारी बसत असे. दर वेळेला तो सावधपणें कचेरींत येणाऱ्या अनोळखी लोकांवर भुंकत असे. कचेरीतल्या लोकांप्रमाणे आसपास राहणाऱ्या घरांतल्या लोकांनाही चतुरक्ष आवडत असे. मुलांचा तर तो लाडका दोस्त बनला होता. पुरोहिताला हे सगळं पाहून फार राग येत असे. पण निरुपायाने त्याला आपला राग आवरावा लागला होता. पुरोहित कुत्र्यावर चिडला की सर्वजण हंसायला लागत.

एक दिवस चतुरक्ष सरळ पुरोहिताच्या घरांत शिरला. जमीनदाराचा पाळलेला आवडता कुत्रा, म्हणून त्याला हांकलण्याचं धैर्य कुणाला होईना. थोडयाच दिवसानंतर चतुरक्ष पुरोहिताच्या घराच्या ओटयावर झोंपूं लागला, व जिथेंजिथें पुरोहित जाई, तिथेंतिथें त्याच्यामागें हाही जाऊं लागला, पुरोहिताने नाराजीच्या सुरांत म्हटले, "पूर्वीच्या काळीं अश्वमेध यज्ञाचा घोडा स्वच्छंदपणें हिंडत असे. माझ्या आसपास स्वच्छंदपणें हे कुत्रं हिंडत असतं. बहुतेक माझा हा श्वानमेध यज्ञ होतो आहे असं वाटतं !"

एका दिवशी सकाळीं पुरोहित पलंगावर झोपलेला होता, तेव्हां चतुरक्ष त्याच्याजवळ येऊन जोरजोरांत भुंकू लागला, "छी छी" करत पुरोहित उठला. त्याच्या मनांत कुत्र्याला काठीने मारुन हाकलावे असे आले. अचानक त्याच्या

दिव्या जैन

लक्षांत आले कीं चतुरक्ष खिडकीकडे बघत, जास्तच जोरांत भुंकतो आहे. त्याने खिडकीकडे बघितले, आणि तो भितीने थरथर कांपू लागला. तिथें एक फणीधर नाग आपला फडा उभारुन फुसफुसत होता. साक्षात यमराज असल्यासारखा नाग पाहून पुरोहित मनांत चरकला आणि त्याची बोबडीच वळली. कसाबसा धीर एकवटून तो 'साप साप' असं ओरडूं लागला. त्याचा ओरडा ऐकून कांही लोक जमले व त्यांनी सापाला मारले.

साप पाहिल्यावर पुरोहिताला आठवण झाली कीं एक दिवस पहांटे तलावांत स्नान करुन तो परत येत होता. अंधारात त्याचा पाय एका सापावर पडला होता. त्याने ही गोष्ट कचेरींतल्या कांहीजणांना सांगितली होती. साप केव्हांही डूग धरुं शकतो म्हणून त्या मंडळींनी त्याला सावध राहाण्याची सूचना दिली होती. पण पुरोहिताला आपल्या मंत्रसामर्थ्यावर फार विश्वास होता म्हणून त्याने विशेष लक्ष दिले नाही. त्याला हेही आठवलं की त्याच दिवशी चतुरक्ष त्याच्या घराच्या आजूबाजूला सारखा फिरत होता, आणि पुरोहित दिसला कीं त्याच्या मागे मागे हिंडत होता. आता मात्र त्याला वाटायला लागलं की खरोखरच सापापासून वांचवण्यासाठीच कुत्रा त्याच्या भोंवती फिरत होता. जर चतुरक्षाने पुरोहिताला भुंकून उठवले नसते तर साप त्याला निश्चितच चावला असता. 'आज ह्याने माझे प्राण वांचवले आहेत' असा विचार मनांत येऊन पुरोहिताला चतुरक्षाबद्दल फार कृतज्ञता वाटली.

सापाला मारल्यानंतर सगळेजण आपापल्या घरीं निघून गेले. चतुरक्षाला मोठ्या प्रेमाने कुरवाळत पुरोहित म्हणाला, "प्रत्येक प्राण्याविषयीं प्रेम आणि करुणा मनांत ठेवली पाहिजे असं शास्त्रांत सांगितलंय. मी पंडित; शास्त्रें शिकून देखील मी ही गोष्ट विसरलो होतो. उलट, तूं मुका प्राणी असून देखील, जरी मी तुझा तिरस्कार करीत असलो तरी, मला तूं संकटातून बांचवले आहेस. हा धडा मी कायम लक्षांत ठेवीन."

पुरोहिताने त्याला जवळ घेतले आणि आपल्या हाताने त्याला दूधपोळी भरवली.

जेव्हां जमीनदाराला ही कथा समजली तेव्हां तो पुरोहिताला म्हणाला, "जर चतुरक्ष नसता तर आज आपल्याला कुणी बाचवलं असतं?"





# सुवर्ण सिंहासन

६

(आजपर्यंत : हैहय वंशाचा कौंडिन्य नरेश पीरवताने दक्षिणेंतल्या सर्व राज्यांची एकजूट करुन एक मोठे साम्राज्य स्थापन केले होते. त्याच्या मृत्यूनंतर साम्राज्यची शकलें झाली आणि सर्व राजे स्वतंत्र झाले. कालिंदीचा राजा माधवसेन कौंडिन्यचा मित्र व होता. तरीदेखील चंपकनरेश मरालभूपतीने, त्याला व कुंदच्या राजाला आपल्या पक्षांत वळवून घेऊन कौंडिन्यवर हल्ला करण्याची योजना आंखली. माधवसेन आपली कन्या श्रीलेखा हिचा विवाह मरालभूपतीच्या मुलाशी करणार होता. परंतु कौंडिन्यचा राजकुमार विजयदत्त ह्याच्याशी विवाह करण्याचे श्रीलेखाची इच्छा होती. म्हणून ती घरांतून पळून कौंडिन्यला आली. विजयदत्तने तिच्याशी गांधर्वपद्धतीने विवाह केला. आपले गुरु शिवानंद यांच्या आज्ञेनुसार कौंडिन्याचा राजा श्रीदत्त याने महालाजवळ खोदकाम केले. तिथें त्याला एक सुवर्ण सिंहासन सांपडले, त्या सिंहासनाचे रक्षण एक सर्प करीत होता. विजयदत्ताने त्याच्या प्रश्नाचे योग्य उत्तर देऊन त्याला जिंकले. राज्याभिषेकाच्या वेळीं जेव्हां तो सिंहासनावर बसायला गेला. तेव्हां सिंहासनाच्या पहिल्या पायरीवरच्या मूर्तीने सांगितलं कीं जोपर्यंत तिच्या प्रश्नांची उत्तरे मिळणार नाहीत तोपर्यंत पुढें पाऊल टाकता येणार नाही. तिने विजयदत्तला सांगितलं, "प्रथम मी एक गोष्ट सांगेन आणि नंतर त्याविषयी प्रश्न विचारीन. जर बरोबर उत्तर दिलंस तर पहिली पायरी चढूं शकशील. पण चुकीचे उत्तर दिलेस तर सिंहासन अदृश्य होईल." तिच्या कहाणीनुसार एक मूर्ख व अत्याचारी राजा कालकेतू, ह्याच्या राज्यांत प्रजेची दशा केविलवाणी झाली. तेव्हां तिथला वृद्ध माजी सेनापती व देशाचा हितचिंतक, याने शेजारच्या राज्याचा राजा चंदनवर्मा याला पत्र पाठवून आपला देश संकटातून बांचवाच्या अशी विनंती करणारे पत्र लिहीले..... यापुढे)

श्रीमहाचे पत्र मिळाल्यानंतर चंदनवर्माने आपल्या गुप्तचरांकडून कालकेतूच्या राज्यांतली खरी परिस्थिती काय आहे त्याबद्दल माहिती मिळवली. परिस्थिती फारच गंभीर थराला गेली आहे हे जेव्हां त्याला कळलं, तेव्हां त्याने त्रिपुरांतक देशावर आक्रमण केलं, व मोठ्या सहजपणाने विजय मिळवला. तिथला राजा झाल्यानंतर चंदनवर्माने कालकेतू राजाला राणीसह महालातून बाहेर निघून, नगराच्या वेशीवरच्या उद्यानांत राहाण्याची आज्ञा दिली. त्याने आपल्या सैनिकांना चित्ररथाला पकडण्याचीदेखील आज्ञा दिली होती. सैनिकांनी सारे शहर तपासले पण त्याचा पत्ता

लक्ष्मी गायत्री



लागला नाही. प्रजाजनांजवळ चौकशी केल्यानंतर आपल्याला माहीत नसल्याचं सर्वांनी सांगितलं.

चंदनवर्मा राज्यावर आल्यानंतर त्या राज्यांतले गुन्हे कमी झाले आणि राजाने कोणाही अपराध्याला पकडलं नव्हतं. चित्ररथासंबंधी बोलताना माजी सेनापती श्रीमल्लाने सांगितले,

''मी ऐकलंय कीं आपण आक्रमण करण्यापूर्वी तो आजारी होता. प्रजेंत तो फार लोकप्रिय आहे. प्रजेचा तो एकमेव हितैषी आणि रक्षणकर्ता होता. त्यामुळें प्रजा त्याच्याशी कृतज्ञ आहे. कदाचित शिक्षा होईल या भितीने प्रजाजनांनीच त्याला एखाद्या गुप्तस्थळीं लपवून ठेवलं असेल.''

चंदनवर्माने विचार केला कीं जर चित्ररथ आजारी असेल तर कोणता तरी वैद्य त्याचा इलाज निश्चित करत असणार. त्याने राज्यांतल्या सर्व वैद्यांवर नजर ठेवण्याची आज्ञा दिली.

एक दिवस राजाला माहिती कळली कीं अश्वमुख नांवाचा एक प्रसिद्ध वैद्य कुणावर तरी औषधोपचार करण्यासाठीं एका रहस्यमय स्थानीं जातो. त्याने वैद्याला बोलावून चौकशी केली. प्रथम वैद्य घाबरला होता, परंतु नंतर त्याने सरळ सांगितले कीं चित्ररथाच्या बाबतींत त्याला कांहीही ठाऊक नाही, किंवा तो गुप्तपणें त्याच्यावर उपचारही करत नाही.

वैद्य खोटं बोलत आहे हे राजाला कळलं तरीही त्याने वैद्याला सोडून दिले.

दुसऱ्या दिवशी चित्रनेमी नांवाचा एक उच्च अधिकारी राजाला रात्रीं गुप्तपणें भेटायला आला व म्हणाला,

''महाराज, काल रात्रीं मी अश्वमुखाला कुठेतरी एकटा जाताना पाहिले म्हणून मी त्याचा पाठलाग केला. आता चित्ररथ कुठें राहातो आहे ते ठिकाण मला ठाऊक झाले आहे. वैद्य औषधोपचारासाठींच तिथे जात होता.'' चंदनवर्मा सैनिकांना घेऊन स्वतः तिथें गेला व त्याने चित्ररथास कैद केले.

चित्ररथास महालांतल्या एका भागात ठेवले गेले व राजवैद्यांकडून त्याच्यावर उपचार केले गेले. त्याची प्रकृती ठीक होताच त्याला त्रिपुरान्तक राज्याचा मांडलिक राजा म्हणून घोषित केले गेले.

आठवड्यानंतर चंदनवर्माने नागरिकांसमोर चित्रनेमीला चाबकाने फटके मारले, आणि अशा प्रकारची कठोर शिक्षा यापुढे अनैतिक कामें करणाऱ्यांना देण्यांत येईल असेही जाहीर केले.

तो म्हणाला, ''चित्ररथाने निर्धन व दुःखी प्रजेला मदत केली, म्हणून तो प्रजेचे प्रेम व आदर मिळवूं शकला, त्यामुळेंच मीसुद्धां त्याला मांडलिक राजा घोषित केला आहे. उत्तम साध्यासाठीं, उत्तम साधनांचे सहाय्य न घेतल्यामुळें आणि उच्च ध्येय



असूनही ते मिळवण्यासाठी गैरमार्ग स्वीकारल्यामुळे त्याने कांही चुकादेखील केल्या आहेत. त्याचे प्रायश्चित्त म्हणून त्याला चित्ररथस्वामींच्या मंदिरात सेवक म्हणून काम करावं लागेल. त्याशिवाय प्रत्येक एकादशीच्या दिवशी त्याला मंदिराची झाडलोट स्वतः करावी लागेल. हीच त्याची शिक्षा आहे.''

आपली कथा संपवत, सालभंजिका पुढे म्हणाली, ''भावी महाराज विजयदत्त, चित्ररथ कुठे लपला आहे हे सत्य केवळ चित्रनेमीच्यामुळेंच समजले. सारी प्रजा आणि खुद्द अश्वमुख वैद्यानेदेखील, खरं माहीत असून, खोटं सांगितलं. पण खरं सांगाणाऱ्या चित्रनेमीला मात्र चंदनवर्माने कठोर शिक्षा दिली. आणि खोटं बोलणाऱ्यांना कांहीच शासन केलं नाही. अपराध करणाऱ्या, लपून बसणाऱ्या चित्ररथाला त्यांनी देशाचा मांडलिक राजा केले. चंदनवर्माच्या दृष्टीतून सत्य-असत्य याचा मानदंड कोणता आहे? खरं सांगणाऱ्याला शिक्षा देण्यामागे एखादा गर्भित अर्थ लपलेला आहे कां? जर तसं असेल तर तो धर्म तरी कोणता? या प्रश्नांचं ठीक उत्तर दिलंस तरच पहिल्या पायरीवर पाय ठेवण्याचा अधिकार तुला मिळेल. नाहीतर तुझ्या डोळ्यांसमोर हे सुवर्ण सिंहासन अदृश्य होईल.''

विजयदत्तने मान खाली घालून नम्रपणें सांगितलं, ''हे सत्याची आत्मा! आपल्या कहाणीचा धीरोदात्त नायक चंदनवर्मा, याचे सर्व निर्णय व वागणूक राजधर्मानुसार आहे आणि एखाद्या समर्थ आणि आदर्श राज्यकर्त्याला शोभणारे आहे. चित्ररथाने संकटकाळांत दुःखी व असहाय प्रजेला मदत केली, राजाच्या अत्याचारांनी आणि अन्यायाने गांजलेल्या प्रजेला यथाशक्ती



दिलासा दिला. जरी या उच्च आदर्शांसाठी त्याने चुकीचे मार्ग निवडले होते, तरी देखील त्याचे कार्य देशप्रेम आणि भक्तीने प्रेरित झालेले होते. त्याच्या चोरी आणि हिंसेच्यामागे, मानवता, परोपकार, दया आणि करुणेच्या उदात्त भावना आहेत आणि ही सत्याची शाश्वत मूल्यें आहेत. वास्तविक, चित्ररथाने मानवतेचे कर्तव्य निभावले आहे, खऱ्या अर्थाने सत्याचे पालन केलेले आहे. चंदनवर्माला सत्याचा हा सूक्ष्म अर्थ समजला आहे, आणि त्यानुसार त्याचे निर्णय खऱ्या न्यायावर आधारलेले होते. चित्ररथाला शिक्षा न दिल्यामुळें त्याने सत्य व न्यायाचे रक्षण केले.

''प्रजेचं हित करणाऱ्या अशा लोकांचा, खुशामती आणि भ्रष्ट अधिकारी द्वेष करतात, तिरस्कार करतात. कारण असले चांगले लोक त्यांच्या भ्रष्ट आचरणांत अडथळे आणतात. केवळ

ईर्षा आणि द्वेषामुळें चित्ररथाला शिक्षा देववण्यासाठींच चित्ररथाबद्दल खरी माहिती पुरवली. ह्यामागे त्याचा वाईट हेतू होता. म्हणूनच खरं सांगितल्यानंतरदेखील चंदनवर्माने चित्रनेमीला सजा दिली. हा निर्णयदेखील सत्य व न्यायाला अनुकूल आहे.

"मन, वचन आणि कर्म - माणसाच्या वागणुकीची ही तीन अंगे आहेत. त्यापैकी प्रमुख आहे मन. कधीकधी वचन किंवा कर्म खऱ्यासारखं दिसत असलं तरी सच्च्या मनाने बोललं किंवा केलं गेलं नाही तरी ते छल-कपट होतं. खऱ्या भावनेने प्रेरित असलेले, परंतु असत्य वाटणारे वचन आणि कर्महीं सत्य होऊन जातं. सत्यअसत्यामधलं हे सूक्ष्म अंतर जाणणारा राजा हा प्रजेचा खरा हितैषी आणि म्हणूनच आवडता असतो. चंदनवर्मा या उत्तम श्रेणींतला राजा आहे. म्हणून त्याने सद्भावनेने प्रेरित झाला असल्यामुळें, चित्ररथाची अयोग्य वाटणारी कृत्यै केल्याबद्दल, त्याला चित्ररथ भगवानाची सेवा करण्याची पवित्र शिक्षा त्याला दिली. असं करुन त्याने प्रजेला दाखवून दिलं कीं पवित्र आणि श्रेष्ठ ध्येयानुसार, त्या ध्येयपूर्तीची साधनेदेखील नीतिमान आणि पावन असायला हवीत. म्हणजे चित्ररथाच्या राजवटींत प्रजा अयोग्य मार्गाचे अनुसरण करणार नाही. आणि मन, वचन व कर्म तिन्ही स्तरांवर सत्याचे आचरण करील.

चंदनवर्माच्या जागी मी असतो तर मीदेखील असंच वागलो असतो."

"शाबास विजयदत्त ! माझ्या प्रश्नांची सरळ आणि योग्य उत्तरे देऊन तूं सिंहासनाची पहिली पायरी चढण्याचा अधिकार प्राप्त केला आहेस. तुझं स्वागत असो."

पहिल्या सालभंजिकेचे शब्द ऐकताच प्रजाजन







आनंदाने विजयदत्ताचा जयजयकार करुं लागले. श्रीदत्त महाराजांनी आपल्या पुत्राला अभिमानाने पोटाशी धरले. श्रीलेखा आनंदाने भावविव्हल झाली व तिचे डोळे भरुन आले. मंगलवाद्यांचा नाद वातावरणांत गुंजत राहिला. विजयदत्ताने पहिल्या पायरीवर पाय ठेवला.

पहिल्या पायरीवर पाऊल ठेवताच दुसरी सालभंजिका म्हणाली, "माझी भगिनी सत्याची आत्मा, तिने सांगितलं होतं ती मी धर्माची आत्मा आहे. आता माझी गोष्ट ऐक. गोष्ट सांगितल्यानंतर मी तुला प्रश्न विचारीन.

"एकदां सुवर्णगिरी राज्यांत कुशध्वज नांवाचा राजा राज्य करीत होता. मंत्रीमंडळाचा सल्ला व सहकार यांच्या मदतीने तो राज्यकारभार मोठ्या कौशल्याने चालवत होता. त्याच्या राज्यांत प्रजा हरप्रकारे सुखी आणि प्रसन्न होती.

राजाला एक मुलगा होता - मलयध्वज ! तो असामान्य प्रतिभेचा मुलगा होता. मोठेपणाची लक्षणें त्याच्या लहानपणींच दिसत होती. त्यामुळें मंत्र्यांनी त्याच्या शिक्षणासाठीं त्याला त्याकाळांतले प्रसिद्ध आणि सर्वश्रेष्ठ गुरु कृष्णचंद्र यांच्याकडे पाठवण्याचा सल्ला दिला. राजाच्या मनांत तेच होते. राजकुमाराला कृष्णचंद्रांच्या आश्रमांत सोडण्यासाठी राजा स्वतः गेला.

तीव्र बुद्धिमत्ता आणि असामान्य प्रतिभेमुळें मलयध्वज लौकरच आपल्या गुरुचा लाडका बनला. त्याच्यात एका कुशल व समर्थ राज्यकर्त्याचे सारे गुण एकवटलेले होते. आपले शिक्षण पूर्ण करुन जेव्हां तो आपल्या राज्यांत परत येण्याची तयारी करुं लागला, तेव्हां त्याला अत्यंत दुःखद बातमी कळली. सुवर्णगिरीच्या शेजारच्या राज्यांतला राजा वज्रकीर्ती याने कपटाने आक्रमण करुन, राजा व राणीची हत्या केली व महालाचा ताबा घेतला होता.

या बातमीने राजकुमार मलयध्वजाच्या हृदयावर जणूं वज्राघात झाला. त्याचे सांत्वन करुन गुरु कृष्णचंद्र त्याला म्हणाले, "तुझ्यावर अचानक आणि अवेळीं आलेले हे संकट किती दुःखद आहे हे मी समजूं शकतो. परंतु वर्तमानांतून जितकं लवकर बाहेर पडून, सावध राहून भविष्यांत काय वाढून ठेवलंय याचा गंभीरपणें विचार करायला हवा. तुझ्या प्राणांवरदेखील संकट येऊं शकतं. तूं आणखी कांही दिवस इथेंच थांब."

मलयध्वजाने अतिशय दुःखित स्वरांत गुरुला सांगितलं, "गुरुदेव, एखाद्या वाघाला एकदा मनुष्याच्या रक्ताची चटक लागली, की तो दुसऱ्या शिकारीच्या शोधांत राहणारच. मी भिऊन, लपून राहिलो तर तात्पुरते संकट टळेल पण भीती तशीच कायम राहील. पण याऐवजी जर आपणच वाघावर



हल्ला करून त्याला खतम केलं, तर आपण निर्भय आणि निश्चिंत होऊं शकूं."

त्याच्या म्हणण्यावर विचार करुन गुरु कृष्णचंद्रांनी सांगितलं, "मला तुझी तीक्ष्ण दृष्टी, कुशाग्र बुद्धी, असाधारण चिकाटी आणि आत्मविश्वास चांगलाच ठाऊक आहे. तुला जे योग्य वाटेल ते कर. माझे आशिर्वाद सदैव तुझ्या पाठीशी आहेत. विजयी भव!"

गुरुचा आशिर्वाद घेऊन मलयध्वज एका सामान्य नागरिकाच्या वेषांत चंद्रहासबरोबर घोड्यावर स्वार होऊन निघाला.

सुवर्णगिरी राज्याच्या सीमेवर भिल्लांचा छोटासा स्वतंत्र प्रदेश होता. तिथला राजा सिंहगुप्त, कुशध्वजाचा चांगला मित्र होता. संध्याकाळ होईपर्यंत मलयध्वज त्या राज्यांत पोंचला व सिंहगुप्तास भेटला. त्याने आपली ओळख सांगून आपली योजनाही सांगितली.

मलयध्वजाला पाहून सिंहगुप्त म्हणाला, "तूं आलास ते बरंच झालं. मी स्वतः तुमच्याशी संपर्क साधणार होतो. माझे सैनिक तयार आहेत. मी तुझ्याबरोबर आहे आणि वज्रकीर्तीला मारुन तुला सुवर्णगिरीचे व वज्रकीर्तीचेही राज्य जोपर्यंत मी देववूं शकत नाही तोपर्यंत मी स्वस्थ बसणार नाही."

"या कार्यात मोठ्या सैन्याची आवश्यकता नाही. फक्त आपल्या सेनेतला एक श्रेष्ठ, कुशल योद्धा, थोडे धन, कांही आभूषणें आणि कांही विषारी सुयांची मला गरज आहे." मलयध्वज म्हणाला. त्याची बुद्धिमत्ता व आत्मविश्वास पाहून सिंहगुप्ताला आनंद झाला. तो म्हणाला, "तुझी योजना ठीक वाटते आहे, पण इतकी थोडी सामुग्री पुरेशी होईल?"

"हो, जर नशिबाने साथ दिली तर इतकंच पुरेसं आहे." राजकुमाराने आत्मविश्वासाने उत्तर दिले.

दुसऱ्या दिवशीं सिंहगुप्ताने आवश्यक वस्तूंखेरीज एक तरुण मलयध्वजाबरोबर दिला. हा तरुण म्हणजे दुसरा तिसरा कुणी नसून एका कुशल योद्ध्याच्या वेषांत त्याची मुलगी शालिनी होती. दोघेही दोन घोड्यावर स्वार होऊन सुवर्णगिरीच्या राजधानीकडे जाऊं लागले. अंधार होताहोता ते राजधानीच्या सीमेवर पोंचले. तिथे त्यांनी थोडा वेळ विश्रांति घेतली. जेव्हां रात्रीचा पहिला प्रहर संपला, तेव्हा घोड्यांना तिथेंच सोडून ते दोघेजण नगराच्या रस्त्यांतून जाऊं लागले.

एका घरांत कांही लोकांचा बोलण्याचा आवाज येत होता. हे दोघे त्या घराच्या ओट्यावर उभे राहून आंतला संवाद ऐकत होते.

एक स्त्री विचारत होती, "हे लोक युवराजाची-देखील हत्या करतील कां?"

"वज्रकीर्तीला सत्तेची झांव सुटली आहे नि त्यांत तो वेड्यासारखं कांहीही करेल. त्याला धर्म-अधर्मांची बिलकूल चाड नाही. राज्यप्राप्तीसाठी युवराजालादेखील तो निर्दयपणें मारुन टाकेल." एका पुरुषाचा आवाज झाला.

थोडा वेळ शांतता होती. नंतर पुन्हां तो पुरुष बोलूं लागला, "पण खरा दोषी तर कन्दर्प आहे. घरांतला शत्रू बाहेरच्या शत्रूपेक्षां जास्त धोकादायक असतो. असल्या लोकांचे तुकडेतुकडे करुन गिधाडांना खायला घालायला हवेत म्हणजे मोठेंच पुण्य मिळेल."

स्त्रीचा आश्चर्यचकित झाल्याप्रमाणें आवाज आला, "काय? आपल्या सेनापती कंदर्पानेच आपल्या राजाराणीची हत्या केली?"

"हळू बोल की! कुणी ऐकलं तर आपलीही तीच दशा होईल. आता मध्यरात्र झालीय. झोंप आता."

बराच वेळ कांही आवाज येईना. थोड्या वेळानंतर मलयध्वजाने दरवाजावर हलकेच थाप मारली.

"कोण आहे?" पुरुषाने आंतून विचारले.

"मित्र!" मलयध्वज उत्तरला. थोड्या वेळानंतर दार उघडले गेले व मलयध्वज आणि शालिनी चटकन आंत शिरले व दार बंद झाले. मलयध्वजाने संकोचाने त्या पुरुषाला आपले नांव सांगितले. आपल्या घरांत आपला युवराज आला आहे हे पाहून घराचा मालक सुकेतू फारच आनंदित झाला. मलयध्वजाने त्याला विश्वासांत घेऊन आपली योजना सांगितली. योजनेनुसार दुसऱ्या दिवशी सकाळीं सुकेतू वज्रकीर्तीच्या शयनागारावरच्या लालू पहारेकऱ्याला आपल्या घरी घेऊन आला.

मलयध्वजाने आपल्या जवळचा एक किंमती हार काढला आणि त्याला सांगितले.

"मला मदत केल्याबद्दल ही माझी तुला प्रेमाची भेट आहे."

"याची आवश्यकता नाही महाराज, आपल्यासाठी कर्तव्यपालन करता येणें हीच माझ्यासाठी आपली प्रेमाची भेट आहे. आपण आमचे राजा आहात. आज रात्रींच्या दुसऱ्या प्रहरीं आपण यावे." एवढे बोलून, युवराजाच्या पायाला हात लावून पहारेकऱ्याने प्रणाम केला, व तो बाहेर गेला.



# भारत- गाथा

*एका महान् संस्कृतीचा शोध*
*युगायुगांचा गौरवशाली इतिहास*

## भगवानाची एक कोमलधारा

"आई, जेव्हां आपण बडोद्यास गेलो होतो तेव्हां मी किती वर्षांचा होतो ग?" संदीपने जयश्रीला विचारले. "अरे, तूं फक्त तीन वर्षांचा होतास. पण तुला हे सगळं आठवतंय हे आश्चर्यच आहे!" जयश्रीने कौतुकाने म्हटले.

"मला खूप सगळं कांही आठवत नाही, पण आपण नावेतून फिरलो ते मात्र बरेच वेळां आठवतं. एक रात्र आपण नदीकिनाऱ्यावरच्या एका घरांत राहिलो होतो, आणि दुसऱ्या दिवशी पहाटेच उठून बाबांबरोबर आपण फिरायला गेलो होतो. सूर्य उगवला तेव्हां त्याची किरणें नदीच्या पाण्यावर पडली आणि पाणी सोनेरी दिसायला लागले. तुम्ही दोघंही उगवत्या सूर्याकडे टक लावून पाहात होतात. आणि मलाही सूर्याकडे पाहायला सांगितलेत. तो शांत सुंदर देखावा माझ्या स्वप्नांत शंभर वेळां आला असेल." संदीप म्हणाला.

चमेली व संदीप आपल्या आजोबांबरोबर न्याहारी करीत होते. त्यांचे आजोबा-प्राध्यापक देवनाथ. आपल्या सुनेचा आणि नातवाचा संवाद लक्षपूर्वक ऐकत होते.

"पण तसला मोठा सूर्य आयुष्यांत पुन्हां कधी मला कां हो दिसला नाही?" संदीपने आजोबांना विचारले.

"सूर्योदय नेहमीच भव्य असतो बाळा! पण तूं लक्षपूर्वक सूर्याकडे पाहायची ती बहुतेक पहिलीच वेळ असेल. कारण तुझे आईवडीलदेखील सूर्याकडे टक लावून पाहात होते आणि ते दृश्य त्यांना तुलाही दाखवायचं होतं.

ती आठवण तुझ्या मनांत अजून ताजी आहे याला आणखी एक दुसरं कारण आहे."

"ही करनालीची गोष्ट आहे. नर्मदेच्या किनाऱ्यावर आम्ही एका आश्रमांत एक रात्र राहिलो होतो. मोठमोठ्या जुन्या काळच्या वृक्षांच्या छायेंत असलेला तो आश्रम खरोखरच एक रमणीय स्थान आहे." जयश्री म्हणाली.



"ते दुसरं कारण कोणतं आहे आजोबा? तुम्ही आत्ता म्हणालात ना?" संदीपने उत्सुकतेने विचारले.

"अरे संदीप, खरं म्हणजे मी तुम्हाला सांगणार नव्हतो. कारण ते समजावून सांगायचं म्हणजे त्याचं स्पष्टीकरण करायला हवं आणि त्यासाठीं तुम्ही अजून लहान आहात, तुम्ही नीट समजूं शकणार नाही."

"संदीपदादाला सांगूं नका वाटलं तर, पण मला सांगा. संदीपदादा तर अजून लहान आहे, पण मी कांही लहान नाही हं! बाबा तर मला आजीबाई म्हणतात." त्याचे बोलणें संपण्यापूर्वीच चमेलीने झटकन सांगितले.

आजोबा हंसले नि म्हणाले, "तुमच्या दोघांच्या हुशारीबद्दल मला खात्री आहे. माझ्या मनांत जे सांगायचं आहे ते समजण्याइतके तुम्ही कुशाग्र बुद्धीचे आहात. सांगावं की नाही असं मलाच वाटत होतं, पण सांगतोच आता," आणि त्यांनी सांगायला सुरवात केली.

"मनुष्य फक्त शरीर, प्राण आणि मन एवढ्याचाच बनलेला नाही. शरीरांत प्राण असला की मनुष्याला इच्छा आणि आवेशही येतात. जर मनुष्यांत मनाचा विकास नसेल, तर तो जनावराच्या पातळीवरचाच राहतो. चांगले काय आणि वाईट काय, याचा विचार करण्याचे ज्ञान मनामुळें मिळते, आणि त्यालाच विवेक म्हणतात. परंतु मनुष्याच्या आंतील सर्वश्रेष्ठ गोष्ट म्हणजे त्याचा आत्मा! आत्मा हा मनुष्याच्या आंत असणाऱ्या परमेश्वराचा अंश आहे. त्यांत परमेश्वराचे सगळे श्रेष्ठ गुण आहेत. आत्मा असल्यामुळेच मनुष्याला भगवंताच्या प्रकाशाच्या दिशेने ओढ वाटते. हे सर्व श्रेष्ठ गुण मनुष्याला राम, कृष्ण, जीझस किंवा बुद्ध बनवतात.



वास्तविक हेच माणसाचं खरं स्वरूप आहे. शरीर, प्राण आणि मन हे आत्म्याचे सेवक आहेत, आत्म्याची यंत्रे आहेत. जोपर्यंत आत्म्याचा विकास होत नाही, तोपर्यंत प्राण आणि मन मनुष्यावर काबू ठेवतात. बाळपणांत आत्मा त्यांच्या सत्तेनुसार वागतो. सुंदर आणि पवित्र गोष्टी पाहून आत्मा विरघळतो. प्रेम आणि स्नेहाला छान प्रतिसाद देतो. पण माणूस वयाने मोठा झाला कीं आपल्या स्वार्थबुद्धीबरोबर मन, आणि इच्छा-आकांक्षांबरोबर असलेला प्राण यांच्या शक्तीवर आत्मा नियंत्रण करूं शकतो, त्यावर काबू ठेवतो. मी काम सांगतोय ते तुम्हाला समजतंय असं वाटतं!"

"मला समजतंय आजोबा, मी संदीप दादापेक्षां लहान आहे म्हणून माझा आत्मा अजूनही माझ्या ताब्यांत आहे. तुम्ही आत्ता ज्या आश्चर्यजनक

वस्तूबद्दल बोललात, तिचा स्पर्श मला कळतोय ना," चमेली खिदळत बोलली.

परंतु संदीपचं मन मात्र दूर, करनालीमधें भूतकाळांत डुंबत होतं. "आजोबा, गंगेच्या गोष्टीसारखी नर्मदा नदीची पण एखादी कहाणी आहे कां हो?" त्याने विचारलं.



"भारतांतल्या बहुतेक सर्व नद्यांच्या संबंधी आश्चर्यकारक कथा आहेत. नर्मदेची कहाणी तर नुसती मधुरच नव्हे तर अतिशय काव्यमय आहे." प्राध्यापक महाशय म्हणाले आणि एक गोष्ट सुरुं केली.

"एकदां अमरकंटक पर्वतावर भगवान शिवजी बराच वेळ ध्यानांत मग्न होते. त्यांच्या शांत, सुंदर व स्थितप्रज्ञ मूर्तीच्या सौंदर्यातून एक लावण्यवती कन्या प्रकट झाली. तिने आपल्या जीवनदात्या भगवान शिवाच्यासमोर नतमस्तक होऊन त्यांना वंदन केले. करुणावतार शिवाने म्हटले, "माझ्या बाळे, तूं माझे हृदय कोमल आणि नरम (नर्म) बनवले आहेस, म्हणून तूं नर्मदा आहेस."

भगवान पुढें म्हणाले, "तुला कोणते वरदान हवे आहे?"

"प्रभु, आपण मला असा वर द्या कीं मी सदैव स्वतंत्र राहीन" त्या सुंदरीने सांगितले.

"एवम् अस्तु!" शिवाने आशिर्वाद दिला.

नर्मदा रानावनांत, पर्वतराजींत गात, नाचत, स्वच्छंदपणें, कोणाची पर्वा न करता, हिंडत होती.

लौकरच तिच्या अनुपम सौंदर्यामुळें, कित्येक देवांची नजर तिच्यावर पडली. एका देवाने तर तिच्यासमोर प्रकट होऊन तिला पकडण्याचा प्रयत्न केला. त्याक्षणींच नर्मदाने जलरूप धारण केले व त्याच्या हातातून ती निसटली आणि प्रवाहरूप नदी होऊन वाहूं लागली.

"अशा प्रकारे, शिवाच्या सौंदर्यापासून नर्मदा वाहूं लागली. जशी विष्णूच्या रुपापासून गंगा वाहायला लागली." प्राध्यापक देवनाथ म्हणाले.

"भारतातल्या नद्या, पर्वत, वनें ह्यांच्या उत्पत्त होण्याच्यामागें मनोरंजक कथा आहेत, त्यांतल्या अनेक प्रतीकात्मक आहेत. पण कांही काळानंतर या प्रतीकांना लोक विसरुन गेले." आजोबा दुःखाने म्हणाले "तरीसुद्धां नुसती गोष्ट म्हणूनदेखील ही किती छान आहे नाही?" संजीवने आपले मत नोंदवले.



"आणि यांची नांवं तरी किती गोड आहेत - गंगा, नर्मदा ...." चमेलीने आपलेही मत सांगितले.

"भारतांतल्या शहरांची प्राचीन नांवेंही तितकीच मधुर आहेत हं! तुम्हाला पाटण्याचं जुनं नांव ठाऊक आहे कां?"

"पाटलीपुत्र!" संदीप व चमेलीने एकदम कोरसमधें उत्तर दिले.

"अगदी बरोबर! पण त्या शहराचं त्यापूर्वीचं नांव पुष्पपुर किंवा कुसूमपुर होतं - फुलांचं शहर! त्रिवेंद्रम तिरु-अनंत-पुरम होतं. आता जुनं नांव पुन्हां प्रचारात आलंय. त्याचा अर्थ अनंत भगवानाचं पवित्रनगर. द्वारकेचं नांव द्वारावती होतं. गुलमर्ग गौरीमार्ग होता - हिमालयाची दिव्य कन्या हिच्या नांवामुळें! लक्ष्मणाच्या नांवावरुन लक्ष्मणवटीचं बहुतेक लखनौ झालं असावं. गुवाहाटी, प्राग्ज्योतिषपुर होतं - पूर्वेची ज्योतिर्मयी आभा! गोवा गोमांतक होता. पॉंडिचेरी वैदिक स्वाध्यायाचं केंद्र वेदपुरी होते. मदुराई मधुरपुर - मधुर शहर होते. अजमेर अजय मेरु होतं. कुलुकुलान्त पीठ हे मानव निवाराची पावन सीमा म्हणून ओळखलं जात होतं. किन्नौर किन्नरपुरी होतं, कलामधें निपुण अशा भौतिक सत्तांचे एक महत्वपूर्ण स्थान! पैठण पूर्वी प्रतिष्ठान होतं, इत्यादि, इत्यादि।"

थोडा वेळ थांबून आजोबा पुढें म्हणाले, "राज्यांची नांवेदेखील किती अर्थपूर्ण आहेत. पूर्वीचे कुंतलाच आज कर्नाटक झाले आहे. पांच नद्यांचा प्रदेश, पंच आब तो पंजाब बनला. बौद्ध विहार असलेले बिहार झाले. कश्यप ऋषींचा झरा, कश्यप मीर वरुन पुढें त्याचे काश्मीर झाले."

"आणि जम्मू?"

"नवव्या शतकांतला एक राजा होता जंबूलोचन, त्यावरुन जम्मू झाले. आपल्या बऱ्याच शहरांच्यांवर महान ऋषीमुनींची व राजांची आठवण करुन देणारी छाप आहे. ग्वालिपा ऋषीवरुन ग्वाल्हेर झाले; प्रसिद्ध बुद्ध भिक्षु नागार्जुनच्या नांवावर नागार्जुन कुंड बनले. जाबाली ऋषींच्या नांवावर जबलपूर झाले. ही यादी खूप लांबलचक आहे म्हणा!" आजोबा उठले. शाळेची वेळ झाली. त्यासाठीं मुलांना अजून तयारी करायची होती.



# व्यापाराचे रहस्य

हेलापुरीमधे हनुमान वाण्याचे किराणा सामानाचे दुकान होते. चोख माल, वाजवी दाम, योग्य वजन व सचोटीबद्दल साऱ्या जिल्ह्यांत ते प्रसिद्ध होते. त्याचा व्यापार छान चालला होता.

नंतर सुगंधीपुराहून समरस नांवाचा वाणी त्या गांवात आला. त्याने हनुमान वाण्याच्या दुकानासमोरच एक नवे दुकान सुरु केले. कांही दिवसांतच त्याचे दुकान चांगले चालूं लागले. हनुमानाची जुनी गिऱ्हाईकेदेखील समरसच्या दुकानावर जायला लागली. हनुमानचा व्यापार मंदावला.

हनुमान काळजींत पडला. आपले गिऱ्हाईक समोरच्या दुकानांत कां जाते ते खूप विचार केला तरी त्याला कळेना. दोन्ही दुकानांतला माल स्वच्छ होता, रास्त किंमती होत्या, तरीही गिऱ्हाईक हनुमानाच्या दुकानांत येत नव्हते.

जेव्हां त्याला कारण समजेना तेव्हां त्याने समरसलाच विचारले. समरसने हंसून म्हटले, ''अरे हनुमान, मी व्यापाराची गुप्त खुबी आहे. तरीही मी तुला खरं ते सांगीन.

व्यापाऱ्याव्यापाऱ्यांत कसलं आलंय गुपित?

''त्याचं असं आहे कीं माल तोलतानाच तूं प्रथम तराजूच्या ताजव्यांत जास्त माल भरतोस. नंतर अंदाजाने त्यांतला थोडाथोडा कमी करत जातोस. गिऱ्हाईकाला मिळणाऱ्या मालाचं वजन बरोबर असतं. तरीदेखील त्याला उगीचच वाटतं कीं त्याला कमी माल मिळतोय किंवा तुला त्यांना वजनांत कमी माल द्यायचाय.''

''पण मी मात्र तसं करत नाही. जाणूनबुजूनच मी प्रथम अंदाजापेक्षां कमी माल ताजव्यांत ठेवतो, थोडाथोडा वाढवत वजनाचा कांटा बरोबर आला कीं तोलून सामान देतो. माझा माल वजनापेक्षां जास्त नसतो. तरीही ग्राहकाला वाटतं कीं मी त्याला थोडा जास्त माल दिलाय. आपल्या दोघांच्या व्यापाराच्या पद्धतींतला हा फरक आहे.''

हनुमानानेदेखील ही पद्धत स्वीकारली आणि दोन्ही दुकाने चांगली चालूं लागली. गिऱ्हाईकांना वाटायला लागले, कीं दोन्ही दुकाने एकाच कुटुंबातल्या दोन भावांची असावींत. हनुमान आणि समरसमधें प्रतिस्पर्ध्याची भावना अजिबात नसून सहकाराची भावना जास्त होती.







# देखरेखीची कला

रमापती नगरांतले सर्वांत श्रीमंत शेठजी होते. कित्येक पिढ्या कामधंदा न करता आरामांत बसून खाऊं पिऊं शकतील इतकी अमाप संपत्ती त्यांच्याजवळ होती. तरी देखील कांही दिवसांपासून त्यांचं मन अस्वस्थ होतं. एक अज्ञात चिंता त्यांच्या मनाला जाळीत होती. कांही मित्रांच्या सल्ल्यानुसार त्यांनी वैद्याकडून तपासणी करवली. पण कांहीही व्याधी आढळली नाही.

शेठ रमापती एक धार्मिक व निष्ठावंत गृहस्थ होते. साधुसंतांची सेवा व अतिथींचा सत्कार करण्याचा त्यांचा स्वभाव होता. घरी आलेल्या पाहुण्याला जेवायला घातल्यानंतरच ते स्वतः भोजन करीत.

एक दिवस त्यांच्या घरीं एक साधू आला. त्यांनी शेठजींच्या आतिथ्यशीलतेवर खूष होऊन सांगितले, ''तुम्ही उत्तम श्रेणींतले सद्गृहस्थ आहात. तुमचे प्रत्येक काम तुम्ही मनःपूर्वक आणि श्रद्धेने करता आहात. परमेश्वर तुम्हाला सुखी ठेवो.''

''मी तसं म्हणूं शकत नाही, पण माझ्या सेवेत कांही उणीव राहूं नये म्हणून प्रयत्न मात्र करतो. तरीसुद्धां महाराज, कांही दिवसांपासून माझं मन अस्वस्थ आहे. खूप विचार केला तरीदेखील मला याचं कारण सांपडत नाही आहे.'' रमापतींनी सांगितलं.

हे ऐकून साधूला आश्चर्य वाटले. याचं कारण शोधण्यासाठीं त्यांनी रमापतींना कांही प्रश्न विचारले. त्या प्रश्नांच्या उत्तरांवरुन त्याला कळलं कीं त्यांच्या कुटुंबात चांगले व समंजस वातावरण आहे.

मग रमापतीच्या काळजीचे कारण काय असूं शकेल? साधू विचार करूं लागला. थोड्या वेळानंतर त्याने विचारलं, ''या नगराखेरीज इतर कुठें तुमची संपत्ती आहे कां?'' ''होय महाराज. पांच गांवात शेती आहे. त्या गांवातले शेतकरी ती शेती करतात आणि त्याचे उत्पन्न इमानेइतबारे वेळेवर देतात.''

''नीट आठवून पाहा. या शेतांवरुन कधी भांडणतंटा झालेला आहे कां?'' साधूने पुन्हां विचारलं.

रमापतीने आठवून सांगितलं. ''विदुरपुरांत माझ्या आईच्या वडिलांनी एक राममंदिर बांधलं होतं. त्या मंदिराच्या खर्चासाठीं सुमारें शंभर एकर जमीनही

सम्पत कुमार



देऊन ठेवलेली होती. त्या मंदिरात दरवर्षी मोठा उत्सव होत असे. पण गेली कांही वर्षे हा उत्सव बंद पडला आहे. हे कळल्यानंतर मला दुःख जरुर झालं होतं. पण माझ्या अस्वस्थ मनाचं हे कारण नाही. कारण हे सर्व मी श्रीरामाच्या इच्छेवर सोडून दिलेलं आहे."

साधूने हंसून म्हटलं, "ही तुमची गैरसमजूत झाली आहे. देवाला कोणत्याही गोष्टीची आवश्यकता नसते हे सर्वांना ठाऊक आहे. तुमच्या आजोबांना काय माहीत नव्हतं कीं श्रीरामाला हवं असेल तेव्हां त्याचं निवासस्थान ते स्वतः शोधतील म्हणून? तरीदेखील आजोबांनी देऊळ बांधलंच ना? शंभर एकर जमीन कशासाठी दिली? मंदिरातल्या देवाला असमर्थ समजून दिली होती थोडीच? वास्तविक देवासाठी आपण जे कांही करतो त्यामुळें आपण आपलेच कल्याण करतो, आपल्या आत्म्याला जागृत करतो आणि आपल्या मनाची शांती मिळवतो. तुम्ही मंदिराच्या व्यवस्थेचा भार त्यांच्यावर टोलवलात, हीच तुमच्या मनाच्या अस्वस्थतेची कारणमीमांसा आहे."

हे ऐकून रमापती मनांतून घाबरुन गेले. आपल्या वर्तनाचे समर्थन करीत ते म्हणाले, "महाराज, तिथली परिस्थिती पाहायला गतवर्षी मी स्वतः पत्नीबरोबर गेलो होतो. सारंकांही ठीकठाक बघून परत आलो. गोंधळ कुठे होतो आहे ते मला माहिती नव्हतं. म्हणून सारा भार मी देवावर सोडून दिला."

"तुमच्या पूर्वजांच्यामधे जशी रामभक्ती होती, तशी आता तुमच्यांत राहिली नाही. हेच कारण आहे की ! खोलांत शिरुन सत्य काय आहे ते पाहाण्याऐवजी तुम्ही परत झालात. जोपर्यंत त्या राममंदिरात पूर्वीप्रमाणेच भक्तीभावाने पुरेपूर भरलेला भव्य उत्सव सुरुं होत नाही, तोपर्यंत तुमचं मन अशांत राहील." साधूने सांगितलं.

"पण महात्मन ! यामुळें माझ्या मनाची अशांती कशी जाईल? ही गोष्ट मला कळली नाही. कृपा करुन मला समजावून द्या." रमापतीने नम्रपणें साधूला विनवले.

आपली लांब दाढी कुरवाळत साधूने हंसून सांगितले, "पहा आता ! मंदिराची निर्मिती एखाद्या महायज्ञासारखीच असते. ते देवाचं शिबिर आहे. तिथें भगवानाची उपस्थिती असते. त्याच्यामुळें पापी जनांचं पाप कमी होतं, आणि पुण्यवान लोकांचं पुण्य वाढत जातं. याखेरीज, मंदिरात काम करणाऱ्यांमुळें त्यांचा चरितार्थ चालतो. त्यांच्यात परमेश्वराच्या ठायीं भक्ती आणि निष्ठा जागती राहाते. या मंदिराची देखभाल नीट होते आहे, त्यांत विरोधी शक्ती घुसखोरी करत नाहीत हे पाहाणं तुमचं परम कर्तव्य आहे. ह्या परम कर्तव्याच्या दिशेने तुमचा आत्मा तुम्हाला संकेत करीत आहे. पण तुम्ही ते समजून घेत नाही आहात आणि तुमची मनःशांती ढळली आहे असं तुम्हाला वाटतंय.



रमापतींना साधूच्या सांगण्यांत तथ्य आणि सच्चेपणा आढळला. त्यांनी विचारलं, "आता मी काय उपाय करुं ते आपणच सांगावं."

"पुन्हां एकवार तिथें जा आणि वस्तुस्थिती समजून घेण्याचा प्रयत्न करा. तिथली देखभाल एखाद्या लायक व्यक्तीच्या हातांत सोंपवा. मंदिराच्या व्यवस्थापनांत निश्चितच कांही गडबड आहे. देखरेख ठीक झाली तर परिस्थिती आपोआप सुधारेल," साधूने आपला विचार सांगितला.

मंदिराची व्यवस्था चांगल्या व इमानी व्यक्तींच्या हातांत आहे, असा रमापतींचा गाढ विश्वास होता. तरीसुद्धां कुठे तरी, कांहीतरी घोटाळा जरुर आहे ते जाणून घेण्यासाठीं त्यांनी साधूला मंदिराच्या व्यवस्थेबद्दल सविस्तर माहिती सांगितली.

"साधुमहाराज! राजमंदिरात चार पुजारी आहेत. तिघेजण श्रीराम, सीतामाई व हनुमानजीच्या पूजाअर्चेत गुंतलेले असतात. चौथा पुजारी गोपुरांत वेदमंत्रांचे पठण व पारायण करीत असतो. श्रीरामसंकीर्तनासाठीं चार संगीतज्ञ नेमलेले आहेत. पुराणांतल्या कथा सांगण्यासाठी एक प्रवचनकार आहेतच. मंदिराच्या शेतांची जबाबदारी दहा शेतकऱ्यांच्यावर आहे. जमाखर्च व हिशेब लिहीण्याचे काम दोन व्यक्ती पाहातात. दोन वर्षांपूर्वी रामशेखर नांवाचा एक वृद्ध सर्वांच्यावर लक्ष ठेवीत असे. त्याच्या घरी कुणीच नव्हतं, म्हणून रात्रंदिवस तो मंदिरात राहात असे व मंदिर हे त्याचं सर्वस्व होतं. तो दिवंगत झाल्यानंतर उद्दालक नांवाच्या इसमावर ही जबाबदारी सोंपवली. त्यावेळेपासूनच देखभालींत ढिलाई आली आहे."



हे ऐकून साधू म्हणाला, "बघा आता, माझं म्हणणं खरं ठरलेना? आता अगदी स्पष्ट आहे कीं उद्दालकाच्या देखरेखीतच गडबड आहे. तेव्हां त्याच्याजागी दुसरा कुणीतरी नेमून टाका."

"पण साधुमहाराज, उद्दालक सर्वांशी मिळून मिसळून वागतो. तो चांगला स्वयंपाक करुं शकतो. स्वतः झाडलोट करण्यांत त्याला संकोच वाटत नाही; मंदिर अतिशय स्वच्छ ठेवतो. साहित्य व शास्त्रांत त्याला बरीच माहिती आहे. तो चांगला गायक आहे. पैन् पैचा हिशेब ठेवतो, आणि सर्वात महत्वाची गोष्ट म्हणजे तो विश्वासू आहे. असा माणूस शोधूनदेखील सांपडणार नाही. विदुरपुरांतल्या सर्वजणांचं त्याच्या बाबतींत हेच मत आहे."

"याचा अर्थ असा होतो कीं तो रामशेखरपेक्षां जास्त लायक आहे."

"नाही महाराज. रामशेखरला रामाच्या

भक्तीखेरीज इतर कांहीही ठाऊक नव्हतं.

"हे सगळं विचित्र वाटतंय. तरीदेखील कांहीतरी गडबड जरुर आहे. ते पाहाण्यासाठीं मीपण तुमच्याबरोबर विदुरपुरला येईन, आणि यथाशक्ती तुम्हाला मदत करीन." साधुने सांगितलं.

विदुरपुरांत कांही दिवस दोघंही राहिली आणि त्यानंतर त्यांना कळलं की उद्दालक खरोखरच हुशार व कर्तबगार आहे. पण आपल्या पत्नीच्या कामांत जो जास्त गुंतलेला असे. कारण त्याची पत्नी हे त्याचं सर्वस्व होतं.

त्याची पत्नी सुशीला उत्तम श्रेणीची देवभक्त होती. इतरांना मदत करण्यांत ती सदैव तत्पर असे. मंदिरांतल्या कार्यक्रमांचे संयोजन ती पुढाकार घेऊन करीत होती. पण ती महत्वाकांक्षी होती. भक्तगणांनी आपली स्तुती करावी म्हणून ती आसुसलेली असे. रोजचे कीर्तन, कथापुराण, अन्नदान, वस्त्रदान वगैरे कार्यक्रमांत ती गुंतलेली असे. पण सगळ्या कार्यक्रमांना व्यवस्थित रूप ती देऊं शकत नव्हती. म्हणून सगळी हमाली व वेठबिगारीचं काम ती उद्दालकाकडून करवून घेत असे.

इतकंच नव्हे तर मंदिराच्या इतर कर्मचाऱ्यांनाही ती आपल्या कार्यक्रमांत गुंतवत असे. त्यामुळें मंदिराच्या व्यवस्थापनांत ढिलाई झाली होती.

हे सर्व ओळखल्यानंतर साधूने हंसत, आपली लांब दाढी कुरवाळत रमापतींना म्हटले, "मला या गोंधळाचं रहस्य समजलं आहे. तुम्ही असं करा उद्दालकला त्या पदावरुन हटवा आणि त्याच्या जागी त्याच्या धर्मपत्नीची नेमणूक करा. सर्व गोंधळ नीट होऊन जाईल."

"पण महाराज, तिच्यांत तर देखभाल करण्याची फारशी कुवत नाही आहे."

"देखभाल करण्याची सर्वांत मोठी कुवत आहे, योग्य व्यक्तींकडून योग्य काम करुन घेण्याची कला आणि लोकेषणा ! हे दोन्ही गुण तिच्यांत आहेत. मंदिराच्या व्यवस्थापनाची जबाबदारी मिळाल्यावर तिला अभिमान वाटेल आणि जरी ती फारशी लायक नसली तरी ती देवालयाच्या व्यवस्थेचं सगळं काम उद्दालककडून करुन घेईल. त्या पदावरुन गेल्यानंतर तो सगळा उटारेटा त्याच्याऐवजीं तिला करावा लागला असता. पण त्याचं सर्वस्व त्याची पत्नी आहे असं तुम्ही मला म्हणालात, तेव्हां देवालयाचं सारं काम तिच्यासाठीं तो मनापासून करील."

साधूने सांगितलं त्याप्रमाणें रमापतींनी व्यवस्था केली. कांही दिवसानंतर राममंदिरात पूर्वीसारखाच भव्य उत्सव झाला व त्याचं सारं श्रेय सुशीलाला मिळालं. रमापतींचं मन आता खरोखर शांत झालं होतं. त्याचबरोबर व्यवस्थापनकलेतलं अंतरस्थ सत्यही त्यांना उमगलं.





## कावेरीच्या किनारी - ८

# प्राचीन धरण

गोष्ट : जयंती महालिंगम

चित्रण : गौतम सेन



सेंट जॉन्स चर्च

तिरुचिरापली शहर केवळ मंदिरांसाठी प्रसिद्ध नसून, १८व्या व १९व्या शतकांत इंग्लिशांनी बांधलेली सुंदर चर्चेस, नगरपालिका, वगैरे सरकारी इमारतींसाठी देखील प्रसिद्ध आहे. खाईस्ट चर्च १७६६ मध्यें टेम्पेकुलम तलावाच्या उत्तरेस बांधलं होतं. त्यानंतर १८१६ मध्यें सेंट जॉन्स चर्च कॅंप विभागांत किल्ल्यांच्या दक्षिणेस बांधलं गेलं. 'अवर लेडी ऑफ लॉर्डस्' हे कॅथलिक चर्च १८४० मध्यें तलावाच्या किनाऱ्यावर बांधून पूर्ण झालं. रॉबर्ट क्लाईव्ह ज्या इमारतींत राहात होते, ती इमारत आज सेंट जोसेफ कॉलेजचा एक भाग आहे.

श्रीरंगम बेटावर तिरुवनैक्कम्‌मध्यें जंबुकेश्वर हे महादेवाचे मंदिर आहे. या मंदिराची भव्यता अद्वितीय आहे. आकाशाला भिडणाऱ्या गोपुरांवर, आणि अनेक खांबी दालनांमध्यें अतिशय मनोहर कोरीवकाम केलेले आहे. हे प्राचीन मंदिर इसवी सनापूर्वी पहिल्या शतकाच्या आसपास संगम काळांत बांधलेलं आहे असं म्हणतात.

कोचेंगन्नन नांवाच्या चोल राजाने हे बांधलं होतं.

अपूलिंगम (अपू याचा अर्थ पाणी) मंदिराचा पाया इतक्या खाली बांधलेला आहे कीं त्याच्या चारी बाजूला नेहमी पाणी भरलेलं असतं. कोणे एके काळीं, मंदिराच्या जागीं जांभळाच्या झाडांची राई होती, आणि एका झाडाखाली शिवलिंग होते. एक हत्ती आणि एक कोळी शिवाचे अनन्य भक्त होते. धूळ व पाचोळा शिवलिंगावर



जंबुकेश्वर मंदिर



**शिवलिंगावर रोज अभिषेक करणारा हत्ती**

पडूं नये म्हणून कोळी रोज त्यावर जाळें विणत असे. आणि कावेरीचे पाणी सोंडेत आणून हत्ती शिवलिंगावर रोज अभिषेक करीत असे. त्यामुळें कोळ्याचे जाळें रोज तुटून जाई. अशा प्रकारे दोन्ही भक्तांच्या अर्चनेच्या पद्धतीमुळें वाद उत्पन्न झाला. एक दिवस कोळ्याला फारच राग आला. हत्तीच्या सोंडेत घुसून तो हत्तीला जोरांत चावला. इतका भलामोठा हत्ती पण त्या चाव्याने मेला. या दंतकथेनुसार त्या कोळ्याने उरैयूरच्या चोल राजवंशात कोचेंगन्ननच्या रुपांत पुन्हां जन्म घेतला.

या भव्य मंदिरांत चार प्राकार आणि प्रदक्षिणामार्ग आहेत. त्यांच्या भिंती रुंद आहेत आणि त्यांत उंचउंच खांब आहेत. दुसरा व तिसरा प्रदक्षिणामार्ग तेराव्या शतकांत बांधले गेले. चौथ्या प्रदक्षिणामार्गात अखिलांडेश्वरीदेवीचे मंदिर आहे. त्यांतली देवीची मूर्ती भव्य व उत्कृष्ट आहे. देवीचे डोळे राजीव असल्यासारखे तेजस्वी आहेत. परंतु, एके काळी, याच देवीचे रुप मोठे रुद्र होते. ते इतके उग्र होते कीं गाभाऱ्यांत कुणीही फार वेळ थांबू शकत नसे. असं म्हणतात कीं आद्य शंकराचार्यांनी देवीचं दर्शन घेतलं व देवीला चक्राकार नक्षी असलेली कर्णफुलं चढवली. त्यानंतर देवीचं रुप सौम्य झालं. महर्षी मुत्तुस्वामी दीक्षितार हे कर्नाटकी संगीतातल्या तीन रत्नांपैकीं एक रत्न होते. देवीच्या रुपामुळें ते इतके भारुन गेले, कीं त्यांनी देवीची प्रार्थना करणारी अनेक मधुर सुश्राव्य गीते लिहीली.

तिरुवनैक्क हे तामीळनाडच्या शिवमंदिरांपैकी शैवांचे सर्वांत पवित्र स्थान मानले जाते. चोल राजांच्याव्यतिरिक्त होयसळ, पांड्य, व नायक राजवंशानीदेखील या मंदिराला उदारपणें भरघोस मदत केलेली होती. गेल्या अनेक शतकांमधे या मंदिरात बऱ्याच वेळां बांधकाम होत गेले. वेळोवेळी त्यांत बदलही करण्यांत आले. कर्नाटकच्या लढाईत इंग्लिश सैन्यापासून वांचण्यासाठीं म्हणून फ्रेंच सैनिकांनी याच जंबुकेश्वर मंदिरात आश्रय घेतला होता आणि आपली शस्त्रें खाली टाकली होती.

श्रीरंगम बेटापासून सुमारे दोन किलोमीटर अंतरावर कोलेरुन किंवा कोलीडम नांवाची कावेरीची एक धारा निघते. या ठिकाणीं एक मोठा ॲनीकट किंवा कलानै बांधलेला आहे. कलानै म्हणजे तामीळमधें दगडी पूल. इंग्लिश शब्द 'ॲनीकट' हा तामीळ भाषेंतल्या अनैकट्टूवरुन बनला आहे. त्याचा अर्थ बंधारा बांधणें असा होतो. असं सांगतात कीं दुसऱ्या शतकातला करिकलान हा चोल राजाने हा ॲनिकट किंवा बांध बांधून घेतला. या बंधाऱ्यामुळें कावेरीचा प्रवाह नियंत्रित केला गेला.तिचे पाणी शेतीसाठी उपयोगांत आणण्याचा, व नदीचा पूर रोखण्यासाठीं केलेला, हा सर्वप्रथम प्रयत्न होता.

हा बांध ३२९ मीटर लांब, १२ ते १८ मीटर रुंद व ४९ मीटर खोल होता. हे मूळ धरण आता अस्तित्वांत नाही, कारण इंग्लिश ॲंजिनियरांनी, सर आर्थर कॉटन यांच्या देखरेखीखालीं, कावेरी डेल्टा योजनेनुसार सन् १८०० च्या आसपास, नवे धरण, जरा वरच्या ठिकाणीं बांधले. १८०६ मधें त्यांनी त्याची उंची वाढवली, आणि १८६० मधें त्यावर जलनियंत्रक झडपा (स्लूस गेटस्) बसवल्या. मातीने व साध्या दगडांनी बनवलेला जुना बंधारा पाण्याचा प्रचंड लोंढा कसा काय अडवू शकत होता, हा प्रश्न नवीन धरण बांधणाऱ्या इंग्लिश ॲंजिनियरांना बुचकळ्यांत पाडणारा होता.अप्पर ॲनीकट किंवा अप्पर कोलेरुन बंधारा मोठ्या ॲनीकटहून सुमारे ३८ किलोमीटर अंतरावर कॉटनतर्फे १८३६-३८ यामधें बांधला गेला आहे. हा बंधारा ७८० मीटर लांब व २ मीटर उंच होता. त्यावर २२ जलनियंत्रक फाटकें लावलेली होती. १८९०-१९०४ च्या दरम्यान अप्पर ॲनिकटचे संपूर्ण बांधकाम पुन्हां करावे लागले होते.



**मोठा ॲनिकट**

मोठ्या ॲनीकटच्यानंतर डेल्टा किंवा दुआबाच्या मुखापासून ६ किलोमीटर अंतरावर कावेरी-वेण्णार नियंत्रकें १८५१ मधे बनवली गेली. त्यामुळें कावेरीला मिळणाऱ्या प्रमुख नद्यांतून पाण्याचा पुरवठा नियमित होत राहातो. कावेरीला मिळणाऱ्या नद्या आहेत वेन्नार, वडावर, कण्णनार, बामनी, कुद्रेमुट्टी आणि अरसलार. या नद्यांच्यामुळें तंजावर जिल्ह्यांत कावेरीचा दुआब अत्यंत सुपीक बनला आहे.

मोठ्या ॲनीकटच्या उत्तरेला गंगैकोंडाचोलपुरम आहे. ही राजराजा चोलचा मुलगा राजेंद्रन याची प्राचीन राजधानी होती. भव्य बृहदीश्वर मंदिर त्याने बांधलं आणि गाभाऱ्यांत ३.९ मीटर



उंचीच्या शिवलिंगाची स्थापना केली. दक्षिण भारतांतील हे सर्वांत मोठे शिवलिंग आहे. राजाची इच्छा होती कीं उत्तर भारतात त्याने विजय मिळवला त्याची आठवण म्हणून एक स्मारक बनवलं जावं. त्याची सेना उत्तर भारतांत बंगालच्या सीमेपर्यंत पोंचली होती. तिथून परत येतांना त्यांनी आपल्याबरोबर पवित्र गंगाजल आणलं होतं. म्हणून राजेंद्रनचं नांव गंगैकोंडचोलन् असं पडलं. जो राजा गंगेला दक्षिणेंत घेऊन आला तो गंगैकोंडाचोलन !

या मंदिराची वास्तुकला राजराजाच्या तंजावरच्या मंदिरापेक्षां कमी सुंदर नाही. एका विस्तीर्ण परिसरांत हे मंदिर बांधलेले आहे. परंतु त्याचा कळस मात्र फारसा उंच नाही. हे मंदिर वास्तुशिल्पाचा एक उत्कृष्ट नमुना आहे. महामंडपाच्या समोर तोंड करुन बसलेला नंदी तंजाऊरच्या नंदीसारखाच आहे. मात्र पुढें हे नगर ओसाड कां पडलं याचं कारण सापडत नाही.

गंगैकोंडा चोलपुरम मंदिर

नंतरच्या शतकांत या मंदिराकडे कुणी फारसं लक्ष दिलं नाही. कोलेरुनला धरण बांधतांना इंग्लिश अँजिनियरांनी या मंदिराच्या भिंतींचे दगड वापरले होते. तंजाऊरचा हा सारा भाग एके काळीं चोलामंडल या नांवाने ओळखला जात असे. त्यावरुन या प्रदेशांत चोल राजांचा प्रभाव किती जबरदस्त आहे ते समजतं. नवव्या शतकांत विजयालय चोल राजाने तंजाऊरला आपल्या राज्यांत सामील करुन घेतलें आणि तंजाऊर हीच राजधानी केली. संगमकाळांत कावेरी दुआबावर चोल राजवंशाचं राज्य होतं. नंतर विजयालय व त्याचा पुत्र आदित्य यांच्या कारकीर्दीत चोलराजे पुन्हां वैभवसंपन्न बनले होते. दक्षिण भारतांत त्यांनी एक बलाढ्य साम्राज्याची स्थापना केली. हे साम्राज्य तेराव्या शतकामधेही टिकलेलं होतं.





# तरंगिणीची हुशारी

शाम जेव्हां वीस वर्षांचा झाला तेव्हां एक दिवस त्याच्या आजीने त्याला जंवळ बसवून घेतले आणि म्हटले, "हे बघ बाळ, जेव्हां तूं वर्षाचा देखील नव्हतास, तेव्हां तुझे आईवडील वारले. तुझं पालनपोषण मीच केलं. तुला कांही आठवत नसेल, कारण त्यावेळीं तूं अगदी लहान होतास. आपल्या डोळ्यांदेखत तरुण मुलगा आणि सून मरताना पाहून मी अगदी कोलमडून गेले होते. पण तुझ्याकडे पाहूनच जगले. तुझ्यासाठीं काय काय मी करुं शकले? म्हातारपणीं मोलमजुरी केली, दुसऱ्यांकडे स्वयंपाक केला, भांडी घासली, कितीकांकडून अपमान सोसले बरं ! फक्त एकाच आशेवर मी होते. एक दिवस मोठा होऊन तूं आपल्या पायावर उभा राहाशील आणि माझी जबाबदारी संपेल! आता तूं मोठा झाला आहेस. तुझं तूं पाहूं शकशील. आता माझा कांही भरंवसा नाही. मी ह्या दिवसाकडे डोळे लावून वाट पहात होते कीं तूं केव्हां मोठा होतो आहेस ते. आता मी शांतपणे मरायला मोकळी आहे.

"तूं जरी वयाने मोठा झाला असलास. तरी बऱ्याच बाबतीत अजून लहान मुलासारखाच

स्वभावाचा आहेस. हल्लींच्या जगांत तुझा निभाव लागणें कठीण. गांवातल्या लोकांना तुझा हा नेभळट स्वभाव ठाउक आहे. इथले लोक लोभी आणि लबाड आहेत. ते तुला इथें सुखाने राहूं देणार नाहीत.

"मी तुझ्यासाठी कसेबसे दहा हजार रुपये सांठवून ठेवलेले आहेत. हे घेऊन तूं शहरांत जा. तिथे चारपांच म्हशी विकत घे आणि दुधाचा व्यापार कर. ती मुकीं अश्राप जनावरें तुझं अहित करणार नाहीत. इथें जर राहिलास ना, तर गांववाले कांही दिवसांतच हे पैसे लुबाडतील." असं म्हणून तिने शामच्या हातांत एक थैली दिली.

योगायोगाची गोष्ट अशी की ज्या दिवशी आजीने शामशी ही बातचीत केली, त्याच रात्रीं आजी जी झोंपली ती झोंपलीच. ती पुन्हां उठली नाही. आजीनं जसं सांगितलं होतं, तसंच करायचं असा शामने निर्णय घेतला.

आजीचे श्राद्धकर्म केल्यानंतर तो भाड्याची जागा पाहायला शहरांत जायची तयारी करुं लागला. पैशाची थैली घरीं ठेवली तर चोरी होण्याची शक्यता जास्त होती. म्हणून त्याने गांवच्या सावकाराजवळ



सावकाराकडे पैसे ठेवत असे.

म्हणून शहरांत जाण्यापूर्वी एक दिवस तो थैली घेऊन सावकाराच्या घरी गेला.

त्यावेळीं सावकार व त्याची पत्नी यांचं भांडण चाललं होतं. कांही दिवसांनंतर त्याच्या पत्नीची आई त्यांच्या घरी येणार होती. सावकाराच्या पत्नीला वाटत होतं कीं आईसाठी एक छानशी साडी घ्यावी. पण सावकार पडला महाकंजूष. सासूबाईसाठी साडी खरेदी करण्याची त्याची कांही इच्छा नव्हती. म्हणून त्याची पत्नी खूप चिडली होती. शामला येताना पाहून, त्याच्याशी कांही न बोलता, ती रागाने स्वयंपाकघरांत निघून गेली.

रुपयांची थैली सावकाराच्या हातांत देऊन शामने सांगितलं, ''यांत दहा हजार रुपये आहेत. दोन दिवसानंतर शहरांतून परत येईन तेव्हां घेऊन जाईन. तोपर्यंत माझे पैसे आपल्याजवळ सुरक्षित म्हणून ठेवून घ्या.''

सावकाराने थैली घेत म्हटलं, ''हो तर, कां घेणार नाही रे? अनाथांना मदत करणें हा माझा धर्म आहे.''

तोंच स्वयंपाकघरांत रागाने तणतणत असलेल्या सावकारीणबाईने जोराने पाण्याचा माट जमिनीवर आपटला. मोठा आवाज झाला तो ऐकून शामने घाबरुन विचारलं, ''सावकार साहेब, हा कसला हो आवाज होता?''

''अरे, धरणीकंप होणार आहे. जा, लवकर नीघ इथून.''

सावकाराला शामच्यादेखत बायकोने येऊन भांडण करायला नको होते.

शहरांत जाऊन शाम दिवसभर जागा शोधत होता. पण त्याला कुठेही जागा मिळाली नाही. शहरांतून निघाल्यावर तो खूपच थकला होता. त्याला फार तहान लागली होती. जवळ एक घर दिसले. थोडेसे पाणी मागण्यासाठी त्याने त्या घराचा दरवाजा ठोठावला.

''कोण आहे? काय पाहिजे?'' अठरा वर्षांच्या एका तरुण मुलीने दार उघडून विचारले.

''थोडं पाणी मिळेल कां प्यायला? फार तहान लागली आहे.'' शामने सांगितले.

''अहो बाबा, जरा इकडे या, कुणीतरी आले आहेत.'' वडिलांना मोठ्याने हांक मारुन ती आंत पाणी आणायला गेली.

मुलीचा पिता बालमुकुंद तिथें आला. त्याने शामला विचारलं, ''रागावूं नकोस हं! तुला पाहून ती घाबरली असेल म्हणून मला ओरडून तिने हांक मारली. अरे, इतक्या ह्या मोठ्या घरांत मी आणि माझी मुलगी तरंगिणी, आम्ही दोघंच राहातो. म्हणून कुणी नवा अनोळखी माणूस पाहिला की ती जरा घाबरते. एक तर हे घर फार मोठं आहे, आणि दुसरं, इथं आसपास



एकही घर नाही. शहराच्या बाहेर असल्यामुळें कुणी भाडेकरुही राहायला येत नाहीत.''

तोपर्यंत तरंगिणी पाणी घेऊन आली. शामने पाणी प्यायलं व नंतर बालमुकुंदाला, आपलं शहरांत येण्याचं कारण सांगितलं. तो पुढें म्हणाला, ''जर इथें मी आपल्या म्हशी बांधल्या तर तुमची कांही हरकत नसली तर मीच तुमचं घर भाड्याने घेईन.''

आंधळ्याला दृष्टी मिळाली तर आणखी काय हवं? बालमुकुंदालाही कुणीतरी भाडेकरु हवा होता. तोही सरळ, परिचित, सलोख्याने राहील असा चांगल्या स्वभावाचा हवा होता. बालमुकुंद आनंदाने म्हणाला, ''तुला जेव्हां केव्हां राहायला यायचंय तेव्हां ये. भाडंही तुला वाटेल ते दे.''

''नाही हं बाबा! भाडं आत्ताच ठरवून टाकलंत तर बरं पडेल.'' मधेंच तरंगिणी बोलली, ती शामकडे वळून म्हणाली, ''दरमहा दोनशे रुपये भाडें पडेल. कबूल आहे का?''

शहरांत दिवसभर हिंडून घर मिळालं नाही म्हणून शाम आधीच वैतागलेला होता. शहरांत नसेना, शहरालगत तर आहे कीं. पाणी प्यायच्या निमित्ताने इतक्या सहजासहजी घर मिळेल अशी त्याला बिलकूल आशा नव्हती. म्हणून त्याने दोनशे रुपये भाडें मान्य केले व ''मला कबूल आहे'' असं म्हणून दोन दिवसांत गांवाहून परत येईन असं सांगून तो गांवी गेला.

गावांत पोंचल्यावर तो प्रथम सावकाराकडे गेला आणि त्याने आपली पैशाची थैली परत मागितली.

त्यावेळेस सावकार कांही लोकांशी गप्पा मारत होता.

''कसले रुपये? आणि कसली थैली? केव्हां दिली होतीस?'' सावकाराने आश्चर्य दाखवीत रागाने विचारले.



''अहो, जेव्हां धरणीकंप होणार होता त्यावेळेस. आठवतंय ना?'' गोंधळून जाऊन शामने हताशपणे विचारले.

मोठ्याने हंसत सावकार म्हणाला, ''अरे, मी जन्मल्यापासून अजून इथें कधीही धरणीकंप झालेला नाही. काय मंडळी, तुम्हाला आठवतंय कां कधी धरणीकंप झाल्याचं?'' तिथें बसलेल्या लोकांना त्याने विचारले.

शामला दटावत तो म्हणाला, ''तुझी आजी मेली म्हणून तुझं डोकंबिकं तर फिरलं नाही ना? जा, जा. मोठा आलाय दहा हजारांची थैली न्यायला!''

सावकाराची अशी कोलांटी पाहून शाम अवाक झाला, आपण लुबाडले गेलो आहोत हे त्याला पुरतं कळून चुकलं. त्याचं सर्वस्व लुटलं गेलं होतं. निराश, हतप्रभ झाल्यामुळें काय करावे ते त्याला समजेना.

शहरात परत जाऊन त्याने आपली सारी दुर्दैवी



कहाणी डोळे पुसत पुसत बालमुकुंद व त्याची मुलगी तरंगिणी यांना सांगितली. बालमुकुंदाने त्याला सहानुभूती दाखवून म्हटले, "भाग्य जास्त प्रबळ असतं. तुझ्या नशिबांत हेच लिहीलं होतं बहुतेक. आता आपण काय करुं शकणार आहोत म्हणा!"

पण तरंगिणीने सांगितले, "असं कां म्हणता बाबा? सावकार इतक्या सहजपणें कुणाचेही दहा हजार रुपये हडप करील कीं काय? त्या लबाडाकडून पैसे परत मिळवण्याचा प्रयत्न केला पाहिले."

"पण आता आपण काय करणार? शामने सावकाराजवळ ठेवायला दहा हजार रुपयांची थैली दिली होती याला कांहीही पुरावा हातांत नाही." बालमुकुंदने निराशेने म्हटले.

"अजूनही रुपये परत मिळण्याची शक्यता आहे. मी जसं सांगते तसं तुम्ही दोघांनी केलंत तर पैसे परत मिळण्याची बरीच आशा आहे." असं म्हणून तरंगिणीने त्यांना आपली योजना समजावून सांगितली.

दोघेही एक संदूक घेऊन मोठ्या सावधानतेने निघाले. बालमुकुंद पेटी घेऊन सावकाराच्या घरीं गेला व आंत जाऊन सरळ खुर्चीवर बसला. शाम घराच्या बाहेरच गल्लींत थांबला होता. सावकाराने बालमुकुंदला विचारले, "कोण आहेस तूं आणि कशासाठी आला आहेस?"

बालमुकुंद म्हणाला, "महाशय, आपल्या ईमानदारीचा दरारा ऐकून मी इथें आलो आहे. माझं नांव बालमुकुंद. तुमच्या गावांतला तरुण मुलगा शाम ह्याचा मी भावी सासरा आहे."

शामचं नांव ऐकून सावकाराने जरा दबकतच विचारलं, "हो हो, पण कोणत्या कामासाठी आला आहात ते तरी सांगा."

बालमुकुंदने सांगितलं, "शामच्या आजीची इच्छा होती कीं त्याचं लग्न या गावांतल्या राममंदिरात व्हावं. लग्नाच्या खर्चासाठीं मी साठ हजार रुपये आणले आहेत. ही आहे माझी पेटी. त्यांत साठ हजार रुपये आहेत. लग्नाच्या खर्चाला लागेल तशी थोडीथोडी रकम जरुरीप्रमाणें आम्ही घेत जाऊं. आपण या गांवातले प्रामाणिक आणि एक मोठे सावकार आहात. आपल्यापाशी माझी रकम सुरक्षित राहील. आपल्याला त्रास देतो आहे त्याबद्दल रागावूं नये."

"छे छे, यांत कसला आलाय त्रास? माझ्यावर विश्वास ठेवून आपली सेवा करण्याची संधी मला देता आहात, हा आपला मोठेपणा आहे." सावकार म्हणाला.

इतक्यांत शाम झटकन आंत आला आणि म्हणाला, "काल जेव्हां मी दोन दिवसांपूर्वी आपल्याला दिलेली दहा हजार रुपयांची थैली मागायला आलो होतो तेव्हां तुम्ही मला विचारलं होतंत कीं मी आपल्याला थैली केव्हां दिली होती म्हणून. आठवतंय कां आता? त्या दिवशीं तुमची बायको खूप संतापलेली होती. स्वयंपाकघरांतून जोरांत आवाज आला होता. आणि मी जेव्हां विचारलं कीं हा कसला आवाज आहे? तेव्हां तुम्ही म्हणाला होतात कीं धरणीकंप होणार आहे. आता तरी आठवतंय कां?"

सावकाराने शामच्या खांद्यावर प्रेमाने हात ठेवून म्हटलें, "मला चांगलं आठवतंय कीं! तूं दहा हजाराची थैली माझ्याजवळ ठेवायला दिली होतीस. पण काल मी ते विसरल्याचं जे नाटक केलं होतं ना, ते तुझ्या भल्यासाठीच होतं. माझ्याजवळ जे लोक बसले होते ते कर्ज मागायला आलेले होते. मी त्यांना कर्ज द्यायचं नाकारलं होतं. त्यांना पैशाची फार अडचण होती. जर त्याच वेळेला मी तुझे पैसे परत दिले असते तर ते लोक तुझ्याकडून रुपये घेऊन गेले असते. तुझे रुपये मी आत्ता आणून देतो." असं म्हणून सावकाराने शामची रुपयांची थैली आंतून आणून त्याला परत दिली. तो थैली घेऊन बाहेर निघून गेला.

बालमुकुंद आपली संदूक घेऊन उभा राहिला आणि म्हणाला, "आपला बोलण्यावरुन कळलं शाम किती नेभळट आणि भित्रा आहे ते. माझी मुलगी नाही असल्या माणसाशी लग्न करायची!" सावकाराचे आभार मानून तो शामच्या पाठोपाठ संदूक घेऊन निघून गेला.

सावकार निराश होऊन डोक्याला हात लावू खुर्चीवर बसला. दुसऱ्याच दिवशी आपले सारे सामान शहरांत बालमुकुंदच्या घरी शाम घेऊन आला आणि त्याच्याजवळ कृतज्ञता व्यक्त करुन म्हणाला, "तुम्हां दोघांच्यामुळें माझं गमावलेलं धन परत मिळालं. आणि शहरांत राहायला जागादेखील मिळाली. आपले उपकार मी कसे फेडूं?" "माझ्या मुलीशी - तरंगिणीशी लग्न करुन!" बालमुकुंद हंसत म्हणाला, "तुझा सरळ स्वभाव आणि माझ्या मुलीची बुद्धीमत्ता म्हणजे दुधांत साखरच!"

आपलं नशीब इतकं चांगलं असेल याची सुतराम कल्पना शामला नव्हती. तो गोंधळून गेला. त्याच्या घशाला कोरड पडली. त्याच्या तोंडून एकदम शब्द आले, "पाणी, तहान लागलीय."

"आत्ता आणते हं" तरंगिणी खुषींत येऊन म्हणाली व लगबगीने आंत जाऊन ती पाणी घेऊन आली.



## दुरुन डोंगर साजरे

पावली गांवातला कुदरत अली सुतारकामांत फार हुशार होता. आसपासच्या गांवातले जमीनदारदेखील आपले पलंग नि खुर्च्या त्याच्याकडूनच करुन घेत. त्याच्या कौशल्याची सगळेजण वाखाणणी करत. पण जेमतेम खाण्यापिण्याच्या खर्चापेक्षां जास्त मजुरी हातांत पडत नव्हती. रात्रंदिवस मेहनत करुन, त्याची बिबी आणि चार बच्चे यांची कशीबशी गुजराण होत होती. मोठ्या मुलीचं, चाँदचं लग्न कसं करता येईल ही चिंता त्याला सारखी जाळीत असे.

अरब देशांत सुतारांची जरुरी आहे आणि इथल्यापेक्षां दसपट मजुरी मिळते असं त्याने कांही लोकांकडून ऐकलं होतं. अनेकजणांनी अरब देशांत जाऊन बरेच पैसे कमावले होते. कुदरत अलीला वाटलं कीं आपण देखील एकदोन वर्षांसाठी तिकडे जावे आणि भरपूर पैसा गांठीशी बांधून परत यावे. इथल्या तुटपुंज्या कमाईत मुलीच्या लग्नाला पैसे कधीच जमवता आले नसते.

एक दिवस तो राजधानींत गेला आणि एका सरकारी कर्मचाऱ्यास भेटला. थोडेफार पैसे घेऊन अरब देशाला जाण्यासाठीं लागणारा परवाना तो कर्मचारी मिळवून देणार होता. कुदरत अलीने आपले घर गहाण टाकून सावकाराकडून थोडे कर्ज काढले आणि अरब देशांत जाण्याचा परवाना मिळवला.

नंतर त्याने एक दिवस आपली बिबी आणि मुलें यांना समजावून सांगितले, ''तुम्ही घाबरुं नका. मी ज्या देशांत जातो आहे तिथें सोन्याच्या मोहरांचा पाऊस पडतो. मी गेलो की लगेच तुमच्या खर्चासाठीं तुम्हाला पैसे पाठवत जाईन. वर्षभरानंतर बरंच सोनं आणि पैसे जमवून परत येईन, आणि आपल्या लाडक्या चाँदची शादी मोठ्या थाटांत करीन.''

असं सांगून तो अरब देशांत निघून गेला.

जेव्हां कुदरत अली त्या देशांत पोंचला, तेव्हां त्याच्या राहण्याची किंवा जेवणाखाण्याची नीट व्यवस्था कांही होऊं शकली नाही. तो रोज कामाच्या शोधांत हिंडे आणि कांहीतरी ओलंकोरडं खाऊन रस्त्याला बाजूला झोंपून जाई. अशा प्रकारें एक महिना झाला. पण त्याला कांही त्याच्याजोगे काम मिळाले नाही. जिथें नव्या इमारतींची कामें चालली होती, तिथें अगोदरच सुतार नेमलेले होते, त्यांची आयुधेंही नव्या पद्धतीची होती. कुदरत अलीची हत्यारें जुन्या पद्धतीची होती. त्यामुळें अतिनाजूक नक्षी त्यांतून होत नसे. म्हणून त्याला कुठेही काम मिळेना.

त्याने जे स्वप्न पाहिलं होतं त्याचा चक्काचूर झाला. एकटेपणा त्याला खायला उठे. बायकोमुलांची चिंता त्याला सतावत होती ती निराळीच. त्यांची गुजराण कशी होत होती ते त्याला माहीत नव्हते. दूर देशांत तो अगदीं एकटा पडला होता. तिथें त्याचं कुणीही नव्हतं.

एक दिवस अचानक त्याची भेट मुल्लाखानशी झाली. तो त्याच्या शेजारच्या गांवातला राहाणारा होता. अरब देशांत मुख्य मिस्त्री व्हायला आला होता. पण त्याला ते काम कांही मिळाले नाही.तेव्हां त्याने मिळेल ते मजुरीचे काम करुन आपले पोट भरायला सुरवात केली. शहराच्या बाहेर एक मोठी इमारत तयार होत होती. त्या ठिकाणीं मुल्लाखान मजूर म्हणून काम करीत होता. कुदरत अलीदेखील त्या बांधकामावर काम शोधायला गेला.

त्या दिवसापासून दोघांनी एकत्र काम केले व एकत्र राहण्याची सोय केली. एक दिवस कुदरत अली मुल्लाखानला म्हणाला, ''अरे भाई, मी तर आपली बिबीबच्चे यांना अल्लाच्या भरंवशावर सोडून आलो आहे. त्यांना तर सांगून आलो होतो कीं इथें पोंचलो कीं तुम्हाला पैसे पाठवीन. पण इथें आल्यावर जे मनांत ठरवलं होतं, ते कांहीच जमलं नाही. माझी बायकोमुलं कशी काय राहात असतील कुणास ठाऊक. आता मला लवकर घरी परत जावंसं वाटूं लागलंय.'' असं म्हणताना कुदरत अलीचे डोळे पाण्याने भरले.

मुल्लाखानला त्याची दया आली. ''तुला हवं असलं तर माझ्याकडून थोडे पैसे घे आणि अगोदर घरी पाठवून दे. चारदोन महिने काम कर, हातांत कांही पैसे शिल्लक पडले कीं घरी परत जा.'' मुल्लाखानने सांगितले.

कुदरत अलीने मुल्लाखानकडून कांही रुपये घेऊन घरीं पाठवले व त्याच्या मदतीबद्दल त्याचे आभार मानले. त्याने दोन महिने हर तऱ्हेच्या मजुरीचे काम केले, आणि दोन महिन्यांची मजुरी घेऊन तो घरीं परत आला. घरीं त्याची मुलें उपासमारीने आजारी पडली होती. घरी परतल्यावर बायकोमुलें त्याला बिलगली आणि ओक्साबोक्शी रडायला लागली. अरब देशांतला आपला अनुभव त्याने जेव्हां त्याच्या बिबीला सांगितला तेव्हां ती म्हणाली, ''दुरुन डोंगर साजरे असतात. आता तरी तुम्हाला कळलं ना!''

### ५२ - शिखंडीची कहाणी

# महाभारत

दुर्योधनाने विचारल्यावर भीष्मपितामहांनी दोन्ही पक्षांतल्या योद्ध्यांचे सविस्तर वर्णन केले. शिखंडीबद्दल माहिती देताना ते म्हणाले कीं मी त्याला मारुं शकत नाही. जरी तो माझ्याबरोबर युद्ध करायला आला तरी मी त्याच्यावर शस्त्र उगारणार नाही.

ह्यावर दुर्योधनाने पुन्हां प्रश्न विचारला, ''आपण तर म्हणाला होतात की युद्धांत मी सर्व शत्रूंचा नाश करीन. मग शिखंडीला मारणार नाही असं कां म्हणतां?''

ह्या प्रश्नाचं उत्तर देताना पितामहांनी सांगितलं, ''ह्याचं कारण मी सविस्तर सांगतो. इथें उपस्थित असलेल्या सर्व राजांनीदेखील लक्षपूर्वक ऐकावे.

''माझे वडील शांतनुमहाराजांनी बरीच वर्षे राज्य केले. त्यांच्या मृत्यूनंतर मी चित्रांगदाला सिंहासनावर बसवले. पण त्याचा अकालीं मृत्यू झाल्यामुळें माझ्या देखरेखीखाली विचित्रवीर्याने राज्य संभाळले. विचित्रवीर्य लग्नाला योग्य वयाचा झाला. पण तो प्रकृतिने फार अशक्त होता. मला त्याची काळजी वाटत होती. तो दुबळा असल्यामुळें एखाद्या राजकुमारीचे हरण करुन तिला आणण्याची त्याची कुवत नव्हती.

त्यासुमारास काशिराजाने आपल्या तिन्ही राजकुमारींसाठी स्वयंवर करायचे ठरवले. त्या तिघींची नांवे होती - अंबा, अंबिका आणि अंबालिका. स्वयंवरासाठीं सर्व राजांना निमंत्रण दिलेलं होतं. विचित्रवीर्य इतका सामर्थ्यवान नव्हता, म्हणून मी एकटाच आपला रथ घेऊन काशीला गेलो. तिन्ही राजकन्या अतिशय सुंदर





होत्या. मी तिथें जाऊन सर्व उपस्थित राजांकडे नीट पाहिलं आणि त्यांच्या शक्तीचा अंदाज घेतला. नंतर तिन्ही राजकन्यांना माझ्या रथांत बसवले व जमलेल्या इतर सर्व राजांना ओरडून जाहीरपणें सांगितले, "मी शांतनुराजाचा पुत्र भीष्म आहे. या तिन्ही राजकन्यांना मी रथांत बसवून घेऊन जात आहे. ज्यांच्या अंगात सामर्थ्य असेल त्यांनी मला रोखावे व राजकन्यांची माझ्या रथांतून सुटका करावी."

"त्याबरोबर, उपस्थित असलेल्या सर्व राजांनी माझ्यावर आक्रमण केले. आपले हत्ती, घोडे, रथ घेऊन मला घेरले. परंतु माझ्या बाणांच्या वर्षावापुढें कोणीही टिकले नाहीत. सगळेजण रणभूमी सोडून पळून गेले.

त्या तिघीजणींना मी माता सत्यवतीच्या स्वाधीन करुन सांगितले, "मातोश्री, काशीराजाच्या तिन्ही कन्यांना मी पळवून आणले आहे. ह्या विचित्रवीर्याच्या पत्नी होतील. तेव्हां आपण ह्यांच्या विवाहांची तयारी सुरुं करावी."

"माता सत्यवती फारच प्रसन्न झाली. लग्नांची तयारी जोरांत सुरुं झाली, तेव्हां काशिराजाची थोरली मुलगी अंबा, हिने मला सांगितले, "माझं शाल्वराजावर प्रेम आहे आणि त्यांचंही मन माझ्यावर जडलं आहे. आम्हाला दोघांना विवाह करण्याची इच्छा होती. पण ही गोष्ट माझ्या पित्यास माहीत नव्हती. माझी आपल्याला विनंती आहे कीं आपण मला शाल्वराजाकडे पाठवावे."

"माता सत्यवती व पुरोहितांशी विचारविनिमय करुन मी तिला सन्मानपूर्वक शाल्वराजाकडे पाठवले.

"परंतु शाल्वराजाने तिला पत्नी म्हणून स्वीकारण्यास नकार दिला व म्हटले, "जिला भीष्म बळजबरीने हरण करुन आपल्याबरोबर घेऊन गेला आहे, तिचा मी स्वीकार करुं शकत नाही. तुझ्यावर भीष्माचा अधिकार आहे. जर तो तुझ्याशी विवाह करणार नसेल तर तूं स्वतंत्र आहेस. तुला जिथें जायचं असेल तिकडे जाऊं शकतेस."

"अंबाने शाल्वराजाला समजावण्याची पराकाष्ठा केली, पण त्याने आपला निर्णय बदलला नाही. अंबाला वाटलें कीं मी तिचे हरण केले म्हणून शाल्वाने तिला धिक्कारले. अंबा माझा तिरस्कार करुं लागली आणि माझ्यावर सूड उगवण्याची तिने प्रतिज्ञा केली.

"शाल्वाने धिक्कारल्यानंतर अंबा शैखावत्य ऋषींच्या आश्रमांत गेली व त्यांना तिने तिची व्यथा सांगितली. परंतु मुनींनी तिला सांगितले, "इथें सर्व तपस्वी राहात आहेत. आणि ते तुला मदत करण्यास असमर्थ आहेत." त्यावर अंबा म्हणाली. "मी जीवनांत निराश झाले आहे आणि मलाही तपस्या करावीशी वाटते. मला तपस्येचा विधी सांगा."

त्या ऋषी-मुनींनी तिला आपला पिता काशिराज याच्याकडे जाण्याचा सल्ला दिला. परंतु अंबा आपला हट्ट सोडीना.

त्यावेळीं त्या आश्रमांत होत्रवाहन नांवाचे एक राजर्षी आले ते अंबाचे पणजोबा होते. त्यांनी अंबेची करुण कहाणी ऐकली व म्हणाले, "मुली, तपस्या करणें तुझ्या शक्तीपलीकडचे आहे. सांसारिक इच्छा तपस्येच्या मार्गात बाधा आणतात. जरी शाल्वराजाने तुला स्वीकारली नसली तरी तूं भीष्माकडे परत जा. परशुराम तुला या कामांत मदत करुं शकतील व तुला भीष्माकडे पोंचवू शकतील. भीष्माने तुझा स्वीकार केला नाही तर ते भीष्मावर सक्ती करुं शकतील. जरुर पडली तर यासाठीं त्याच्याशी युद्धही करुं शकतील."

योगायोगाने महेंद्र पर्वतावर राहाणारे परशुराम दुसऱ्या दिवशी त्याच आश्रमांत आले. अंबा व तिच्या सख्यांनी त्यांचे स्वागत केले, सत्कार केला. बोलता बोलता होत्रवाहनाने आपली नात अंबा हिची करुण कथा त्यांना सांगून या समस्येचे निराकरण करण्याची प्रार्थना केली.

परशुरामांनी अंबेला विचारले, "मुली, तूं भीष्माकडे जाण्यास तयार आहेस कीं शाल्वराजाकडे? तुला ज्याच्याकडे जायचे असेल त्याच्याकडे मी तुला पोहोचती करीन."

अंबा म्हणाली "भीष्मच माझ्या त्रासाचे कारण आहे. त्याच्यामुळेच माझी दुरवस्था झाली आहे. भीष्माने माझे बळजबरीने हरण केले नसते, तर शाल्वराजाने माझा त्याग केला नसता. शाल्वराजाचे अजूनही माझ्यावर प्रेम आहे. पण



सामाजिक प्रतिष्ठेला बाध येईल म्हणून माझा स्वीकार करण्यास त्यांना संकोच वाटतो आहे. ह्याच कारणाने मला भीष्माची चीड आहे. व त्याचा सूड घेण्याच्या विचाराने मी रात्रंदिवस तळमळते आहे. त्याच्यावर सूड उगवल्याशिवाय माझ्या मनाला शांतता मिळणार नाही. भीष्माचा वध करण्यासाठीच मी तपस्या करते आहे."

हे ऐकून परशुराम म्हणाले, "मी भीष्माला मारुं शकत नाही. पण जर त्याने तुझा स्वीकार केला नाही तर त्याच्याशी युद्ध करुं शकेन."

परशुराम व अंबा कांही ऋषींच्याबरोबर सरस्वती नदीच्या किनाऱ्यावर आले व कुरुक्षेत्रांत राहिले. त्यांनी मला निरोप पाठवला.

मी एक गाय व कांही ब्राह्मण घेऊन त्यांना भेटायला गेलो व त्यांचा योग्य सत्कार केला. परशुरामांनी मला म्हटले, "भीष्मा, तूं तर जन्मभर



अविवाहित राहाण्याची प्रतिज्ञा केली आहेस, मग तूं अंबेचं हरण कां केलेस? आणि जर केलेस तर तिला आपल्याजवळ कां ठेवले नाहीस? तुझ्यामुळें तिचे जीवन नष्ट-भ्रष्ट झाले आहे. आता तिच्याशी कोण लग्न करील? तुझ्यामुळें शाल्वाने तिला स्वीकारले नाही. आता तुला तिच्याशी विवाह केला पाहिजे."

भीष्म पुढें म्हणाले, "तेव्हां मी त्यांना समजावण्याचा प्रयत्न केला व म्हटले, "मी माझा पुतण्या विचित्रवीर्य ह्याच्याबरोबर विवाह करण्यासाठीं काशीराजाच्या तिन्ही राजकन्यांचे हरण केले होते. मी त्यांना माझ्यासाठी आणलेल्या नव्हत्या हे मी सर्वांना स्पष्टपणें सांगितले होते. अविवाहित राहाण्याची माझी प्रतिज्ञा अटळ आहे.

"जरी मला इंद्राशीही युद्ध करावे लागले तरी चालेल परंतु कोणत्याही परिस्थितीत मी विवाह करणार नाही. जेव्हां अंबेने शाल्वराजाकडे जाण्याची व त्याच्याशी विवाह करण्याची इच्छा प्रकट केली तेव्हां मी तिला सन्मानपूर्वक त्याच्याकडे पाठवले होते. आता शाल्वराजाने तिचा स्वीकार केला नाही, यांत माझा काय दोष?"

माझ्या बोलण्याने परशुरामांना राग आला व त्यांनी म्हटले "जर तूं अंबेशी विवाह केला नाहीस तर मी तुला ठार मारीन."

मी त्यांच्याशी युद्ध करण्यास तयार नव्हतो. ते माझे गुरु होते. मी त्यांना या गोष्टीची आठवण करुन दिली आणि सांगितले कीं आपण माझे गुरु आहात, आपण मला युद्धविद्या शिकवली आहे व त्याबरोबर शस्त्रें-अस्त्रेंही मला दिली होतीत. त्यावर ते म्हणाले कीं मी तुझा गुरु आहे ना, तर तूं माझी आज्ञा पाळ.

त्यावेळीं मी त्यांना स्पष्ट सांगितले कीं कोणत्याही परिस्थितीत मी माझी प्रतिज्ञा मोडणार नाही. त्याच्यासाठीं जरी तुमच्याबरोबर युद्ध करावे लागले तरी मी मागे हटणार नाही.

त्यांच्या अट्टाहासामुळें मला त्यांच्याशी युद्ध करणें भाग पडले. कुरुक्षेत्रावर युद्धाची तयारी सुरुं झाली.

युद्ध सुरुं होण्यापूर्वी मी हस्तिनापुरला येऊन माता सत्यवतीला सर्व हकीकत सांगितली, व तिचा आशिर्वाद घेऊन कुरुक्षेत्राबर परत आलो. परशुराम तेथें आलेले होते आणि युद्ध करण्यासाठीं माझी वाट पाहात होते. आम्हा दोघांचे युद्ध पाहाण्यासाठीं अनेक ऋषीमुनीजन तिथें आले होते.

आमच्या दोघांच्यात भयंकर युद्ध झाले. चोवीस तास सतत युद्ध चालल्यावर त्यांनी हार मानली व अंबाला सांगितले, "तूं पाहिलेस ना, मी भीष्माला मारुं शकलो नाही. तेव्हां आता तूं त्याला शरण जा" अंबेने असं करण्याला साफ नकार दिला आणि मला मारुन माझा सूड घेण्यासाठीं ती यमुनेच्या कांठी तपस्या करण्यासाठीं निघून गेली. तिथें तिने बारा वर्षें घोर तपस्या केली. या संकटांतून तिला वांचवण्यासाठीं तिचे भाऊ तिला घरी नेण्यास आले होते. पण ती तपस्येंत मग्न होती. तिच्या भावांनी तिचा तपस्याभंग करण्याचा खूप प्रयत्न केला, पण ते असफल ठरले. तिची तपस्या पाहून भगवान शंकर प्रसन्न झाले व तिला 'वर माग' असं म्हणाले. अंबाने 'युद्धामधें भीष्माला पराभूत करुन त्याचा वध करीन' असा वर मागितला.

शिवाने वरदान देताना सांगितलं, "पुढील जन्मांत तू स्त्रीरुपांत जन्म घेशील. पण कालांतराने तुला पुरुषत्व प्राप्त होईल. त्यानंतर तू भीष्माचा वध करुं शकशील."

भीष्म पुढें म्हणाले, "अंबेला माझा सूड घेण्याची इतकी घाई झालेली होती कीं तिने लगेच चिता तयार केली व "भीष्माचा वध करण्यासाठीं मी अग्निप्रवेश करीत आहे" असं म्हणून तिने त्या चितेत उडी घेतली.

ही अंबा नंतरच्या जन्मांत द्रुपदाची मुलगी म्हणून जन्माला आली. तिचे नांव शिखंडी !

एकदा माझ्याबरोबर युद्ध करताना द्रुपद पराभूत झाला होता व तोही माझा सूड घेण्याच्या विचारांत होता. माझा वध करणारा एक पुत्र मिळावा या इच्छेने त्याने ही घोर तपस्या केली. शिवाने प्रसन्न होऊन वर दिला - "भीष्माचा शेवट करणारा तुझ्या घरांत प्रथम स्त्रीरुपांत जन्म घेईल



व युद्धांत त्याच्या हातून भीष्माचा मृत्यू होईल."

कांही काळानंतर द्रुपदाच्या पत्नीने एका मुलीस जन्म दिला. पण मुलगा झाला आहे असं जाहीर केलं. त्या मुलीचे पालनपोषण एखाद्या मुलाप्रमाणें पण गुप्तपणें केलं. कारण द्रुपदाचा व त्याच्या राणीचा भगवान शंकराच्या वरदानावर पूर्ण विश्वास होता. बालकाचे नांव शिखंडी ठेवले गेले.

द्रुपदकन्या शिखंडी जन्मतः विविध कलांत निपुण होती. व युद्धकलेंतही प्रवीण होती. पुरुषवेष धारण करुन तिनें द्रोणाचार्यांकडून धनुर्विद्या शिकून घेतली.

आता ती विवाहास योग्य झाली होती आणि द्रुपदास तिच्या लग्नाची काळजी वाटूं लागली. हिचा पुरुषाशी विवाह करावा कां स्त्रीशी? पुढे



पत्नीच्या विचाराने द्रुपदाने तिचा विवाह स्त्रीशी करायचे ठरवले.

दशार्णचा राजा हिरण्यरोम ह्याच्या कन्येचे नांव पण शिखंडी होते. त्याने आपल्या मुलीचा विवाह द्रुपदाची मुलगी शिखंडी हिला मुलगा आहे असे समजून आनंदाने ठरवला. दोन्ही शिखंडींचा विवाह मोठ्या थाटांत साजरा झाला.

परंतु दशार्ण राजाच्या मुलीच्या लवकरच लक्षांत झाले कीं तिचा पती स्त्रीच आहे. जेव्हां ही बातमी तिच्या पित्यास कळली, तेव्हां तो संतापला व त्याने द्रुपदास निरोप पाठवला कीं "तुम्हीं आपल्या मुलाचा विवाह माझ्या मुलीशी करुन मला फसवले आहे व माझा अपमान केला आहे. त्याचा सूड घेण्यासाठीं मी माझ्या सैन्यासह येऊन तुमचा सर्वनाश करणार आहे."

राजा द्रुपद व त्याची पत्नी या संदेशाने भयभीत झाले. दशार्णराजाशी सामना करण्याची त्यांची शक्ति नव्हती. त्याशिवाय, शिखंडीचं रहस्य प्रकट झालं असतं तर सर्व राजांनी त्याची टर उडवली असती. या फजितीच्या आणि अपमानाच्या कल्पनेने ती दोघे फारच अस्वस्थ झाली. शिखंडीलाही आपल्या आईवडिलांना पडलेली चिंता पाहून फार काळजी वाटत होती. म्हणून प्राणत्याग करण्यास ती वनांत गेली. ते वन स्थूणापर्ण नांवाच्या यक्षाचे होते.

त्या वनांत शिखंडीने अन्नपाणी वर्ज्य करुन प्राण त्याग करण्याचा निश्चय केला. तिची स्थिती पाहून यक्षाने विचारले, "देवी तूं कोण आहेस? ह्या वनांत तूं कां आलीस?

शिखंडीने म्हटले, "मी संकटांत असल्यामुळें इथें आले आहे परंतु माझे संकट निवारणें अशक्य आहे." त्यावर यक्षाने आपली ओळख करुन दिली, व तो पुढें म्हणाला, "मी कुबेराचा मित्र आहे, तुला वरदान देऊन तुझें संकट दूर करूं शकेन."

तेव्हां शिखंडीने आपल्या आणि आपल्या आईवडिलांच्या संकटाबद्दल यक्षास सविस्तर सांगितले.

यक्षाला तिच्या दारुण अवस्थेबद्दल करुणा वाटली.परंतु तिला कायमचे पुरुषत्व प्राप्त करुन देण्याइतकी शक्ति त्याच्याजवळ नाही हे त्याला जाणवले. पण थोडे दिवसांपुरते आपले पुरुषत्व देण्याइतकी शक्ति त्याच्यापाशी होती.

"कांही काळापर्यंत मी माझें पुरुषत्व तुला देऊं शकेन आणि तुझे स्त्रीत्व मी घेईन. अशा प्रकारें तात्कालिक स्वरुपांत मी तुला थोडीफार मदत करूं शकेन." शिखंडीला मदत करण्याच्या हेतूने यक्ष म्हणाला.



शिखंडीने त्याचे म्हणणें लगेच कबूल केले व ती पुरुष शिखंडी बनून ताबडतोब आपल्या आईवडिलांकडे गेली.

द्रुपदाच्या आनंदाला सीमा राहिली नाही. त्याने दशार्ण राजाला हा संदेश लिहून पाठवला, "माझा पुत्र शंभर टक्के पुरुष आहे. संशय असेल तर आपण प्रत्यक्ष येऊन परीक्षा पाहा."

दाशार्णराजाने कांही दासींना पाठवून द्रुपदाच्या सांगण्याची प्रचिती पाहिली. शिखंडी पूर्ण पुरुष आहे ही खात्री झाल्यानंतर आपली कन्या सासरीं परत पाठवली व द्रुपदाची क्षमा मागितली.

यादरम्यान एक दिवस कुबेर आपल्या विमानांतून स्थूणापर्णाच्या वनांत पोंचला. स्त्री बनलेला असल्यामुळें स्थूणापर्ण त्याला भेटायला आला नाही. त्यामुळें कुबेराला खूप आश्चर्य वाटले. कुबेराच्या दूतांनी स्थूणापर्ण स्त्रीरुप झाल्याचे सांगितले. स्थूणापर्णाला स्त्रीरुपांत पाहून कुबेराने कारण विचारले. वस्तुस्थिती समजल्यावर कुबेर अतिशय संतापला व स्थूणापर्णाला "तूं सदैव स्त्रीच राहाशील." असा शाप दिला. यक्षाने शापमुक्त करण्याची कुबेराला वारंवार विनंती केली. तेव्हां कुबेर म्हणाला कीं शिखंडी मरण पावल्यानंतर स्थूणापर्ण पुन्हां पुरुष बनेल.

इकडे शिखंडी पुरुषाचे रुप मिळाल्यामुळें आनंदात होता. शिवाचे वरदान खरे झाल्यामुळें द्रुपद व त्याची पत्नी फारच प्रसन्न होते. परंतु कांही दिवस गेल्यानंतर यक्षाला दिलेले वचन शिखंडीला आठवले व तो फिरुन उदास झाला.

कांही दिवसांनंतर उदास मनाने शिखंडी आपल्या वचनानुसार स्थूणापर्ण यक्षाला त्याचे पुरुषत्व परत देण्यासाठी आला. परंतु कुबेराच्या शापामुळें स्थूणापर्णाला शिखंडीकडून आपले पुरुषत्व परत घेता येईना. त्यामुळें शिखंडी आमरण पुरुष राहिला.

भीष्म पितामहांनी दुर्योधनाला शिखंडीची कथा सांगितली व म्हटले, "अंबानेच माझा प्राण घेण्याची प्रतिज्ञा करुन शिखंडीच्या रुपांत पुनर्जन्म घेतला आहे हे मी तुला आता सांगितलंच आहे. मी प्रतिज्ञा केलेली आहे कीं मी स्त्री, स्त्रीनामधारी किंवा स्त्रीचरित्रवाल्या व्यक्तिवर शस्त्र चालवणार नाही. ह्या कारणानेच मी शिखंडी बरोबर युद्धही करणार नाही किंवा त्याला मारणारही नाही."





# खरा विजय

निरंजनपूर गांवाच्या बाहेर एका पारावर चार तरुण संध्याकाळीं गप्पा मारत होते.

भूषण म्हणाला, ''माणसाला कोणतेही कार्य अशक्य नाही. जर एखाद्याने प्रामाणिकपणें आणि निष्ठेने प्रयत्न केले तर अत्यंत कठीण कामदेखील त्याला जमूं शकेल.''

''जे काम अशक्य असते, ते कितीही आटोकाट प्रयत्न केले तरी माणसाला पूर्ण करता येत नाही.'' दयानिधीने आपले विरोधी मत स्पष्ट केले.

चर्चेला गंभीर वळण लागले व त्याचा शेवट पैज लावण्यांत झाला.

दयानिधी म्हणाला, ''तुझे वडील सिगरेटशिवाय मिनिटभरदेखील राहूं शकत नाहीत. त्यांची सिगरेट सुटणें अशक्य काम आहे. जर तूं हे करुन दाखवलंस तर मी तुला शंभर रुपये देईन.'' दुसऱ्या दोघां मित्रांनी दयानिधीचीच री ओढली.

भूषण थोडा वेळ गप्प राहिला. नंतर म्हणाला, ''मी तुमचे आव्हान स्वीकारतो. पण मी हे तुमच्या शंभर रुपयांसाठीं स्वीकारत नाही आहे, परंतु हे सिद्ध करण्यासाठी कीं हे असाध्य नाही. मला कांहीही करावं लागलं तरी मी माझे म्हणणें सिद्ध करुन दाखवीन.''

दुसऱ्या दिवशीं भूषण जेव्हां आपल्या वडिलांना भेटला, तेव्हां धूम्रपानाचे वाईट परिणाम त्यांना सांगू लागला. ''सिगरेट ओढण्यामुळें माणसाचे आयुष्य कमी होते, तऱ्हेतऱ्हेची असाध्य दुखणीं त्याला होतात. त्या व्यक्तीला असह्य वेदना सोसायला लागून तो अकालींच मृत्यूची शिकार होऊं शकतो.''

भूषणाचे वडील माधवराव एक चांगले गृहस्थ होते. पण त्यांना गप्पा मारण्याचे आणि सिगरेटचे जबरदस्त व्यसन होते. ते खूपच गप्पिष्ट होते आणि मजेशीर गप्पा मारीत. बोलताबोलता एका पाठोपाठ एक अशा सिगरेटी ओढीत.

त्यांनी आपल्या मुलाचे बोलणें लक्षपूर्वक ऐकले. सिगरेट ओढण्याचे दुष्परिणाम त्यांनाही ठाऊक होते. तरी आपल्या या संवयीचे समर्थन करताना ते म्हणाले, ''अरे भूषण, जीवन आणि मृत्यू - दोन्ही आपल्या हातांत नसतं. जे नशिबांत होणार असेल ते टळत नाही. ज्या क्षणीं मरण येणार असते त्यांतून कुणालाही वाचवणं अशक्य असतं. सिगरेट न ओढणारी माणसं मरत नाहीत कां? आता प्रकृतिसाठी सिगरेट अपायकारक आहे हे मी मानतो. पण सिगरेट ओढण्याचा मला जो आनंद मिळतो आहे, तो निरोगी प्रकृतीच्या आनंदापेक्षां कितीतरी पटीने जास्त आहे. मग सिगरेट सोडून मी त्या आनंदाशिवाय नीरस वाटणारं जीवन कशाला जगायचं? हा तर शुद्ध मूर्खपणा आहे म्हणून या बाबतींत तूं लुडबूड करुं नकोस.''

इतकं बोलून त्यांनी लगेच एक सिगरेट पेटवली व म्हणाले. ''सिगरेट ओढणें म्हणजे श्वास घेण्यासारखे आहे. जर मी ही बंद केली तर मलाही श्वास घेता येणार नाही.'' भूषणला वाटलं कीं खरोखरच हे एक अशक्य काम आहे. तो अगदीं निराश होऊन गेला. वडिलांच्या मनांत घर करुन बसलेला हा चुकीचा विचार आहे. सिगरेटीशिवाय ते जगूं शकणार नाहीत कां? हा त्यांचा विचार बदललाच पाहिजे. म्हणून तो पुन्हां म्हणाला.

''हे तुमचे मत आहे बाबा! कोणतेही विचार आणि मते परिस्थितीनुसार बदलतात, नष्ट होतात. अशी कोणतीही वाईट संवय नाही कीं ती सुटूं शकणार नाही. जरुर आहे फक्त मनाचा निश्चय करण्याची. तुमची मनापासून इच्छा असेल तर तुम्ही या घातक संवयीपासून मुक्त व्हाल.''

''मला कितीही वाटलं कीं सिगरेट सोडावी, तरी मी सोडूं शकणार नाही.'' माधवरावांनी सिगरेटचा एक झुरका घेऊन म्हटले.

भूषणने थोडा विचार केला व म्हणाला, ''बरं बाबा, समजा तुम्हाला कुणी सिगरेट सोडण्यासाठी एक लाख रुपये दिले तर तुम्ही काय कराल?''

''सोडून देईन की! पण मला एक लाख रुपये



द्यायला कोण वेडा बसलाय?''

''म्हणजे याचा अर्थ स्पष्टच आहे कीं जरुर तुमची इच्छा असली तर तुम्ही जरुर सिगरेट सोडूं शकाल.'' भूषणने उत्साहित होऊन मोठ्या आशेने वडिलांना म्हटलं.

''आणि जर कुणी तुमच्या गळ्यावर सुरी ठेवून सांगितलं कीं सिगरेट सोड नाहीतर गळा कापीन, तर?''

''सोडीन म्हणून सांगीन ना! जोपर्यंत त्याची सुरी गळ्याजवळ आहे तोपर्यंत. तो निघून गेला कीं सिगरेट पेटवीन.'' माधवरावांनी हंसतहंसत प्रत्युत्तर केले.

हे ऐकून भूषण दुःखी व उदास झाला. तो नाराज झाला आणि जरा रागांतच म्हणाला, ''तुम्ही माझं बोलणं मनावर घेत नाही आहात. देवाने दिलेलं हे सोन्यासारखं आयुष्य, तुम्ही याच्याशी असा खेळ

नाही करुं शकत. जर तुम्ही सिगरेट सोडणार नसाल तर मीही मला वाटेल ते करीन". एवढं बोलून तो ताडकन उठून तिथून निघून गेला.

त्या दिवशीं भूषण जेवला नाही. आईने खूप समजावलं पण तो कांही आपला हट्ट सोडेना. जेव्हां माधवरावांना हे कळलं तेव्हां ते पत्नीची समजूत घालत म्हणाले, "भूक लागली कीं आपोआप येईल जेवायला. किती दिवस उपाशी राहाणार आहे? उगीच चिंता करुं नकोस."

भूषणचा अन्नसत्याग्रह कांही दिवस चालू राहीला. तो दिवसभर आपलं काम करीतच होता. एक दिवस कांही कामासाठी तो परगांवी गेला आणि कांही दिवसानंतर परतला. तिथेही त्याने कांहीही खालें नव्हते.

आता त्याची प्रकृति बिघडायला लागली. चेहरा निस्तेज झाला. डोळे खोल गेले. तोंडावर एक उदास, आजारी कळा दिसायला लागली. तो महिनाभर आजारी होता तरी एकीकडे त्याचे काम चालूंच होते.

भूषणची परिस्थिती पाहून त्याच्या आईनेही त्याच्याप्रमाणेंच जेवण सोडले. दोघांची प्रकृति गंभीर झाली. आईने अंथरुण धरले. घरांतले, बाहेरचे, सगळेजण याचा दोष माधवरावांना देऊं लागले. ते म्हणूं लागले, "मुलगा सिगरेट ओढतो म्हणून वडील नाराज असलेले पाहिलं होतं. पण बाप सिगरेट ओढतो म्हणून मुलगा नाराज होताना प्रथमच ऐकतो आहोत." माधवरावांना लोक काय म्हणताहेत याची विशेष पर्वा नव्हती. परंतु मुलगा व बायकोची दशा पाहून त्यांचे हृदय हेलावले. सिगरेटीसाठी पत्नी व मुलगा गमवायला ते तयार नव्हते.

"जर माझ्या मुलाला कांही झालंच तर....." हा अशुभ विचार मनांत येताच त्यांच्या हृदयाचा थरकाप झाला.

त्यांनी सिगरेटचं पाकीट गटारांत फेकून दिलं आणि भूषणला मिठी मारुन तो म्हणले, "तूं जिंकलास बेटया! मी हारलो, जा, आंत जाऊन जेवायला बैस."

"खरी जीत तर तुमची आहे बाबा! सिगरेटरुपी राक्षसाने तुमच्यावर विजय मिळवलेला होता. पण आता तुमच्या आनंदासाठीं तुम्ही सिगरेटवर अवलंबून राहाणार नाही. आता तुम्ही स्वतंत्र आहात."

कठीण आणि अशक्य वाटणारं हे काम शक्य झाल्याचं पाहून बापलेकांना, दोघांनाही एका वेगळ्या आनंदाचा अनुभव मिळाला.





# ठोंब्या

कावेरी नदीच्या कांठावरच्या एका गांवात गोवर्धन नांवाचा एक गरीब ब्राह्मण राहात होता. त्याला खूप दिवसांनंतर एक मुलगा झाला. त्याचे नांव त्यांनी ठेवले श्रीवर्धन. बाळपणापासून श्रीवर्धन जरा मठ्ठच होता. जिथें बसेल तिथें बसून राहायचा. जोपर्यंत तिथून त्याला कुणी उठवत नव्हते तोपर्यंत एका जागीं बसलेला असायचा. कोणी बोलाबलें कीं यायचा आणि आतां जा म्हटले कीं जायचा. त्याला झोंप आली तरीदेखील "झोंप जा आता" असं सांगावं लागत असे.

त्याची ही तऱ्हा पाहून त्याच्या पित्याने असा विचार केला कीं त्याला वसतीगृह असलेल्या शाळेंत पाठवावा. तो एकदां लिहायला वाचायला लागून अभ्यास करुं लागला म्हणजे त्याचा मठ्ठपणा जाईल. तिथें गुरुकुलांत बारा वर्षे राहूनही तो अजिबात बदलला नाही. तो बुद्दू होता पण आळशी नव्हता.

बारा वर्षे गुरुकुलांत राहून आल्यानंतरही जेव्हां त्याच्यांत कांहीही बदल आढळला नाही, तेव्हां त्याच्या वडिलांनी त्याला घरांतली बारीकसारीक कामें सांगायला सुरवात केली. त्याच्या आईची दृष्टीही अधू होऊं लागली होती. त्यामुळें स्वयंपाकाचे काम गोवर्धनलाच करावे लागे. जोपर्यंत श्रीवर्धनला कांही काम सांगितले नाही तोपर्यंत तो कांहीही करत नसे. आणि प्रत्येक कामासाठी त्याच्यामागे धोशा लावला कीं तो चिडचिड करायचा.

श्रीवर्धनचे लग्न एखाद्या समंजस मुलीशी करुन दिले तर ती त्याच्याकडून गोड बोलून कांहीतरी कामधाम करवून घेईल. निदान स्वयंपाक करताना रोज आपली बोटं भाजतात, ते तरी वांचेल असा विचार करुन गोवर्धनने त्याचे लग्न केले.

पत्नी घरी आल्याने आता श्रीवर्धनला कांहीच काम करावे लागत नव्हते. तो आपला एका जागी बसून राही. श्रीवर्धनच्या पत्नीला तिचा सासरा म्हणाला, "तूं तुझ्या नवऱ्याला कांही काम करायला सांगून तुझी कामं करत जा नं!" परंतु ती आपल्या नवऱ्याला कोणतेही काम सांगेना व सर्व कामें स्वतः



करीत होती.

मातीच्या गोळ्यासारखा बसून राहिलेल्या आपल्या मुलाला पाहून श्रीवर्धन त्याला म्हणाला, "अरे, तुझ्या बायकोला विचार ना तिला कांही मदत पाहिजे कां? नुसता बसला आहेस, तिचे कांही तरी काम कर कीं!"

श्रीवर्धन बायकोजवळ गेला नि म्हणाला, "जर कांही काम असेल तर सांग ना, मी करीन."

ती म्हणाली, "वडील माणसं काम सांगतात आणि लहानांनी ते करायचं असतं. सासूबाईंना जाऊन विचारा कीं कांही करायचं आहे कां?"

श्रीवर्धन आईकडे गेला व म्हणाला, "आई, कांही असेल तर सांग, मी करीन."

आई म्हणाली, "मी आंधळी आहे. मी काय सांगणार? तूं तुझ्या वडिलांना विचार जा."

तो वडिलांकडे गेला आणि म्हणाला, "माझी बायको आणि आई मला कांहीच काम सांगत नाहीत. काय करूं, तुम्हीच कांहीतरी काम सांगा."

"अरे, सांगा काय म्हणतोस ठोंब्यासारखं? तुला कळत नाही का काय काम करावं ते? माझंच नशीब फुटकं म्हणून तूं माझ्या घरीं जन्माला आलास! घरांत कांही काम करीत नाहीस तर पैसा कमावण्यासाठीं कुठें नोकरी तरी कर. इतकी वर्षे शाळेंत शिकत होतास. कांहीतरी पैसे मिळवायला शीक. मुलांना घरीं बोलावून शिकवले तरी पैसे मिळतात. नाहीतर एखाद्या मंदिरात पूजापाठ तरी करत जा. मी काय सांगूं? जा, निदान भगवंताची प्रार्थना तरी कर. तो प्रसन्न झाला तर एखादा वर तरी देईल." पित्याने हेटाळणीच्या सुरांत म्हटले.

श्रीवर्धन अरण्यांत जाऊन तपस्या करूं लागला. कांही दिवसानंतर, भगवान त्याच्यासमोर प्रकट झाले आणि म्हणाले, "तुझ्या तपस्येने मी संतुष्ट झालो आहे. बोल, कोणता वर देऊं तुला?"

"काय वर मागायचा असतो हे मला ठाऊक नाही. तुम्ही इथेंच थांबा जरा वेळ, मी घरीं जाऊन घरच्यांना विचारून येतो..." असं म्हणून श्रीवर्धन मोठ्या खुषींत घरीं गेला आणि त्याने गोवर्धनला सांगितले," बाबा, तुम्ही सांगितलंत तशी मी तपस्या केली. भगवानाने प्रत्यक्ष दर्शन देऊन मला वर माग असं सांगितलंय. तुम्ही सांगा मी कोणता वर मागूं?"

पित्याला मुलाचा मठ्ठपणा पाहून अतिशय राग आला. त्याने त्याला रागावून म्हटले, "अरे, भरपूर पैसा-अडका, ऐश्वर्य मागायचंस की ! जन्मभर आपण गरीबींत राहात आहोत." आईनेही मुलाचे बोलणें ऐकले होते. तिनें मुलाला आपल्याजवळ बोलावले आणि म्हणाली, "तूं भगवंताजवळ वर माग कीं माझ्या आईची दृष्टी तिला परत मिळावी."





**उपदेशामुळें कुणाचा स्वभाव बदलत नसतो. कारण अगदीं उकळत ठेवलेले पाणीसुद्धां पुन्हां आपल्या मूळ स्वभावानुसार शीतल होऊं लागतं. - पंचतंत्र**

जेव्हां पत्नीला कळलं कीं आपल्या पतीला परमेश्वराने दर्शन दिलंय, तेव्हां ती त्याला बाजूला नेऊन म्हणाली, "आपल्या संतान होऊं दे असा वर मागा."

सगळ्यांना "बरं, बरं" म्हणून श्रीवर्धन पळतपळत पुन्हां अरण्यांत जिथें त्याने तपस्या केली होती, त्याच जागेवर पोंचला. परंतु भगवंत तिथें दिसेना. भगवानाला तो आसपास शोधायला लागला. त्या ठिकाणीं त्याला एक मुनी तपस्या करताना दिसला.

"कांही वेळांपूर्वी मला इथेंच भगवान दिसले होते, ते या बाजूला आले होते कां?" त्याने मुनीला विचारले.

हे ऐकून मुनींना आश्चर्य वाटलं. त्याने श्रीवर्धनकडून सारी कथा विचारून घेतली. सगळं ऐकून मुनीने विचारलं, "जेव्हां भगवान प्रत्यक्ष आले होते, तेव्हां लगेच तूं वर कां मागितला नाहीस? भगवंताकडून वर न मागता तूं घरीं विचारायला गेलास? अरे, मेला कां नाहीस? अभागी कुठचा! मी इतकी वर्षे इथें तप करतो आहे. तरी मला कांही भगवानाने दर्शन दिलं नाही." ते चिडून म्हणाले.

"मेला नाहीस" हे मुनींचे शब्द ऐकल्यानंतर श्रीवर्धन मरण्यासाठीं जागेचा शोध करायला लागला. थोड्या अंतरावर एक पहाड दिसत होता. त्या पहाडावर चढून खाली उडी घेतली कीं आपणांस मरण येईल या विचाराने तो पहाड चढूं लागला.

अर्ध्या वाटेवर एक शिकारी भेटला व श्रीवर्धनला म्हणाला. "पहाडावर तर कांहीच नाही, तूं उगीचच पहाडावर कशासाठी चढतो आहेस?

"वर जाऊन, तेथून खाली उडी मारून, मरण्यासाठीं" श्रीवर्धनने उत्तर दिले आणि आपली सारी कहाणी शिकाऱ्याला सांगितली. त्याच्या मनाचा सरळपणा पाहून शिकाऱ्याने सांगितले, "तुझी इच्छा देव पुरी करील. घरीं जा. आत्महत्त्या करूं नकोस."

त्याच्या सांगण्याप्रमाणें श्रीवर्धन घरीं आला. त्याचे घर ऐश्वर्याने भरलेले पाहिले. आईला दृष्टी आली. श्रीवर्धनला खूप आनंद झाला. वर्षानंतर त्याला मुलगा झाला. घरांत आनंदीआनंद झाला.

त्याला भगवताने दर्शन दिले हे ऐकून या ठोंब्याला गांवकरी "ठोंबेगुरु" म्हणूं लागले.





# उत्तर सरळ होतं

फार पूर्वीच्या काळीं एक श्रीमंत व्यापारी राहात होता. तो अतिशय कंजूष आणि स्वार्थी होता.

एका दिवशी उजाडताच तो व्यापारानिमित्त कुठल्यातरी दूरच्या शहरी जाऊं लागला. आपल्याबरोबर चालत जाण्यासाठी त्याने युसूफ नांवाच्या एका तरुणाला नोकरीवर ठेवले.

"पण मालक, इतक्या लांबच्या प्रवासाचा थकवा मी सहन करुं शकणार नाही." युसूफने हळूंच प्रस्तावना केली.

"कांही हरकत नाही. थकवा वाटून घ्यायला मी आहे ना बरोबर." व्यापारी म्हणाला.

व्यापाऱ्याने घोड्यामागच्या गाडींत सामान लादलं, आणि आपण घोड्यावर बसला, आणि युसूफ मात्र घोड्याच्या पुढेंपुढें धावत होता. व्यापाऱ्याने थोडा वेळदेखील त्याला घोड्यावर बसायची संधी दिली नाही.

मधूनमधून थोडा आराम करत दिवसभर त्यांचा प्रवास चालू होता. संध्याकाळीं ते एका मुक्कामावर पोंचले. तिथें रात्री विश्रांति घ्यायचे ठरले होते. त्यांनी तंबू ठोकला. जेवण झाल्यानंतर व्यापाऱ्याने घोड्याचे जीन उतरवून घोड्यावर राखण करण्यास युसूफला सांगितले. तोंपर्यंत तो स्वतः तंबूत थोडा वेळ झोंपण्यासाठीं गेला.

"मालक, थकवा वांटून घ्यायचा होता ना? आता अर्धी रात्र मी जरा झोंपू कां? तोपर्यंत आपण घोड्याची राखण कराल कां?" युसुफने अजीजीने विचारलं.

"अरे पोरा, थकवा वाटून घ्यायचा आहेच, पण जरा वेगळ्या तऱ्हेने! तुला व्यापाराचं सामान आणि घोडा, दोन्हींवर नजर ठेवणं मुष्कील होईल. म्हणून तूं तंबूच्याबाहेर राहून फक्त घोड्याची राखण कर. मी तंबूच्या आंत सामानाची निगराणी करतो." व्यापारी म्हणाला.

युसूफ इमानाने तंबूच्या बाहेर एका झाडाला टेकून बसला व पहारा करुं लागला. थकव्यामुळें त्याला झोंप लागली.

अचानक मध्यरात्रीं तंबूच्या आंतून व्यापाऱ्याने अर्धवट झोंपेतच विचारले, "काय करतो आहेस रे युसूफ?"

"मी विचार करतो आहे" नोकराने उत्तर दिले.

"कसला विचार करतो आहेस?" व्यापाऱ्याने पुन्हां प्रश्न केला.

"मी विचार करतोय कीं जर आपण गुलाब तोडायला गेलो आणि फक्त कांटेच दिसूं लागले तर?"

"मग कांट्यांना हात न लावता परत ये. तूं एक चांगला जागरूक राखणदार आहेस. शाब्बास रे मेरे बच्चे" मालक खूष झाला आणि पुन्हां झोंपी गेला. दोन तासांनंतर व्यापाऱ्याने पुन्हां विचारलं.

"अरे माझ्या पोरा, आता काय करतो आहेस?"

आळसटलेल्या आवाजांत युसूफ म्हणाला, "मला अजून आश्चर्य वाटतं आहे, मालक."

"कसलं आश्चर्य वाटतंय रे?"

"मालिक, उद्यां जर सूर्याने उगवायचंच नाही असं ठरवलं तर काय होईल हो?"

"मी नाही काळजी करणार असल्या गोष्टींची. पहांट झाली कीं सूर्याच्या उगवण्याची वाट न पाहाता मी चालूं लागेन." त्याने दिलासा द्यायच्या सुरांत सांगितलं आणि पुन्हां झोंपी गेला.

थोड्या वेळानंतर त्याने पुन्हां आवाज दिला.

"अरे युसूफ बेटे, काय करतो आहेस रे? आता काय वाटतंय?"

"आता तर मी फारच खोलवर विचारांत गढलो आहे."

"होय रे! म्हणजे तूं इतका वेळ विचार करत बसला आहेस! आणि अजून तुला आश्चर्य वाटतंच आहे कां?" रात्रभर जागून घोड्याची काळजीपूर्वक देखभाल करणारा हा विश्वासू नोकर पाहून मालक अगदीं खूष झाला.

"होय मालिक, मी खरंच खूप विचार करतो आहे, आणि आश्चर्य करतो आहे कीं काल तुम्ही घोड्यावर स्वार झाला होतात आणि मी पुढें पळत होतो. पण आज घोड्यावर कोण बसणार, आणि घोड्याच्या पुढें कोण पळत जाणार, जर घोडाच नसला तर?" युसुफने चांचरत विचारलं.

"उत्तर सरळ आहे, आपण दोघंही बरोबर चालत जाऊं. 'व्यापाऱ्याने पटकन उत्तर दिले. त्याच्या सुस्त डोक्यांत युसूफचे उत्तर जरा उशीरां शिरले. तेव्हां तो तीरासारखा तंबूच्याबाहेर आला आणि पाहातो तर जमिनीवर फक्त जीन पडलेलं होतं. त्याचा देखणा, उमदा घोडा दिसत नव्हता. तो आपल्या दुर्दैवाबद्दल हळहळूं लागला.

तेव्हांपासून त्या स्वार्थी, कंजूष आणि घमेंडखोर व्यापाऱ्यांत एक नरमाई आली. आणि त्याचं सर्वांना आश्चर्य वाटलं. त्याला आता कळून चुकलं होतं कीं जर युसूफला त्याने अधेमधे विश्रांति देण्यासाठीं घोड्यावर बसवलं असतं, आणि अर्धी रात्र घोड्याची रखवाली केली असती, तर युसुफ जागा राहूं शकला असता, आणि मग चोराला इतक्या शिताफीने घोडा चोरणें शक्य झालं नसतं.



# आपली परंपरा

## ओळखा




खाली दिलेल्या प्रश्नांची उत्तरें पुढच्या अंकात दिली जातील. तोपर्यंत तुम्ही स्वतः ही उत्तरें शोधून काढा, आणि आपल्या परंपरेचा परिचय करुन घ्या.



**1**

"दररोज असंख्य लोकांना आपण मृत्यूच्या खाईत जातांना पाहात आहोत. तरीही आपल्याला वाटत असतं कीं आपण अमर आहोत. हे सर्वांत मोठे आश्चर्य आहे."

हे कुणी, केव्हां आणि कां म्हटलं?

**2**

खालील पौराणिक व्यक्तीं व स्थानें यांचा एकमेकांशी काय संबंध आहे?

| | | |
|---|---|---|
| अ. शकुनी | - | गांधार |
| ब. केसरी | - | महामेरु |
| क. सहदेव | - | महिष्मती |
| ड. भरत | - | केकय |
| इ. वाल्मिकी | - | तमसा |





**चांदोबा : भाषा अनेक**
**ज्ञान आणि आनंदाची भावना एक**

# संवय

एक दिवस शिव सराइपुरच्या बाजारांत एक गाय विकायला गेला. गाईचं वर्णन करताना तो प्रत्येक गिऱ्हाईकाला सांगत होता, "गाय किती उत्तम जातीची आहे, हे सांगायची जरुरच नाही. गाय पाहितीत कीं तुम्ही समजूं शकालच."

दुसऱ्या गांवातला विष्णू सहज फेरफटका मारायला म्हणून बाजारांत आला होता. त्याने आपली गंमत म्हणून खोट्या उत्सुकतेने गाईची किंमत विचारली.

"शंभर रुपये." शिवने सांगितलं.

विष्णूने गाय पाहिली. गाईची किंमत शंभर रुपयांपेक्षां जास्त होती हे विष्णूला सहज कळून चुकलं पण त्याने जाणूनबुजून इतकी कमी किंमत सांगितली कीं त्या किंमतीत कुणीही एखादी गाय विकली नसती. विष्णू म्हणाला, "पंचवीस रुपयांना देशील कां?"

शिवने विष्णूला आपादमस्तक न्याहाळले आणि म्हटले, "ठीक आहे, आण पंचवीस रुपये."

विष्णूने चटकन खिशांतून पंचवीस रुपये काढून दिले. त्याला खूप आनंद झाला होता. शंभर रुपयांपेक्षा अधिक किंमतीची गाय त्याला केवळ पंचवीस रुपयांत मिळाली होती. शिवने इतक्या कमी किंमतीला गाय कां विकली हे कुतूहल त्याला होतंच. त्याने शिवला म्हटलं, "मी तर उगीचच कांहीतरी बोलायचं म्हणून अगदी कमी किंमत सांगितली. ही गाय चांगली शंभर रुपयांपेक्षां जास्त किंमतीची दिसते आहे. तूं ती इतक्या कमी किंमतीला कां विकतो आहेस?"

रुपये खिशांत ठेवून शिवने उत्तर दिले, "जेव्हां कुठलीही वस्तू माझ्या मालकीची नसते, तेव्हां ती विकताना तिच्या किंमतीबद्दल फारसा विचार किंवा घासाघीस न करण्याची माझी संवय आहे." असं बोलून बाजारांतल्या गर्दीत तो दिसेनासा झाला.

हे ऐकून विष्णूचे हातपाय लटपटले.

ती गाय तिथेंच सोडून तोही लगबगीने बाजारांतल्या गर्दीत मिसळून गेला, पण दुसऱ्या तऱ्हेने!

**देशपांडे**





# भारत :

## तेव्हां व आता

# द्वारका

## गतकालीन प्रशांती



भारतातले एक प्रमुख पौराणिक स्थळ आहे गुजरातेती द्वारका. दुसऱ्यातिसऱ्या कुणी नव्हे, तर प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्णानी वसवलेली ही पवित्र नगरी आहे. हिला द्वारावती म्हटलं जात होतं; त्यापूर्वीचं हिचं नांव होतं कुशस्थली.

पुराणकथेनुसार श्रीकृष्णाला आपल्या राजधानीसाठीं मोठ्या भूमीची आवश्यकता होती. म्हणून समुद्र मागें हटला आणि श्रीकृष्णाला आवश्यक भूमी मिळाली. श्रीकृष्णाच्या निधनानंतर समुद्र पुढें सरला आणि ती भूमी समुद्राने पुन्हां घेतली. म्हणजेच, द्वारकेचा एक भाग समुद्रांत बुडाला. परंतु श्रीकृष्णाच्या किल्ल्याच्या आंतला जो भाग होता तो तसाच राहिला. बेट द्वारका या नांवाने हे बेटाच्या रुपांत अजून उभे आहे.

बेट द्वारकेच्याजवळ खणल्यानंतर शेकडो वर्षांपूर्वी इथें एक समृद्ध शहर वसलेले होते याच्या खुणा आहेत. सध्यांची द्वारका ही पूर्वीच्या पांच शहरांच्या अवशेषांवर वसलेली आहे. पुराणांनुसार हे स्थान श्रीकृष्णापूर्वीच्या काळांतही होतं. परंपरेनुसार द्वारका भारतांतल्या सात पवित्र तीर्थक्षेत्रांपैकीं एक आहे. इतर सहा स्थाने आहेत - अयोध्या, मथुरा, उज्जयिनी, वाराणसी, हरिद्वार व कांचीपुरम.

श्रीकृष्णाचा महाल रमणीय रैवतक पर्वताच्या *पायथ्याशी तरी होता किंवा डोंगराच्या अर्ध्या* उंचीवर. बेट द्वारका म्हणजे डोंगरांचा एक समूह आहे. त्यांचा बहुतेक भाग नुसत्या रानटी झुडुपांनी भरलेला आहे व ही भूमी शेतीला निरुपयोगी आहे. परंतु निरनिराळ्या ठिकाणीं प्राचीन मूर्तींचे व वेळोवेळीं बांधलेल्या स्मारकांचे अवशेष अधूनमधून सांपडत असतात. त्यावरुन हे स्थान इतिहासाच्या वेगवेगळ्या काळांतही महत्वाचे होते हे स्पष्ट होते.

शंकराचार्यांनी भारतात चार पवित्र स्थानांवर चार मठांची स्थापना केली. दूर उत्तरेंत बद्रिकाश्रम दक्षिणेंत शृंगेरी, पूर्वेला पुरी आणि पश्चिमेंत द्वारका! द्वारकेंतला शंकरमठ, द्वारकेंतल्या सर्वांत आकर्षक स्थळाच्या, म्हणजे द्वारकाधीश मंदिरालगत आहे. या मंदिरात श्रीकृष्णाची मूर्ती द्वारकाधीशाच्या रुपांत स्थापन केलेली आहे.

गोमतीच्या किनाऱ्यावर स्थापन केलेल्या या मंदिराचा मूळ आराखडा श्रीकृष्णाचा पणतूण बज्रनाभ याने केलेला होता. राजा जगतसिंह राठोड यांनी बांधलेल्या या भव्य मंदिरात रोज हजारों भक्तांची गर्दी दर्शनासाठी जमत असते. श्रीकृष्णाचा महाल बेट द्वारकेंत बांधला होता आणि या मंदिराच्या ठिकाणीं त्यांचा राजदरबार होता.

इथली मूर्ती अत्यंत देखणी आहे. मेवाडची (चितोडगडची) राणी मीराबाई सन १५४६ मधें या मूर्तीत विलीन झाली होती असं मानतात.

मंदिराच्या दक्षिणेस ५६ पायऱ्या उतरुन गेल्यानंतर शांतसरिता गोमती नदी आहे. ही गुप्तपणें पवित्र गंगानदीस जाऊन मिळते असं भाविक मानतात.

या प्रसिद्ध मंदिरापासून दोन किलोमीटरवर श्रीकृष्णाची अर्धांगिनी रुक्मिणीदेवी हिचे मंदिर आहे. जवळच नागेश्वर महादेव तीर्थ नांवाचे एक पुरातन शिवमंदिर आहे. त्याच्यानजिक एक पवित्र झरा आहे. तिथें श्रीकृष्णाच्या बालपणांतली मित्रमंडळी गोपगोपी, त्यांचा सखा श्रीहरी याला भेटण्यासाठीं द्वारकेला आले होते. त्यांच्यासाठी इथें शिबीर स्थापले होते.

भगवान श्रीकृष्णापासून, शंकराचार्य आणि मीराबाईपर्यंत भूतकाळांतल्या आठवणींत द्वारकानगरी रमलेली असते.

नगराच्याजवळच कांही आधुनिक उद्योगधंद्यांच्या व्यतिरिक्त, द्वारका अजूनही एक शांतनिवांत भूमी आहे. आधुनिक जीवनशैलीतली सर्व साधने असली तरी इथल्या वातावरणांत भूतकाळांतल्या ऐश्वर्याचाच जास्त प्रभाव आहे.

आधुनिक द्वारकेंत अनेक शैक्षणिक व सांस्कृतिक संस्था आहेत. भारतातल्या इतर शहरांप्रमाणेंच त्या संस्था द्वारकेचे एक अभिन्न अंग आहेत. सुदैवाने इथले पारंपारिक भक्तीमय वातावरण अद्यापही कायम आहे. बहुतेक संस्था श्रीकृष्णाच्या कोणत्या ना कोणत्यातरी नांवाशी निगडीत आहेत.

कोणे एके काळीं स्वयं भगवान इथले राजे होते, या गोष्टीचा जर द्वारकानिवासी नागरिकांना अतिशय अभिमान वाटत असला, तर त्यांत आश्चर्य कसले?



# दुनियेला धडा शिकवणारा कलंक



प्राचीन अथेन्स शहरांत खेळांचे ऑलिंपिक सामने मोठ्या उत्साहाने आयोजित केले जात असत. बऱ्याच वर्षांनंतर ६ एप्रिल १८९६ रोजीं सामन्यांचे पुनरुज्जीवन करण्यांत आले.

प्राचीन काळांतल्या ऑलिंपिक सामन्यांत, विजेत्याला, ऑलिव्ह झाडाच्या पानांचा मुकुट पारितोषिक म्हणून दिला जात असे. त्याच्या गौरवाचं ते प्रतीक होतं. खेळाडूंची कुवत, कौशल्य, धमक व



## आजचे जग

सहनशक्ती या सामन्यांत आजमावली जात असे. आणि हे सारे गुण फक्त निष्कलंक चारित्र्य, सरळ स्वभाव व प्रामाणिक असलेल्या खेळाडूंतच असूं शकतात असा पूर्वीच्या लोकांचा गाढ विश्वास होता.

ऑलिंपिक खेळांचे सामने पुन्हां सुरु झाले खरे, पण पूर्वीच्या काळांत असलेली खिलाडू वृत्ती मात्र त्यांत राहिली नाही. हळूंहळूं या खेळांत भाग घेणें म्हणजे चांगला पैसा कमावणें अशी अनेकांची धारणा होऊं लागली. जुन्या काळांतल्या खेळाडूंमधे वागण्यांतली आदब, वैयक्तिक स्वाभिमान आणि शूर वृत्ती दिसून येई पण सध्या मात्र एक सामुदायिक अहंकाराची वृत्ती खेळाडूंमधें पसरलेली दिसते. एखाद्या देशाचे नागरिक इतक्या उथळ आणि क्षुद्र वृत्तीने वागायला लागतात, कीं जणूं कांही त्यांच्या देशाचे मोठेपण, या खेळांत जिंकायला जाणाऱ्या या मूठभर खेळगड्यांच्या हातांतच राहिलंय! खेळाडू आपली खिलाडू वृत्ती विसरले आणि ते खेळायला लागले केवळ पैशासाठीं किंवा आपल्या सामुदायिक अहंकारासाठी !

आपले साध्य व लक्ष्य जर कुणी विसरले, तर त्यांतला मूळ उद्देश बारगळतो, बिघडतो व कुजतो. खेळांत भाग घेणाऱ्या स्पर्धकांनी उत्तेजक, मादक औषधांसारखे अनैसर्गिक मार्ग स्वीकारले, केवळ जिंकण्यासाठी ! आज हे घोर व कटु सत्य उघड स्वरूपांत आपल्यासमोर उभे ठाकलेले आहे. दक्षिण आफ्रिकेच्या क्रिकेट संघाच्या कप्तानाला लांच दिल्याचा आरोप आहे. त्याने जाणूनबुजून भारतीय संघासमोर पराभव पत्करला. कारण ज्यांनी या खेळावर भारताच्या बाजूने पैजा लावल्या होत्या, त्यांचा भरघोस फायदा झाला असता. हा आरोप सध्यां चर्चेचा विषय आहे आणि त्याची सरकारी स्तरावर कायदेशीर चौकशी चालू आहे.

यामुळें एक गोष्ट स्पष्ट आहे - घडूं नयेत अशा गोष्टीही घडतात.

ही शरमेची बाब आहे. जर या घटनेपासून आपण कांहीच शिकलो नाही तर भविष्यकाळांत यापेक्षांही जास्त धक्कादायक आणि लाजिरवाण्या गोष्टी घडतील. खेळांबद्दलचे आपले आचरट प्रेम आपण कमी केले पाहिजे. खेळाचे, खेळांडूचे कौतुक जरूर करावे, परंतु



आपले भवितव्य त्यांच्यावरच अवलंबून असल्यासारखे अवास्तव महत्व त्यांना देऊं नये.

खेळांचे प्रशिक्षण, नवशिक्या, लहान, उमेदवारांना देताना, प्रत्येक देशाने खेळाबद्दलची योग्य वृत्ती त्यांच्यामधे रुजवली पाहिजे. आपला दृष्टीकोन निकोप असला कीं आपल्या आयुष्यांतल्या प्रत्येक गोष्टीकडे चांगल्या दृष्टीने आपल्याला पहाता येते.

कायद्याच्या कक्षेंतून पाहिलं तर खेळांच्या निकालावर पैजा लावणे हे कायद्याने बंद केले पाहिजे. शिवाय जी मंडळी यांत भाग घेतात त्यांना कठोर शिक्षा व्हायला हवी. खेळाचा व्यापार होऊं देऊं नये.

सुप्रसिद्ध लेखक जॉर्ज ऑरवेल यांनी मोठे मार्मिक विधान त्यांच्या "खिलाडू वृत्ती" या निबंधात केले आहे. ते म्हणतात, "गंभीरपणें जिंकण्यासाठी, हारजीत होणाऱ्या खेळांचा न्यायीवृत्तीशी संबंध नसतो. जिंकण्यासाठी खेळताना, ईर्षा, मत्सर, तिरस्कार, बढाई, नियमांचे उल्लंघन व क्रौर्य पाहताना मिळणारा आसुरी आनंद, दुष्टपणा - या साऱ्या गोष्टी खेळाभोवती गोळा होतात. दुसऱ्या शब्दांत सांगायचं तर ती बिनबंदुकांची लढाई ठरते."

ऑरवेलनी आपल्याला सावधानतेचा इशारा दिलेला आहे. आपण जर आपल्या निष्क्रिय वृत्तींत व बघ्यांच्या भूमिकेंत बदल केला नाही, तर खेळाऐवजी ते खेळाचं विडंबन होत राहील.

# खास बातम्या

## तुमचा नवा शानदार शत्रू

तुमच्या मित्राने वर्गात सेलफोन आणला म्हणून तुम्ही तुमच्या वडिलांकडे सेलफोन किंवा मोबाईल फोन मागितला आहे कां? कृपा करुन तुम्ही या मागणीचा आग्रह धरुं नका. जर तुमच्या मित्राबद्दल तुमच्या मनांत प्रेम असेल तर त्यालाही फोन न वापरण्यास सांगा. सेलफोनचा वापर करणाऱ्यांना ब्रेनट्यूमर सारखे प्राणघातक रोग होण्याची भिती शास्त्रज्ञांनी बोलून दाखवली आहे. त्याविषयीं अधिक सखोल संशोधन चालूं आहे. परंतु धोक्याची सूचना ऐकण्यांत शहाणपणा आहे. नाहीतरी, ही एक केवळ संवयीचीच बाब आहे!



## मोनालिसाचा चित्रकार

पंधराव्या शतकांतला इटॅलियन कलावंत लिओनार्दो द व्हिंची याने काढलेले मोनालिसा हे जगांतल्या सर्वोत्तम चित्रांपैकीं एक आहे. लिओनार्दो हा एक अद्वितीय बुद्धिमत्तेचा कलाकार होता. माणसें कशी उडूं शकतील याच्या यंत्रणेबद्दल त्याच्या कांही निश्चित कल्पना होत्या. अशा उडत्या यंत्रांची अथवा विमानांची रेखाचित्रें त्याने काढलेली आहेत.

त्या काळांतले चित्रकार त्यांचे स्वतःचे रक्त व लाळ किंवा थुंकी रंगात मिसळत असत. आता संशोधकशास्त्रज्ञ लिओनार्दोचे DNA त्याच्या चित्रांवरुन शोधून काढणार आहेत. त्या शोधामुळें त्याच्या व्यक्तिमत्वाबद्दल आपल्याला बरीच माहिती मिळेल. टस्कनच्या लिओनार्दो म्युझियमचे संचालक म्हणतात, ''आम्ही आमच्या शास्त्रज्ञांची मदत घेऊन, याचा एखाद्या गुन्ह्याचा पोलिस छडा लावतील, त्यापद्धतीने पाठपुरावा करीत आहोत.''



## मंगळनिवासींचा आहार

मंगळनिवासी म्हणजे आपल्या पृथ्वीवरचे जे अंतराळवीर मंगळावर जातील ते! त्यांची ही यात्रा पूर्ण होण्यास एक हजार दिवस लागतील. संशोधनाअंती असे दिसून आले आहे की हे वीर शाकाहारी असायला हवेत. म्हणजे अवकाशांत उगवूं शकणाऱ्या पंधरा अन्न-पदार्थांवर त्यांची गुजराण होऊं शकेल. उदा. गाजर, गहूं, टोमॅटो, सोया आणि सर्वांत महत्वाची म्हणजे मिरची!





## चालू महिन्यात जन्मलेली विशेष व्यक्ती

२३ जुलै १८५६ रोजीं बाळ गंगाधर टिळक यांचा जन्म झाला. त्यांना टिळक महाराज असेही संबोधलं जात असे. टिळक हे ''भारतीय अशांततेचे जनक' व त्यांचे नामवंत राजकीय सहकारी श्री. अरविंदबाबू घोष हे 'भारतीय राष्ट्रीयतेचे प्रेषित' म्हणून भारताच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत. या दोघांनी इंडियन नॅशनल कॉंग्रेसला एक निश्चित धाडसी दिशा दिली.

टिळक महाराजांचा जन्म महाराष्ट्रांत रत्नागिरी येथें झाला. ते कायद्याचे पदवीधर झाले. पण वकिलीचा व्यवसाय करण्याऐवजीं ते पत्रकार व समाजकार्यकर्ते झाले. ''केसरी'' या मराठी वृत्तपत्राचे, व 'मराठा' या इंग्लिश वृत्तपत्राचे ते संपादक होते.



बाळ गंगाधर टिळक

१८९७ मधें त्यांनी सर्वश्रेष्ठ मराठी राज्यकर्ता छत्रपती शिवाजी यांच्या स्मरणार्थ वार्षिक उत्सव सुरुं केला. जनतेमधील सुप्त राजकीय भावना चेतवण्यासाठीं या उत्सवाचा उपयोग झाला. त्यावेळेस पुण्यांत प्लेगची महाभयंकर साथ आली होती. त्यावर उपाययोजना करण्याच्या निमित्ताने ब्रिटिश सरकारच्या अधिकाऱ्यांनी व सोजीरांनी पुण्यांतल्या सामान्य नागरिकांना अतोनात छळले व अपमानित केले. टिळकांनी यावर कडाडून टीका केली. त्यामुळें राजद्रोहाच्या आरोपाखालीं त्यांना तुरुंगवासाची शिक्षा झाली.

१९०७ साली सुरतेला इंडियन नॅशनल कॉंग्रेसचे ऐतिहासिक अधिवेशन झाले. श्रीअरविंदबाबू व टिळक, या दोघांच्या नेतृत्वाखालीं बऱ्याच प्रतिनिधींना वाटत होते कीं ब्रिटिश सत्तेकडून संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी करावी. मवाळ गटाच्या प्रतिनिधींना हे फारच धाडसी पाऊल ठरेल असे वाटत होते. ह्याचा परिणाम म्हणजे कॉंग्रेसमधें फूट पडली. कॉंग्रेसच्या जहाल गटाने श्रीअरविंदांच्या अध्यक्षतेखाली वेगळे सत्र भरवले. त्यांत टिळक हे प्रमुख वक्ते होते.

१९१० साली श्रीअरविंदबाबू पॉंडिचेरीला गेले आणि १ ऑगस्ट १९२० रोजीं लोकमान्य टिळकांचा मृत्यू झाला.

टिळक हे केवळ राजकारणधुरंधर नव्हते तर एक गाढे अभ्यासू विद्वान होते. 'गीतारहस्य' आणि 'ओरायन' ही त्यांची अमर पुस्तकें आहेत.

टिळक म्हणाले होते. ''या जगांत आणखीही कांही श्रेष्ठ शक्ती आहेत, व त्यांचा अंमल आपल्या नियतीवर असतो. परमेश्वराची हीच इच्छा असेल कीं ज्या कार्यासाठीं मी लढतो आहे, ते कार्य मी तुरुंगाबाहेर असण्यापेक्षां, जर मी तुरुंगात असलो, तर ते जास्त चांगल्याप्रकारें साध्य होऊं शकेल.''

या अंकापासून आम्ही आपल्या सृजनात्मक
चढाओढीला नवीन आकार देत आहोत

# सृजनात्मक चढाओढ

खाली एक कथेचा आरंभ दिलेला आहे. यात एक रोचक कथा बनण्याचे सारे लक्षण हजर आहेत. परंतु हे 'सृजन' तुमच्या हातात आहे. तुम्हाला सर्व संभवनीय कथाक्रमांची कल्पना करायची आहे अन् कथेला अन्तिम रूप द्यायचे आहे. अन् ती आकर्षकही शीर्षकही द्यायचे आहे. ही कथा संभर ते दोनशे शब्दात पूर्ण करायची आहे. ही चढाओढ आमच्या बाल वाचकांसाठी आहे. रचनेबरोबरच स्पष्ट अक्षरात आपले नाव, वय, इयत्ता, विद्यालयाचे नाव आणि पिन कोड सह आपल्या घराचा पत्ता लिहायला मुळीच लिहायला विसरू नका. हे सिद्ध करून द्या कि आपण प्रौढ व्यक्तींपेक्षाही चांगलं लिहू शकता. यासाठी त्यांची मदत घेऊ नका.

गंगा नगरच्या शाही बगीचांच दृश्य नेहमीच सुन्दर दिसतं. त्यात अनेक फळं देणारे वृक्ष आणि फुलं देणारी रोपं आहेत. माळी प्रत्येक वृक्ष व रोपांची आपल्या स्वतःच्या मुलांप्रमाणे सावधपणे देखरेख करत असे.

त्या बागांमधे खूप माकडे होती. परंतु ती सामान्य माकडांपेक्षा निराळीच होती. त्यांचं फुलांवर फार प्रेम असे. माळ्याला फुलांची देखरेख करताना ती नेहमीच पहात असत. ती कधी फुलांचे ताटवे खराब करत नसत.अन् फुलंही तोडत नसत. त्यामुळे माळ्याबरोबर त्यांची मैत्री झाली होती.

एके दिवशी माळ्याला कुठे बाहेर जायचे होते. त्याच्या पश्चात् रोपांना पाणी कोण घालणार? तो याचा विचार करू लागला. आणि शेवटी त्याच्या मनात एक विचार आला. त्याने काही माकडांना बोलावून एका दिवसासाठी आपलं काम करून द्यायला विनंती केली ती सर्व कबूल झाली. त्या सर्वांनी पाण्याची बादली पाहिली होती. अन् त्यांना पाणी कुठून आणायचं हेही माहीत होतं.

दुसऱ्या दिवशी सर्व माकडं एकत्र झाली आणि रोपांना पाणी घालू लागली. त्यांचा नेता दुरून कामावर देखरेख करत होता. परन्तु अचानक त्याला एक शंका आली. "रोपांना पुरेसं पाणी मिळत आहे का? काही रोपांना ज्यास्त पाणी तर घातलं जात नाहीय?

अन् या अडचणीचा तोडगा त्याने कसा काढला? चला, आपलं पेन अन् कागद हातात घ्या. तुमची प्रवेशिका आम्हाला ३० जून पर्यंत मिळायला हवी. विजयी प्रवेशिका ऑगस्ट अंकात प्रकाशित होईल.

इस समस्या का समाधान उसने कैसे किया? चलो, अपनी लेखनी और कागज उठाओ. तुम्हारी प्रविष्टि हमें ३० जून तक मिल जानी चाहिये. विजयी प्रविष्टि अगस्त अंक में प्रकाशित होगी.

-संपादक

## जून २००० च्या अंकात प्रकाशित प्रश्नोत्तरीची उत्तरे

१. हे होतं सरोवरावर बसलेल्या बगळ्याच्या रूपात मृत्युदेवता यमाकडून विचारलेल्या टाका प्रश्नाचं युधिष्ठिराकडून दिलं गेलेलं. उत्तर.

२. अ. शकुनि हा गांधारचा राजकुमार होता.
ब.महामेरू हे स्थान जिथे केसरी रहात होता, ते होतं.
स. सहदेवने युधिष्ठिरच्या राजसूय यज्ञापूर्वी महिष्मती राजाला पराजित केलं होतं.
द. भरताची माता कैकयी ही कैकय नरेशाची कैकय याची कन्या होती.
इ. वाल्मिकी ऋषींचा आश्रम तमसा नदीच्या किनारी होता.






# पंखवाला घोडा

दृढनिश्चयी राजा विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन शव खाली उतरवले, आणि ते आपल्या खांद्यावर घेऊन तो स्मशानाच्या दिशेने चालू लागला. त्या रात्रीं घनदाट अंधार होता, सोसाट्याचा वारा, विजांचा लखलखाट आणि भूतप्रेतांच्या कर्कश किंकाळ्यामुळें वातावरण जास्तच भीतीदायक झाले होते. तरीही निर्भय विक्रमार्क पुढें चालला होता. जेव्हां हृदयाचा थरकांप करणाऱ्या स्मशानाच्या जवळ तो आला, तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ म्हणाला, ''राजन, मी तुला सांगूनसांगून थकलो. अरे, तुझे हे श्रम व्यर्थ आहेत. विनाकारण तूं या मध्यरात्रीं संकटाशी खेळतो आहेस. ज्या उद्देशाने आणि कामनापूर्तीसाठीं तू इतकं साहस



करतो आहेस, तो तुझा हेतू कधीही पूर्ण होणार नाही. बुद्धिमान व्यक्ती प्रथमच विचार करतात कीं ज्या कार्यसिद्धीसाठीं ते धाडस करायला जातात, ते कार्य त्या सिद्धीच्या योग्यतेचे आहे किंवा त्या सिद्धीजोगे ते कार्य अनुरूप आहे कां हे! कठीण पुरुषार्थ दाखवून कोणतीही इच्छित वस्तू मिळवणे एवढंच पुरे होत नाही. त्या वस्तूच्या योग्यतेचे असणे हे जास्त महत्वाचे आहे.

''शांतीपूर राज्यांतला एक युवक प्रताप, असाच एक पुरुष होता. त्याने असंभव वाटणारे कार्य करुन दाखवले. पण त्या कार्याच्या योग्यतेचा तो नव्हता. त्यामुळें त्याचे सारे श्रम वायां गेले. तुला समजावून सांगण्यासाठी त्याची कहाणीच तुला ऐकवतो. नीट लक्ष देऊन ऐक.'' असं म्हणून वेताळाने त्याला ही गोष्ट सांगितली.

''शांतीपूरचा राजा इंद्रसेन याची एक मुलगी होती, देवदत्ता ! तीं जेव्हां विवाहयोग्य झाली तेव्हां राजाने मंत्र्यांना तिच्यासाठी एक चांगला योग्य राजकुमार शोधण्यास सांगितले. आसपासच्या राज्यांत त्यांनी चौकशीसाठीं दूत पाठवले.

देवदत्ताला जेव्हां हे कळलं तेव्हां ती म्हणाली, ''पिताश्री, लहानपणापासून माझी एक प्रबळ इच्छा आहे. जो कोणी माझी ही इच्छा पूर्ण करेल त्याच्याशीच मी विवाह करीन.'' ''तुझी काय इच्छा आहे ते तरी सांग. मी तुझ्यासाठीं अगदी तुला हवा तसाच राजकुमार शोधून काढीन.'' राजाने प्रेमाने लेकीला विचारले.

''माझी इच्छा आहे कीं पांढरे पंख असलेल्या घोड्यावर बसून स्वच्छ, शुभ्र चांदण्यांत आकाशांत विहार करुन यावं. जो राजकुमार किंवा इतर कुणीही असा घोडा आणील त्याच्याशी मी लग्न करीन. हा माझा अगदीं अटळ निश्चय आहे. जर कुणालाही हे जमलं नाही, तर मी आजन्म अविवाहित राहीन.'' राजकन्येने निश्चयपूर्वक सांगितले.

हे ऐकून राजाला आश्चर्य वाटलं आणि त्याबरोबर तिची काळजीही वाटायला लागली. त्याच्या मनांत आलं, ''कहाण्यांमधे पंखवाल्या घोड्याबद्दल वाचलं होतं. पण पृथ्वीवर असले घोडे असतात याला कांहीच ठोस पुरावा नाही. एखादी व्यक्ती कितीही शूर असली तरी हे अशक्य कार्य त्याला पूर्ण करता येणार नाही.''

राजा इंद्रसेनाने आपल्या मुलीला समजावून सांगितलं कीं हे अशक्य कोटींतलं काम आहे. पृथ्वीवर राहाणाऱ्या मानवाला हे काम करता येणार नाही. कदाचित स्वर्गलोकांत राहाणारे देव करुं शकतील. तेव्हां तिने आपला निश्चय बदलावा. पण राजकन्या हट्टास पेटली होती.

नाईलाजाने राजाने देशभर घोषणा करवली कीं जो राजकुमार किंवा व्यक्ती पांढऱ्या पंखांचा घोडा आणील त्याच्याशी राजकन्येचा विवाह होईल.

वर्षभरांत अनेक राज्यांतल्या राजकुमारांनी घोडा



मिळवण्याचे प्रयत्न केले पण त्यांना जमले नाही.

त्या राज्यांत प्रताप नांवाचा एक सुंदर व साहसी तरुण होता. त्याने राजाची ही घोषणा ऐकली. पण एक वर्षापर्यंत जेव्हां हे आव्हान स्वीकारायला कोणी राजकुमार पुढें येऊं शकला नाही, तेव्हां प्रतापने हे आव्हान सर्व तरुणांसाठीं आहे असे मानले. तो मनांत विचार करुं लागला.

वीस वर्षांचा हा तरुण प्रताप त्याच्या परिवारांत एकटाच राहिला होता. फुलें विकून व फुलांची सजावट करुन तो आपला चरितार्थ चालवत होता. रंगीबेरंगी, सुगंधी फुलांच्या माळा बनवणें. उत्सवामधें मुख्य दरवाजांवरची तोरणें बनवणें, मंदिरातल्या भगवंताच्या मूर्ती फुलांनी मढवणें, हाच त्याचा पोटापाण्याचा व्यवसाय होता. मंदिरातल्या मूर्ती तो विशेष श्रद्धेने सजवत असे. म्हणून पुजाऱ्यांचा तो फार लाडका होता.

एक दिवस तो पुजाऱ्याला राजाच्या घोषणेबद्दल सांगत होता. तेव्हां त्याने विचारले, ''पुजारीजी, भूलोकांत पंखवाला घोडा मिळतो कां हो? कां असला घोडा फक्त पुस्तकांतच दिसतो?''

पुजाऱ्याने हंसत म्हटले, ''पंखवाले घोडे पृथ्वीवर नसेनात कां, परंतु इतर कांही लोकांत हे मिळूं शकतात. या लोकांत देवांच्या अनेक जाती निवास करतात. आपल्या राज्याच्या जवळच विंध्यपर्वत मालेच्या दऱ्याखोऱ्यांत कितीतरी जुनी मंदिरें आहेत. ज्यांनी तिथें जायचं धाडस केलं, त्यांचं म्हणणं आहे कीं तिथल्या सरोवरांत स्नान करण्यासाठीं गंधर्वकन्या त्यांच्या लोकांतून बऱ्याचवेळां येतात. आपल्या डोळ्यांनी त्यांना पाहिल्याचं ही मंडळी खात्रीपूर्वक सांगतात.''

पुजाऱ्याच्या सांगण्यावर प्रतापचा विश्वास बसला. दुसऱ्याच दिवशीं सकाळीं तो विंध्यपर्वतराजीच्या दिशेने चालूं लागला. जंगले आणि पहाड पार करताकरता सूर्यास्तापूर्वी तो एका



नयनरम्य खोऱ्यांत येऊन पोंचला. तिथें पाण्याचा एक सुंदर धबधबा होता. जवळच कांही गुंफा होत्या. धबधब्याच्या आजूबाजूला सुंदर दाट वृक्षराजी होती. चहूंकडे सुंदर रंगीत फुलांनी डंवरलेली झुडुपं होती. त्या जागेचे अद्भुत नैसर्गिक सौंदर्य पाहून तो तिथेंच थबकला.

सूर्यास्ताच्या वेळेच्या संधिप्रकाशांत त्या जागेला कांही आगळेंच स्वर्गीय तेज आले होते व ती जागा अतिशय मोहक वाटत होती.

तिथली फुलें पाहून त्याचं कलासक्त मन उचंबळून आलं. तिथल्या उंच झाडांना बिलगलेल्या फुलवेलींच्या कुंजात त्याने एक वेलींचा झोंपाळा बनवला व रंगीत फुलांच्या माळांनी तो सजवला. तोपर्यंत सूर्यास्त होऊन गेला. शुक्ल पक्ष असल्यामुळें शुभ्र चांदणें पानांमधून झिरपत झोंपाळ्यावर पडत होते. तिथला देखावा एखाद्या स्वप्नलोकांत असावा असा अतिप्रसन्न व विलोभनीय होता. तो एका



वृक्षाच्या फांदीवर बसला आणि आनंदाने ते दृश्य न्याहाळूं लागला. त्याने आपल्या गळ्यांत आणि हातांतही फुलांच्या माळा घातल्या.

रात्रीचे दोन प्रहर उलटल्यानंतर आकाशमार्गानें कांही गंधर्वकन्या तिथें उतरल्या. त्या सर्वजणींनी तिथल्या धबधब्याच्या पाण्यांत स्नान केले व एका गंधर्वकन्येखेरीज बाकी सगळ्याजणी परत गेल्या. तिचं नांव चारुशीला होतं. जेव्हां तिची नजर त्या झोंपाळ्यावर पडली, तेव्हां ती फारच खूष झाली व त्यावर बसून झोका घेऊं लागली.

थोडा वेळ झोके घेतल्यानंतर तिने त्या झोंपाळ्याकडे निरखून पाहिले. जितकी ती लक्षपूर्वक तो झोंपाळा पाहात होती, तितकी ती बेचैन होऊं लागली. तिला वाटलं होतं कीं झाडाच्या फांद्यांचा झोंपाळा आपोआप बनला आहे, त्यांत जडवलेली फुलेंही वेलीवरुन झोंपाळ्यावर पडली असावीत असं तिला प्रथम वाटलं. ती विचार करुं लागली कीं झाडाला पानं, फुलं येतात तसा झोंपाळा कसा निर्माण होऊं शकेल? ही कोणत्या कलाकाराची किमया आहे?

चारुशीला असा विचार करीत होती तोंच झोंपाळ्याजवळ मंदस्मित करत असलेल्या एका सुंदर तरुणाकडे तिचं लक्ष वेधलं. "कोण? मानवांना वर्ज्य असलेल्या या निर्जन अरण्यांत रात्रीं येणारा तूं कोण आहेस?" चारुशीलाने विचारले.

"आपण आम्हा मनुष्यांपेक्षां वेगळ्या अशा अनुपम सुंदर, अलौकिक गंधर्वकन्या असाव्यात असं वाटतं. पण मी मात्र एक सामान्य मनुष्य आहे, आणि एका खास कारणासाठी इथें येण्याचे धाडस मी केले आहे. जर आपण खरोखरच गंधर्वकन्या असलात तर आपली मदत मला हवी आहे. मी फुलांचा कलाकार आहे आणि आपल्या लोकांचे मन प्रसन्न करण्यासाठींच मी फुलें आणि वेलींचा हा झोंपाळा बनवला आहे." प्रतापने मोठ्या नम्रतेने आणि सौजन्यपूर्वक सांगितले.

"अद्भुत! जर तूं हा झोंपाळा बनवला असशील तर तूं एक असामान्य कलाकार आहेस, आणि अभिनंदनास पात्र आहेस. बोल, माझ्याकडून काय मदत हवी आहे तुला? जर कांही मी करुं शकले तर मला खूप आनंद वाटेल."

प्रतापने तिथें येण्याचा आपला उद्देश तिला सांगितला. "हो, आमच्या गंधर्वलोकांत पांढऱ्या पंखांचे घोडे जरुर आहेत. पण मी तुला त्याठिकाणी फक्त पोंचवूं शकते, घोडे आणण्यासाठीं मी दुसरी कोणतीही मदत करुं शकणार नाही. बाकीचे काम तुला आपली बुद्धि व बळ वापरुनच करावे लागेल." इतकं बोलून गंधर्वकन्येने प्रतापचे रुप एका फुलांच्या हारांत बदलून टाकले. तो हार गळ्यांत घालून, जिथें पांढऱ्या पंखाचे घोडे होते त्या गंधर्वलोकांत ती पोंचली. तिथें गेल्यानंतर तिने प्रतापला पुन्हां मनुष्याच्या रुपांत बदलून टाकले व ती तिथून निघून



गेली.

प्रताप गंधर्वलोकांतल्या पांढऱ्या पंखवाल्या घोड्यांचे सौंदर्य बघून चकितच झाला. तिथली प्रत्येक गोष्ट - झाडें झुडुपें, घरें, जमीन, आकाशांतल्या स्वप्नांप्रमाणें सुंदर आणि मनमोहक होती.

एका घोड्याला त्याने तिथल्याच फुलांपानांनी सजवलं, आणि स्वतःच्या अंगावरच्या फुलांच्या माळा त्याने घोड्याच्या गळ्यांत घातल्या, त्यामुळें तो घोडा जास्तच देखणा दिसूं लागला.

घोडा प्रतापला म्हणाला, "ऐक, मंगल वाद्यांचे आवाज ऐकूं येत आहेत. थोड्याच वेळांत गंधर्वराज सुवर्णगंभीर त्यांच्या वाढदिवसाच्या स्वारीसाठी घोडा पसंत करायला इथें येतील. सुदैवाने जर माझी निवड झाली तर मी तुझी इच्छा पूर्ण करीन.

"तूं मला फुलांनी इतकं छान सजवलं आहेस. मी खूप देखणा दिसूं लागलो आहे. गंधर्वराज इथें येतील तेव्हां मात्र तूं बागेत लपून बैस. मी तुला रात्रीं येऊन भेटेन."

गंधर्वराज त्या घोड्याचं सौंदर्य बघून खरोखरच मुग्ध झाला. त्याने वर्षभर स्वारीसाठीं ह्याच घोड्याला पसंत केलं. त्या घोड्याची पूजा-अर्चना झाल्यावर राजा त्यावर बसला. राजा राजभवनांत परत गेल्यानंतर तो घोडा प्रतापजवळ आला आणि म्हणाला, "हे मानव युवका, मी तुझा फार आभारी आहे. तुझ्या सजावटीमुळेंच राजाचा खास घोडा बनण्याचं सौभाग्य मला मिळालंय. बोल आता, तुझी काय इच्छा आहे?"

प्रतापने घोड्याला गंधर्वलोकांत येण्याचा आपला हेतू सांगितला. प्रतापचे बोलणें ऐकून घोडा म्हणाला, "हे बघ तरुणा, तूं निश्चितच एक धाडसी युवक आहेस. त्याचप्रमाणें एक महान कलाकार आहेस. या गुणांमुळेंच तूं पृथ्वीवरुन गंधर्वलोकांपर्यंत येऊं शकलास. तरीदेखील राजकुमारीशी विवाह करुन



राजा होण्याचं तुझं स्वप्न अनुचित आहे. तुझ्या मनोवृत्तीला आणि स्वभावधर्माला ते योग्य ठरणार नाही. राजधर्म कठोरधर्म आहे, आणि कला, त्यांतून पुष्परचनांची कला, फुलांसारखीच कोमल असते. तरीही, मी तुला जे वचन दिलं आहे ते मी अवश्य पाळीन. चल, बैस माझ्या पाठीवर. मी तुला राजकन्येकडे घेऊन जातो."

घोड्याचे बोलणें ऐकून प्रताप जरा चिंतेत पडला. मग थोडा विचार करुन तो घोड्यावर बसला. आकाशमार्गानें उडतउडत थोड्या वेळांत तो घोडा शांतीपूर राज्याच्या राजउद्यानांत उतरला.

चांदण्या रात्रीचे उद्यानांतले नैसर्गिक सौंदर्य पाहण्यासाठीं राजकन्या देवदत्ता बागेंत होती. तिच्या मनांत असलेल्या पांढऱ्या पंखवाल्या घोड्याच्या स्वप्नांत गुंगली होती. तितक्यांत खरोखरच पांढऱ्या पंखांचा एक घोडा उडत आला व बागेंत उतरला. घोड्याच्या पाठीवर एक सुंदर तरुण पाहून ती

आश्चर्यचकित झाली.

प्रताप घोड्यावरून उतरला व राजकन्येजवळ येऊन म्हणाला, "राजकुमारीजी, आपण लहानपणापासून पंखवाला घोडा बघण्याचं स्वप्न पाहात होतात. तो घोडा याक्षणीं आपल्या डोळ्यांसमोर आहे. यावर बसून पाहिजे तितका वेळ चांदण्या आकाशांत हिंडून यावे." इतकं बोलून प्रताप तिथून निघून गेला."

वेताळाने ही गोष्ट सांगून विक्रमार्कला प्रश्न केला, "राजन, ज्या लक्ष्याच्या पूर्तीसाठीं प्रतापने इतकं साहस दाखवलं आणि श्रम केले, त्या लक्ष्यापर्यंत पोंचून त्याला तिलांजली देऊन टाकली. तो इतका विचारशून्य होता कां, कीं त्याची बुद्धि चालेनाशी झाली होती? तो असा कां वागला? त्याने राजकन्येशी विवाह कां केला नाही? याचं स्पष्टीकरण माहीत असूनही जर तूं सांगितलं नाहीस तर तुझ्या डोक्याचे तुकडेतुकडे होतील."

वेताळाचा संदेह दूर करण्यासाठी विक्रमार्कने आपले मौन सोडले व तो म्हणाला,

"प्रतापने सुरुवातीपासूनच राजकन्येशी विवाह करण्यांत जास्त स्वारस्य दाखवले नव्हते. तो धाडसी होता पण महत्वाकांक्षी नव्हता. राजकन्येशी विवाह करण्याच्या लालसेनेच पंखवाल्या घोड्याचा शोध त्याने केला नव्हता. सर्व तरुणांना हे एक आव्हान समजून तो घोड्याच्या शोधांत निघाला. जेव्हां देशांतले सारे राजपुत्र याबाबतींत असमर्थ ठरले तेव्हां त्याने हे आव्हान स्वीकारले.

"राजकन्येशी विवाह न करण्याचं दुसरं कारण असं होतं कीं पंखवाल्या घोड्याचा सल्ला त्याला पटला होता. तो साहसी होता पण कठोरहृदयी नव्हता. तो फुलांची सजावट करण्याच्या कलेंत इतका वाकबगार होऊं शकला, कारण त्याचा स्वभाव संवेदनाशील व हळवा होता. पानें, फुलें आणि झाडेंवेली यांच्याशी त्याचे मन जुळलेले होते. आपल्या कल्पनेने फुलांचे नैसर्गिक सौंदर्य वाढवणें हाच त्याचा व्यवसाय, धर्म आणि कर्म होतं. राजभवनांत तो कधीही सुखी राहिला नसता. पंखवाल्या घोड्याच्या सूचनेमुळें त्याला आपल्या मूळस्वभावधर्माचे मर्म समजले.

म्हणून बराच वेळ विचार केल्यानंतर प्रतापने निर्णय घेतला कीं तो राजकन्येशी विवाह न करता पूर्वीप्रमाणेंच सर्वसामान्य नागरिकाचे जीवन व्यतीत करेल. निःस्वार्थीपणाने त्याने राजकुमारीचे अशक्य वाटणारे स्वप्न पूर्ण केले, याचा त्याला जो आनंद मिळाला, तितका आनंद राजा झाल्या-नंतर बहुधा मिळाला नसता."

राजाचे मौन भंग होताच वेताळ उडत जाऊन पुन्हां झाडावर जाऊन बसला.







# राक्षसाचा आजार

जुन्या काळची गोष्ट आहे. एका घनदाट जंगलाच्या जवळच एक गांव होते. त्या गांवात रघुनंदन नांवाचा एक निष्णात वैद्य राहात होता. त्याचं औषध नेहमी लागू पडत असे. औषध घेतलं कीं रोग पळायचा. त्यामुळें त्याच्या घरीं आजाऱ्यांची नेहमी रीघ लागलेली असे.

रोग्यांकडून रघुनंदन कधीं पैसे मागत नसे. पण लोक त्याला कृतज्ञता म्हणून फूल ना फुलाची पाकळी देत असत. अशाप्रकारें त्याचा उदरनिर्वाह चाले. गरीब रोग्यांकडून तो कांहीही घेत नसे.

त्याचा हा उदार स्वभाव त्याच्या पत्नीला, भानुमतीला, बिलकूल पसंत नव्हता. या घरांत लग्नानंतर ती जेव्हां आली, तेव्हां अनेक इच्छा, आकांक्षा मनांत घेऊन आली होती. तिला वाटलं होतं, इतक्या मोठ्या वैद्याचं घर किंमती सामानाने भरलेलं असेल, नेसायला उंची रेशमी साड्या मिळतील, सोन्याच्या दागिन्यांनी ती नखशिखान्त सजेल. पण इथें तर सगळंच उलटं होतं. दोन्ही वेळचं जेवणखाण जेमतेम भागवण्याइतकी वैद्याची कमाई होत होती. तिच्या स्वप्नांचा चक्काचूर झाला.

एका मध्यरात्रीं कुणीतरी त्यांचं दार ठोठावलं. दोघांनाही जाग आली. भानुमती कुरकुरत म्हणूं लागली, "या घरांत तर रात्रींदेखील शांतपणें, सुखाने झोंपता येत नाही रे देवा! जेव्हां पाहावं तेव्हां कोणत्याही वेळीं रोगी येत असतात." नाईलाजाने ती उठली आणि दार उघडायला गेली. वैद्यदेखील उठून तिच्या पाठोपाठ गेला.

दार उघडल्याबरोबर समोर एक भीमकाय राक्षस उभा होता. दोघेंही भीतीने थरथर कांपू लागली. भानुमती किंचाळली आणि घाईने आंत निघून गेली.

"तुम्ही घाबरूं नका. शेजारच्या जंगलात राहाणारा मी एक राक्षस आहे. गेल्या कांही दिवसांपासून माझी प्रकृति खराब झाली आहे. तुमचं नांव ऐकून तुमच्याकडे तपासणी करून घ्यायला आलो आहे." एवढं बोलताना त्याला धाप लागली आणि दोन्ही हातांनी डोकं घट्ट धरून तो मटकन् खाली बसला.

दिव्या जैन



त्याचं बोलणं ऐकून रघुनंदन व भानुमतीच्या जिवांत जीव आला.

"कसला त्रास होतोय आपल्याला?" निर्भय होऊन रघुनंदनने विचारले. राक्षसाने एक लांबलचक श्वास घेऊन सांगितलं, "सारखी तहान लागते. हातपाय आणि तळवे फार दुखतात. शरीर मरगळलेलं असतं. असं वाटतं कीं आता आपण मरणार! अशक्तपणा खूपच आलाय, त्यामुळें नीट चालता येत नाही."

वैद्याने त्याची नाडीपरीक्षा करुन म्हटले, "यायला खूप उशीर केला आहेस. रोग बराच वाढलाय. हा तर प्राणघातक असुरमेह रोग आहे. पण हरकत नाही. माझं औषध जर नियमितपणें घेतलंस तर महिनाभरानंतर तूं पूर्णपणें बरा होशील."

एवढं बोलून वैद्याने त्याला लाडवाच्या आकाराच्या, औषधाच्या डझनभर गोळ्या खायला दिल्या, आणि एक हंडाभर काढा प्यायला दिला. नंतर वैद्याने सांगितले, "कांही वेळांतच औषधाचा परिणाम जाणवायला लागेल. औषध लागू पडलेलं दिसलं कीं त्यानंतर तूं निघालास तरी चालेल."

खरोखरच कांही क्षणांत राक्षसाला जरा बरं वाटायला लागलं. कृतज्ञता व्यक्त करुन तो म्हणाला, "मी उद्यां पुन्हां याच वेळेला येईन."

राक्षस निघून गेल्यावर भानुमतीने रागाने दरवाजा आपटून बंद केला व नवऱ्याला ती खोंचकपणें म्हणाली, "तुम्ही माणसांकडून पैसे मागत तर नाहीच कधी, निदान या राक्षसाकडून तरी पैसे मागायचेत कीं! त्या राक्षसाचं भलं करुन तुम्ही कोणतं पुण्य कमावणार आहात? तो तर माणसांचा शत्रू आहे."

रघुनंदनने शांतपणें पत्नीला उत्तर दिलं, "हे बघ भानुमती, माझा पेशा असा आहे की त्याचा व्यापार करायचा नसतो. मी औषध जरुर देतो पण रोगी परमेश्वराच्या कृपेने बरा होतो. आणि बरा झाल्यानंतर त्याला जे कांही देता येणं शक्य असतं, ते आपल्याला पुरेसं असतं. आणखी पैसे घेऊन काय करायचंय?"

भानुमतीला कांही नवऱ्याचा हा उपदेश पटला नाही. तिने मनाशी ठरवलं की दुसऱ्या रात्रीं राक्षस आला कीं आपणच त्याच्याशी बोलायचं.

जेव्हां दुसऱ्या रात्रीं औषध घेण्यासाठी राक्षस आला तेव्हां ती म्हणाली, "हे पाहा राक्षसमामा, तुमच्या कालच्या गुणत्या औषधासाठीं वैद्यराजांनी शंभर रुपये खर्च केले आहेत. उद्यां मात्र कृपा करुन तुम्ही रिकाम्या हातीं येऊं नका हं!"

तिचे बोलणें ऐकून राक्षस चवताळला आणि तिला ओरडून म्हणाला, "माझ्याकडे पैसे मागण्याची तुझी हिंमत कशी झाली? आणि मला मामा म्हणणारी तूं कोण? पुन्हां असली चूक करुं नकोस. अरण्यांत जो मनुष्य मला दिसतो त्याच्याकडे किती पैसाअडका आहे हे मी आधी पाहतो आणि नंतर त्याला खातो."

राक्षसाचे बोलणें ऐकून भानुमती घाबरली. पण त्याच्याकडे भरपूर धन जमलेलं असलं पाहिजे असा तिने तर्क केला. राक्षसाच्या राहाण्याच्या ठावाठिकाणा कळला तरी गडगंज सोनेनाणें व धन मिळण्याची शक्यता आहे असें तिला वाटले.



खूप विचार करुन राक्षसाची संपत्ती मिळवण्याची तिने एक योजना आंखली. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं तिने आपल्या पतीला आपण माहेरी जात आहोत असं सांगितलं, व ती बाहेर गेली. गांवाबाहेरच्या एका पडक्या घरांत लपून बसली. मध्यरात्रीनंतर वैद्याचे औषध घेऊन राक्षस जेव्हां परत जाऊं लागला तेव्हां तीही लपतछपत त्याच्यापाठोपाठ त्याच्या गुहेपर्यंत आली. राक्षसाच्या गुहेजवळच उरलेली रात्र व दुसरा दिवस तिने लपून बसून घालवला. तिच्या डोक्यांत पैशाचे पिशाच्च थैमान घालत होते. त्या हव्यासापुढें ती तहानभूक, झोंप, भीती, सारं सारं विसरली होती.

दुसऱ्या रात्रीं जेव्हां राक्षस वैद्याच्या घरीं गेला तेव्हां ती हळूंच गुहेंत शिरली. गुहेच्या एका कोंपऱ्यात सोन्याचे दागिने व मोहरांनी भरलेल्या चामड्याच्या दोन मोठाल्या पिशव्या पडल्या होत्या. त्या पाहून तर ती आनंदाने वेडी झाली. त्या दोन्ही थैल्या खांद्यावर घेऊन व राक्षसाची नजर चुकवून, पहांटेपर्यंत ती घरीं परत गेली. आपल्या घराच्या मागील दाराच्या अंगणात तिने त्या थैल्या लपवून ठेवल्या. तोपर्यंत रघुनंदन उठला होता. सकाळची आन्हिकें उरकून तो स्नान करायला गेला. आपल्या या योजनेबद्दल भानुमतीने त्याला कांहीच सांगितले नव्हते. आपली योजना यशस्वी झाली व खूप दागिने, पैसे मिळाल्यामुळें ती खूप आनंदात होती.

एकाएकीं तिच्या पायांत आणि शरीरांत वेदना सुरुं झाल्या. दिवसभर उपाशीपोटी राहून, रात्री दोन जड थैल्या ओढत आणल्या, म्हणून शरीर आंबून गेले असेल असं तिला वाटलं. ती खूप दमली होती म्हणून विश्रांतिसाठीं पलंगावर आडवी झाली. हळूंहळूं तिचे अंग जास्तीच दुखायला लागले. ती कण्हूं लागली.

जेव्हां रघुनंदनने तिच्या कण्हण्याचा आवाज ऐकला तेव्हां त्याने तिची नाडी तपासली व तिला कांही



गोळ्या खायला दिल्या.

त्याच रात्रीं जेव्हां राक्षस औषध घ्यायला आला तेव्हां तो अगदी खुषींत येऊन म्हणाला, "वैद्यबुवा, तुमचं औषध अगदीं रामबाण आहे. आता माझे दुखणें पूर्णपणें बरें झाले आहे. मला आता पहिल्यासारखा उत्साह वाटतो. मरगळ पार नाहीशी झाली आहे. तुम्हाला बक्षीस देण्यासाठीं म्हणून मी कांही दागिने आणि थोड्याफार मोहरा देणार होतो. पण ते सारं धन माझ्या गुहेतून कोणीतरी पळवून नेलंय. तेव्हां लक्षांत आलं कीं माझ्या गुहेची माहिती कुणालातरी झालेली आहे. म्हणून मी आता दुसरीकडे राहायला जातो आहे. तुमचे माझ्यावर फार उपकार झालेले आहेत. आता मला औषधाची आवश्यकता नाही."

राक्षस जसा निघून गेला तशी भानुमती आणखी-नच जोरजोरांत कण्हायला लागली, रडायला लागली. "सारखी तहान लागते आहे हो. हात, पाय नि सारं शरीर पिळवटून निघाल्यासारखे ठणकते आहे.

तळव्यांची आगआग होते आहे. लीवर कांहीतरी औषध द्या मला!''

रघुनंदन धांवतच तिच्या खोलींत गेला आणि त्याने तिला तपासले. नीट नाडीपरीक्षा केल्यानंतर तो आश्चर्याने म्हणाला, ''अग, तुझ्यांत तर सारी राक्षसाच्या रोगाची लक्षणें दिसत आहेत. पण हे कसं काय शक्य आहे? विश्वास बसणार नाही. पण रोगाची सगळी लक्षणे अगदी तशीच आहेत. आश्चर्यच आहे!''

नवऱ्याचे बोलणें ऐकून भानुमतीचा चेहरा पांढराफटक पडला. तिला वाटलं कीं राक्षसाचं पापाचं धन तिने आणल्यामुळें तिला हे दुखणें सुरुं झाले. राक्षसाने तर माणसांना मारुन किंवा लुटून हे धन एकत्र केलं असेल. ती पापाची कमाई तिच्या घरांत आली म्हणून तिची ही अवस्था झाली. मनांतल्या मनांत ती फारच खजील झाली. पैशाच्या लोभाने तिने हे पाप केलं होतं. तिने आपल्या नवऱ्याला दागिन्यांच्या आणि मोहरांच्या थैल्याबद्दल सांगितलं, आणि रडतरडत ती त्याची क्षमा मागूं लागली. ती नंतर म्हणाली, ''राक्षसाच्या गुहेतलं पापाचं धन भरलेल्या त्या थैल्या गांवाबाहेरच्या अंधाऱ्या विहिरीत फेंकून द्या. जोपर्यंत ते धन आपल्या घरांत आहे, तोपर्यंत ते मला सुखाने जगूं देणार नाही.''

त्या थैल्यांतलं ते सोनंनाणं व दागदागिने पाहून रघुनंदन स्तिमित झाला. तो भानुमतीला म्हणाला, ''हे बघ, धन कधी पवित्र किंवा अपवित्र असत नाही. पैसा ही परमेश्वराने निर्माण केलेली या जगांतली एक शक्ती आहे. परंतु त्याचा उपयोग मात्र पवित्र किंवा अपवित्र होऊं शकतो. हे धन जर विहीरींत फेंकले तर त्याचा दुरुपयोग होईल, ते वांया जाईल. त्यापेक्षां आपण हे धन ग्रामाधिकाऱ्याकडे देऊं या म्हणजे त्याचा उपयोग साऱ्या गांवासाठी आणि समाजासाठीं होईल. जनतेच्या कल्याणासाठी हे धन वापरता येईल. याहून जास्त पवित्र उपयोग दुसरा कोणता असूं शकेल कां?''

भानुमतीला नवऱ्याची कल्पना पटली व ती म्हणाली, ''तुमचा निर्णय लोककल्याणासाठीं आहे. लोकांचे भले त्यांत आपणही भले! तुम्ही किती चांगल्या, मनाचे आहात. पैशाचं भूत माझ्या मानगुटीवर बसलं होतं, म्हणून मला ही दुर्बुद्धि झाली. आता माझे डोळे उघडले आहेत. मला आता पुरतं समजलं आहे कीं कष्टाच्या संपत्तीमधें, मग ती कितीही कमी असली तरी जे सुख व संतोष आहे, ते सुख लोभीपणात आणि पापाच्या पैशांत नाही.''

वैद्याने पत्नीला औषध देतादेता म्हटलं, ''राक्षसरोगाचं औषध तुला एकदाच दिलं तरी तूं बरी होशील आणि उद्यां सकाळपासून सगळीं कामं करायला लागशील बरं!''





# सुवर्ण सिंहासन

(७)

(आजपर्यंत : एका बाजूला चंपकनरेश मरालभूपती कालिंदी व कुंदच्या राजांना बरोबर घेऊन कौंडिन्यवर आक्रमण करायला निघतो आहे, तर दुसऱ्या बाजूला कौंडिन्यचा राजपुत्र विजयदत्त याचा राज्याभिषेक होतो आहे. कालिंदीचा राजा माधवसेन याने ठरवलं कीं समरांगणांत गेल्यानंतर तो कौंडिन्यच्या बाजूने लढेल. पण मरालभूपतीला मात्र त्याने हे अद्याप सांगितलेलं नाही. तिकडे विजयदत्त सुवर्णसिंहासनाच्या पहिल्या पायरीवर चढला, आता तो दुसऱ्या सालभंजिकेची गोष्ट ऐकतो आहे. त्या गोष्टींत सुवर्णगिरीचे राज्य शेजारच्या राजाने राजाची हत्या करुन हडप केले होते. - त्यानंतर)

एके काळीं सुवर्णगिरी राज्यांत कुशध्वज नांवाचा राजा राज्य करीत होता. तो मंत्र्यांशी विचार विनिमय करुन उत्तमप्रकारें राज्यकारभार चालवीत होता. त्याच्या राज्यांत प्रजाजन हरप्रकारे सुखी व संतुष्ट होते.

राजाला एक मुलगा होता - मलयध्वज. तो असामान्य बुद्धिमतेचा हुशार राजपुत्र होता. मोठेपणाची सारी लक्षणें त्याच्या बालवयांतच दिसून येत होती. म्हणून उत्तम शिक्षणासाठीं त्याला त्याकाळच्या सर्वश्रेष्ठ व प्रसिद्ध गुरु कृष्णचंद्र यांच्याकडे पाठवावे असा मंत्र्यांनी सल्ला दिला. राजाचेही मत तसेच होते. राजकुमाराला कृष्णचंद्रांच्या आश्रमांत सोडण्यासाठीं राजा स्वतः गेला.

मलयध्वजाची कुशाग्र बुद्धिमत्ता आणि असाधारण प्रतिभा पाहून तो लवकरच गुरुजींचा आवडता झाला. एका कुशल व समर्थ राज्यकर्त्याचे सारे गुण त्याच्यात एकवटलेले होते. आपले शिक्षण पूर्ण करुन जेव्हां तो आपल्या राज्यांत परत जाण्याची तयारी करत होता. त्याचवेळेस त्याला अतिशय वाईट बातमी कळली. सुवर्णगिरीच्या शेजारचा राजा वज्रकीर्ती याने कपटाने आक्रमण केले, व रात्रीं महालांत घुसून राजा व राणीची झोपेंतच हत्या केली आणि राजवाड्याचा ताबा घेतला होता.

**लक्ष्मी गायत्री**



ह्या बातमीने राजकुमार मलयध्वज आणि त्याचे गुरु कृष्णचंद्र यांच्यावर वज्राघात झाला. त्याचे सांत्वन करताना गुरुजी म्हणाले, ''तुझ्यावर हे आकस्मिक आणि अवेळी झालेले संकट मी समजूं शकतो. पण जितक्या लवकर जमेल तसं तूं स्वतःला दुःखांतून सावरायला हवंस. यापुढें कोणते पाऊल आता उचलायचे, याचा विचार केला पाहिजे. तुझेदेखील प्राण संकटात आहेत. मला वाटतं तूं आणखी कांही दिवस इथेंच थांब.''

आपले दुःख आवरुन मलयध्वज म्हणाला, ''गुरुदेव, मला तर असं वाटतंय कीं ज्या वाघाने एकदां मनुष्याच रक्त चाखलंय, तो वाघ दुसऱ्या शिकारीच्या शोधांत असणारच. संकटाला भिऊन मी जर लपलो तर संकट तात्पुरते टळेल, पण भीती मात्र तशीच कायम राहील. त्याविरुद्ध जर आपणच वाघावर चालून गेलो, आणि त्याला कायमचं संपवलं तर आपण निर्घोर आणि निश्चिंत होऊं शकूं.

''याची दुसरी बाजू तितकीच प्रबळ आहे गुरुदेव. माझ्या मातापित्याची हत्या ते शयनकक्षांत झोंपलेले असताना झालेली आहे. याचा सरळ अर्थ होतो कीं आपल्याच राज्यांतल्या विश्वासघातकी व्यक्तींनी हा कट रचला असला पाहिजे. आज प्रजेची सहानुभूति आपल्या बाजूला आहे. पण जर कांही दिवस त्यांना माझ्याकडून कांहीच बातमी मिळाली नाही, तर त्यांना वाटेल कीं मी शत्रूंच्या षड्यंत्राचा बळी झालो आहे. जुन्या राजाला विसरुन ते नव्या परिस्थितीचा स्वीकार करतील. म्हणून मला इथून शक्य तितक्या तांतडीने माझ्या राज्यांत परत गेलंच पाहिजे. आणि तिथली राजकीय स्थिती समजून घेतली पाहिजे. अर्थात अगदी गुप्तपणेंच!''

त्याच्या बोलण्यावर विचार करुन गुरु कृष्णचंद्र म्हणाले, ''तुझी तीक्ष्ण दृष्टी, कुशाग्र बुद्धी, असाधारण जीवन, आणि तुझा आत्मविश्वास मी पूर्णपणें ओळखून आहे. तुला जे योग्य वाटेल ते तूं जरुर कर. माझे आशिर्वाद सदैव तुझ्या पाठीशी आहेत. विजयी भव!''

गुरुचा आशीर्वाद घेऊन मलयध्वज आपली चंद्रहास तलवार घेऊन, एका सामान्य माणसाच्या वेषांत निघाला. सुवर्णगिरीच्या सीमेवर भिल्लांचे एक छोटेसे स्वतंत्र राज्य होते. तिथला राजा सिंहगुप्त कुशध्वजाचा जवळचा मित्र होता. संध्याकाळ होताहोता मलयध्वज सिंहगुप्ताच्या राजधानींत पोंचला व सिंहगुप्तास भेटला.

मलयध्वजाला पाहून सिंहगुप्ताला फार आनंद झाला. तो म्हणाला,''तूं आला आहेस ही फार चांगली गोष्ट घडली आहे. कुशध्वजाची हत्या





झाल्याची दुःखद बातमी समजल्यानंतर मी स्वतःच तुझ्याशी संपर्क साधण्यासाठीं प्रयत्न करीत होतो. माझे सैन्य तुझ्या मदतीसाठीं सज्ज आहे. युद्धांतदेखील मी तुझ्याबरोबर उभा राहीन. जोपर्यंत त्या दुष्ट वज्रकीर्तीला मारुन तुला तुझे सुवर्णगिरी राज्य परत मिळवून देत नाही, तोपर्यंत मी स्वस्थ बसणार नाही.''

''पण महाराज, शत्रूजवळ तर आता दोन्ही राज्यांचे सैन्य आहे. आपले मूठभर सैनिक त्यांच्याशी सामना कसे करुं शकतील? आपला स्नेह व मदत मला मिळाली आहे त्याबद्दल मी कृतज्ञ आहे. परंतु माझा विश्वास आहे कीं केवळ सैन्याच्या मदतीने विजय मिळवणें कठीण आहे. माझ्या पिताश्रींना ज्या कपटनीतीने मारले आहे, त्याच पद्धतीने त्यांना मारण्याची माझी इच्छा आहे. मला असंही खात्रीपूर्वक वाटतं कीं यांत आमच्या सैन्यांतला कुणीतरी वरिष्ठ अधिकारी सामील असला पाहिजे. याबद्दलची वस्तुस्थिती शोधून काढायला हवी. शिवाय विश्वासघात करणाऱ्यांना शिक्षा द्यायला हवी. हे सगळं गनिमी काव्यानेच शक्य आहे. म्हणून आपल्या सैन्याऐवजीं आपण मला आपल्या सैन्यांतला एक कुशल योद्धा, थोडं धन, कांही सोन्याची आभूषणें आणि कांही विषाने भरलेल्या सुया देण्याची व्यवस्था करावी.'' मलयध्वजाने आपली योजना सांगितली.

त्याचे चातुर्य व आत्मविश्वास पाहून सिंहगुप्त फारच प्रसन्न झाला व त्याला म्हणाला, ''तुझी योजना तर चांगलीच आहे, पण इतकंच पुरे होईल कां?''

''होय महाराज! जर दैवाने साथ दिली तर इतकंच पुरे आहे.'' मलयध्वज निर्धाराने म्हणाला.

''तर मग ठीक आहे. उद्यां सकाळपर्यंत या त्याच्या गोष्टींची व्यवस्था केली जाईल. आता भोजन करुन थोडीशी विश्रांति घ्यायला हवी तुला!'' सिंहगुप्त प्रेमळपणें म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सकाळीं सिंहगुप्ताने एका सुंदर व बलिष्ठ योद्धयास मलयध्वजाकडे आणले. सिंहगुप्त हंसून म्हणाला, ''या तरुणाचं म्हणणं आहे कीं औपचारिक परिचय करुन देण्याची कांही आवश्यकता नाही. त्याची शक्ती व सामर्थ्य तुला नंतर आपोआप कळेल; असा त्याचा दावा आहे.''

मलयध्वज मनांत समजला कीं सिंहगुप्त त्याची चांचणी घेत आहे. त्यानेही सिंहगुप्ताला हंसून प्रत्युत्तर केले, ''जर राजकुमारी शालिनीसारखी कुशाग्र बुद्धीची वीरांगना माझ्याबरोबर असेल तर विजय निश्चित आहे. माझी आकांक्षा सफल होईल असा मला विश्वास आहे.''

मलयध्वजाचे हे बोलणें ऐकून शालिनी लाजली



व तिची नजर लाजेने खाली झुकली.

सिंहगुप्ताने आश्चर्याने विचारले, "अरे मलयध्वज! तुला कसं कळलं कीं सैनिकाच्या वेषांत ही एक स्त्री आहे आणि तीदेखील माझी मुलगी शालिनी आहे म्हणून? तूं तर यापूर्वी शालिनीला कधी पाहिलंदेखील नव्हतंस! तुझ्या बुद्धीमत्तेची मी परीक्षा बघत होतो आणि त्यांत तूं खरोखरच चातुर्य दाखवलंस. आता मात्र माझी खात्री पटलीय कीं तुझा उद्देश्य साध्य करण्यांत तूं जरूर यश मिळवशील.

"मला ठाऊक होतं कीं युद्धविद्येंत अतिशय पारंगत असलेली आपली कन्या असतांना, माझ्या मदतीसाठी आपण इतर कुणाला पाठवलं नसतंत. म्हणून मला सहजगत्या राजकुमारीला ओळखता आलं." मलयध्वजाने उत्तर दिले.

पण सिंहगुप्ताचे कांही या उत्तराने फारसें समाधान झाले नाही. खरं कारण कळावं असं वाटलं, तरी त्याने तो विषय पुढें वाढवला नाही. तरी त्याने मलयध्वजाला हव्या असलेल्या सगळ्या वस्तू त्याने देऊन त्यांना आशिर्वाद दिला व त्या दोघांचा निरोप घेतला.

मलयध्वज व शालिनी अश्वरोहणांत निपुण होते. सिंहगुप्ताचा आशिर्वाद घेऊन दोघांनीही आपापले घोडे पिटाळले. आणि घोडेही त्यांचा इशारा मिळताच वायुवेगाने दौडू लागले.

सूर्यास्त होण्यापूर्वी ते सुवर्णगिरीच्या राजधानीजवळच असलेल्या एका वनांत थांबले. तिथें त्यांनी थोडी विश्रांति घेतली. तेव्हां शालिनीने विचारले, "सकाळीं आपण मला ओळखूं शकलात त्याबद्दल जो खुलासा केलात, तो कांही पटण्याजोगा नव्हता. मी पुरुषवेषांत असतानादेखील तुम्ही मला कसं ओळखलंत? याचं खरंखुरं उत्तर द्याल कां?"

"कोणतीही स्त्री कुठल्याही वेषांत असली तरी सामान्य परिस्थितींत ती आपली कोमलता, लाजरेपणा आणि डोळ्यांचा चंचलपणा लपवूं शकत नाही. निराळ्या परिस्थितीत ती कदाचित या स्त्रीसुलभ गोष्टी लपवूं शकेलही. म्हणून मला आपल्याला ओळखणं फारसं कठीण नव्हतं." मलयध्वज हंसत उत्तरला.

दोघेही पुन्हां घोड्यांवर स्वार होऊन पुढें निघाले. जेव्हां ते राजधानीच्या सीमेवर पोंचले तोपर्यंत अंधार झालेला होता. नगरापासून जरा दूर असलेल्या एका घनदाट वृक्षाच्याजवळ ते थांबले. आपले घोडे त्यांनी त्या वृक्षाखाली बांधले. रात्रींचा पहिला प्रहर उलटेपर्यंत ते तिथेंच बसून राहिले. नगरांत येणारे व जाणारे नागरिक ते लांबून पाहात होते. नंतर ते चालत नगराकडे निघाले. नगरांतल्या सर्वसाधारण



नागरिकांची वस्ती असलेल्या लहान रस्त्यांवरून ते फिरूं लागले.

रात्रींचा दुसरा प्रहर झालेला होता. चोहीकडे नीरव शांतता होती. घराची दारे बंद करून लोक झोंपायच्या तयारीत होते. एका अंधाऱ्या गल्लींत मलयध्वज व शालिनी पाऊल न वाजवता अगदीं सावकाशपणें चालत होते.

वाटेंत एका घरांत जरा अंधुकसा उजेड आंतल्या बाजूला दिसत होता. ही दोघे त्या घराच्याजवळ गेली. खिडकींतून त्यांनी डोकावून पाहिले तर त्या घरांतली पतीपत्नी त्यांना बोलत असताना दिसली.

ती स्त्री विचारत होती कीं हे लोक युवराजाची पण हत्या करतील कां? पुरुषाने सांगितले, "हा वज्रकीर्ती राजा सत्तेच्या लोभाने वेडापिसा झालेला आहे. तो अन्यायी व पापी आहे. त्याला धर्मअधर्माची चाड नाही. छळकपट करून जशी त्याने आपल्या राजाराणीची हत्या केली, त्याचप्रमाणें राज्य मिळवण्यासाठीं तो युवराजाला मारायला मागेंपुढें पाहाणार नाही. युवराज गुरुजींच्या आश्रमांत आहेत हे फार चांगलं आहे. तरीसुद्धां शत्रू तिथें पोंचणार नाही असं थोडंच आहे?"

"हे परमेश्वरा! आमच्या युवराजांचा रक्षण कर रे बाबा!" ती स्त्री हात जोडून म्हणाली.

थोडा वेळ दोघेही गप्प बसलेली होती. नंतर तो पुरुष म्हणाला, "पण खरा गुन्हेगार तर दुष्ट सेनापती कंदर्प आहे. घरांतलाच चोर आणि वर शिरजोर! घरांतला शत्रू बाहेरच्या शत्रूपेक्षां जास्त धोकादायक असतो. आपल्या राज्याचा रक्षकच मुळीं भक्षक बनला आहे. असल्या दुष्टांना शिक्षा द्यायची म्हणजे त्यांचे तुकडेतुकडे करून गिधाडांना



खाऊं घालण्यापेक्षां जास्त क्रूर शिक्षा हवी."

ती स्त्री आश्चर्यचकित होऊन म्हणाली, "काय? आपला सेनापती कंदर्प हाच आपल्या राजाराणीचा खुनी आहे?"

"अग हळू बोल जरा! कुणी ऐकलं तर आपलीदेखील तीच गत होईल. मध्यरात्र होऊन गेली आहे. झोंप आता." पुरुषाने तिला सुचवलं.

बराच वेळ आंतून कांही बोलण्याचा आवाज आला नाही. तेव्हां मलयध्वजाने हळूंच दारावर टकटक केले. तरीही कांही आवाज आला नाही. म्हणून मलयध्वजाने पुन्हां दार ठोठावले.

"कोण आहे?" त्या पुरुषाचा दबकत आवाज आला.

"मित्र" मलयध्वजानेही हलक्या आवाजांत उत्तर दिले.

थोड्या वेळानंतर दार उघडले. ते उघडताच



ती दोघे आंत शिरली व त्यांनी आंतून दार बंद केले. मध्यरात्रीं आपल्या घरांत हे दोन अनोळखी तरुण शिरलेले पाहून, घराचा मालक सुकेतू व त्याची पत्नी भांबावून गेले होते.

जेव्हां मलयध्वजाने आपला परिचय करुन दिला तेव्हां सुकेतूच्या आनंदाला पारावार राहिला नाही. स्वतः युवराज आपल्या घरांत आलेला पाहून त्याला धन्य झाल्यासारखे वाटले.

मलयध्वजाने सुकेतूला विश्वासांत घेतले आणि त्याच्याकडून आणखीही थोडीफार माहिती मिळवली. अत्याचारी राजा वज्रकीर्ती व हत्यारी कंदर्प यांचा नायनाट करण्यासाठी त्याने ठरवलेली योजना सुकेतूला सांगितली. सुकेतू युवराजाला सर्वप्रकारें मदत करण्यास तयार होता. तो म्हणाला, "आपण आमचे राजे आहात. जे कांही घडलं त्याबद्दल साऱ्या प्रजेला फार वाईट वाटत आहे. पण हे सगळं इतकं गुपचूप आणि अचानक घडलं कीं प्रजाजनांना त्याची जरादेखील कुणकुण लागलेली नव्हती. या हत्येमुळें प्रजा दुःखी तर आहेच पण रागावलेली देखील आहे. कंदर्पाच्या बाजूचे कांही थोडे लोक सोडल्यास बाकी सारे नागरिक आपल्या बाजूला आहेत. आपल्या आदेशानुसार आम्ही आपण सांगाल ते करायला तयार आहोत."

"आपल्याला उघडपणें कांहीच करायचं नाही. नाहीतर प्रजाजन आणि आम्ही दोघं त्यांत खलास होऊन जाऊं. म्हणून मी जसं सांगतो आहे तसंच पण अगदीं गुप्तपणें करत राहा. देवाच्या कृपेने सत्याचाच विजय होईल." मलयध्वजाने सुकेतूला सांगितलं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं, राजकुमाराच्या सांगण्यावरुन, सुकेतूने वज्रकीर्तीच्या शयनागारावरचा पहारेकरी गुरु याला आपल्या घरीं बोलावून आणले. मलयध्वजाने त्याला आपली ओळख सांगितली, व त्याच्याकडून मदत मागितली. हे ऐकून गुरु घाबरुन गेला. तेव्हां मलयध्वजने आपल्या अंगरख्याच्या खिशांतून एक किंमती हार काढला व त्याला तो हार दाखवून म्हटले, "तुझ्या कामाबद्दल हे इनाम आहे. काम झाल्यानंतर याच्या दसपट इनाम मिळेल. घाबरुं नकोस.तूं सत्य व न्यायाची मदत करतो आहेस, पापाची नाही. या धर्माच्या कामांत जे पुण्य तुला मिळेल, ते तर निराळेच आहे."

गुरुने हार घ्यायचे नाकारत म्हटले, "आपण आमचे खरे राजे आहात. आपल्याला मदत करणें हा माझा धर्म आहे. तेव्हां त्याच्यासाठी इनामाची आवश्यकता नाही. आपण पुन्हां गादीवर यावं हीच आमची इच्छा आहे. आपण आज रात्रींच्या दुसऱ्या



प्रहरानंतर येण्याचं ठरवावं." असं सांगून गुरुने राजकुमाराच्या पायाला हात लावून प्रणाम केला.

वज्रकीर्तीचा पहारेकरी गेल्यानंतर, मलयध्वजाने सुकेतूकडून कंदर्पाच्या शयनागाराच्या पहारेकऱ्यास बोलावून घेतले. युवराजाची ओळख होताच त्या पहारेकऱ्याचा, वीरचा, चेहरा गोरामोरा झाला, व घाबरुन तो थरथर कांपू लागला. नंतर युवराजाशी बोलल्यानंतर तो सांवरला व त्याने आनंदाने युवराजाला हर प्रकारें मदत करण्याचे वचन दिले.

मलयध्वजाने चटकन आपल्या कपड्यांतून एक सुई काढून वीरच्या हाताला टोंचली. तो वेदनेने कळवळला व जोरांत ओरडूं लागला. मलयध्वजने त्याच्या तोंडावर पट्टी बांधली, व शालिनीने सुकेतूच्या मदतीने त्याचे हातपायदेखील बांधले.

नंतर मलयध्वजने सुकेतूला पाठवून त्याच्या पत्नी व मुलाला बोलावले. त्यांना गुंगी आणणारी सुई टोंचली, त्यामुळें ते बेशुद्ध झाले. वीरजवळ येऊन मलयध्वज म्हणाला, "तुझ्या मनांतली कपटी भावना मी ओळखली नि तुझ्या शरीरांत विंचवाचे विष टोंचले. तुझी पत्नी आणि मुलगा बेहोष आहेत. जर तूं मला मदत केलीस तर तुझा परिवार आणि तूं सुरक्षित राहाल. पण जर मला मदत केली नाहीस तर तुमच्यापैकीं कोणीही जिवंत राहाणार नाही.

मलयध्वजचे बोलणें ऐकून वीर सुन्न झाला. पत्नी आणि मुलाचे प्राण संकटात आहेत हे पाहून त्याने हात जोडून खुणेने सांगितले कीं आपण जसे सांगाल तसें मी करीन.

जेव्हां मलयध्वजला पूर्ण खात्री वाटली कीं हा आता विश्वासघात करणार नाही, तेव्हां त्याने त्याला एक औषध पाजले, व म्हटले, "या औषधाने तुझ्या अंगातील विष उतरेल. जसे मी सांगतो आहे तसं आज रात्रींच तुला हे काम करावे लागेल. उद्यां सकाळीं तुझी पत्नी व मुलगा तुला इथेंच भेटतील. तूं जराही कपटीपणें वागलास तर ती तुला इथें मृतावस्थेंत सांपडतील." **(क्रमशः)**



# भारत-गाथा

*एका महान् संस्कृतीचा शोध*
*युगायुगांचा गौरवशाली इतिहास*

## सभ्यता बरोबर एक बृहत् अरण्य

''भारतांतल्या गांवांच्या जुन्या नांवांची जी यादी तुम्ही दिलीत ती फारच मनोरंजक होती. ही नांवे जुन्या काळांतल्या अनेक आश्चर्यजनक लोकांची आठवण पुन्हां उजळतात.'' प्रो. देवनाथ व संदीपबरोबर नदीकिनाऱ्यावर फिरताना चमेली उद्गारली.

''ही नांवे केवळ थोर व्यक्तीच नाही तर त्यांच्या श्रेष्ठ कार्याबद्दलही आपल्याला माहिती देतात. होय कीं नाही, आजोबा?'' संदीपने विचारले.

सिमेंटच्या एका बाकावर बसून प्रोफेसर नदीच्या पलीकडे खूप दूरवर असलेल्या डोंगराच्या व झाडांच्या धूसर रेषेमागे अस्तास जाणाऱ्या सूर्याकडे ते एकटक पाहात होते.

''ठीक आहे मुलांनो! पण आपला भूतकाल इतका मोठा आणि गुंतागुंतीचा आहे कीं स्थानांचे नांव दर्शवलेला श्रेष्ठ व्यक्ती व त्यांचे महान कार्य यांचेच स्मरण देते असं नाही. भूतपूर्वकालांतल्या स्त्रीपुरुषांची मनोवृत्ती समजावून घेणे बऱ्याच वेळां अवघड काम असते. मला एवढं ठाऊक आहे की कांही स्थानांची नांवे अशा व्यक्तींवरुन ठेवली गेली जे शूर नव्हते किंवा कुलीन नव्हते. पण त्यांच्याबाबतीत कांही असामान्य घटना घडत गेल्या. तेव्हां ऋषींना वाटलं की जर त्यांची नांवे त्या जागांना दिली गेली नाहीत तर भविष्य कालांत लोक त्या घटना विसरतील.'' आजोबा म्हणाले.

''पण त्या गोष्टी विसरल्या गेल्या कां? आणि असल्या अयोग्य घटनांसाठी दुर्जनांच्या नांवाला अमरत्व कशासाठी यायला हवे?'' संदीपने विचारले.

''होय बाळ, अशा प्रसंगी घटना इतकी महत्वाची होते कीं विसरायचे म्हटले तरी ती विसरली जात नाही. अयोग्य व्यक्तीची आठवण त्याबरोबर जोडलेली असते. जसं कृष्णाची आठवण ठेवायची तर कंसाचीही आठवण येते. कारण गोष्ट दोघांच्याशी जोडलेली आहे. तसं पाहिलं तर वाईट व्यक्तींना त्या मथितार्थातून वेगळे करता येत नाही. कारण आपली कहाणी त्यांच्यामुळेच तर निर्माण झालेली असते.'' आजोबांनी आपला विचार मांडला.

''उदाहरण सांगा पाहूं....!'' आपल्या भावाकडे हंसून पाहात पण आजोबांपासून तोंड लपवत चमेली म्हणाली. तिच्या सुहास्याने ती जणूं आपल्या भावाला सांगत होती कीं आजोबांना एखादी गोष्ट सांगण्याचा आग्रह कर.



विश्वावसु

''उदाहरणार्थ दंडकारण्य! या जागेचे नांव एका तरुण राजामुळें अमर झाले. पण हा राजा कोणत्याही सन्मानास लायक नव्हता असं म्हणायला हवं!''

''दंडकारण्य? आजोबा, रामायणांतल्या गोष्टीमध्यें हे नांव मी वाचलेलं आहे. हे जंगलाला दिलेले काल्पनिक नांव असेल, होय ना?'' चमेलीने चौकसपणें विचारले.

''तुला असं कां वाटलं कीं हे काल्पनिक नांव आहे म्हणून? हे अरण्य तर जगांतल्या साऱ्या अरण्यांचा मानबिंदू आहे. फार प्राचीन म्हणून नव्हे, पण हे असे अरण्य होते कीं तेथे एका महान संस्कृतिचा विकास झाला. दंडकारण्यासारखे जगांत दुसरे अरण्य नाही.''

''पण ही तर पुराणकाळांतली कथा आहे. तुमच्या म्हणण्याप्रमाणें हे अरण्य आता देखील अस्तित्वांत आहे कां?'' चमेलीने जास्त उत्सुकतेने विचारले.

''आपल्या भारतदेशांत, जिथें दरवर्षी २५३५० हेक्टेअर जंगले नष्ट केली जात आहेत, तिथें हा प्रश्न विचारणें म्हणजे आश्चर्य आहे. आपली जंगले अत्यंत भिसाडघाईने उजाड होत आहेत. चमेलीबाळा, खरंच दंडकारण्यांत रामायणांतल्या अनेक महत्वाच्या घटना घडल्या. याच वनांत विधवा राक्षसी शूर्पणखा हिने रामाशी विवाह करण्याची इच्छा दर्शवली, आणि लक्ष्मणाने तिचे नाक कापले होते. ऋषीमुनींच्या यज्ञांत विघ्न आणणाऱ्या अनेक राक्षसांशी रामाने युद्ध केले. याच वनांत रावणाने सीतेचे हरण केले. इथल्या वृक्षराजींतच रावणाशी युद्ध करताकरता पक्षीराज जटायु स्वर्गवासी झाला. इत्यादि, इत्यादि। पण हे प्रचंड मोठे अरण्य जरा रोडावले असले तरीसुद्धां, ओरीसा, आंध्रप्रदेश व मध्य प्रदेशाच्या कांही भागांत हे घनदाट अरण्य अजूनही पसरलेले आहे.''

''आजोबा, या अरण्याच्या नांवाबद्दलची कहाणी तुम्ही सांगणार होतात ना, ती सांगा ना!'' संदीप अधीर झाला होता.

देवनाथांनी गोष्ट सुरुं केली.

''फार प्राचीन काळांतली गोष्ट आहे ही. या मोठ्या प्रदेशावर दंडकवंशाचे राजे राज्य करीत असत. त्या वंशातला एक राजा होता दंडक. तो एक ख्यालीखुशालींत रमणारा, आनंदी व विलासी तरुण होता.

एके दिवशी घोड्यावर स्वार होऊन तो अरण्यांतून



जात होता. वाटेंत तो एका सरोवराजवळ थांबला. पाण्यांतून एक सुंदर स्त्री बाहेर कांठावर येतांना त्याने पाहिली. ती एखादी परी तर नव्हती ना? दंडकराजाने विचार केला. माणसांमधें असं अनुपम सौंदर्य असूं शकतं यावर त्याचा विश्वास बसेना.

ती तरुणी घोडेस्वाराला पाहून किंचित हंसली व दुसऱ्या दिशेला वळून जायला निघाली. परंतु, दंडक घोड्यावरुन झटकन उतरला आणि तिच्याजवळ जाऊन उभा राहिला. ती बावरली आणि लाजून तिने मान खाली घातली.

''तुझा मार्ग चुकला आहे कां? कीं तुला कांही मदत हवी आहे?'' तिने लाजत प्रश्न केले.



''जिथें मी जायला निघतो, तो माझा मार्ग बनतो. कारण ह्या साऱ्या प्रदेशाचा मी राजा आहे. तुझ्या दुसऱ्या प्रश्नाचं उत्तर द्यायचं तर होय, मला तुझ्याकडून मदत जरुर हवी आहे. मला तुझ्याशी विवाह करायचा आहे.'' दंडक म्हणाला.

ती तरुणी स्तंभित झाली. पण लगेच स्वतःला सावरत ती म्हणाली, ''हे बघ तरुणा, तूं स्वतःला इथला राजा म्हणवतोस, पण माझा त्यावर विश्वास नाही. एका राजाला तरी निदान हे माहीत असायला हवं कीं कोणताही पुरुष एका स्त्रीशी दोन प्रकारच्या परिस्थितींत विवाह करुं शकतो. त्या स्त्रीची त्या विवाहाला संमती असायला हवी, किंवा तिची इच्छा असावी. आणि त्या स्त्रीच्या मातापित्यांनी विवाहाचा प्रस्ताव स्वीकारायला हवा. तुझ्याशी विवाह करण्याची माझी इच्छा नाही, आणि तूं त्यासंबंधी माझ्या मातापित्यांची अनुमतीही घेतलेली नाहीस.''

हे ऐकून राजा असभ्यपणें हंसला व म्हणाला, ''हे अहंमन्य मुली, कोणताही बाप मला, एका राजाला जांवई म्हणून स्वीकारण्यांत स्वतःला भाग्यवान समजेल. रीतीरिवाज मी मानत नाही. ये, माझ्याबरोबर चल. माझ्या मंत्र्यांच्याबरोबर गाड्या भरभरुन भेटवस्तू तुझ्या वडिलांकडे पाठवूं आणि त्यांना खूष करुन टाकूं.'' असं उन्मत्तपणें बोलताबोलता त्याने तिचा हात पकडण्याचा प्रयत्न केला.

ती स्त्री दुसरीतिसरी कोणी नसून शुक्राचार्यांची कन्या अरजा होती. जवळच मुनींचा आश्रम होता. तिथल्या सरोवरांत स्नान करुन ती परत येत होती.

''छी छी, अरे आडदांड तरुणा, तुझा धिक्कार असो'' ती किंचाळून म्हणाली, ''माझे पिताश्री एक ऋषी आहेत आणि तुझा सारा खजिना आणि राजवैभवदेखील त्यांना संतुष्ट करुं शकणार नाही. व्यक्तीच्या चारित्र्याखेरीज बाकी सारं कांही त्यांच्या लेखी तुच्छ आहे.''

तिने दंडकाच्या हातांतून आपला हात सोडवून घेतला. तरी दंडक पुन्हां तिला पकडण्याचा प्रयत्न करुं लागला. या मानवी जनावरापासून आपली सुटका करुन घेण्यासाठीं तिला फार झटापट करावी लागली. त्यांत तिला बरेच खरचटले व जखमेंतून रक्त येऊं लागले.

''नीच, दुष्टा, निघून जा इथून. तुझ्या या गुन्ह्याची शिक्षा तुला लौकरच मिळेल.'' ती रडतरडत तिथल्या गर्द झाडींत शिरली व दिसेनाशी झाली. त्या अरण्यातले सर्व लहानमोठे मार्ग तिला ठाऊक होते. तिचा पाठलाग करण्याचा खूप प्रयत्न दंडकाने केला पण त्याला ती सांपडली नाही.



जवळच एका नदीच्या कांठावर शुक्राचार्यांचा आश्रम होता. त्यांचे ध्यान संपल्यानंतर जेव्हां त्यांनी डोळे उघडले, तेव्हां रडत, मुसमुसत असलेली, व घाबरलेली अरजा त्यांनी दिसली.

''काय झालं, बाळे?'' मुनिवर्यांनी विचारलं.

त्यावर ती ओक्साबोक्शी रडायला लागली. ती इतकी भेदरलेली होती कीं बराच वेळ तिच्या तोंडून एकही शब्द फुटेना. तिला कधी वाटलंदेखील नव्हतं कीं जंगली, हिंस्र जनावरांपेक्षां माणूस हा जास्त धोकादायक जनावर आहे म्हणून ! आणि माणसाला असल्या परिस्थितीशी सामना द्यावा लागतो हेही तिला नवीन होतं. पित्याचा सांत्वनपर आवाज ऐकल्यावर तिने त्यांना ही दुःखद घटना सांगितली.

मुनीवर्यांनी ध्यान लावले. त्यांना अंतर्ज्ञानाने कळले कीं हा आचरट दुराचारी माणूस राजा दंडक स्वतःच होता. त्यांना हे देखील कळलं कीं त्याच्या साऱ्या राज्यांत असल्या प्रकारचे अत्याचार वरचेवर होत आहेत.

त्यांनी एक यज्ञ करायचे ठरवले आणि सर्व दैवी शक्तींना त्याच्या राज्याचा सर्वनाश करावा म्हणून आवाहन केले. त्यांनी शाप दिला, ''पवित्र आत्मे आणि निर्दोष पशू यांच्याखेरीज पापी दंडकराजाचे सारे राज्य जळून खाक होऊं दे.''

थोड्याच वेळांत राजमहालाबरोबर अरण्याच्या चारी दिशांची नगरें आणि गांवें अग्नीच्या अनंत ज्वाळांनी वेढली जाऊं लागली. ही आग अनेक दिवस व रात्रीं टिकली होती. या विनाशलीलेंत दंडकराजा व त्याचे सारे राज्य जळून खाक झाले. फक्त कांही निर्दोष स्त्रीपुरुष व मुकी जनावरें त्यांतून वांचली व ते आसऱ्यासाठीं दुसरीकडे गेले.

शेंकडों कोसांवर सगळीकडे राखच राख पसरलेली होती. खरोखर, हा अग्निप्रलय फारच भयंकर असला पाहिजे!

हळूंहळूं कालक्रमानुसार हे दृश्य पालटले. पावसाळी वाऱ्यांबरोबर इतर अरण्यांतून आलेल्या बिया त्या मरुस्थळावर अंकुरित होऊं लागल्या. शेंकडों वर्षांनंतर हे सारे क्षेत्र पुन्हां जंगलमय झाले. शतकें उलटली आणि मंदगतीने हे वन तपस्वी व ऋषीमुनी यांचे शरण-स्थळ बनले. इतकेंच नव्हे, तर राक्षस आणि पिशाच्चांचा अड्डादेखील तिथें तयार झाला.

ज्या ऋषी व मुनींना या अरण्याची कथा माहीत होती, त्यांनी त्या अभागी राजाच्या व त्याच्या वंशाच्या नांवावरुन याला दंडकवन किंवा दंडकारण्य असे नांव दिले. कारण हे नांव पडण्यास तोच जबाबदार होता.

''किती अद्भुत आहे हे सारं, नाही?'' चमेली व संदीपने आपले आश्चर्य प्रगट केले.





# खुळचट गाढव

एक गुरुजी आपल्या घरंदाज शिष्यांच्या घरीं शिकवणीला बहुतेक वेळां चालत जात असत. आता त्यांचं वय झालं होतं, आणि ते लौकर थकून जात असत. पण त्यांनी कधी त्याबद्दल कुरकूर केली नाही.

एक दिवस त्यांच्या एका शिष्याने त्यांना एक छानसं गाढव आणून दिलं, आणि सांगितलं, ''गुरुजी, आपण गांवोगांव फिरण्यासाठीं याचा स्वीकार करावा ही विनंती. रेती आणि चिखल तुडवत आपल्याला पायीं हिंडताना पाहून आम्हाला सर्वांना फार वाईट वाटत असे. हे अगदीं तगडं जनावर आहे आणि आपल्याला फार उपयोगी पडेल.''

गुरुजींना पायीं हिंडण्याची विशेष काळजी नव्हती. पण इतक्या प्रेमाने दिलेली भेट नाकारायचे त्यांच्या जिवावर आले. म्हणून त्यांनी गाढवाची भेट स्वीकारली.

दुसऱ्या दिवशीं गुरुजींना गांवच्या जमीनदाराकडे जायचं होतं. ते गाढवावर बसले आणि त्यांचे शिष्यगण त्यांच्या मागोमाग निघाले. जमीनदाराच्या वाड्यासमोर अनेक स्त्रिया व पुरुष गुरुजींच्या स्वागतासाठीं उभे होते. गाढवावरून उतरण्यापूर्वी गुरुजींना हार घालण्यांत आला. त्यांच्यावर उधळलेल्या कांही फुलांपैकी थोडी फुलें गाढवावर पडली. त्यांबद्दल गाढवाला निश्चितच गर्व झाला असला पाहिजे.

गुरुजींना शिष्यगण वाड्यांत घेऊन गेले आणि गाढवाला जमीनदाराच्या गाढवशाळेंत बांधण्यांत आलं.

तिथली जमीनदाराची गाढवें या गाढवाला म्हणाली, ''आपण महान आहात. आपल्या जातींतल्या एकाला इतकी प्रतिष्ठा मिळाली आहे हे पाहून आम्हाला फार अभिमान वाटतो आहे.''

गुरुजींच्या गाढवाने अगदीं छानदार मंदस्मित केलें. त्यालाही आपण कुणीतरी श्रेष्ठ आहोत असंच वाटायला लागलं. तास दोनतासानंतर गुरुजी वाड्यातून बाहेर निघाले. तोपर्यंत नोकरांनी त्यांच्या गाढवाला भरपूर खाऊंपिऊं घातलं होतं. गुरुजी आपल्या आश्रमांत परत आले.

जेव्हां गुरुजी गाढवावर बसून शिष्यांच्या घरीं जात, तेव्हां गुरुजी गाढवावरुन खालीं उतरण्यापूर्वीच शिष्यगण त्यांना साष्टांग नमस्कार करीत. गाढवाला वाटायला लागलं की सारेजण त्यालाच हा मानसन्मान देत आहेत.

एकदां जमीनदाराच्या घरांत कांही धार्मिक समारंभ होता. त्यासाठीं गुरुजी ओळीने तीन दिवस रोज वाड्यावर जात होते. ते घर गाढवाला सर्वांत जास्त पसंत होते. तो वाड्यायावर जायला नेहमी उत्सुक असे. तिथें गाढवाचा पाहुणचार व्यवस्थित होई. दुसऱ्या घरांतून त्याचं असं कौतुक होत नसे याचं त्याला फार वाईट वाटे, व तो नाराज असायचा.

तो समारंभ संपल्यानंतर गुरुजी आठवडाभर आश्रमाच्या बाहेर कुठें गेले नाहीत. नंतर एका शिष्याच्या निमंत्रणानुसार त्याच्या घरीं जाण्यासाठी ते तयार झाले. तबेल्यांतून निघताना गाढव फारच आनंदात होते. गुरुजी गाढवावर बसले आणि शिष्याच्याबरोबर त्यांच्या जाण्याच्या ठिकाणीं जाऊं लागले. कांही अंतरावर एक चौक होता. त्यांतला एक रस्ता जमीनदाराच्या घराकडे जात होता.

ज्या शिष्याच्या घरीं गुरुजींना जायचे होते, त्या शिष्याच्या घराकडे दुसरा रस्ता जात होता. शिष्याने जसे गुरुजींना आपल्या घराच्या दिशेने यायला सांगितले, तसें गाढव थांबले आणि पुढें जाईचना. कारण गाढवाला जमीनदाराच्या घराकडे जायची फार इच्छा होती.

त्या शिष्यांनी गाढवाला आपल्या घराकडे जाणाऱ्या रस्त्यावर आणण्याचा खूप निकराचा प्रयत्न केला. तेव्हां गाढवाला राग आला. त्याने गुरुजींना खाली पाडले आणि जमीनदाराच्या घराकडे ते धांवत सुटले.

जमीनदाराचे घर जवळच होते. गाढव मोठ्या आनंदात दरवाज्यांतून धांवत आले व पायऱ्यांपर्यंत पोंचले. आंतल्या चौकांत ते घुसणार तेवढ्यांत नोकरांनी त्याला काठ्या घेऊन मारावयास सुरुवात केली, आणि त्याला बाहेर पळवून लावले.

लंगडत लंगडत ते पुन्हां आपल्या गल्लींत परतले, आणि बडबडायला लागले, ''मला वाटतं, त्यांनी मला ओळखलंच नाही बहुतेक!''

मनोज दास





# हंसण्याची मोकळीक

बाबूशेट दररोज सकाळीं आपल्या शेताची निगराणी करायला घरुन शेतावर जाई व दिवसभर तिथेंच राही. त्याचं जेवण व पाणी त्यांच्या नोकराची लहान मुलगी शांता घरांतून घेऊन शेतावर जाई. त्यांचे जेवणखाण आटोपले कीं ती शेतावरची बारीकसारीक कामें करीत बसे.

बाबूशेट म्हातारा होता व गलेलठ्ठ होता. म्हणून प्रत्येक कामासाठी त्याला कुणी ना कुणी मदतीला लागत असे. शांता त्याला शेतावर जेवण वाढी, पाणी वगैरे देई आणि त्याची किरकोल कामें ती अगदी शांतपणें करीत असे. म्हणून बाबूशेटही तिच्याशी खूप प्रेमाने वागायचा.

एक दिवस जेवण झाल्यानंतर बाबूशेट शेताच्या बांधावरुन चालत देखरेख करत होता. पाय घसरुन तो बाजूच्या चिखलांत धपकन पडला. सारे शरीर चिखलाने लडबडले. हातावर जोर देऊन उठण्याचा त्याने प्रयत्न केला. पण व्यर्थ! तो इतका तुंदिलतनू होता कीं त्याला उठता येणें कांही शक्य नव्हते. शांताने आधार देऊन पाहिले, पण तिला त्याला उठवता येईना. तेव्हां बाबूशेटने कण्हत सांगितले.'' बघ, आजूबाजूच्या शेतांमधे कुणी असतील तर त्यांना बोलावं जा!''

जवळच्या शेतांतला भूषण झाडांना विहीरीचे पाणी देत होता. शांता जेव्हां त्याला बोलवायला गेली, तेव्हां त्याने मदतीला यायला साफ नकार दिला व म्हणाला, ''बरं झालं. मला कालच त्याने शिव्या दिल्या होत्या, नाही कां! त्या पाप्याला बरी शिक्षा केली आहे देवाने!''

बिचारी शांता रडवेली होऊन परत येत होती. वाटेंत तिला पामर नांवाचा एक मजूर भेटला. शांताची गोष्ट ऐकल्यावर त्यानेही बाबूशेटला उठवायचे नाकारले. तो म्हणाला, ''त्या जाड्याला तसाच जमिनीवर पडलेला राहूं दे. गरीबांच्या दुःखाची त्याला कधीही जाणीव नसते. जमिनीवर मातीत झोपणं कसं असतं ते जरा तरी कळूं दे त्याला!

शांताला काय करावे ते समजेना. थोड्याशा अंतरावरुन नागनाथ आणि सोमनाथ हे दोन शेतकरी आपापल्या शेतांकडे जात होते. शांता धावतधावत त्यांच्याजवळ गेली आणि बाबूशेटला उठवावे म्हणून तिने त्यांना विनंती केली. बाबूशेट अडचणींत सांपडलाय हे पाहून सोमनाथाला फारच हंसूं आले. तो तिला म्हणाला, ''बाबूशेटसारख्या ढोल्या मारुतीला चिखलांत पडलेल पाहाताना तुला मोठी मजा वाटली असेल ना? तूं नशीबवान आहेस ग पोरी. आमचं कुठलं आलंय एवढं भाग्य?''

परंतु नागनाथाला बाबूशेटची दया आली. दुसऱ्याला वेदना होत असताना हंसणें अगदी चुकीचे आहे असे म्हणून त्याने सोमनाथला दटावले आणि बाबूशेटच्या मदतीसाठी तो तावडतोब निघाला.

बाबूशेट अजूनही ओल्या मातीच्या राडांत कण्हत पडलेला होता. नागनाथाने त्याला हात देऊन उठण्यास मदत केली व म्हणाला, ''आपलं आता वय झालं आहे. एकट्याने असं शेतावर येणं ठीक नाही. आजकाल कुणी कुणाला मदत करीत नाहीत, उलट लोक दुसऱ्यांच्या अडचणी पाहून हंसतात. त्यांची टर उडवतात. ही पोरगी शांता इतकी रडवेली झाली होती कीं तिला पाहिल्यावर मला लगेच कळून चुकलं कीं तुम्हाला खूपच त्रास होत असला पाहिजे!''



बाबूशेटने शांताकडे पाहिले. ती खरीच खूप उदास आणि केविलवाणी दिसत होती. जसं कांही तिचं छत्रच हरवलं असावं अशी ती बापुडवाणी दिसत होती. ''अग, घाबरुं नकोस इतकी. मला कांही एक झालेलं नाही बरं शांता!'' तिला धीर देत बाबूशेट म्हणाला. नागनाथने आपल्या बैलगाडींतून बाबूशेट आणि शांता यांना घरीं पोचवलं.

बाबूशेटचं चिखलाने बरबंटलेलं शरीर आणि चेहरा पाहून त्याची बायको प्रथम घाबरुन म्हणाली, ''अगबाई, काय ही दशा झालीय तुमची? काय झालं हो तुम्हाला?'' आणि नंतर मात्र तिला हंसूं आवरेना. ती हंसायला लागली.

''माझा पाय घसरला आणि शेताच्या बांधावरुन मी चिखलांत पडलो. माझी अगदी कठीण अवस्था झाली होती. ती पाहून ही बिचारी दहा वर्षांची पोर चळवळून गेली आहे आणि तूं मात्र हंसतेस कशी?''

हे ऐकून शांता जास्तच कासावीस झाली. ती पळतपळत मागच्या अंगणात गेली. तिथें बाबूशेटची सून काम करत होती. तिला शांताने विचारलं, ''वहिनी, मी जरा शेजारच्या सुभद्राकडे जाऊन येऊं कां?''

सुभद्रा ही शांताच्या वयाचीच मुलगी होती. शेजारच्या घरांत ती काम करत असे.

बाबूशेटच्या सुनेने चमकून शांताला विचारलं, ''तुझं काय काम आहे ग तिच्याजवळ?''

''काम नाही कांही. पण मालक शेतांत पडले ना, ते मला तिला सांगायचंय.''

''मग त्यांत घाई कसली एवढी? इथलं काम संपव आणि जा नंतर. चल, सारी कामं तशीच करायची राहिलीत अजून, ती अगोदर पुरी कर.'' सूनबाईनी फर्मावलं.

बिचारी शांता खट्टू होऊन कामाला लागली. जेव्हां ढीगभर भांडी घासली, कपडे धुऊन टाकले, तेव्हां बाबूशेटच्या बायकोने सांडगे उन्हांत वाळत टाकले होते, त्यावर लक्ष ठेवायला सांगितलं. कावळे आले तर काठीने हांकलायचे हे काम तिला दिले.

आपलं मन मारुन बिचारी अंगणात बसून सांडग्यांवर राखण करीत बसली.

मनोजदास

तेंवढ्यांत तिथें तिचा पिता, भीमा कांही कामानिमित्त आला. वडिलांना पाहून शांता आनंदून गेली आणि म्हणाली, "बाबा, मी आता सुभद्राला भेटून लगेचच येते हं."

भीमाला वाटलें कीं या दोघीजणी मालक शेतांत पडले त्याबद्दलच बोलणार असतील. तरी पण त्यांच्या गप्पा ऐकण्याची त्याला उत्सुकता होती. म्हणून तो हळूंच तिच्या पाठोपाठ गेला आणि त्या दोघींची बातचीत ऐकूं लागला.

सुभद्रा आपल्या मालकाच्या घराच्या मागील दारी गाईंना वैरण घालत होती. शांता तिथें उड्या मारत, खिदळत पोंचली. तेव्हां सुभद्रेने हातातले काम तसेच टाकले व शांताजवळ येऊन ती म्हणाली, "काय ग, काय झालंय तरी काय?"

"आधी तूं सांग, मग मी तुला एक छान गंमत सांगीन."

सुभद्रा म्हणाली, "मला कांहीच सांगायचं नाही, पण तुझी गंमत सांग बघू लौकर!"

"तुला ठाऊक आहे कां सुभद्रा, आज काय झालं ते? आज मालक शेतात तोंडावर पडून आपटले. हात, पाय, कपडे, तोंड सगळं चिखलाने लडबडलं होतं ग बाई. त्यांचा तो चेहरा पाहून मला तर इतकं हंसायला यायला लागलं. इतकं हंसायला....." शांताला आपलं हंसूं आवरेना.

सुभद्राही खळखळून हंसायला लागली आणि म्हणाली, "पण ते पडले तरी कसे?"

"हे असे ..." आणि तिने बाबूंशेटसारखे जमिनीवर पडून दाखवले. दोघीही पुन्हां खिदळायला लागल्या.

"पण अशा वेळेला हंसणं बरं नाही ना, म्हणून मी माझं हंसूं आवरलं. जितकं मी हंसणं आवरलं, तितकं मला जास्त वाईट वाटायला लागलं. ज्याने ज्याने म्हणून मालक पडल्याची बातमी ऐकली, त्या प्रत्येकजणाने कांही ना कांही बोलून मालकांची टिंगल केली. पण आपल्याला कुठे कांही बोलायची किंवा हंसायची मोकळीक आहे?" शांता उदास स्वरांत म्हणाली, "म्हणून मला तुझ्याकडे येऊन पोटभर हंसायचं होतं. पण मला कुणी येऊंच दिलं नाही. मला अगदी तुला भेटायची घाई झाली होती. कारण मला खूप खूप हंसायचं होतं."

"चल आता, हंस कीं पाहिजे तितकी." सुभद्राने उत्तर दिले व दोघीजणी पुन्हां हसूं लागल्या.

भीमाने घरीं जाऊन आपल्या पत्नीला सांगितलं. "आपण आपल्या मुलांपासून त्यांचं बाळपण हिरावून घेतो आहोत. उद्यापासून शांता मालकांच्या घरीं कामावर नाही जायची, पण शाळेंत जाईल. तिथें तिला हंसायला, खेळायला व शिकायलाही मोकळेपणा आणि पूर्ण स्वातंत्र्य मिळेल. आणि तो तिचा जन्मसिद्ध अधिकार आहे."







बृहदीश्वर मंदिर

कावेरीच्या मुखावर तयार झालेल्या दुआबाचें सुवर्णयुग नवव्या शतकापासून सुरुं झाले. त्यानंतर ४०० वर्षें चोल राजांनी तिथें राज्य केले आणि या प्रदेशाची सर्व प्रकारें भरभराट झाली. दीर्घकाळपर्यंत तंजावूर ही चोल राजांची राजधानी होती.

चोल वंशाचा श्रेष्ठ राजा पहिला राजराजन याने इ.स. ९८५ ते १०१४ पर्यंत राज्य केले. त्याने बृहदीश्वर मंदिर बांधले. त्याला 'मोठे मंदिर' असंही म्हणतात. हे बांधायला सहा वर्षे लागली. नांवाला साजेसे अतिविशाल बृहदीश्वर देवालय हे स्थापत्यकलेचा एक अजोड नमुना आहे. पिरॅमिडच्या आकाराचे त्याचे अष्टकोनी विमान ६४ मीटर उंच आहे. त्याच्या कळसावर ८० टन वजनाची अखंड शिळा बसवलेली आहे. इतका जड दगड इतक्या उंचीवर कसा नेला असेल? असं म्हणतात कीं तो दगड वर नेण्यासाठीं एक तिरपी चढण बांधली होती. तिचं एक टोक मंदिराच्या सर्वांत उंच स्थानावर होतं, आणि दुसरं टोक सहा किलोमीटर अंतरावर असलेल्या वायलूर गांवात! दुमजली गाभाऱ्यांत बसवलेले मंदिराचे शिवलिंग तीन मीटरपेक्षां जास्त उंच आहे. त्याचा अभिषेक करण्यासाठीं पुजाऱ्यांना शिडीवर चढावे लागते.

## कावेरीच्या किनारी - ९

# भव्य चोल साम्राज्य

कहाणी : जयंती महालिंगम
चित्र : गौतम सेन

गाभाऱ्याच्याच आंतल्या व बाहेरच्या भिंतींवर मनोहर मूर्ती कोरलेल्या आहेत. निरनिराळ्या स्वरूपांतल्या शिवभगवानाच्या मूर्तींबरोबरच शैव नायनार संतांच्या जीवनांतले प्रसंग व भरतनाट्यम् नृत्याच्या १०८ मुद्राही तिथें दगडांत कोरलेल्या आहेत. मंदिराच्या चारी बाजूंना उंच खांबांच्या सज्जांमधे सुंदर भित्तीचित्रें आहेत. शिवाचे वाहन नंदी- तोही आपल्या स्वतंत्र मंडपात विराजमान आहे. नंदीची ३.६ मीटर उंच, ६ मीटर लांब व जवळजवळ २५ टन वजनाची मूर्ती एका अखंड दगडातून बनवलेली आहे.

सुरुवातीला राज्यांतल्या ३७० वस्त्यांमधले नागरिक वर्गणी जमवून मंदिराचा खर्च चालवत असत. पहिल्या राजराजाने मोठमोठ्या देणगीदारांची नांवे मंदिरांत कोरण्याची प्रथा सुरुं केली. बृहदीश्वर मंदिरात ज्यांनी सोनें, जडजवाहीर किंवा जमीन देवालयाला दान केलेली आहे, अशा किमान पन्नास दात्यांची नांवे कोरलेली आहेत. या यादींत सर्वांत पहिली



तंजावूर शैलीचे एक चित्र

नांवें राजराजा व त्याची भगिनी कुंदवी यांची आहेत.

मंदिराच्या आवारांत आणखी एक पेरियनायकी देवीचं मंदिर आहे. चोल राजांच्यानंतर जवळजवळ पन्नास वर्षे तिथें राज्य करणाऱ्या पांड्य राजांनी हे मंदिर बांधलें आहे. सुलतान अल्लाउद्दिन खिलजीचा सेनापती मलिक काफूर याने हा प्रदेश जिंकला. पण इसवी सन १३७७ मधें विजयनगरचा सुभेदार बुकचा मुलगा कंपन याने दिल्लीच्या मुसलमान सुभेदाराचा पाडाव केला. त्यानंतर पुढील २०० वर्षे या दुआबावर नायकांचे राज्य होते. नायक राजे विजयनगरच्या साम्राज्याशी एकनिष्ठ होते. त्यांनी तंजावूरमधें एक भव्य महाल बांधला. रघुनाथ नायक (इ.स. १६००-१६३४) हा साहित्य व संगीतप्रेमी राज्यकर्ता होता. महालांतल्या ग्रंथालयातल्या ताडपत्रांवर लिहीलेल्या जुन्या पोथ्या त्यानेच जमवल्या होत्या असं मानतात.

तंजावूरमधें जवळजवळ शंभर वर्षे मराठ्यांचे राज्य राहिले. त्यांचे तिथें येण्याचे कारण अगदीच निराळे आहे.त्याचं असं झालं, कीं विजयनगर साम्राज्याचा अस्त झाल्यानंतर तो इलाखा विजापूरच्या सुलतानाच्या ताब्यांत गेला, त्याने आपला एक सरदार शहाजी भोसले याला तंजावूरची जहागीर दिली. शहाजीनंतर त्याचा मुलगा व्यंकोजी उर्फ एकोजी इथला जहागिरदार झाला. एकोजी हा छत्रपती शिवाजीचा सावत्र भाऊ होता. विजापूर राज्य दुर्बल झाल्यानंतर एकोजी स्वतंत्र राज्यकर्ता बनला. योगायोगाची गोष्ट अशी कीं एकोजी आणि शिवाजी, दोघांचाही राज्याभिषेक सन १६७४ मधें झाला. अठराव्या शतकाच्या शेवटीं इंग्रजांनी मराठा राज्यकर्त्याला निवृत्तीवेतन देऊन त्याचे राज्य आपल्या ताब्यांत घेतले.

मराठी राजांनी तंजावूरची समृद्ध, सांस्कृतिक परंपरा पुढें चांगल्या प्रकारें चालू ठेवली - खास करुन तुळसाजी व त्याचा पुत्र दुसरा सरफोजी यांनी !" दुसऱ्या सरफोजीला एक डॅनिश प्रॉटेस्टंट पाद्री शिकवायला होता. लहानपणापासूनच त्याला लेखना-वाचनाची व पुस्तकें जमा करण्याची आवड होती. त्याने आपल्या महालांत एक ग्रंथालय सुरुं केले. त्याने दुर्लभ पांडुलिपीतल्या पोथ्या खरेदी करण्यासाठी, किंवा त्यांच्या प्रती तयार करण्यासाठीं, विद्वान पंडितांना देशभर पाठवले होते. आज सरस्वती महाल ग्रंथालयांत, संस्कृत, तेलुगु, मराठी, उर्दू, फारसी व आणखी कांही युरोपीय भाषांमधले २२,००० पेक्षा जास्त अमूल्य ग्रंथ आहेत. सरफोजीने जमवलेल्या वस्तूंचे एक छोटे संग्रहाल आहे. त्यांच्या महालाच्या





पोत्तया, वडिवेलु आणि चिन्नय्या, तंजावूर चौकडींतले तिघे बंधू

एका टोंकाला एक आठमजली स्तंभ, गणेशमंदिर व बृहदीश्वर मंदिराच्या आवारांत एक नटराज मंडप त्यांनी बांधला.

चोल राजे व मराठे राज्यकर्ते संगीत व नृत्यकलेचे प्रेमी व जाणकार होते. किमान ३६० संगीतकारांना मराठा राजांच्या दरबारांत आश्रय मिळालेला होता. कांही राजे स्वतःच संगीतकार होते, व त्यांच्या संगीतरचना प्रसिद्ध आहेत. चोल राजांच्या दरबारांत किमान ४०० देवदासींनी भरतमुनींच्या नाट्यशास्त्रावर आधारलेले भरतनाट्यम् सर्वात प्रथम सादर केले होते. त्या नृत्यास तेव्हां सादिरआट्टम किंवा दासीआट्टम म्हटलं जात होतं. बृहदीश्वराच्या मंदिरात नृत्य करणाऱ्या देवदासींना, पाहिल्या राजराजाच्या काळांत, मंदिराच्या चारी बाजूंच्या गल्ल्यांमधें घरें दिली जात होती.

एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीस सुप्रसिद्ध तंजावूर चौकडीने सदिरआट्टम नृत्याला सुनिश्चित स्वरूप देऊन, त्याला शास्त्रोक्त नृत्याचा दर्जा देववला. तंजावूर चौकडी म्हणजे पोन्नय्या, चिन्नय्या, शिवानंदन् आणि वडिवेलू हे चार भाऊ होते. त्यांनी भरतनाट्यमचा कायाकल्प करुन या नृत्याला तंजावूरच्या सीमेबाहेर नेले आणि दूरदूरपर्यंत त्याची लोकप्रियता पसरली. कर्नाटक संगीताचे प्रसिद्ध रचनाकार मुत्तुस्वामी दीक्षितार यांनी या बंधूंना संगीताचे प्राथमिक धडे दिलेले होते.

चोल राजांच्या काळांत तमिळ संस्कृती फक्त नृत्यगायनांतच नव्हे, तर चित्रकलेंत देखील उत्कर्षास पोचली होती. तंजावरी चित्रकलेची ओळख म्हणजे गडद रंगाच्या रेखांमधें हलक्या रंगांचा भराव, रंगीत खडे,

महाराज सरफोजी (दुसरे)



रत्नें, आरसे यांची सजावट आणि सोन्याच्या वर्खाचा वापर! सध्यां ही चित्रकला अतिशय लोकप्रिय आहे. कर्नाटक संगीतातले जाणकार म्हणतात कीं तंजावूरमधें बनवलेल्या वीणा, तंबोरे, मृदंग वगैरे वाद्यांच्या तोडीची वाद्यें अन्यत्र होऊं शकत नाहीत.

कर्नाटक संगीतातले तीन प्रख्यात दिग्गज तंजावूरपासून कांही किलोमीटर अंतरावर असलेल्या, तिरुवैय्यारु गांवात जन्मले.

त्यागराज, मुत्तुस्वामी दीक्षितर आणि श्यामाशास्त्री, हे तिन्ही संगीतश्रेष्ठी, समकालीन होते. त्यांत त्यागराजाचे स्थान पहिले मानले जाते. त्यांचे सारे जीवन तिरुवैय्यारु गांवांत गेले. हे गांव कावेरी व तिला मिळणाऱ्या चार सहाय्यक नद्यांच्या संगमावर वसलेले आहे. इथल्या मंदिरातला स्थापित देव आहे पंचनदीश्वर - म्हणजे पांच नद्यांचा स्वामी.


महान संत व संगीतकार त्यागराज

दरवर्षी एप्रिल व मे महिन्यांत पंचनदीश्वराची मूर्ती पालखींत बसवून तिची शोभायात्रा निघते. तिरुवैय्यारुपासून निघून तिरुपालनम्, तिरुचोत्रुत्तुरै, तिरुवेणुगुडी, तिरुकांडयूर, तिरुपून्तुरुती, तिरुनैस्थानम् नांवाच्या सहा गांवातून ही यात्रा फिरते. यात्रेबरोबर चालणारे भक्तगण रात्रभर गात, नाचत असतात. कधीकधी नदीच्या कोरड्या वाळवंटात रात्रीं थकून झोंपतात.

त्यागराज श्रीरामाचे निस्सीम भक्त होते. त्यांनी आपली गाणीं संस्कृत व त्यांची मातृभाषा तेलुगुमधें रचली आहेत. संगीत आणि भक्ती ही दोन्ही एकच आहेत, असं मानणाऱ्या या संतकवीने सूर, शब्द आणि रागांची अशी गंगा प्रवाहित केली आहे की तिच्यांत सारे भेदभाव वाहून जातात. त्यागराजांचे थोरले बंधू त्यांना आळशी व नालायक म्हणत. ज्या श्रीरामाच्या मूर्तीची त्यागराज रोज पूजा करीत होते, ती मूर्ती त्यांच्या भावाने उचलून नदीत फेकून दिली. त्यागराजांना अतिशय दुःख झाले. ते नदीच्या तीरावर गेले आणि आपल्या आराध्यदैवताला त्यांनी कळवळून सांकडे घातले, "परत ये प्रभू! ये रे ये!" आणि काय चमत्कार! कावेरीच्या तळांतून ती मूर्ती निघून लाटेवर तरंगत आली.

असं म्हणतात कीं त्यागराजाच्या समाधीवर हीच मूर्ती स्थापन केलेली आहे. ही समाधी तिरुवैय्यारुमधे कावेरीच्या कांठावर बांधलेली आहे. प्रसिद्ध गायिका बेंगळूर नागरत्नम्मा यांनी १९२० सालीं त्याचा जीर्णोद्धार करवला. दरवर्षी हजारों कर्नाटक संगीतप्रेमी तिथे एकत्र येऊन त्या महान संगीतकाराचा आराधना-उत्सव साजरा करतात. त्यागराजाच्या मूर्तीला शास्त्रोक्त अभिषेक केल्यानंतर त्याची पूजा केली जाते. देशांतले नामवंत गायक व वादक त्यागराजरचित पंचरत्नकीर्तनाचे सामूहिक गायन-वादन करतात. त्या ऋतूंत कावेरीचे पात्र तुडुंब भरलेले असते. तिच्या लाटांच्या हलक्याशा आवाजाबरोबरच, संगीत स्वरांचे आरोह अवरोह असे जुळून येतात कीं गायक व श्रोते एका अनुपम आनंदात तल्लीन होतात.





# भार्गवचा राग

मांधार गांवात उदय नांवाचा एक तरुण व्यापारी होता. व्यापारी, चतुर बुद्धिमत्तेबरोबर त्याच्या अंगी कष्टाळू वृत्ति, मन लावून काम करणें व धोरणी दूरदृष्टी हे गुण होते. त्याचा व्यापार झपाट्याने वाढूं लागला. वयाची पंचवीस वर्षें पूर्ण होईपर्यंत तो गांवातला प्रमुख व्यापारी मानला जाऊं लागला. त्याचे यश पाहून त्याच्या आईवडिलांना फार आनंद होत असे.

एक दिवस वडिलांनी उदयला सांगितले, "मुला, आजपर्यंत तूं धंद्यात गुरफटला होतास म्हणून तूं लग्नाचा प्रस्ताव टाळत होतास. पण आता तर तुझा धंदा उत्तम चालला आहे. भार्गवला धंद्याचं कारण सांगून इतके दिवस आम्ही लग्नाची गोष्ट पुढें ढकलत होतो. पण असं किती दिवस करता येईल? तूं हो म्हणालास तर त्याला निरोप पाठवून लग्नाचा विचार नक्की करण्यासाठीं बोलावून घेता येईल."

भार्गव दुसऱ्या गांवांत राहात होता, आणि या मंडळींच्या घरीं त्याचे येणेंजाणें होते. त्याची मुलगी अरुणा उदयपेक्षां चारपांच वर्षांनी लहान होती. दोघांची फारशी मैत्री नव्हती. तरी दोन्ही परिवारांच्या स्नेहामुळें लोक समजत कीं या दोघांचं मोठेपणीं लग्न होईलच. उदयला भार्गवबद्दल फार प्रेम व आदर होता. भार्गव त्यांच्या घरीं नेहमी येत असे, आणि छोट्या उदयला छानछान गोष्टी सांगे. त्याचा स्वभाव विनोदी होता आणि बालगोपाळांना तो आवडत असे. तो शेती करी आणि त्याची चांगली पन्नास एकरांची सुपीक जमीन होती. तो गांवातला प्रमुख नागरिक होता, म्हणून सर्वजण त्याला मान देत असत.

"जशी तुमची इच्छा" असं म्हणून उदयने

सुजाता रावल



विवाहाच्या प्रस्तावाला मान्यता दिली. उदयची संमती मिळतांच त्याच्या आईवडिलांनी भार्गवला ही आनंदाची बातमी कळवली.

जेव्हां अरुणाला ही गोष्ट समजली तेव्हां तिने आपल्या आईला सांगितलं की तिला उदयशी लग्न करायचं नव्हतं. तिला याचं कारण विचारल्यावर ती म्हणाली कीं पांच वर्षांपूर्वी जेव्हां उदय त्यांच्या घरीं आला होता आणि ती त्याला त्यांचे गांव दाखवत होती, गांवातल्या प्रमुख गोष्टींची माहिती देत होती, तेव्हां त्याने तिला दटावून म्हटले होते, "उगीच बायफळ बडबड करुं नकोस ग !"

"तो चांगला नाही आई" असं म्हणून ती तिथून उठून निघून गेली.

तिची आई तिच्यापाठोपाठ गेली आणि हंसून म्हणाली, "अग, हे कांही योग्य कारण तरी आहे कां? अजूनदेखील तूं लहान मुलांसारखी कसली रुसतेस? उदयला मी तुझ्यापेक्षां जास्त ओळखते. तो अतिशय हुशार आणि प्रामाणिक मुलगा आहे. त्याच्याशीं जर लग्न केलंस तर जीवनभर सुखी होशील."

आईकडून उदयची तारीफ ऐकल्यावर अरुणाला आठवलं कीं दोन वर्षांपूर्वी उदयची आई जेव्हां त्यांच्याकडे आली होती, तेव्हां तीदेखील आपल्या मुलाची तोंड फाटेपर्यंत स्तुती करत होती. त्यावेळेलासुद्धां तिला उदयचे दटावणें आठवले होते.

अरुणाचा विवाहाला नकार जेव्हां भार्गवला आपल्या पत्नीकडून कळला, तेव्हां तोही हंसून म्हणाला, "ही कांही फारशी कठीण समस्या नाही. लग्नापूर्वी ती दोघे एकमेकांबरोबर दोनचार दिवस घालवतील तर अरुणाचा गैरसमज दूर होईल." मग भार्गवने उदयच्या आईवडिलांना कळवले, "जरी सामाजिक वहिवाटीनुसार लग्नापूर्वी वधूवर एकमेकांची नीट ओळख व्हावी म्हणून मुलीच्या घरी भेटतात, तरी शेजारीपाजारी टोमणे मारतातच." पूर्वी इतक्या वेळां भेटले आहेतच. मग आता कशाला हवंय हे नाटक उगीचच?" असं कांही होऊं नये म्हणून लग्नाची बातमी सध्यां गुप्त ठेवूं या. आणि उदयला कांही दिवसांसाठीं माझ्याकडे एकटाच पाठवून द्यावा. तुम्ही दोघे आलात तर पुन्हां चौकस शेजाऱ्यांना चोंबडेपणा करण्याची संधी मिळेल."

हे पत्र मिळाल्याबरोबर उदयच्या वडिलांनी



त्याला बोलावून सांगितले, "धनापूरच्या हातमागाच्या रेशमी साड्या फार प्रसिद्ध आहेत. शहरांतून या साड्यांना नेहमीच मागणी असते. तूं तिथे जा आणि दोनचार दिवस राहून त्या साड्यांचे निरनिराळे प्रकार आणि त्यांच्या किंमती याची सार्यंत माहिती गोळा कर. या कामांत भार्गवदेखील तुला मदत करील. त्याच्या घरीं तूं राहा."

उदयने दिवसभर आपले काम केले. रात्रीं जेवण झाले आणि आपल्या घरचा घोड्याचा टांगा घेऊन तो रात्रीं धनापूरला जायला निघाला. त्याचा टांगा भार्गवच्या घरासमोर थांबला, तोपर्यंत पहांट झालेली होती. त्यावेळीं अरुणा अंगणांतली रांगोळी पूर्ण करण्यांत मग्न होती. तिची आई तिथेंच उभी राहून लेकीच्या कलेची तारीफ करीत होती.

उदयची नजर अभावितपणें अरुणावर पडली. तिच्या सौंदर्याची मनोमन प्रशंसा करीत तो तिला पाहात राहिला. अरुणाने पण उदयला पाहिले. तिने त्याला ओळखलं, आणि ती पटकन आंत निघून गेली. उदय मात्र अंगणातल्या रांगोळीकडे एकटक पाहात होता.

अरुणाची आई त्याच्याजवळ येऊन म्हणाली, "अरे उदय, तूं काय पाहातो आहेस एवढं? अरे, पांच वर्षांपूर्वी तूं पाहिली होतीस तीच अरुणा आहे ही ! आता चांगली मोठी झालीय आणि खूप बदलली आहे. चल ना, अरे, घरांत चल."

उदय घरांत शिरल्याबरोबर भार्गव उठला आणि त्याने नाराजीच्या सुरांत उगीचच



कांहीतरी आरडाओरडा केला. तो चिडून बायकोला म्हणाला, "सकाळीं उठून कसली कटकट चालवली आहेस ग? उदय आला म्हणजे कांही आभाळ कोसळलं नाही. आलाच आहे तर राहील दोनचार दिवस नि जाईल. इतक्या छोट्या गोष्टीसाठीं माझी झोंप कशाला खराब केलीस?"

हे ऐकून उदयचा सारा उत्साह मावळला. त्याचं येणं भार्गवला पसंत नसावंसं त्याला वाटलं. पण थोड्या वेळानंतर भार्गव उठला आणि त्याने अतिशय प्रेमाने उदयची विचारपूस केली. उदयला थोडा दिलासा वाटला. तरीदेखील त्याच्या मनांत ही गैरसमजाची ठुसठुस राहिली. त्याने आपल्या येण्याचे कारण भार्गवला सांगितले. भार्गवच्या लक्षांत आले कीं उदयच्या



बडिलांनी त्याला खरें कारण सांगितलेले नाही. हे तर चांगलेच झाले. भार्गव उदयला म्हणाला, "माझी तुझ्याबरोबर येण्याची जरूर नाही. अरुणा तुझ्यासारखीच हुशार आणि व्यापारी तैलबुद्धीची आहे. इथल्या सगळ्या विणकरांची घरें, त्यांचे माग, त्यांचे कापडाचे पोत, यांतली सारी बारीकसारीक माहिती तिला आहे. ती तुझ्याबरोबर येईल. तिला सगळेजण ओळखतात. तिच्याबरोबर गेलास तर सगळेजण तुला आपला समजून व्यवहार करतील."

आंघोळ वगैरे उरकून उदय तयार झाला. अरुणा त्याला जेवायला वाढत होती. तेव्हां भार्गव आपल्या खांद्यावरची रेशमी शाल नीट करीत अरुणाला म्हणाला, "उदयला विणकरांच्या वस्तींत घेऊन जा, आणि चांगल्यापैकी रेशमी साड्या पाहायला आणि पसंत करायला मदत कर. गांवात कांहीतरी नवी अडचण आलीय, त्या कामासाठीं मला दुसरीकडे जायला लागेल."

उदयचे जेवण झाल्यावर अरुणा त्याच्याजवळ आली व म्हणाली, "बरं, तुम्हाला कोणत्या गिऱ्हाईकांसाठीं साड्या हव्या आहेत ते सांगा पाहूं आधीं!"

"कोणत्या म्हणजे? गिऱ्हाईकांसाठीं साड्या हव्या आहेत, बस." उदय म्हणाला.

"म्हणजे गरीब गिऱ्हाईकांना, श्रीमंत ग्राहकांना कीं मध्यम श्रेणीच्या लोकांसाठी?"

"अरे वा! तूं तर माझ्यापेक्षां जास्त चांगला व्यापार करूं शकशील कीं! तुला ग्राहकांच्या निरनिराळ्या दर्जाविषयी बरीच माहिती दिसते आहे." उदय तिची तारीफ करूं लागला.

त्या दोघांची मागील भेट जरी पांच वर्षांपूर्वी झालेली होती, तरी अरुणाच्या मनांत अपमानाची अढी अजून शिल्लक होती. म्हणून यावेळेला उदयशी बोलताना ती सावध होती. उदयच्या मनांतले जे अरुणाचे त्यावेळचे धूसर चित्र होते, ते केव्हांच पुसले गेले होते. आता त्याच्या मनांत त्यावेळच्या एका अल्लड, बडबड्या व बेफिकीर मुलीच्या जागी एक सुंदर, संयमी, विचारी, सुसंस्कृत व बुद्धिमान तरुणीचे चित्र स्पष्ट उभे राहिले.

"बरं, आता हे सांग, इथें फक्त शुद्ध रेशमी साड्या बनतात, कीं कृत्रिम रेशमाच्यादेखील बनतात?" उदयने मुद्दामच तिच्याबरोबर जास्त



वेळ घालवण्याच्या दृष्टीने हा प्रश्न विचारला होता.

"पन्नास विणकरांपैकीं फक्त पांचजण शुद्ध रेशमी साड्या बनवूं शकतात. त्यांच्या साड्या मोठमोठ्या शहरांत व परदेशांतदेखील जातात." अरुणाने थोडक्यांत समर्पक उत्तर दिले.

अशा रीतीने दोघांनी घरीं बसूनच गप्पा मारल्या, आणि कुठें बाहेर गेले नाहीत.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कुणा श्रीमंत शेतकऱ्याचा नोकर भार्गवला बोलावण्यास आला. भार्गव अजून उठला नव्हता. अरुणाने भिऊन वडिलांना उठवले नाही, आणि त्या नोकराला सांगितले "ते अजून झोंपलेले आहेत. तूंच उठव त्यांना." त्या नोकराने भार्गवला हांक मारली. भार्गवची झोंपमोड झाली. त्याबद्दल तो त्या नोकराला खूप रागावला. पण थोड्याच वेळांत तयार होऊन त्याच्याबरोबर निघून गेला.

त्यादिवशीं उदय व अरुणा खाऊनपिऊन घरांतून लौकरच निघाले. पण साड्या पाहायला त्यांना वेळ झाला नाही. दिवसभर गांवातल्या जुन्या इमारती, राधेचे मंदिर, बाजारपेठा, वस्त्या, नाट्यगृहें, वगैरे दाखवत त्यांची माहिती अरुणा उदयला सांगत होती. उदय जितका तिच्या सौंदर्यावर मोहित झाला होता, तितकाच तिची बुद्धिमत्ता पाहून चकित झाला होता. दोघेही घरीं परत आल्यानंतर अरुणाच्या आईने उदयला विचारले, "आमची अरुणा कशी काय वाटली तुला?" संकोचून उदयने कांहीच उत्तर दिले नाही. नंतर तिने आपल्या मुलीला एका बाजूला बोलावून विचारलं, "उदय तुला कसा



वाटतो आता?"

अरुणाने कांहीच उत्तर दिले नाही. पण तिला मात्र आईला स्पष्ट सांगावंसं वाटत होतं कीं यावेळेला जरी तो चांगला वाटतो आहे, तरी पांच वर्षांपूर्वीचा मनांतला राग अजून कायम आहे.

रात्रीं सर्वजण एकत्र जेवायला बसले होते. त्यावेळेस गांवातला एक शेतकरी, भरत, त्यांच्याकडे आला. तो भार्गवला म्हणाला, "उद्यां सकाळीं माझ्या शेतांत विहीर खणण्याचा मुहूर्त करायचा आहे. त्यासाठीं आपण यायला हवं."

"उद्यां नाही रे येता येणार मला." भार्गवने सांगितले. "मग आपल्याला केव्हां सवड आहे? तेव्हांचा मुहूर्त काढूं या. कारण आपल्या

उपस्थितीशिवाय आणि आशिर्वादाखेरीज हे काम होणार नाही." भरतने सांगितले.

"तुझा इतका आग्रहच आहे तर मी उद्यांच येतो. पण मला सकाळीं उठवायला कुणाला तरी पाठव." भार्गव म्हणाला.

"कुणाला तरी कशाला? मीच स्वतः येईन आणि आपल्याला घेऊन जाईन. आपण तिथें आलात कीं मला सारं कांही पावलं." भरतने नम्रपणें सांगितलं.

हा संवाद ऐकून उदयला आश्चर्य वाटलं. तो भार्गवला म्हणाला, "आपल्याला सकाळीं झोंपेतून कुणी उठवलं कीं तुम्ही त्याच्यावर रागावतां, मग भरतला कशाला त्या वेळेलाच बोलावलंत? जरा उशीरा बोलवायचंत."

हे ऐकून भार्गव जोरजोरांत हंसायला लागला, आणि त्याने सांगितलं. "सकाळीं उठल्यावर माझा राग कुणावर तरी काढला नाही, तर मी दिवसभर बेचैन असतो. आणि रोजरोज एकाच माणसावर रागवायला मला आवडत नाही. त्यांनी कां म्हणून माझा राग विनाकारण सहन करावा? म्हणून मी रोज निराळा माणूस निवडतो. बरं झालं, आज भरत आला ते! त्याचंही काम झालं नि माझंही!"

सुटकेचा निश्वास सोडून उदय म्हणाला, "आत्ता माझ्या लक्षांत आलं. आपला राग हाही एक दिनचर्येचा आवश्यक भाग आहे. पहिल्या दिवशी माझी चुकीची समजूत झाली होती."

भार्गवने आपला मुद्दा अधिक स्पष्ट करत म्हटले, "कांही व्यक्ती आपल्याला दुरून दुष्ट आणि दांभिक दिसतात. पण जवळून ती व्यक्ती पाहिली कीं आदबशीर, सौम्य आणि सुस्वभावी आहे असं कळतं."

वडिलांचे बोलणें ऐकून अरुणाच्या मनांत उदयबद्दल अढी होती ती विरघळली. भार्गवचा राग पाहून उदयचा गैरसमजदेखील नाहीसा झाला. दोघांनीही दुसऱ्या दिवशीं आईला सांगितले कीं एकमेकांना ते पसंत आहेत.








# महाभारत

दुसऱ्या दिवशीं युद्ध सुरुं होणार होतं. कांही प्रहरानंतर तो विनाशलीलेचा प्रलयंकारी क्षण येणार होता. मोठेमोठे असंख्य महारथी या युद्धाच्या ज्वालेंत कीटक-पतंगाप्रमाणें भस्म होऊन जाणार होते, तो क्षण आता जवळ येणार होता.

त्या रात्रीं दुर्योधनाने आपल्या सेनेतल्या प्रमुख योद्ध्यांना बोलावून विचारले, "पांडवांना निर्मूळ करण्यासाठीं किती दिवस लागतील?"

भीष्म पितामहांनी सांगितलं कीं पांडवांच्या सर्वनाशासाठीं किमान एक महिना तरी लागेल. आपल्या वार्धक्याविषयीं बोलताना द्रोणाचार्यांनी देखील तितकाच वेळ लागेल असं सांगितलं. कृपाचार्यांच्या मतें पांडवांचा सर्वनाश करण्यास दोन महिने लागले असते. अश्वत्थामा म्हणाला कीं तो पांडवांना केवळ दहा दिवसांत मृत्यूलोकांत पोंचवूं शकेल. कर्ण म्हणाला कीं या कामाकरता पांच दिवसांपेक्षां जास्त दिवस लागणार नाहीत. त्याच्या बोलण्यावर भीष्म हंसले, आणि म्हणाले, "जोपर्यंत कृष्णाबरोबर अर्जुन तुझ्यासमोर येत नाही तोंवर ही बढाई मार. तो समोर आला की तुझा हा अहंकार पोकळ ठरेल. तोपर्यंत बैस स्वतःची खोटी स्तुती करीत."

ही सारी बातमी गुप्तचरांमार्फत जेव्हां धर्म राजाला कळली, तेव्हां त्याने अर्जुनाला बोलावून विचारले, "कौरव सेनेला समूळ नष्ट करण्यास तुला किती समय लागेल?" धर्मराजाला विजयाचे आश्वासन देत अर्जुन म्हणाला, "भ्राताश्री, आपण चिंता कां करीत आहात? आपल्या योद्ध्यांच्या हातून कौरवांचा मृत्यू व आपला विजय निश्चित आहे. तिन्ही लोकदेखील जरी आपल्या विरुद्ध





शत्रूपक्षांत उभे राहिले, तरी एका क्षणांत त्या सर्वांचा विनाश होऊं शकेल. कारण आपल्याकडे असे एकखास पाशुपत अस्त्र आहे कीं जे भीष्म, द्रोणाचार्य, कृपाचार्य, कर्ण, कुणाकडेही नाही. परंतु असल्या महान अस्त्राचा प्रयोग सर्वांवर करता येत नाही."

दुसऱ्या दिवशी पहांट होताच कौरवांच्या व पांडवाच्या सेना, दोन समुद्रांच्या वादळी लाटा याव्यात तशा रणभूमीच्या दिशेने येऊं लागल्या. दुर्योधनाच्या पक्षांतल्या सर्व योद्धयांच्या चेहऱ्यावर विजयाची आशा झळकत होती.

सेनांच्या या अथांग गर्दीत साऱ्या देशांतले सगळे तरुण, व धट्टेकट्टे पुरुष, दोन्हींपैकी एका पक्षांतून लढण्यासाठीं आले होते. घरोघरी फक्त लहान मुलें, स्त्रिया, वृद्ध व आजारी माणसें उरली होती.

युद्धाला सुरवात झालेली नव्हती, तेव्हां व्यास-मुनी धृतराष्ट्राजवळ आले आणि म्हणाले, "तुझ्या पुत्रांचा आणि त्यांच्या बाजूने लढणाऱ्या सर्व राजांचा अंत जवळ येत चालला आहे. तूं त्यांची चिंता करुं नकोस. कारण हीच त्यांची अटळ नियति आहे. जर युद्धभूमीचे दृश्य पाहाण्याची तुझी इच्छा असली तर मी तुला दिव्य दृष्टी देऊं शकेन. त्यामुळें युद्धक्षेत्रांतली प्रत्येक घटना घडत असताना तूं आपल्या डोळ्यांनी पाहूं शकशील."

त्यावर धृतराष्ट्राने सांगितलं, "आपले पुत्र व भाऊबंद मरत असताना पाहाणें फार कष्टाचे होईल. पण युद्धाची सविस्तर आणि संपूर्ण माहिती अवश्य जाणण्याची माझी फार इच्छा आहे. त्याच्यासाठीं कांही उपाय असली तर कृपया सांगावा."

तेव्हां व्यासांनी सुचवलं, "मी संजयला दिव्य दृष्टी प्रदान करतो. कुरुक्षेत्रावरील प्रत्येक दृश्य तो पाहूं शकेल. आणि तिथली सविस्तर माहिती तो तुला ऐकवीत जाईल."

एवढं बोलून व्यासांनी संजयला दिव्य दृष्टी प्रदान केली. युद्धाचे सारे दृश्य पाहता पाहता संजय धृतराष्ट्राला ती माहिती वर्णन करुन सांगू लागला.

युद्ध सुरुं होण्यापूर्वी कौरवांचे सेनापती भीष्म पितामह यांनी आपल्या योद्धयांना संबोधून म्हटलं, "राजे हो आणि शूरवीर योद्धे मंडळींनो! हे युद्ध आपल्या सर्वांसाठी स्वर्गाचे द्वार आहे. या द्वारांतून प्रवेश करुन इंद्रलोक किंवा ब्रम्हलोकांत जाता येते. क्षत्रियांसाठीं परलोकगमनाचा हाच एक उचित मार्ग आहे. क्षत्रियांना अंथरुणावर आजारी पडून नव्हे तर शौर्याने लढत असताना रणभूमीवरचा मृत्यू उत्तम असतो. तेव्हां निर्भय होऊन आपण सर्वजण युद्धाला सज्ज व्हा."

कर्णाने प्रतिज्ञा केली होती कीं जोपर्यंत





भीष्मपितामह रणभूमीवर असतील तोपर्यंत तो युद्ध करणार नाही. म्हणून त्याच्याखेरीज इतर सर्व योद्धे रणघोष करीत पुढें सरसावले.

दोन्ही पक्षांच्या सेना आपापल्या व्यूह-रचनेनुसार उभ्या होत्या. पांडवसेनेचं नेतृत्व भीम करत होता. शिखंडीची सेना व्यूहाच्या मध्यभागी होती. व्यूहाच्या डाव्या भागाचे रक्षण सात्यकी करीत होता. धृष्टद्युम्न संपूर्ण व्यूहाचे निरीक्षण करीत होता. रथ दोन्ही सैन्यांच्यामधें उभा करुन श्रीकृष्णाने म्हटले, "अर्जुना, ज्यांच्याशी तुला युद्ध करायचे आहे त्या भीष्म, द्रोणाचार्यांसारख्या महारथींकडे जरा पहा."

समोर युद्ध करण्यासाठीं उभे असलेले आपले गुरुजन, आजोबा, भाऊ, पुतणे, या सर्वांकडे अर्जुनाने एकवार पाहिले. आणि त्यांना मारण्याच्या कल्पनेने त्याच्या जिवाचा थरकांप झाला. त्याचं शरीर शिथिल झालं आणि त्याच्या हातांतलं गांडीव धनुष्य गळून पडलं. त्याचं मन विषण्ण आणि कष्टी झालं.

त्याने श्रीकृष्णाला म्हटलं, "आपलाच वंश व परिवाराचा नाश करुन राज्यसुख भोगण्यांत मला कांही औचित्य दिसत नाही. असलं रक्तरंजित राज्यसुख मला नको. मी यांना मारुं शकत नाही. म्हणून मी युद्ध करणार नाही."

असं बोलून अर्जुन निराश होऊन रथाच्या मागील भागांत खाली बसला. तेव्हां अर्जुनाला युद्धासाठीं प्रेरित करण्यासाठीं श्रीकृष्णाने सांगितले, "अर्जुना, युद्धभूमीवर अचानक तुझी असली कसली लाजिरवाणी मनोवृत्ती झाली रे? क्षत्रियधर्माच्या विरुद्ध कःपुरुषाचा तुझा हा भाव तुझ्यासारख्या श्रेष्ठ वीराला शोभत नाही. रणभूमीवरुन भिऊन पळून जाण्यांत तुझे किती आणि कसे अपयश ठरेल याचा तूं विचार तरी केला आहेस कां? जग तुला काय म्हणेल?

"अरे, क्षत्रियाचा उत्तम धर्म आहे - युद्ध! जर तूं आपल्या धर्माचे पालन केले नाहीस तर तुझी नुसतीच दुष्कीर्ती होणार नाही तर तूं स्वर्गातदेखील जाऊं शकणार नाहीस. आणि दुष्कीर्ती ही क्षत्रियाला मरणासमान आहे.

"आता राहिली गोष्ट तुझ्या हातून तुझ्या नातेवाईकांचा व परिवाराचा होणार मृत्यू! एक तर विवेकी आणि ज्ञानी लोक जीवनमृत्यूच्या विचारांत जास्त गुंतत नाहीत. कारण त्यांना माहीत असतं कीं आत्म्याचा मृत्यू होत नाही. आत्मा शाश्वत आहे व अमर आहे. जशी आपण जुनी वस्त्रें उतरवून नवीन वस्त्रें धारण करतो, त्याचप्रमाणें आत्मा-देखील जुने शरीर टाकून देऊन नवे शरीर ग्रहण करतो. म्हणून मृत्यूची चिंता करणें निरर्थक आहे.



"तुला जीवन-मृत्यू, सुखदुःख, लाभ-हानी, जय-पराजयाच्या भावनांच्या पलीकडे जाऊन, तुझे कर्तव्य व क्षत्रियधर्माचे पालन तूं आता करायला हवेस. बुद्धिमान व्यक्ती हेच करतात. जर तूं युद्धांत विजयी झालास तर राज्यसुख उपभोगशील. जर लढताना तुला मृत्यू आला तर स्वर्गसुख उपभोगशील. तेव्हां आता युद्ध करण्यांतच तुझा लाभच लाभ आहे. आणि युद्धांतून पळून जाण्यांत सर्वतोपरी नुकसान व हानी आहे. म्हणून तूं आता उठ आणि तुझे कर्तव्य आणि वीरधर्माचे पालन कर." अशा रितीने श्रीकृष्णाने अर्जुनाला गीतेचा उपदेश केला.

श्रीकृष्णाच्या उपदेशामुळें अर्जुनाची विषण्ण मनस्थिती दूर झाली आणि तो पुन्हां जोमाने युद्धासाठीं उभा राहिला.

त्यानंतर धर्मराजाने आपले कवच व अस्त्र-शस्त्रें खाली उतरवली आणि तो आपल्या रथांतून खाली उतरला. चालतचालत तो भीष्माकडे जाऊं लागला. अर्जुन व इतर पांडवांनी त्याचे अनुकरण केले. सर्वांत शेवटीं श्रीकृष्णही चालूं लागला.

अर्जुन व इतर बंधूंनी युधिष्ठिराला विचारले, "भ्राताश्री, आपण निशस्त्र होऊन शत्रूसेनेकडे कां चालला आहात?" पण कांहीही उत्तर न देता युधिष्ठिर पुढें चालूं लागला. तेव्हां श्रीकृष्णाने त्यांचे शंकानिरसन करण्यासाठीं सांगितले कीं धर्मराज, भीष्म, द्रोण, कृपाचार्य आणि शल्य यांची युद्धास संमति व त्यांचे आशिर्वाद घेण्यास चालला आहे. गुरुजनांचा आशीर्वाद मिळाल्यामुळें विजय निश्चित असतो."

कौरव सैनिकांना वाटलं कीं युधिष्ठिर युद्धाच्या भीतीने आपल्या भावांसह भीष्माला शरण येतो आहे. ते आपापसांत कुजबुजूं लागले व म्हणायला लागले, "छे छे! पांडव कांही खरे क्षत्रिय नाहीत. जर ते खरे शूर असतील तर ऐन युद्धाची वेळ आल्यावर मृत्यूला घाबरले कसे? आता तर काय, लढाई न लढताच दुर्योधनाचा विजय झाला आहे."

पांडवांच्या सेनेतही धर्मराज भीष्माला काय सांगतील व भीष्म त्यांना काय उत्तर देतील याबद्दल खूप उत्सुकता होती. त्यांच्या बोलण्याचा अर्जुनावर व श्रीकृष्णावर काय परिणाम होईल? युद्धाचे नांव काढले तरी हर्षभरित होणाऱ्या भीमावर याची कोणती प्रतिक्रिया होईल? हे सर्व जाणून घेण्यास दोन्ही पक्षांच्या सेना फार उतावीळ झालेल्या होत्या.

धर्मराज बलाढ्य शत्रुसेनेच्या मधून भीष्मा-जवळ पोचले व म्हणाले, "युद्धांत आपल्याशी सामना करणें हे अतिशय कठीण व घाडसी कार्य आहे. म्हणून आम्ही आपल्याकडून युद्धाला



अनुमती मागण्यासाठीं आलो आहोंत. आम्हाला आशिर्वाद द्यावा."

भीष्मपितामह धर्मराजावर प्रसन्न होऊन म्हणाले, "या तुझ्या सौजन्यशील वर्तनामुळें मी फार खुष झालो आहे. युद्धासाठीं माझी संमती व आशीर्वाद, दोन्ही आहेत. विजयी भव ! वाटल्यास एखादा वर माग. धन मनुष्याला दास बनवतं. म्हणून मला कौरवांच्या बाजूने लढावं लागणार आहे. या माझ्या कर्तव्यांत बाधा येईल असा वर मात्र मागूं नकोस."

"पृथ्वीवरची कोणतीही शक्ती आपला पराजय करं शकणार नाही. पण जर आमचा विजय व्हावा असं आपल्याला वाटत असेल तर आपणच आपल्या पराजयाचा उपाय असलाच तर सांगावा." धर्मराजाने विचारलं.

"मी युद्धांत कसा पराजित होऊं शकेन हे मला माहीत नाही. युद्ध करताना माझा मृत्यू होईल असं विधिलिखित नाही. या बाबतीत पुन्हां कधीतरी भेट." पितामहांनी सल्ला दिला.

त्यानंतर धर्मराज भीष्माचा आशिर्वाद घेऊन गुरु द्रोणाचार्यांच्याजवळ गेले, आणि विनयपूर्वक हात जोडून म्हणाले, "आचार्यवर! युद्ध करण्याची अनुमती आणि आशीर्वादाची याचना करण्यासाठीं आलो आहे."

द्रोणाचार्यांनी सांगितलं "युद्ध करण्याचा निश्चय करतेवेळींच तूं मला विचारण्यासाठी यायला हवं होतंस. या तुझ्या अपराधासाठीं मी तुला शाप देऊं शकलो असतो. पण युद्धाला प्रारंभ करण्यापूर्वी तुझ्या येण्यामुळें आता मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. युद्ध कर आणि विजयी भव! तुझी कांही इच्छा असल्यास सांग. मी कौरवांचे अन्न खाल्लंय, त्यामुळें तुमच्या पक्षांतून युद्ध करं शकत नाही. हे सोडून आणखी दुसरं कांही मागायचं असलं तर मागून घे."

"युद्धांत आपल्याला जिंकणे कुणालाही शक्य नाही. म्हणून आपणही आपला पराजय कशांत आहे ते सांगावे म्हणजे आम्ही विजयी होऊं शकूं." धर्मराजाने नम्रतेने विचारले.

"जोपर्यंत मी लढत असेन तोपर्यंत तुमचा विजय अशक्य आहे हे मात्र निश्चित आहे. म्हणून शक्य तितक्या लवकर मला मृत्यूला आलिंगन देण्यासाठीं पाठव." द्रोणाने सांगितले.

"पण आपण तर अजेय आहात. आपल्याला कोण मारूं शकेल? आपल्या मृत्यूचं रहस्यच मला जाणून घेण्याची इच्छा आहे." धर्मराजाने सांगितलं.

"जोपर्यंत माझ्या हातांत धनुष्यबाण राहील व जोपर्यंत मी लढत राहीन. तोपर्यंत ना कोणी मला पराजित करं शकेल, ना कुणी मला मारं शकेल. पण जर माझ्या कानावर एखादी अप्रिय बातमी आली, आणि ती गोष्ट कुणा विश्वासू व्यक्तीमार्फत कळली तर मी अस्त्राचा त्याग करेन. मगच मला कुणी मारं शकेल, एरवीं नाही." द्रोणाने आपल्या मृत्यूचें रहस्य सांगितले.

द्रोणाचार्यांचा आशिर्वाद घेऊन धर्मराज कृपाचार्यांच्या आशिर्वाद मागण्यास गेले. त्यांनी पांडवांना विजयी होण्याचा आशिर्वाद देताना सांगितलं, "मी युद्धभूमींत कोणाकडूनही पराजित होऊं शकणार नाही किंवा मरणारही नाही. तरीही विजय तुमचाच होईल. तेव्हां निश्चिंत मनाने जा आणि युद्ध कर."

त्यानंतर धर्मराजाने मामा शल्याकडूनही युद्धाची अनुमती व आशीर्वाद मागितला. शल्यानेही युद्धास संमती आणि विजयाचा आशिर्वाद देताना युधिष्ठिराला आणखी कांही मागण्यास सांगितलें. त्यावर धर्मराजाने कर्णाचा वध करण्यांत मदत मागितली. त्यावर शल्याने सांगितले, "ही मदत देखील मिळेल. जा, निर्भयपणें युद्ध करा आणि विजयी व्हा."

जेव्हां सर्व पांडव गुरुजनांचे आशिर्वाद घेऊन परत आले, तेव्हां श्रीकृष्णाने कर्णाला विचारले, "जोपर्यंत पितामह युद्धांत लढत आहेत, तोपर्यंत तूं कौरवांच्या बाजूने लढणार नाहीस. कारण तशी तुझी प्रतिज्ञा आहे. मग तोपर्यंत तूं पांडवांच्या बाजूने कां लढत नाहीस? भीष्माच्या मृत्यूनंतर कौरवांच्या पक्षांत निघून जा."

"मी दुर्योधनासाठीं आपले प्राणदेखील पणाला लावीन. आणि कोणत्याही परिस्थितींत मी त्याच्याविरुद्ध कांही एक करणार नाही." कर्णाने निर्धारपूर्वक सांगितले.

तेव्हां दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी उभा राहून आणि कौरवसेनेला पुकारून धर्मराज म्हणाले, "आपल्यापैकीं अर्जुनदेखील जरी कुणाला सत्य व न्यायाचे रक्षण करण्यासाठीं आमच्या पक्षांत यायची इच्छा असेल तर त्यांचं स्वागत आहे."

त्यावर दुर्योधनाचा भाऊ युयुत्सु पुढें आला आणि पांडवांच्या बाजूने युद्ध करण्याची आपली इच्छा त्याने प्रकट केली. धर्मराजाने त्याला संमती दिली.

यानंतर शंखनाद आणि रणभेरींचा आवाज दशदिशांत दुमदुमला आणि महाभारतांतल्या प्रलयंकारी युद्धास प्रारंभ झाला.





# खरा पंडित

चक्रपूरमधें एक ब्राह्मण तरुण राहात होता. त्याचं नांव होतं चक्री! तो लहान होता तेव्हाच त्याचे आईवडील वारले, म्हणून तो फारसा शिकूं शकला नाही. तरीही, थोडेफार पंचांग पाहाणें, विवाह, यात्रा वगैरेसाठी शुभ मुहूर्त काढून देणें हे त्याला ठाऊक होते. त्याचा चरितार्थ त्यावर ठीक चालला होता व थोडेफार पैसे शिल्लक पडत होते.

चक्रीला कविता करण्याची आणि त्या गाऊन दाखवण्याची जन्मजात हौस होती. गांवातल्या धर्मशाळेच्या पारावर तो बसायचा, आणि आपल्या कविता नेहमी गुणगुणायचा. कांही पंडित, विद्वानांकडून काव्यशास्त्रांतले छंद, मात्रा, अलंकारयोजना इ. कांही मूळ नियम त्याने शिकून घेतले होते. त्यांच्या आधारें त्याच्या कविता लोकप्रिय होत होत्या आणि श्रोत्यांवर चांगला प्रभाव पाडीत असत.

एकदां धर्मशाळेंत उतरलेल्या एका कवीने चक्रीच्या कविता ऐकल्या. चक्रीची प्रशंसा करीत तो म्हणाला, "तूं एक चांगला कवी आहेस, त्याचबरोबर चांगला गायकदेखील आहेस. परंतु या कलांना जोपर्यंत प्रोत्साहन व आश्रय मिळत नाही, तोपर्यंत त्यांना लोकप्रियता व प्रसिद्धी मिळत नाही. माझा सल्ला आहे कीं तूं राजाश्रय मिळवण्याचा प्रयत्न कर. त्यामुळें तुझ्या पोटापाण्याचीही नीट सोय होईल, समाजांत मानसन्मान मिळेल, आणि तुझ्या कवितेला नि प्रतिभाशक्तीला बहर येईल. तुझी कविता अमर होईल."

या बोलण्याने कवीचा उत्साह दुणावला. दुसऱ्याच दिवशीं राजाला भेटण्यासाठीं तो राजधानीकडे निघाला. राजधानीला पोंचण्यापूर्वी संध्याकाळ झाली, म्हणून तो एका गांवात थांबला व उतरण्यासाठीं धर्मशाळा शोधूं लागला. त्या गांवातल्या वडाच्या झाडाखाली पारावर बसलेल्या केशवने त्याची विचारपूस केली. चक्रीची सारी कहाणी ऐकून केशव त्याला म्हणाला, "मीदेखील ब्राह्मण आहे. तुम्हाला भोजनासाठीं आणि विश्रांतिसाठीं धर्मशाळेंत उतरण्याची कांही आवश्यकता नाही. आज आपण माझे पाहुणे आहात. उद्यां मी तुम्हाला राजधानीला पाठवण्याची व्यवस्था करीन." चक्रीने आनंदाने केशवचे निमंत्रण स्वीकारले.

चक्रीला घेऊन केशव आपल्या घरी गेला. त्याच्या वृद्ध वडिलांशी त्याने चक्रीचा परिचय करून दिला. त्याची माहिती कळल्यानंतर ते वृद्ध गृहस्थ म्हणाले, "तूं तर माझा दूरचा नातेवाईक आहेस. आता तूं थोडे दिवस इथें राहा, आणि माझे पौरोहित्याचे काम सांभाळ. थोड्या मोठ्या माणसांबरोबर थोडाफार अनुभव तुला मिळाला कीं मग राजाश्रय मिळवण्यासाठीं राजधानीला जा."



तोंच केशवची मुलगी स्वाती तिथें आली आणि म्हणाली, "आजोबा, जेवण वाढलं आहे. बाबा तुम्हाला जेवायला बोलावताहेत."

आजोबांनी चक्रीची ओळख स्वातीशी करून दिली, आणि सांगितलं कीं हे राजाच्या दरबारांत कवी होण्यासाठीं जाणार आहेत.

त्यावर स्वाती हंसून म्हणाली, "दरबारांत तर आत्ता तिथे कवी हजर आहेत. एक दिवसाचा कवी, दुसरा संध्याकाळचा कवी. आणि तिसरा रात्रीचा कवी. हे चक्रीमहाशय कोणत्या वेळेचे कवी आहेत?"

स्वातीच्या गूढ प्रश्नाचं उत्तर चक्रीने गूढ भाषेंतच दिलं. तो म्हणाला, "मला तर सर्व वेळा पाहायच्या आहेत. या तिन्ही वेळांच्या कवीपंडितांनी जर मला योग्य ठरवलं तर मी वर्तमानकाळाचा कवी बनूं शकेन."

स्वाती आणि चक्रीचा हा गूढ संवाद राजाच्या एका गुप्त हेराने ऐकला. राजाने आपल्या देशांत लपलेल्या शत्रूंचा शोध करण्यासाठीं साऱ्या राज्यांत गुप्तचरांचं जाळं पसरलं होतं. त्यांतल्या एका हेराने राजाला या संवादातला शब्द न शब्द ऐकवला. राजाला त्यांतला अर्थ कांही कळला नाही. म्हणून त्याने दरबारांतल्या तिन्ही कवींना बोलावून त्याचा सरळ अर्थ काय आहे ते विचारले.

तिन्ही कवीपंडित हा संवाद ऐकून खूप रागावले. संतापाने त्यांचा जळफळाट झाला. ते म्हणाले, "महाराज, त्या दोघांनी या संवादात आम्हा तिघाजणांविषयीं अत्यंत अपमानास्पद शब्द वापरले आहेत. दिवसाचा कवी किंवा पंडित हे संबोधन जुगाऱ्याला वापरतात, संध्याकाळचा कवी किंवा पंडित चोराला म्हणतात. आणि रात्रीचा कवीपंडित

व्यभिचारी मानला जातो."

राजाने स्वाती आणि चक्रीला दुसऱ्या दिवशीं राज्यसभेंत बोलावून सांगितलं, "तुम्ही दोघांनी आमच्या दरबाराच्या कविपंडितांवर लादलेले आरोप सिद्ध करुन दाखवा. नाहीतर तुम्हाला कठोर शिक्षा भोगावी लागेल." चक्री आणि स्वातीने प्रथम एकमेकांशी बोलून राजाला काय उत्तर द्यायचे ते ठरवले.

चक्रीने राजाला वांकून अभिवादन केले आणि मोठ्या नम्रपणें तो म्हणाला, "महाराज, दिवसाचा कवी याचा अर्थ असा आहे - द्यूतामुळें पांडवाची दुःखमयी गाथा जाणणारा ज्ञानी; म्हणजे महाभारताचा कवीपंडित. संध्याकाळचा कवी म्हणजे ज्याला सीता-हरणाची कथा ठाऊक आहे तो - म्हणजे रामायणाचा पंडित ! आणि रात्रींचा कवी जो आहे तो रसांचा राजा शृंगार - त्यांत संयोगवियोगाच्या दोन्ही गोष्टी ओतप्रोत भरल्या आहेत असे श्रीकृष्णाचे जीवनचरित्र जाणणारा. म्हणजेच मद्‌भागवताचा कवींपडित."

"आपले तिन्ही कवी या तीन महान ग्रंथांचे महापंडित आहेत. जर या तिन्ही महापंडितांनी मला योग्य समजले तर मी खरा पंडित बनूं शकेन. मग मला आपल्या छायेंत राहाण्याचं सौभाग्य प्राप्त होऊं शकेल. स्वातीच्या व माझ्या संवादाचा हा खरा नि सरळ अर्थ आहे."

चक्रीचे स्पष्टीकरण ऐकून तिथे कवी फारच खूष झाले. त्यांनी सांगितलं, आम्ही सर्वांनी तुझ्या संवादाचा मुद्दामच विपरीत अर्थ लावला होता. पण आम्ही तिथे कोणकोणत्या महाकाव्याचे पंडित आहोत हे तूं त्या विपरीत अर्थावरुनच ओळखलंस! त्यावरुन तूं खरा पंडित आहेस हे निश्चित समजलं आहे."

राजाने चक्रीचा योग्य सत्कार केला व त्याला आपल्या दरबारांत नेमणूक दिली. थोड्याच दिवसानंतर चक्री व स्वाती यांचे लग्न झाले. कांही काळानंतर चक्रीने सुंदर काव्यरचना केल्या व तो एक श्रेष्ठ कवी म्हणून प्रसिद्ध झाला.







# काटकसरीचे महत्व

एका गांवात पश्चिमी किनाऱ्यावर गणेश व गंगाधर नांवाचे दोन तरुण राहात होते. लहानपणापासून ते जिवलग मित्र होते. मोठे झाल्यानंतर ते दोघे आपला उदर निर्वाह करण्याच्या विचारास लागले. त्या वेळेला त्यांच्या गांवात फार मोठा दुष्काळ पडला. म्हणून दोघांनी विचार केला कीं पूर्व किनाऱ्याच्या बाजूला जाऊन एखाद्या शहरांत जावे. आणि कांहीतरी नवा पोटापाण्याचा उद्योग मिळवण्याचा प्रयत्न करावा.

"अरे बाबा, मनुष्याला पोटासाठीं असं कितीसं अन्न हवं असतं? थोडेसे तांदूळ आणि सुकी मासळी खाऊन आपण कित्येक वर्षे जगूं शकतो. आपण काटकसरीने राहिलो, आणि मेहनत करुन जे कांही मिळवूं त्यांतली काहीं रक्कम बाजूला सांठवत राहिलो तरी चांगलेच! त्या पैशांतून आपण व्यापार करुं शकूं आणि नंतर आपले आयुष्य आरामांत घालवूं शकूं." गंगाधर म्हणाला.

"छान,छान, आपण काटकसर करुन पैसे सांठवू!" गणेशने दुजोरा दिला.

दोघेही घराबाहेर पडले. पूर्वेच्या किनाऱ्यावर जाऊन पुढें चालूं लागले. तिकडच्या प्रदेशांत चारी बाजूला हिरवीगार डोलत असलेली शेते होती. ती पाहून त्यांना खूप आनंद वाटला. नंतर ते दोघे दुसऱ्या एका शहरांत पोंचले. ते एक व्यापाराचे केंद्र होते. दोघांनी विचार केला कीं एकदोन वर्षे आपले काम आपण दोघांनी वेगवेगळे राहून करावे. आपापल्या नशिबाची परीक्षा पाहावी. म्हणजे एकाचा भार दुसऱ्यावर पडणार नाही. असे ठरवून दोघेही दोन निराळ्या दिशांना वळले.

गणेश मनापासून कष्ट करीत पैसे सांठवू लागला. गंगाधरच्या सांगण्यानुसार तो भात आणि सुकी मासळी खाऊन आपले पोट भरीत व काटकसरीने राहून दिवस घालवूं लागला.

पण अशा तऱ्हेने गणेश फार दिवस राहूं शकला नाही. साधे जेवण त्याला रुचेना. जवळ पैसे असताना अशी कंजूषी करणें त्याला मानवेना. एक दिवस त्याने कोंबडी विकत

बद्री प्रसाद



आणली आणि ती शिजवून त्यावर ताव मारला. त्याच्या मनाची तृप्ती झाली. त्याच्या मनांत आले, नीट मनसोक्त जेवण करता आले नाही तर पैसे मिळवण्याचा फायदा तरी कसला?

पण आपण काटकसरीचा नियम मोडला याची त्याला खंत वाटायला लागली. म्हणून पुन्हां त्याने भात व सुक्या मासळीवर राहायचे ठरवले. पण ते साधें जेवण त्याला आवडेना. त्याला नेहमी कोंबडीच्या रश्श्याची आठवण येऊं लागली.

शेवटीं त्याला कोंबडी खाण्याचा मोह आवरेना. त्याच्याजवळ जे पैसे शिल्लक होते ते तो स्वादिष्ट जेवणावर खर्च करुं लागला. अशा प्रकारें हळूंहळूं त्याचा पैसा खर्च होत गेला, आणि काम करण्याचा त्याला कंटाळा येऊं लागला. शरीरही काम करीनासे झाले. शेवटी त्याच्या-जवळ साधा भात व सुकी मासळी खाण्याइतके देखील त्याला पैसे मिळेनासे झाले.

या काळांत गंगाधरचा धंदा चांगल्याप्रकारें वाढत गेला. त्याने काटकसर करुन व भरपूर मेहनत करुन स्वतःच्या हिंमतीवर घर व जमीन विकत घेतली. त्याची कमाई सतत वाढत होती. त्याने एक घर विकत घेतले व लग्न करुन तो आनंदात राहूं लागला.

गणेशला समजलं कीं त्याच्याप्रमाणेंच रिकाम्या हाताने शहरांत आलेला गंगाधर मोठा श्रीमंत झाला आहे आणि आरामांत राहातो आहे! आपल्या जुन्या मित्राकडे मदत मागण्याच्या विचाराने तो गंगाधरच्या घरीं गेला. आणि त्याला म्हणाला कीं दैवाने त्याला साथ दिली नाही; म्हणून भात-सुक्या मासळीचे दोन घांस मिळणें देखील त्याला कठीण होते.



"तुलाही भात व सुक्या मासळीचे जेवण मिळेल याची मी व्यवस्था करीन. पण तूं आपल्या पायांवर उभा रहा!" असं सांगून गंगाधरने आपल्या घराच्या आवारांत एक छोटी झोंपडी तयार केली आणि रोज तो गणेशला भात आणि सुकी मासळी पाठवायला लागला.

आणखी कांही दिवस गेले. एक दिवस गंगाधरने गणेशला बोलावून समजावले, "रोज भात आणि सुकी मासळी खाऊन तूं कदाचित कंटाळला असशील. तूं एक काम कर. आपल्या चिंचेच्या बागेंतले सर्वांत लहान झाड मी तुला देतो. त्या झाडाची पाने तूं मासळींत घालून शिजव. तुझं जेवण जास्त चविष्ट लागेल."

गणेश आपल्या मित्राबरोबर चिंचेच्या बागेंत गेला. तिथल्या सर्वांत लहान रोपाची पानें आणून त्याने मासळीच्या कालवणांत घातली. कालवण चवदार बनले. पण कांही दिवसांतच त्या रोपाची सारी पाने संपून गेली.

गणेश आपल्या मित्राजवळ गेला आणि चिंचेच्या झाडाची पानें तोडायची परवानगी मागूं लागला. गंगाधर म्हणाला, "तूं आजपासून सर्वांत मोठे जे झाड आहे त्याची पानें तोडत जा."

आणखी कांही दिवस गेले. गंगाधरने गणेशला बोलावून विचारले, "तूं ज्या झाडाची पानें रोज तोडतोस, त्याची पानें संपली की नाहीत अजून?"

"अरे बाबा, त्या झाडाची पानें संपतील कशी? मी एका दिवशीं फक्त मूठभर पाने तोडतो, तर दुसऱ्या दिवशीं दोन मुठी पाने उगवलेली असतात." गणेश म्हणाला.

"अरे मित्रा! मी आणि तूं जे काम केलं, त्यांत हाच फरक आहे. तुझी कमाई जेव्हां खूप कमी होती, तेव्हां तूं सारे पैसे खर्च केलेस. मी ते पैसे साठवेत म्हणून जोर धरला. चिंचेच्या त्या लहान झाडासारखं तुझं आयुष्य भकास झालंय. पण चिंचेच्या मोठ्या झाडाप्रमाणें माझं आयुष्य मात्र फुलत आहे, फळाला आलं आहे." गंगाधर म्हणाला.

"तूं मला चांगला धडा शिकवलास. आज-पासून मी तुझ्या कमाईवर निर्भर राहाणार नाही. आणि आपल्या पायांवर उभा राहाण्याचा पुन्हां प्रयत्न करीन." हे सांगून गणेशने आपल्या मित्राचा कित्ता गिरवायचा निश्चय केला.



# राजादेखील नम्र असावा

चित्र : शंकर ली





































# भारताचा शोध - प्रश्नोत्तरी

खालीं दिलेल्या प्रश्नांची उत्तरें पुढच्या अंकात दिली जातील. तोपर्यंत तुम्ही स्वतः ही उत्तरें शोधून काढा, आणि आपल्या परंपरेचा परिचय करुन घ्या.



## 1

१. अ प्राचीन भारतीय साहित्यांतली पहिली कादंबरी कोणती मानली जाते?

ब प्राचीन भारतीय साहित्यांतल्या कोणत्या कृतीची रचना दोघा ऋषींनी मिळून केली आहे?

क भारतातले पहिले ऐतिहासिक नाटक कोणते?

उ कालिदासानंतरचा प्रसिद्ध नाटककार कोण आहे? त्याची प्रसिद्ध कृती कोणती आहे?

## 2

एक राजकुमार, सैन्याबरोबर, आपला राजा असणाऱ्या ज्येष्ठ बंधूने सोडलेल्या घोड्याबरोबर फिरत होता. हा घोडा जर कुणा राजाने न अडवता परत आला असता, तर त्या घोडयाचा स्वामी सम्राट म्हणून घोषित केला गेला असता.

पण घोड्याबरोबर चालत जाणाऱ्या राजकुमाराला व त्याच्या सैन्याला, एका तरुणाने आव्हान दिले. साहजिकच, दोघांच्यात युद्ध झाले. राजकुमार मारला गेला. पण एका स्त्रीने त्याला पुन्हां जिवंत केले. नंतर समजले कीं तो तरुण दुसरा कुणी नसून त्या राजकुमाराचाच मुलगा होता.

हा राजकुमार कोण होता? युवक कोण होता? ती स्त्री कोण होती?



जे रोप बांकत नाही, ते वृक्ष होऊन बांकेल कां?

# वाईट संवयी

लक्ष्मीपूर गांवात राम नांवाचा एक सामान्य शेतकरी होता. तो फार काटकसरी होता. अगदी जरूर पडली तरच तो खर्च करीत असे. मुलांनी जर पानांत उष्टे अन्न टाकले तर तो त्यांना रागवत असे. आणि नंतर 'अन्न म्हणजे देव आहे. त्याची नासाडी करुं नये' हे त्यांना तासभर समजावत बसे. तो पत्नीला नेहमी सांगायचा, कीं मुलांना जेवढं ती खाऊं शकतील, तेवढंच जेवण वाढावे. त्याच्या पत्नीला, सीताला, त्याची ही काटकसर आवडत नसे. आपला नवरा एक कंजूष चक्रम आहे असं तिला वाटायचं. ती मुलांची बाजू घेऊन त्याला म्हणे - "एक एक दाण्याचा हिशेब ठेवण्याइतके कां आपण गरीब आहोत? अन्न म्हणजे कांही सोनं नव्हे, कीं रतीभरदेखील इकडेतिकडे होऊं शकणार नाही."

पण रामच्या मतें, काटकसरी असणें, कोणतीही गोष्ट निष्काळजीपणें वांया न घालवणें, आणि फालतू खर्चाला आळा घालणें, या सर्वांत चांगल्या गोष्टी आहेत. त्याला आपल्या बायकोमुलांच्या उधळ्या संवयी आवडत नसत. म्हणून त्यांना सुधारण्यासाठी त्याने एक योजना ठरवली.

एका गुरुवारी संध्याकाळी त्याने सीताला सांगितले, "उद्यां सकाळीं आपण सर्वांनी अन्नपूर्णेश्वरी देवीच्या मंदिरात दर्शनाला जायचे आहे. बरोबर थोडंसं फराळाचं बांधून घे. देवीचं दर्शन घेऊन तिथेंच वाटेंत कांहीतरी खाऊं आणि परत येऊं."

रामची कल्पना सीताला आवडली. दुसऱ्या दिवशीं भल्या पहाटे उठून तिने कांही गोड व कांही तिखट फराळाचे जिन्नस बनवले. त्याचे एक गांठोडे बांधून एका पिशवींत घातले व रामजवळ दिले. मग मुलांना तयार करुन सर्वजण देवीच्या मंदिरात जायला निघाले.

उन्हाळ्याचे दिवस होते. देवीचे मंदिर डोंगरावर होते. ती चढण चढतांना सीता लवकरच दमली व घामाघूम झाली. तरीपण वाटेंत थांबून थांबत, ती देवळांत जरा उशीरा पोंचली. मुलें आणि राम पळतपळत लौकरच वर पोंचले. शुक्रवार असल्यामुळें मंदिरात खूपच गर्दी होती. म्हणून दर्शन होईपर्यंत दुपार झाली.

परत तिथेपर्यंत सीता व मुलें पार थकून गेली होती. त्यांना खूप भूक लागली होती. त्यांना पुढें चालवेना. वाटेंत एका झाडाखालीं सीता थांबली आणि म्हणाली, "इथें थोडा वेळ थांबून फराळ करुं या. मुलें अगदीं भुकेजली आहेत आणि चालून दमली आहेत. शिदोरीचं गाठोडं काढा बरं!"

रामने पिशवींत हात घातला, पिशवी हालवून पाहिलं, आणि निराश होऊन म्हणाला, "गोंधळच झाला सगळा! बहुतेक फराळाची पिशवी, आपण पूजेचं साहित्य खरेदी केलं, तेव्हां दुकानांतच विसरली असावी. आता उपाशीपोटीच घरी परतावं लागेल."

रामच्या वेंधळेपणाबद्दल सीता खूप चिडली, पण करणार काय? थकून भागून चालत सगळे घरीं पोंचले. सीता तडक स्वयंपाकघरांत शिरली आणि मुलांसाठीं कांहीतरी खायला करण्याच्या तजविजीला लागली.

"स्वयंपाक नंतर कर. उपाशी आहेस. कांहीतरी खाऊन घे अगोदर. मुलांनाही बोलाव." रामने हंसत पिशवीतून फराळाचे गांठोडे काढले. ते पाहून सीता अतिशय रागावली व चिडून म्हणाली, "तुम्ही अगदी पाषाणहृदयी आहात. जाणूनबुजून तुम्ही मुलांना उपाशी ठेवलंत ना!"

राम निमूटपणें तिचे रागावणें ऐकून घेत होता. ती त्याला उलटून बोलत होती, मुलांना फराळ वाढत होती, एकीकडे आपणही खात होती, आणि खाताखाता रामवर खूप उलटसुलट रागवत होती.

जेव्हां मुलांचं खाणं झालं तेव्हां राम सीताला म्हणाला, "आज मुलांच्या ताटांकडे बघ तरी जरा! अन्नाचा एक कणदेखील ताटांत नाही. ताट साफ आहे ना? कां बरं?"

चाटूनपुसून साफ केलेल्या थाळ्या पाहून सीताही विचार करुं लागली. आज मुलांनी पानांत कांहीही उष्टं अन्न टाकलं नाही. आत्ताच घासून साफ केल्यासारखी ताटं स्वच्छ होती. "जशी पैशाची किंमत गरीबाला जास्त समजते, त्याचप्रकारें अन्नाची किंमत भुकेल्या पोटार्थ्यालाच समजते. तुम्हाला हे समजावून सांगण्यासाठीं मी हे नाटक केलं. मुलांच्या वाईट संवयीं असल्या, तर त्या लहान वयांतच घालवाव्या लागतात. जर लहानसं रोप बांकत नसलं, तर त्याच मोठा वृक्ष झाल्यानंतर जरा तरी वाकेल कां?" रामने सीताला खुलासेवार सांगितलं.

त्या दिवसापासून सीता मुलांच्या ताटांत थोडे कमी जेवण वाढायला लागली. जास्त पदार्थ मागितले तरच ती पुन्हां आणखी थोडा देई. यामुळें ताटांत उष्टें अन्न टाकण्याची मुलांची संवय सुटली आणि सीतालाही काटकसरीचे मर्म समजले.

- आर. निवास





# भारत :
## तेव्हां व आता
# श्रीनगर
## सुंदर आणि आकर्षक शहर

श्रीनगर ही जम्मू व काश्मीर राज्याची राजधानी आहे. श्रीनगर शहर नावाप्रमाणेंच सुंदर आणि लोभस आहे कारण निसर्गानें इथें सौंदर्याची मुक्त उधळण केली आहे. समुद्रसपाटीपासून १७६८ मीटर उंचीवर हे गांव वसले आहे. मनमोहक दल सरोवर हा तर गांवाचा मानबिंदू. त्याशिवाय इतर अनेक उद्यानें व बगिच्यांनी गांवाचा चेहरामोहरा फारच देखणा झालेला आहे. इथें झेलम नदी आपल्याला भेटते.

पुराणकाळांत काश्मीर हा पाण्याचा मोठा जलाशय होता. त्यांत जलोद्भव नांवाचा राक्षस राहात होता. जलोद्भव म्हणजे पाण्यांतून बाहेर येणारा! तो त्याच्या जलराज्यांतून उडी मारुन बाहेर येई आणि आजूबाजूची वस्ती उध्वस्त करी. तो पाण्यांत असेपर्यंत कुणीही त्याला कांही करुं शकत नव्हतं. तसा त्याला वर मिळालेला होता. महर्षी काश्यप यांना त्याच्या मृत्यूचे रहस्य ठाऊक होते. त्यांनी एक जादूचा नांगर आणला व तो सारा तलाव खणून काढून, सारे पाणी खेचून काढले. तलाव कोरडा पडल्यानंतर जलोद्भवाची ताकद संपली व तो मेला. त्या जमिनीला काश्यप-मीर म्हणूं लागले व पुढे त्याचे काश्मीर झाले.

कल्हन यांनी लिहीलेल्या 'राजतरंगिणी' या प्राचीन काश्मीरनरेशांसंबंधींच्या बखरींत श्रीनगर हे सम्राट अशोकाने वसवले होते असा उल्लेख आहे, वास्तविक, या शहराच्या स्थापनेचे श्रेय अशोकाची कन्या चारुमती हिला जायला हवं. ह्या रमणीय प्रदेशांत या मनमोहक ठिकाणीं, ती आपल्या पित्याबरोबर गेली होती. मन लोभावणारे दल सरोवर पाहून ती म्हणाली, ''ध्यान करायला किती शांत जागा आहे ही!'' या शब्दामुळें इथें एक बुद्धविहार बांधावा अशी सम्राटाला प्रेरणा झाली. हळुंहळुं त्याभोंवती हे शहर विस्तारले.

श्रीनगर नाव कुणी ठेवले ते आम्हाला माहीत नाही. एका दंतकथेनुसार हे नांव जुन्या सूर्यनगर नांवावरुन पडले आहे. हिंदुस्तानची १९४७ मधें फाळणी झाली. तेव्हां जम्मू-काश्मीरच्या महाराजांना, त्यांचे संस्थान हिंदुस्तान किंवा पाकिस्तान, यापैकीं एकांत विलीन करण्याची संधी दिलेली होती. महाराजांनी निर्णय घेण्यापूर्वीच पाकिस्तानला घाई झाली आणि त्यांनी आपल्या सैन्याच्या मदतीने, डोंगरी भागांतले अनेक रहिवासी काश्मीरमधें घुसवले. महाराजांनी संस्थान भारतांत विलीन करायचे ठरवले आणि ताबडतोब भारतीय सेनेने पाकिस्तानी उपटसुंभांना हाकलले, परंतु लडाखच्या जिल्ह्याच्या एक भाग मात्र त्यांच्या ताब्यांत राहिला आहे. संयुक्त राष्ट्रसंघाने लढाई थांबवण्याचा इशारा केला व युद्धबंदीची सीमारेषा आंखली.

अजूनही पाकिस्तान काश्मीरमधें त्रास देत आहे, हे साऱ्या जगाला पुरते ठाऊक आहे. श्रीनगरमधें हजारों पर्यटक दरवर्षी येत असत, तिथें कित्येक वर्षे निशब्द शांतता होती. आता परिस्थिति जरा बदलूं लागली आहे. पाकिस्तानच्या मदतीने होणारी दडपशाही जरा कमजोर होऊं लागली आहे.

जुन्या श्रीनगरमधें खरोखरी इतकी प्रेक्षणीय ठिकाणें होती. उदाहरणार्थ, बगीचे आणि धबधबे असलेली चष्मेशाही, स्वर्गीय उद्यान अथवा निशातबाग, जहांगीर बादशहाने तयार केलेली शालिमार बाग, शंकराचार्यांनी व श्रीअरविंदांनी जिथें ध्यानधारणा केली तो हरीपर्वत व शंकराचार्य टेकडी, आणि हजरबाल मशीद, जिथे महंमद पैगंबराचा केंस ठेवलेला आहे असं म्हणतात.

आधुनिक श्रीनगरमधें पर्यटकांसाठी अनेक हॉटेल्स, हाऊसबोटी व इतर सुविधा आहेत. पर्यटन हा इथला प्रमुख व्यवसाय आहे. श्रीनगरमधें, नयनमनोहर परिसरांत, अनेक शैक्षणिक संस्था स्थापन झालेल्या आहेत. जम्मू-काश्मीर विद्यापीठ, शेर-ए-काश्मीर कृषीशास्त्र व तंत्र विद्यापीठ, याखेरीज अनेक महाविद्यालयें व अकादमी इथें आहेत.



*एक तरंगती बाग-एक जुने चित्र समोरच्या पृष्ठावर - दल सरोवरांत शिकारा*

श्रीनगरप्रमाणेंच आजूबाजूला बरीच रमणीय पर्यटनस्थळें आहेत. काश्मीरची हस्तकला प्रसिद्ध आहे. त्याशिवाय कागदाच्या लगद्याच्या सुबक वस्तू, लांकडी कोरीवकाम केलेल्या वस्तू, फर्निचर, लोंकरी गालिचे, शाली, स्वयंपाकात लागणारे केशर, व सुगंधी अत्तरांसाठीं व औषधांतही उपयुक्त असणारी कस्तुरी - या सर्व गोष्टींसाठीं काश्मीर प्रसिद्ध आहे.



**आजचे जग**

# श्रीलंकेतली रणधुमाळी

श्रीलंकेची जुनी बखर 'महावंश', त्यानुसार कोणे एके काळीं, पूर्व हिंदुस्तानांतला एक राजपुत्र विजयसिंह या बेटांत पोंचला. त्याने बेटाचा ताबा घेतला व तिथें राहाणाऱ्या छोट्या जमातींना जंगलात पळवून लावले. त्याच्याबरोबर पांचशे सैनिक होते. त्यांची लग्नें त्याने मदुरेहून तरुण मुली आणवून त्यांच्याशी लावली. सध्यांचे जे सिंहली नागरिक आहेत ते सगळे या सैनिकांचे वंशज आहेत. बेटाचे सिंहलद्वीप हे नांव विजयसिंहावरून पडले. पुढें सम्राट अशोकाची मुलें राजपुत्र महेंद्र व राजकन्या संघमित्रा यांनी सिंहलद्वीपच्या राज्य करणाऱ्या राजघराण्याला व बेटांतल्या जनतेला बुद्धधर्माची दीक्षा दिली.

साहजिकच, दक्षिण हिंदुस्तानांतले, विशेषतः तामीळ भागांतले राजेरजवाडे व व्यापारी यांनी या द्वीपांत लहान वसाहती सुरुं केल्या. त्यांचे बहुसंख्य लोक भारताच्या अगदी जवळ असलेल्या प्रदेशांत, म्हणजे जाफनामधे राहात होते.

सिंहली व श्रीलंकेचे तामीळ या दोन्ही जमातींची मुळें भारतीय आहेत परंतु, इथले अल्पसंख्यांक तामिळ नागरिक, त्यांच्यावर बहुसंख्यांकांकडून त्यांच्यावर होत असलेल्या बऱ्याच अन्यायांविरुद्ध तक्रार करीत होते. त्यांनी तमिळ युनायटेड लिबरेशन फ्रंट किंवा (TULF) या संघटनेमार्फत चळवळ सुरुं केली. हळूं हळूं इतर तामिळ संघटना सुरुं होऊं लागल्या. त्यांपैकी सर्वांत आक्रमक व हिंसाचारी संस्था आहे (लिबरेशन टायगर्स ऑफ तमिळ इलम LTTE) किंवा तामिळी वाघ! या वाघांना श्रीलंकेतच त्यांचे स्वतंत्र राज्य हवे आहे. या संस्थेच्या उदयाबरोबर तामिळ चळवळीला निराळेच वळण लागले. तामीळ वाघाची संस्था म्हणजे तामीळभाषिकांचा एकमेव आवाज आहे असा तामीळ वाघांचा दावा आहे. इतर कुणाचाही थोडासा जरी आवाज उठलेला दिसला, तर ती व्यक्ती ठार मारली जात होती. अशा अघोरी रितीने अनेक अनुभवी व निष्ठावंत तामीळ नेत्यांचा कांटा तामीळ वाघांनी काढला, आणि अखेरीस भारताचे भूतपूर्व पंतप्रधान राजीव गांधी यांचीही हत्या केली.

तामीळी वाघ व श्रीलंकेचे सैन्य यांच्यातली लढाई सतत चालूं राहिली आहे. यांत जाफनाच्या नागरिकांचे मात्र बरेंच नुकसान झाले आहे. राज्याची आर्थिक परिस्थिती फारच बिकट झालेली आहे. हजारों तामीळ नागरिक निर्वासित होऊन भारतांत परत आले आहेत. हा संघर्ष पुन्हां एकदा फार गुंतागुंतीचा झालेला आहे.

भारताने नेहमीच श्रीलंकन तामीळ नागरिकांबद्दल सहानुभूती दर्शविली आहे. परंतु श्रीलंकेची फाळणी व्हावी ही कल्पना भारताला मान्य नाही. भारताला स्वानुभवाने कळून चुकले आहे कीं देशाची फाळणी हे संघर्षाला उत्तर असूं शकत नाही. भारताची फाळणी झाली तरी त्यामुळें भारताची किंवा पाकिस्तानची कुठलीच बाजू भक्कम झाली नाही. किंबहुना, दोन्ही देश त्याबाबतीत सदैव असमाधानी राहिले आहेत.

दुसरा मुद्दा म्हणजे लोकशाहीवर विश्वास ठेवणारा कोणताही देश तामीळ वाघांचा हिंसाचार मान्य करणार नाही. देशांतल्या बड्या नेत्यांचे, त्यापैकीं कांही आदरणीर ज्येष्ठ नेते होते, त्यांचे हत्याकांड ही कांही सुसंस्कृत विचारसरणी नव्हे. त्यांच्या दहशतवादाचा सर्वांनी तीव्र निषेध केला आहे.

समजूतदारपणें जर उभयपक्षांमधे चर्चा होऊं शकली. तर सामोपचाराने बरेंच कांही करता येईल. श्रीलंकेतला हिंसाचार थांबवून तिथें सलोख्याचे वातावरण निर्माण व्हावे, अशी भारताप्रमाणेचं जगांतल्या इतर देशांचीही इच्छा आहे.

# विशेष बातम्या

## वय ही काही अडचण नव्हे

आजकाल मुलं बहुधा वर्गात जायला अन् लिहावाचायला घाबरत नाहीत. तरीही कांही जण कधी कधी वर्गातून पळून जाऊ इच्छित असतील. नवी दिल्लीच्या राजकिशोर पांडे याच्या गोष्टीमुळे नक्कीच या विद्यार्थ्यांना प्रेरणा मिळेल. दिल्ली विश्वविद्यालयाच्या ४४ वर्षीय सुरक्षा गार्डने नुकताच पी.एच.डी.च्या पदवीसाठी आपला शोध-प्रबंध प्रस्तुत केलाय. तो १९८० मधे अुत्तरप्रदेशमधील आपल्या गावच्या विद्यालयातून बारावी इयत्ता पास करून आला होता आणि दिल्ली विश्वविद्यालयात मजुरीवर नोकरी करू लागला होता. त्याने कोणत्या कॉलेजमधे दाखला घेतला नाही. परन्तु स्वतंत्रविद्यार्थी म्हणून परीक्षा देअून त्याने बी.ए. व नंतर एम.ए. पास करून घेतले. यामधेच त्याचे लग्न झाले, त्याला चार मुलंही झाली. त्याने जेव्हां पी.एच.डी. च्या दाखल्यासाठी आवेदन केले, तेंव्हा त्याला दोन वर्षे बिनपगारी रजा घ्यायचा सल्ला मिळाला. पण त्याला हे कसे शक्य होते? कारण, त्याला कुटुंबाचा अुदरनिर्वाह करायचा होताच. विश्वविद्यालयाने त्याला केवळ रात्रीची ड्यूटी देअून मदत केली. त्याने 'आध्यात्म रामायण' व 'आनन्द रामायण' याचा तुलनात्मक अभ्यास करण्यात कितीतरी रात्री जागवल्या. त्याचे म्हणणे आहे की रामायणाच्या जवळपास शंभर व्याख्या अुपलब्ध आहेत.



आता आणखी जरा एक निराळी गोष्ट पहा. सेन्ट्रल इटलीच्या मारिया तुझ्जा पत्तारोपा या सप्टेंबरपासून प्रीस्कूल म्हणजे नर्सरीपेक्षाही खालच्या इयत्तेत शिकायला जातील. त्या जेव्हां १०५ वर्षापूर्वी जन्मल्या, तेंव्हा प्री-स्कूल सारखी कोणतीही इयत्ता नव्हती. आणि तशाही त्या आपल्या आयुष्यभर कोणत्याही शाळेत शिकायला गेल्या नाहीत.

## कमीत कमी ताण आणि वजन

पाठीवर जड दप्तरे घेअून शाळेत जाणाऱ्या विद्यार्थ्यांचे दृश्य भारतात सर्वसाधारणपणे पहायला मिळतेच आणि. सिंगापूरमधें मेकॅनिकल इंजिनियरिंग व बिझिनेस अध्ययनाचे विशेषज्ञ सहा महिन्यांपासून शाळेच्या दप्तरांच्या लोकप्रिय डिझाइन्सची पहाणी करत आहेत, आणि कमीत कमी वजनाच्या दप्तरांचा सांगाडा बनवत आहेत. मुलांकडून पाठ व खांदे दुखण्याच्या गंभीर तक्रारी आल्यानंतर हे अध्ययन केले जात आहे.

तपासणीच्या अवधीत विशेषज्ञांना पत्ता लागला की, मुले आपल्या दप्तरात पुस्तकांशिवाय पेन्सिल-बॉक्स, पाण्याच्या बाटल्या व खेळणीही ठेवतात. यांमुळे दप्तराचे वजन आणखीच वाढते. विशेषज्ञांच्या दलाने आता दप्तराचे एक असे डिझाइन बनवले आहे कि ज्यात फोमने झाकलेला एक गादीवाला साज आहे. त्यात दबावाची कमानही आहे. ती धक्का सहन करायचे काम करते. अशी दप्तरे पुढील सत्रापासून आता भारतातही दिसू लागतील, अशी आशा आहे.





## बिडी ओढण्यावर प्रतिबंध

तुम्हाला माहितीच असेल की, सिगरेटप्रमाणे बिडीही एक धूम्रपानच होय. भारतात, विशेषतः दक्षिण भारतात बिडी फार लोकप्रिय आहे. अन् हे कमी कडू प्रकार ओढणारे बिडी पसन्त करतात. नुकतीच याची निर्यातही सुरू झाली आहे. अन् भारतासाठी बिडी विदेशी पैसा कमावूं लागली आहे. निर्यात-व्यापार करणाऱ्यांना गेल्या काही दिवसात बरेच नुकसान सहन करावे लागले आहे. कारण अमेरिकेने बिडीच्या आयातीवर प्रतिबन्ध लावला आहे. अधिकाऱ्यांचे असे म्हणणे आहे की, या धन्द्यात लहान मुलांचे श्रम लागलेले आहेत. वास्तविक, अमेरिकन सरकारने असा दूरगामी निर्णय घेतलेला आहे की, ते बालकांच्या श्रमाने अुत्पादित झालेली कोणतीही वस्तु आयात करणार नाहीत. ही फार दुःखाची गोष्ट आहे की. भारतात अजूनही फटाके, बांगड्या आणि गालिचे या रोजगारात लहान मुलांचे श्रम बऱ्याच मोठ्या प्रमाणात लावले जातात. ही फार दुःखाचीगोष्ट आहे. त्यांना हॉटेलांमधेही प्लेट्स् धुताना व बाजारात मजुरीचे काम करताना आपण अजूनही पहातोच.





## अुंदीर (माअूस) दाबल्याबरोबर पंचतंत्र पहा!

पंचतंत्रात अुंदरांनी भरलेल्या गोष्टी आहेत. परंतु या शीर्षकाचा अुंदीर (माअूस) इंटरनेटशी संबंध ठेवून आहे. यात लवकरच संपूर्ण पंचतन्त्र व कथासरित्सागरच्या गोष्टी अुपलब्ध होतील. अन् त्या कंप्यूटर युनिटवर माअूस दाबल्याबरोबर पहायला व वाचायला मिळू शकतील. पुणे विश्वविद्यालयाचा विज्ञान-विभाग आवश्यक अशा सॉफ्टवेअरने जवळजवळ पूर्ण तयार आहे; यात अन्य कार्यक्रमांबरोबरच संस्कृत साहित्यातल्या म्हणी सामावलेल्या असतील. संस्कृत इनफॉर्मेटिक्स नावाच्या परियोजनेत प्राचीन संस्कृतच्या मुळापासून अुद्धृत केलेल्या सुभाषित सूक्तीही सामिल असतील. 'संस्कृत इनफॉर्मेटिक्स' नावाची ही परियोजना कानपूर आय्.आय्.टी. आणि हैद्राबाद व बंगलोर - सी.डॅक्.च्या विशेषज्ञांकडून तयार केली जात आहे.



## संस्थापक - प्रकाशक यांच्याकडून



'चान्दोबा' ची जेव्हां सुरुवात झाली, तेव्हां भारत काहीसा निराळाच होता. प्रकाशने फार कमी असत आणि 'मुलांसाठी पत्रिका' खरे पाहता एकही नव्हती. मुद्रणाची पद्धत (हाताने एक-एक जोडून शब्दांची रचना, आजच्या चमत्कारीक शिल्प-विज्ञानापासून कित्येक कोस दूर होती! टेलिव्हिजन नव्हता, कम्प्यूटर नव्हता, आणखीही बऱ्याच गोष्टी - ज्या आजच्या वैज्ञानिक युगातल्या सर्वसाधारण वस्तु आहेत त्या नव्हत्या.

परन्तु भारत आपल्या जीवनाच्या नव्या चरणात प्रवेश करत होता; इंग्रजी शासनापासून मुक्त होऊन राष्ट्र आपल्या पायांवर उभं रहात होतं.

आमचे दिवंगत मित्र श्री. चक्रपाणी व मी - आमचा दोघांचाही असा विश्वास होता की जेव्हां आपण आजच्या मुलांना हंसायला शिकवूं, तेव्हांच उद्याच्या भारताच्या चेहऱ्यावर हास्य उमटेल. तेव्हां आजच्या बालकांना आपण आपल्या महान परंपरेवर प्रेम करायला शिकवूं, तेव्हांच उद्याचा भारत एक शक्तिशाली राष्ट्र बनेल. या साहित्य-सामुग्रीचा आनंद त्यांनी एकत्रपणें घ्यावा. भारतीय भावनेशी त्यांनी समरस व्हावे. अशा रितीने, या अद्भुत प्रयोगाचा नव्हे. एका धाडसी कार्याचा, म्हणजेच 'चांदोबा'चा जन्म झाला ! व्यक्तिविकासासाठी भारतीय आख्याने, पौराणिक गोष्टी आणि लोकसाहित्याचे अक्षय भांडार मुलांसाठी ''तिळा उघड'' बनले.

चान्दोबा हळूहळू घराघरात लोकप्रिय झाला. आपल्या जीवनमार्गाच्या उतार-चढावावरून प्र'ास करता तो पुढे जात राहिला. अलिकडच्या दिवसता त्याने आपल्या जीवनातील सर्वाधि मोठे संकट झेलले एका वर्षाहूनही अधिक काळ याचं प्रकाशन बन्द राहिलं ! परन्तु याच्या मागची थक सद्भावना पुन्हा विजीय झाली आहे. त्या साहसी हितचिंतकांचं मी अभिनंदन करतो, ज्यांनी याच्या रथाची सतलेली चाकं धावत येऊन उचलली अन् याच्या ध्येयाच्या मार्गावर ती चाकं पुन्हा स्थापित केली.

माझ्यासाठी ही आनन्दाची दुहेरी संधी आहे - पहिली यासाठी की, हे प्रकाशन आपली 53 वी जयन्ती साजरी करत आहे अन् दुसरी यासाठी, की थोड्याशय बेहोशीनंतर हा चान्दोबा पुन्हा नव्या शक्तीसह जागा झाला आहे.

चान्दोबाच्या या यशानिमित्त, सर्व वाचक, शुभचिन्तक व संरक्षकांना माझ्या शुभेच्छा!

बी. नागी रेड्डी



वेताळ कथा

# परमधामचा मोक्ष

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा झाडाजवळ गेला, झाडावरून त्याने प्रेत खाली उतरवले अन् ते आपल्या खांद्यावर टाकून नेहमीप्रमाणे तो स्मशानाकडे चालू लागला. त्या घोर अंधाऱ्या आणि तुफानी रात्री, ढगांचा गडगडाट, विजांचा चमचमाट आणि भुताप्रेतांच्या आरड्या ओरड्यामुळे वातावरण जास्तच भयानक झाले. थरकाप उडविणारे ते स्मशान जवळ आल्याबरोबर प्रेतात रहाणारा वेताळ म्हणाला, ''राजा, काही लोक तर इतके आळशी असतात, की ते कोणतीही वस्तु इकडची तिकडे ठेवू शकत नाहीत अन् असं जीवन घालवण्यातच त्यांना आनंद मिळतो. पण.



या विपरित तू मात्र या भयानक तुफानी रात्रीसुद्धा इतका प्रयत्नशील राहिलेला आहेस की यातत्र आनन्द मानत आहेस. या प्रयत्नांमागे जर तुझं काही ध्येय असेल, तर एक गोष्ट लक्षात ठेव. जेंव्हा तुझ्या ध्येयपूर्तीची वेळ येईल, तेंव्हा परमधाम प्रमाणे चूक करू नकोस अन् अविवेकी माणसासारखा वागू नकोस. तुला सावध करण्यासाठी मी तुला त्याची गोष्ट सांगतो. ती नीट लक्षपूर्वक ऐकून घे.

एका जंगलाच्या जवळच्या एका गावी परमधाम नावाचा एक तरुण रहात असे. आपल्या कुटुम्बात तो एकटाच होता. खूप मेहनती असूनही तो अत्यन्त गरीब होता. पुष्कळ कष्ट करूनही तो आपल्या पोटापुरतेही मिळवू शकत नसे. खूप आर्जवे करूनही त्याला मजुरी इतकी थोडी मिळे की आपली गुजराण करणे त्याला कठीण जाई. आयुष्याबद्दल निराश होऊन तो जंगलात जाऊन तपस्या करू लागला. त्याच्या कठोर तपस्येने प्रसन्न होऊन भगवान प्रकट झाले व त्याला वर मागायला सांगू लागले.

"मला मोक्ष द्या प्रभु! या जीवन-मरणातून मुक्ती द्या अन् मला स्वतःच्या सत्तेत विलीन करून घ्या." परमधामने भगवन्ताजवळ वर मागितला.

हसतहसत भगवान त्याला प्रेमाने म्हणाले, "वत्स, मानव जीवन कुणाला यासाठी दिलं जातं, की माणसानं स्वतःसाठी जगत असताना दुसऱ्यांसाठीही काही करावं. यातच मानव-देह धारण केल्याची सार्थकता आहे. तुम्हा दोघांपैकी कोणी एकही तसं कर्म केलेलं नाही. म्हणून तुम्हाला आत्ता मोक्ष दिला जाणार नाही. मी तुम्हाला काही अद्भुत अशा शक्ती देतो. त्यां द्वारा दुसऱ्यांचं भलं करा. तुम्ही जेंव्हा निस्वार्थ भावानं परोपकार करू लागाल, तेंव्हाच तुमचं मानव-जीवन धन्य होईल. अन् तुम्ही मोक्षाचे अधिकारी व्हाल. तोपर्यन्त मानवसेवा करत रहा." इतके बोलून भगवान अन्तर्धान पावले.

परमधामला जगातल्या कोणत्या वस्तूबद्दल आसक्ती राहिलेली नव्हती. त्याची शीघ्रातिशीघ्र मोक्ष प्राप्त करून घ्यायची इच्छा होती. जंगलातून परत येताना त्याला एक तरुण दिसला. तो आपले डोके उलट खाली करून आपल्या हातांच्या आधाराने चालत होता. त्याला पाहून परमधामला फार आश्चर्य वाटले अन् त्याने युवकाला याचे कारण विचारले.

"माझे वडील कसल्याशा गुप्त रोगाने आजारी असून अंथरूणाला खिळलेले आहेत. सर्व औषधं प्रभावहीन ठरली. आमच्या गावच्या पुजाऱ्याने म्हटले की, त्यांच्यावर कुठला तरी दुष्टात्मा स्वार झालेला आहे. मी जर दररोज काही वेळ असा



चाललो, तर तो दुष्टात्मा शांत होऊन माझे वडील बरे होतील." तरुणाने सांगितले.

"पण असं हातांच्या आधाराने चालल्यामुळे तुला त्रास नाही होत?" परमधामने विचारले.

"का होत नसेल? फार त्रास होतो बुवा. याशिवाय माझा डावा हात तर जन्मापासून कमजोर आहे. वैद्यानं सुचवलं आहे की आणखी काही दिवस मी याच्या आधारानं चालत राहिलो, तर मी या हातानं अपंग होईन! पण माझ्या या हाताची अशी किंमत देऊनही जर माझे वडील बरे झाले, तर मला त्याहून मोठा आनन्द अन् सुख कशामुळे मिळेल?" आपला डावा हात दाखवत तो म्हणाला, "ते पूर्णतः बरे झाले, म्हणजे मी अधिक सुखानं अन् शान्तीनं जगू शकेन."

त्या तरुणाच्या परोपकार-भावनेनं प्रभावित होऊन परमधाम म्हणाला, "तू वास्तवतः एक श्रेष्ठ कोटीचा माणूस आहेस. तुझं पुण्यच तुला अन् तुझ्या पित्याला बरं करील. आता तू हातांवर चालणं बन्द कर, अन् आनन्दानं घरी जा. माझं बोलणं वाया जाणार नाही."

तो तरुण उभा रहात म्हणाला, "मग तर आपण माझ्या घरी येऊन माझ्या वडिलांना दर्शन देण्याची कृपा करा."

"मी कुणाच्या घरी जाऊन त्याची परतफेड किंवा सेवा-सत्कार स्वीकारत नसतो." परमधाम म्हणाला.

"स्वामी, आम्ही असमर्थ माणसं आपणासारख्या महात्म्यांची परतफेड कशी करू शकणार? मी तर आमच्या घरी चलण्याची प्रार्थना अशाकरता करतोय, की माझ्या वडलांबरोबरच गावचे इतर पीडित लोकही आपल्या दर्शनानं लाभान्वित होतील" तो तरुण म्हणाला.



"अच्छा, असं असेल तर जरा थांब. एक काम उरकून घेतो." परमधाम म्हणाला.

परमधामने नंतर शान्तपणे डोळे मिटून घेतले अन् आपल्या हृदयातच भगवंताचे स्मरण केले अन् म्हटले, "हे देवा, मी अगदी निस्वार्थ भावनेनं एक परोपकार केलाय. आता तरी मला स्वतःमधे विलीन करून घे."

निस्वार्थ परोपकार करणारे तुझ्यापेक्षा चांगले कितीतरी आहेत. त्यांनादेखील मी अजूनपर्यंत मोक्ष दिलेला नाहीय. मग तुलाच इतक्या लवकर मोक्ष कसा मिळेल? तो युवक सुद्धा तुझ्यापेक्षा जास्त परोपकारी आहे. त्याच्यासमोरच उभाआहेस तू." हृदयातून भगवन्ताचा आवाज आला.

"हा युवक माझ्यापेक्षा जास्त परोपकारी कसा बरं होऊ शकतो?" आश्चर्याने परमधामने विचारले.

"ज्यावेळी तुला हे रहस्य समजेल, त्या क्षणीच तुला मोक्ष मिळेल बघ!" भगवान म्हणाला.

भगवन्ताचा हा आदेश घेऊन परमधाम त्या युवकासह त्याच्या घरी गेला. त्या वेळेपर्यंत युवकाचे वडील छान बरे झाले होते. युवकाने परमधामबद्दल गावच्या लोकांना सांगून टाकले की या महात्म्याच्या आशिर्वादामुळेच त्याच्या वडिलांची रोगापासून मुक्तता झालीय! ते ऐकून गावचे सारे लोकही परमधामच्या दर्शनासाठी पुढेपुढे येऊ लागले. अन् आपापल्या दुःखापासून मुक्तिसाठी त्याचे आशिर्वाद मागू लागले.

कोणी रोगानं पिडलेला होता. कोणी सून आपल्या सासूमुळे दुःखी होती. तर कोणी सासू आपल्या सुनेमुळे! कोणाचे पीक निकालात लागले होते, तर कुणाच्या विहीरीचे पाणी आटून गेले होते. परमधामच्या आशिर्वादामुळे अन् देवाने दिलेल्या त्याच्या अद्भुत शक्तीमुळे गावचे सगळे लोक सुखी-सम्पन्न झाले. कोणाला कसलीही अडचण राहिली नाही. गाव स्वर्ग बनला.

त्या गावात रंगा नावाचा एक बदमाश होता. त्याच्या मदतीने श्रीमन्त लोक गरीबांना सतावत असत. गावात आता कोणाची कसली अडचण किंवा दुःख नव्हतं. त्यामुळे रंगाला कसलं काम उरलं नव्हतं. त्याला आता कोणीच विचारत नसे. त्यामुळे आता त्याच्या मनात वैराग्य आले.

तोही एक दिवस परमधामजवळ जाऊन म्हणाला, "स्वामी, मी फार दुष्ट माणूस आहे. मी लोकांना फार सतावलंय पण आता नुसता तो विचार आला, तरी मनाला कष्ट होतात. यातून मुक्त होण्यासाठी एकच वाट आहे. कृपा करून मला मोक्ष प्रदान करा."

"या शिवाय दुसरं काही माग-धन, आभूषण, घर, वाहन-सगळं काही द्यायला मी तयार आहे. दुसऱ्या एकाद्या गावात मानानं जगायचं साधन देऊ शकतो मी तुला. पण मोक्ष मात्र नाही देऊ शकणार." परमधाम म्हणाला.





"नाही स्वामी! दुसऱ्या एकाद्या गावी गेलो, तर पुन्हा मी पूर्वीच्याच रंगासारखा वागू लागेन; पुन्हा लोकांना त्रास द्यायला सुरुवात करीन. आता मला मोक्ष देऊन या पापमय जीवनातून मुक्तीच द्या. हे आपणासारख्या महात्म्याच्या कृपेनंच घडू शकेल." परमधामचे पाय धरत रंगाने प्रार्थना केली.

"ठीक आहे. विचार करीन. उद्या ये." परमधाम बोलला.

रंगा निघून गेल्यावर परमधामने पुन्हा एकदा हृदयात ध्यान करून भगवन्ताचे स्मरण केले.

"रंगाला मोक्ष देऊ इच्छित असशील, तर स्वतःचा मोक्ष त्यागावा लागेल. यावर नीट विचर करून काय ते ठरव" भगवन्ताने त्याला सावधगिरीचा इशारा दिला.

दुसऱ्या दिवशी परमधामने रंगाला म्हटले, "मी तुला आपलं सारं पुण्य देत आहे. नदीच्या पाण्यात स्नान कर अन् भगवंताचं ध्यान करून मोक्षाची कामना कर. तुला भगवान मोक्ष प्रदान करील."

रंगाला मोक्ष दिल्यानंतर भगवन्त आपण होऊनच परमधामच्या पुढ्यात प्रकट झाले अन् त्यांनी म्हटले, "पुत्रा, तुला मोक्ष प्रदान करत आहे."

"नाही, आता मला मोक्ष नको प्रभु." परमधाम निश्चयपूर्वक बोलला.

"तुझं कर्तव्य तर पुरं झालंय. आज संध्याकाळी पवित्र नदीत स्नान करून भगवंताचं ध्यान कर अन् मोक्षाची कामना कर. भगवान तुला मोक्ष प्रदान करील. इतके सांगून भगवान अदृश्य झाले.

"तुझं कर्तव्य तर पुरं झालंय.

वेताळने कहाणी इथेच समाप्त केली. अन् म्हणाला, "राजा, परमधामनं प्रथम मोक्षासाठी कित्ती वेळा तरी प्रार्थना केली. पण भगवंताने नकार दिला. पण जेंव्हा परमधामनेच मोक्ष घ्यायला नकार दिला; तेंव्हा भगवन्ताने त्याला मोक्ष प्रदान केला. यात काही रहस्य आहे की परमधामची विवेकहीनता आहे? दुसरीकडे रंगासारख्या दुष्ट व्यक्तीला परमधाम इतक्या सहजपणे मोक्ष देत आहे. यात त्याची



नादानी नव्हे तर काय? या प्रश्नांचं उत्तर माहीत असूनही तू दिलं नाहीस, तर तुझ्या मस्तकाचे तुकडे-तुकडे होतील.''

वेताळाच्या प्रश्नाचं उत्तर देत राजा विक्रम म्हणाला, ''परमधामच्या मोक्षाला नकार देण्यामागे त्याची परोपकार व त्याग ही महान् भावना आहे; त्याची विवेकहीनता नव्हे! भगवन्ताकडून प्राप्त झालेल्या अद्भुत शक्तींद्वारा अधिकात अधिक जनकल्याण करायची त्याची इच्छा आहे. मानवकल्याणासाठीच देवाने त्याला या शक्ती प्रदान केल्या होत्या. भगवन्ताच्या सृष्टीची सेवा म्हणजे प्रत्यक्ष भगवन्ताचीच सेवा होय हे मर्म समजूनच त्याने आपल्या मोक्षाचे पुण्य रंगाला दिले. या भावनेनेच त्याने मोक्षाचा अस्वीकार केला. जोपर्यन्त त्याला हे ज्ञान नव्हतं, तोपर्यन्त तो जीवनाला भार समजत होता; तोपर्यन्त तो जीवनातल्या त्रासांपासून पळून जाऊन मोक्षाची कामना करत होता. त्यावेळी त्याला मोक्ष दिला गेला असता, तर त्याचा आत्मा, मन आणि प्राणाचा विकास झाला नसता.

जोपर्यंत रंगासारख्या दुष्ट व्यक्तीला मोक्ष देण्याचा प्रश्न आहे, तेंव्हा तोसुद्धा अविवेकपूर्ण म्हणवला जाऊ शकत नाही. रंगामधे खऱ्या पश्चात्तापाचा उदय झालेला होता. तो आपले असले जीवन बदलू इच्छित होता. त्याच्यात खरं वैराग्य जागं झालेलं होतं. परमधामने यावेळी त्याला मोक्ष दिला नसता, त्याच्यासाठी स्वतःच्या मोक्षाचा त्याग केला नसता, तर त्याला भीती होती की रंगा पुन्हा दुष्ट व्यक्ती बनला असता. त्याने मोक्ष देऊन एका दुष्टात्म्याचा उद्धारच केला त्याबरोबरच त्याच्या अत्याचारांपासून परमधामने लोकांची सुटकाच केली.

परमधाम जेंव्हा पूर्ण रूपाने निस्वार्थी बनला, त्याचा आत्मा जेंव्हा शुद्ध व निर्मल बनला, तेंव्हा भगवन्ताने त्याला यंत्र बनवून त्याच्याकडून पृथ्वीवर मानवकल्याणासाठी जे कर्म करवायचं होतं, ते करवलं. त्याची भूमिका जेंव्हा पूर्ण झाली, तेंव्हा त्यालाही मोक्ष प्रदान केला.

यासाठीच परमधामच्या जीवनात कुठेही विरोधाभास नाहीय. तुझी शंका निराधार अन् अज्ञानसूचक आहे वेताळा!

राजाचं मौन भंग करण्यात सफलता मिळाल्याबरोबर वेताळ त्या शवासह अदृश्य झाला अन् पुन्हा त्याच झाडावर जाऊन बसला.





## चालू महिन्यात जन्मलेली विशेष व्यक्ती

पिता डॉक्टर कृष्णधन घोष व माता स्वर्णलता यांच्या घरी कलकत्ता इथे सन् १८७२ मधे १५ ऑगस्ट रोजी जन्मलेले श्रीअरविन्द घोष यांना बाल्यावस्थेतच दार्जिलिंगच्या एका आयरिश कॉन्व्हेंट स्कूलमधे शिकण्यासाठी पाठवले गेले. तेथून सात वर्षांच्या अल्प वयातच त्यांना सन १८७९ मधे इंग्लंडला पाठवण्यात आले, कारण त्यांची इच्छा होती की, आपल्या मुलावर भारतीयतेचा कसलाही प्रभाव पडू नये.



श्रीअरविन्द

श्रीअरविन्द यांना प्रथम लन्डन येथील सेंट पॉल्स स्कूलमधे शिक्षण घेण्यासाठी पाठवले. तिथे शाळेत त्यांनी सर्व प्रमुख बक्षिसे मिळवली. नंतर त्यांना छात्रवृत्ती (स्कॉलरशिप) देऊन केम्ब्रिजच्या किंग्ज कॉलेजमधे पाठवण्यात आले. तेथे त्यांनी सर्वात अधिक मार्क्स् मिळवून ते ट्रिपोस परीक्षा पास झाले. त्याचबरोबर भारतीय प्रशासनिक सेवा (इण्डियन सिव्हिल सर्विस) ची खुली चढाओढही उत्तीर्ण केली.परन्तु त्यांनी प्रशासनिक सेवेत त्यांना इंग्रजांची नोकरी करणे पसन्त नव्हते, म्हणून घोडेस्वारीच्या परीक्षेला ते अनुपस्थित राहिले. त्यावेळी बडोद्याचे महाराज सर सयाजीराव गायकवाड लण्डनमधे होते. त्यांनी आपल्या राज्यात त्यांना नोकरी देण्याचा प्रस्ताव मांडला. श्री अरविन्द सन् १८९३ मधे भारतात

त्यांना कैद करण्याचा व देश सोडून जाण्याच्या शिक्षेचा प्रयत्न केला गेला. परन्तु या सर्वांबद्दल काही माहिती नसलेले श्रीअरविन्द फ्रेंचांची वसाहत पांडिचेरी येथे आले.

इथे त्यांच्या जीवनाचे एक नवेच पर्व सुरु झाले. ते पूर्णतः योगाकडे वळले. आणि योगाच्या माध्यमातून जीवनाचे रहस्य शोधण्याच्या कामाला लागले. त्यांना असा अनुभव आला की, सृष्टीच्या विकासात मानव हेच अन्तिम पाऊल नव्हे. माणूस एका नव्या व्यक्तित्वात अजूनही विकसित होईल - मनापासून नव्हे. तर मनापक्षाही अत्यन्त उच्च चेतनेने चालित होईल. त्या चेतनेला त्यांनी 'अतिमानसिक चेतना' असे म्हटले आहे.

भारताला स्वातन्त्र्य श्रीअरविन्दांच्या वाढदिवशी मिळाले.

आज मानव-जातीच्या भवितव्याबद्दलच्या श्रीअरविन्दांच्या दृष्टिकोणाबद्दल जगभरातील लोकांची रुची निरन्तर वाढत चालली आहे.



# व्यायाम आवडला नाही

एका राजाचे दोन पुत्र होते - अजेय व विधेय. दोघेही कुशाग्र बुद्धीचे व होतकरू होते. दोघंही सोळा वर्षांचे झाले. सोळा वर्षांतच त्यांनी सर्व विद्या शिकून घेतल्या.

आता राजासमोर एक समस्या होती, की राज्यभार दोघांपैकी कोणावर सोपवावा. कारण दोघेही समान दृष्टीने त्या योग्य होते. खूप विचार करून त्याने निश्चित केले की राजा हा सर्वप्रथम शारीरिक रूपाने, भगवंताच्या सुंदर प्रतिमेप्रमाणे सुंदर व सौष्ठवपूर्ण असायला हवा; कारण राजाही प्रजेला भगवंतासमानच असतो. म्हणूनच ज्या राजकुमाराचं शरीर आकर्षक, स्वस्थ व सौष्ठवपूर्ण असेल त्यालाच राजा व्हायला हवे. राजाचं सौंदर्य केवळ त्याच्या चेहऱ्यावर नव्हे, तर त्याच्या अंग-अंगावरून प्रतीत व्हायला हवं.

म्हणून त्याने दोन्ही राजकुमारांना बोलवून म्हटले, ''तुम्ही दोघंही दोन वर्षेपर्यंत महालाबाहेर राहून आपापलं शरीर स्वस्थ, सुन्दर, आकर्षक आणि सौष्ठवपूर्ण बनवा. ज्याचं शरीर अधिक आकर्षक बनेल त्यालाच 'राजा' बनवलं जाईल. पण लक्षात ठेवा, तुम्ही राजपुत्र आहात ही गोष्ट गुप्त राहिली पाहिजे.''

त्या राज्यात जयमल्ल नावाचा एक पहिलवान होता. तो एका वर्षात एकाच शिष्याला शिकवत असे. तो मल्ल-युद्ध कलेबरोबरच अशा व्यायामांबाबत दक्ष होता कि ज्यांच्यामुळे शरीराच्या प्रत्येक अवयवाची घडण सुन्दर व आकर्षक बनेल.

पित्याचे बोलणे ऐकून दुसऱ्याच दिवशी राजकुमार अजेय जयमल्लकडे गेला. त्याच दिवशी जयमल्ल आपल्या शिष्यांची निवड करणार होता. अजेयसुद्धा त्या निवडीत सामिल झाला. आणि हर प्रकारे उपयुक्त सिद्ध झाला. जयमल्लने त्याला आपला शिष्य बनवला आणि मल्ल विद्या, त्याचप्रमाणे निरनिराळ्या व्यायामांचा अभ्यास शिकवू लागला.

विधेय एका दुसऱ्याच गावी जाऊन अज्ञात रूपाने राहू लागला. त्या गावचे लोक आळशी आणि भाग्यवादी होते. कित्येक वर्षांपासून तिथे पाऊस पडला नव्हता. त्यामुळे पीकपाणी चांगले नव्हते. तरीही लोकांनी काहीच उपाय केले नाहीत, अन् भाग्याच्या भरंवशावर नुसतेच बसून राहिले. फलतः कुणाजवळही खायला एक दाणाही उरला नाही. गाव तर भीषण दुष्काळाच्या सीमेवर होता.

विधेयने गाव सुधारायचा निश्चय केला. तो गावच्या प्रमुख अधिकाऱ्याला भेटला. व त्याला म्हणाला की, गाववाल्यांनी मिळून परिश्रम केले, तर इथलं भाग्य पालटू शकतं. परंतु तो अधिकारीही गावच्या लोकांप्रमाणेच सुस्त होता. त्यामुळे त्याने विधेयचे म्हणणे गंभीरतेने घेतले नाही. अन् ते नुसतेच चेष्टा समजून सोडून दिले. परंतु विधेयने गाव सुधारायचा अन् गाववाल्यांच्यात विश्वास पैदा करायचा पक्का संकल्प केला होता. म्हणून त्याने ग्रामाधिकाऱ्यासमोर आपला खरा परिचय दिला.

अधिकारी राजकुमाराचा परिचय जाणताच घाबरून गेला. त्याने तावडतोब गाववाल्यांना बोलावून त्यात राजकुमारने आपला खरा परिचय दिला.

''हा गाव शापग्रस्त आहे. आम्ही परिश्रम करूनही काही लाभ होणार नाही.'' एक वृद्ध निराशेच्या सुरात बोलला.

''या शापातून मुक्त करायलाच तर मी इथे आलो आहे. कठिण परिश्रमाला दुसरा काही उपाय नाही. शापाचा उपाय म्हणजे श्रमच! मी सांगेन तसं तुम्ही सर्व मिळून करा म्हणजे त्याचं फळ गोडच मिळेल. मला साथ दिली नाहीत, तर तुमचं दारिद्र्य कधीच दूर होणार नाही. त्याबरोबरच तुम्हाला राजदण्डही मिळेल.'' राजकुमार विधेयने त्यांना प्रेरक व भयभीत करणाऱ्या शब्दांनी उत्साहित करायचा प्रयत्न केला.

काही लोकांनी मनापासून प्रेरित होऊन अन् काहींनी त्यांना भय दाखवल्यामुळे राजकुमाराला सहाय्य करायचा निर्णय घेतला. अशा प्रकारे सारा गाव राजकुमारच्या निर्देशनाखाली कठिण परिश्रमात दंग झाला. सर्वांनी मिळून शेकडो तलाव खोदले की ज्यामुळे पाणी देण्याची व्यवस्था होऊ शकेल. सर्वांनी आपापल्या शेतात धान्य पेरले. पाणी दिल्यामुळे सर्वांच पीक चांगले तरारले पुढल्या वर्षी पावसाचे पाणी तलावांमधे भरल्याने



पाणिग्रही

पाणी कमी पडलं नाही. लोकांनी गावच्या चारी बाजूंना वृक्ष लावले. अन् रस्ते ही बनवले. दोन वर्षात गावाचा कायापालट झाला. आता विधेय गाववाल्यांचा निरोप घेऊन आपल्या महालात पित्याकडे परत आला.

अजेय राजवाड्यात अगोदरच पोचला होता. राजाने दोघांच्याही गोष्टी ऐकल्या अन् दोघाचं शरीर सौष्ठवही पाहिलं. दोघंही स्वस्थ, सुंदर व आकर्षक दिसले. परंतु अजेयचे शरीर अधिक घाटदार व पुरुषोचित होते. त्याने राजा बनण्याचा दावा करत म्हटले, "मी तर एका वर्षातच आपली अट पूर्ण केली. या शिवाय मी अटीनुसार आपण राजकुमार असल्याचं रहस्य कोणाही समोर प्रकट केलं नाही. पण विधेयने मात्र ही अट भंग केली. त्यामुळे राजा बनायचा अधिकार केवळ मलाच आहे."

राजा हसत म्हणाला, "देश माती, डोंगर इत्यादी जड पदार्थांना म्हणत नाहीत. देश तर माणसांपासून बनतो. प्रजा ही जिवन्त सत्ता आहे. तोच देश आहे. परिश्रम तोच सार्थक होतो, जो प्रजेसाठी तिच्या कल्याण व अुत्थानासाठी केला जातो. तुम्हा दोघांचेंही शरीर सुगठित व सौष्ठव आकर्षक आहे. पण तुझें श्रम फक्त आपल्या शरीरासाठीच केलेले आहेत. पण विधेयचे श्रम प्रजेच्या कल्याणासाठी केलेले आहेत. ते बहुजनहिताय आहेत. म्हणूनच जास्त सार्थक आहेत."

"याशिवाय तू केवळ मला प्रसन्न करून राजा बनण्यासाठी श्रम केलेस. विधेयने राजा बनण्याच्या अटीची पर्वा केली नाही अन् गाव सुधारण्यासाठी, त्यांना परिश्रमी बनवण्यासाठी अटही मोडली. त्याच्या कार्यामुळे सारी प्रजा प्रसन्न आहे. दारिद्र्याने ग्रस्त गाव आज आत्मनिर्भर झाला.

"जरी तो वयाने तुझ्यापेक्षा लहान असला तरी माझ्या विचाराप्रमाणे राजा बनायचा अधिकारी तोच आहे. जे काम राजा करू शकत नाही, ते तुम्ही पुरं करू शकता. म्हणूनच माझी इच्छा आहे की, तू सेनापतीच्या रूपात राज्य संचालनात मुख्य भूमिका कर अन् दोघंही भाऊ मिळून प्रजेची देखरेख करा.

माझं म्हणणं स्वीकारलंत तर तुम्हा दोघांच्यात लपलेले गुण यांचा निरन्तर विकास होत राहील अन् त्यांच्या मदतीने पूर्ण राज्य सर्व दृष्टींनी समृद्ध होत राहील."

अजेयने पित्याच्या अटीचे वास्तविक मर्म समजून घेतले अन् त्याच्या आदेशाचा सहर्ष स्वीकार केला.







# सुवर्ण सिंहासन

(८)

(आत्तापर्यन्त सुवर्णगिरिचा राजकुमार मलयध्वज त्या गुरुकुलात विद्याध्ययन करत होता. पित्याच्या हत्येची बातमी कळल्यावर तो आपल्या पित्याचे मित्र सिंहगुप्तला भेटतो आणि त्याची युवराज्ञी शालिनीला घेऊन गुप्तवेषात सुवर्णगिरीच्या राजधानीत प्रवेश करतो. तिथे एका देशभक्त नागरिकाच्या साह्याने वज्रकीर्ति आणि कन्दर्प यांच्या शयन कक्षाच्या पहारेकऱ्यांना आपल्या पक्षात मिळवून घेतो.)

अर्ध्या रात्रीनंतर मलयध्वजने गुरूच्या साह्याने वज्रकीर्तीच्या शयनागारात प्रवेश केला. त्यावेळी तो गाढ झोपेत होता. मलयध्वजने त्याला पायाने लाथ मारून अुठवले. आपल्या समोर अुघडी तलवार घेतलेल्या एका युवकाला पाहून वज्रकीर्ती किंचाळला. मलयध्वजने त्याचे तोंड बन्द करत म्हटले, "तू कपटाने माझ्या राज्यावर आक्रमण करून झोपलेल्या माझ्या पित्याची हत्या केलीस. पण मी मात्र तुला जागवून न्यायपूर्वकच मारत आहे." इतके बोलून त्याने वज्रकीर्तीच्या छातीत तलवार घुसवली.

त्याच वेळी वीरच्या मदतीने पुरुषवेषात शालिनीने विश्वासघातकी सेनापती कन्दर्पच्या शय्यागारात प्रवेश करून त्याला जागवले. तो जागा झाल्याबरोबर त्याच्या शरीरात विषपूर्ण सुई भोसकली. काही क्षणातच तो मृत्यूच्या मांडीवर कायमचा झोपला.

मलयध्वज वज्रकीर्तीला मारून गुरुबरोबर कन्दर्पाच्या कक्षाकडे सरकत होता, इतक्यात वाटेतच शालिनी भेटली. तिने कूटभाषेत संकेताने

लक्ष्मी गायत्री



सांगितले की काम झालंय.

मलयध्वजाने वीरला आदेश देऊन राजमहालातल्या साऱ्या पहारेकऱ्यांना तिथे बोलावले व आपला परिचय देऊन म्हटले, "इथला राजा आता मीच आहे. विश्वासघातकी कन्दर्प अन् कपटी वज्रकीर्तीला त्यांच्या पापाची शिक्षा आता मिळून चुकली आहे. माझ्या आदेशाबाचून महालात जे कोणी आले, त्यांना कैद करा. आजची रात्र फार भयंकर आहे. खबरदार, एक पक्षीही इथे प्रवेश करायला धजू नये. जा, सतर्कतेनं आपापल्या कर्तव्याचं पालन करा."

यानन्तर मलयध्वज बन्दीगृहाकडे चालू लागला. त्याने बन्दीगृहाच्या अधिकाऱ्याला म्हटले, "मी राजकुमार मलयध्वज आहे. कन्दर्प अन् वज्रकीर्ती मरण पावले आहेत. मी आपले मन्त्री आणि राजाचे भक्त सेनाधिकाऱ्यांना मुक्त करायला आलो आहे. बंदीगृह अधिकाऱ्याने ताबडतोब मन्त्री व सेनाधिकाऱ्यांना मुक्त केले.

"मन्त्रीमहाशय, आता आपण पुन्हा राज्याच्या संचालनाचा भार आपल्या हाती घ्या. रस्त्यातले सर्व काटे दूर झालेले आहेत. कन्दर्प अन् वज्रकीर्ती मारले गेले. अुद्या सकाळीच नवीन राजाची घोषण व्हायला हवी. आत्तापर्यन्त दोघांच्याही मृत्यूची खबर महालाबाहेर पोचलेली आहे. आता आपण जसं अुचित समजाल, तसं करा." मलयध्वजने मन्त्र्याला सादर प्रणाम करत म्हटले.

"साधुवाद मलयध्वज! तुझ्या पित्याचा सूड घेऊन राज्यही परत मिळवलंस हे तू मोठ्या वीरतेचं काम केलं आहेस. आता सर्व काही माझ्यावर सोड. परन्तु हा तुझ्याबरोबरचा युवक कोण आहे?" शालिनीकडे संकेत करून मन्त्र्याने विचारले.

"ते नंतर सांगेन. हा त्यासाठी अुपयुक्त वेळ नव्हे. आत्ता माझ्यासाठी काय आदेश आहे?" मलयध्वज म्हणाला.

"तू आत्ता आराम कर. सकाळी सात वाजता सभाभवनात हजर हो." मंत्री म्हणाला.

यानन्तर मन्त्री सेनाधिकाऱ्यांना घेऊन त्यांच्याबरोबर जे कैदी होते ते सारे सेनाशिबिरात पोचले. आणि सर्व सेनाधिकाऱ्यांना संबोधित करत.

"आपल्या पहिल्या राजाच्या राजपुत्राने शासनाचा भार आपल्या हाती घेतला आहे. सकाळी सात वाजता सभाभवनात त्यांचा



राज्याभिषेक होईल. राज्याचं अनुशासन ही सेनेची जबाबदारी राहील. कन्दर्प व वज्रकीर्ती यांचे परिवार पुढल्या निर्णयापर्यन्त कैदखान्यातच रहातील. सकाळी पाच वाजता नगरभरात अशी दवंडी पिटवा की प्रजासुद्धा या समारंभात सामिल होऊ शकते."

सकाळी नवीन आक्रामक राजा आणि कदर्पाचा मृत्यु व युवराज मलयध्वजच्या राज्याभिषेकाबद्दल प्रजेने आनन्दोत्सव साजरा केला.

राजा म्हणून घोषित झाल्यावर गुरूला सोनं व चांदीच्या अगणित अशर्फ्या, भेट दिल्या आणि वीरला बोलावून घेऊन म्हटले, "तुम्ही एका दुष्ट व विश्वासघाती व्यक्तीला साथ दिली आहे. तुम्ही विषारी कीटकाप्रमाणे धोकादायक आहात. तुम्ही कसलीही जबाबदारी देण्याच्या लायकीचे नाही आहात. मी तुमची मदत घेतली आहे. म्हणून तुम्हाला प्राणदान देतो आहे. तुम्ही आजपासून अुद्यानातल्या रोपांची काळजी घ्याल."

नन्तर त्याने सुकेतुला सहपरिवार आपल्या राजभवनात भोजनासाठी निमंत्रित केले. आणि त्यांच्याबद्दल कृतज्ञता प्रकट करत म्हटले की, "आपण माझ्याबरोबर संकटातही बन्धुप्रमाणे स्नेहपूर्ण व्यवहार केलात. म्हणून आपण माझे बन्धुच आहात. भविष्यात राजमहालाच्या प्रत्येक अुत्सवात आपण आमचे सन्मानित अतिथी असाल."

एका आठवड्यानन्तर मलयध्वजने परिवारासह भिल राजा सिंहगुप्ताला आमन्त्रित करून शालिनीबरोबर विवाहाचा प्रस्ताव केला.



काही दिवसांनी विवाह झाल्यानन्तर दोघेही प्रजेच्या कल्याणकार्यात रुजू झाले.

दुसऱ्या सालभंजिकेने कहाणी इथेच समाप्त करून विजयदत्तला म्हटले, "युवराज विजयदत्त शालिनीशिवाय मलयध्वजला त्याच्या अुद्देश्याच्या पूर्तीत सहाय्य देणाऱ्या तीन्ही व्यक्ती त्याच्याच राज्याचे नागरीक होते. तिघांमध्येही जर एक जरी व्यक्ती त्याला मदत न करता, तर त्याला राज्य मिळवणं अशक्य होते, म्हणजेच त्याच्यासाठी तिन्ही व्यक्तींचं सहाय्य एकसारखंच होतं. तरीही त्याने तिघांच्या सन्मानात त्यांच्याबद्दल कृतज्ञता दाखवण्यात फरक का बरं केला? गुरूला त्याने फक्त सुवर्णमुद्रा दिल्या, परन्तु सुकेतुला राज सन्मान देण्याबरोबरच स्वजन असल्याप्रमाणे प्रेम दिले. आणि वीरला दोन्हीपैकी



काहीच दिले नाही. अुलट त्याला अपमानित करून निम्न स्तराचे काम दिले. त्या तीन्ही नागरीकांबद्दल मलयध्वजच्या व्यवहारात अशा भेदभावाचं कारण काय? त्याने तसं काही अज्ञानामुळे केलं? कि जाणूनबुजून पक्षपात केला, किंवा यामागे राजधर्माचं काही सूत्र लपलेलं आहे? आणि मलयध्वजच्या जागी तूच स्वतः असतास, तर तू त्या तिघांशी कसा वागला असतास?

''तू जर या प्रश्नांची योग्य अुत्तरं दिलीस तर सुवर्ण सिंहासनाची अधिष्ठात्री देवी, त्या तीन नागरीकांच्या बाबतीत मलयध्वजच्या व्यवहारात भिन्नतेमुळे त्याचं अज्ञान किंवा पक्षपात नव्हे, परन्तु राजधर्माचं गूढ सूत्र लपलेलं आहे. राजधर्माचा ज्ञाता भिन्न भिन्न व्यक्तींबरोबरची त्याची चेतना व बुद्धीच्या स्तरानुसार व्यवहार करतो. तीन्ही नागरीकांच्यात स्तरभेद असल्यामुळेच त्याने तिघांचं स्वागत - सत्कार निरनिराळ्या पद्धतीने केला.

''वीरचा स्तर अधम आहे. तो राजद्रोही, नीच व कुटिल आहे. तो नाइलाज झाल्यावर राजकुमारला मदत करण्याचं वचन देतो. असे लोक दण्डपात्र आहेत. परन्तु मलयध्वज त्याचा अुपकार दुर्लक्षित करू इच्छित नाही. मग त्याने नाइलाजानेही त्याला मदत का केली नसेल? म्हणूनच त्याला प्राणदण्डापासून मुक्त करतो. प्राणदानच त्याला पुरेसं आहे.

गुरूदेखील पहारेकरी आहे. पण त्याच्यात कृतज्ञता आहे. राजभक्ती तो मध्यम स्तराचा नागरीक आहे. तो स्वेच्छेने राजकुमारला मदत करतो. जरी तो दीन आहे, तरीही राजकुमारचं अनुचित धन घेत नाही. असे मानसिक स्तर असणाऱ्या लोकांसाठी धनाची भेट फार महत्वपूर्ण असते. असे लोक याहून अधिकाची इच्छाच करत नाहीत. म्हणून गुरुला अगणित अशर्फ्या देअून त्याची जीवनभराची दरिद्रता दूर केली. गुरुच्या मानसिक स्तरानुरूप हा सर्वोत्तम अुपहार होता. अन् यामुळे तो पूर्णतः संतुष्ट होता.

''सुकेतु हा अुत्तम कोटीचा नागरिक आहे. तो केवळ राजभवनासंबंधी ज्ञान ठेवत नाही, पण अुलट त्याच्यात राजभक्तीही आहे. त्याच्यात मातृभूमीबद्दल प्रेम आहे. त्याला अुचित - अनुचितचं ज्ञान आहे. म्हणूनच तो कन्दर्पच्या विश्वासघाताला मोठंच अधम कर्म मानतो. तो आपल्या राजासाठी सर्व काही करायला तयार आहे. हेच कारण आहे की त्याने मलयध्वजला



आसरा दिला अन् त्याची संपूर्ण योजना कार्यान्वित करण्यात मुख्य भूमिका पार पाडली. त्याने राजकुमारला स्वजनाप्रमाणेच आपल्या घरात ठेवले. आणि त्याला सर्वप्रकारे मदत केली. त्यामुळेच राजकुमार मलयध्वजनेही राजा झाल्यावर त्याला व त्याच्या पत्नीला आपल्या नातेवाइकाप्रमाणे सारखाच राजसन्मान दिला. धनापेक्षाही अुच्च श्रेणीची ही राजकीय प्रतिष्ठा विशिष्ट नागरीकांनाच सुलभ होते. हा सन्मान सुकेतुच्या मानसिक स्तराला सर्वथा अुपयुक्त होता. आणि तो यामुळे पूर्णतया सन्तुष्ट होता.

''माझ्या दृष्टीने मलयध्वजचा तिघांशी निरनिराळा व्यवहार त्याची योग्यता व स्तराला अनुरूप असल्यामुळे सर्वथा अुचितच होता. एका अुत्तम कोटीच्या राजाला असेच करायला हवे. राजधर्माचं हेच आदर्श रूप होय. - मलयध्वजच्या स्थानी जर मी असतो तर असाच व्यवहार केला असता.

''विजयदत्तचे अुत्तर ऐकून दुसरी सालभंजिका प्रसन्न होअून म्हणाली, ''अभिनन्दन युवराज! तुझं अुत्तर आदर्श राजाच्या धर्मसूत्रप्रमाणेच आहे. आता तू दुसऱ्या पायरीवर आरोहण करण्यास योग्य आहेस. तुझं स्वागत आहे.''

सालभंजिकेकडून विजयदत्तचे स्वागत होताना पाहून सभाभवनात टाळ्यांचा कडकडाट झाला. मंगलवाद्यांच्या स्वराने चारी बाजूंना आनन्दाची लहर पसरली. विजयदत्तने प्रसन्न मुद्रेनं दुसऱ्या पायरीवर पाय ठेवले.

आता तिसरी व शेवटची सालभंजिका हसत म्हणाली, ''युवराज विजयदत्त! न्यायाच्या



देवीच्या रूपात तू माझा परिचय जाणून चुकला आहेस. मी तुला न्यायवर्धन नावाच्या एका राजाची गोष्ट सांगते. श्रद्धापूर्वक ऐक.''

न्यायवर्धन सुभद्र देशाचा राजा होता. तो आपल्या आदर्श न्यायासाठी सर्वत्र प्रसिद्ध होता. आणि यामुळेच आपल्या राज्यातल्या प्रजेला फार प्रिय होता. त्याच्या न्यायात कुठे पक्षपात किंवा असत्याचा आभासही नसे. त्याच्या न्यायामुळेच त्याचे नाव 'न्यायवर्धन' असे पडले. तसं त्याचं खरं नाव बलवर्धन होतं.

सुभद्र देशाचा शेजारचा राजा भौम्य हा बलवर्धनचा जिवलग मित्र होता. जेंव्हा भौम्यचा युवराज कुमारसेतु तरूण झाला तेंव्हा एक दिवस राजा भौम्य त्याला म्हणाला, ''पुत्रा, मी आता वृद्ध झालोय. तुला राज्याभिषेक करावा असं



वाटतंय मला. पण राजा बनण्यापूर्वी मुख्य धर्म न्याय याचं यथोचित ज्ञान आवश्यक आहे. शेजारचा राजा आदर्श न्यायासाठी प्रसिद्ध आहे. तू काही दिवस शिष्यरूपाने त्याच्याबरोबर राहून न्याय धर्माचं पालन केलंस तर छान होईल. हे तुझ्या फार हिताचं होईल.''

पित्याच्या आदेशानुसार कुमारसेतु सुभद्र देशात जाऊन राजा न्यायवर्धनला भेटला. राजाने त्याच्यावर पुत्रवत् प्रेम केले अन् म्हटले, ''न्यायाच्या विषयात मला जे जे माहीत आहे, ते सांगेन. न्यायव्यवस्था एक विशाल परिवारा-समान आहे. राजा त्या परिवाराचा प्रमुख आहे. ज्या प्रकारे परिवारात मुलांची भांडणं होतात, त्याचप्रमाणे राज्यभरात प्रजेमधे आपसात मतभेद होत रहातात. जर ते आपसातच मिटवले गेले, तर चांगलं होतं. नाहीतर त्यांच मतभेदांच्या निर्णयाचं दायित्व प्रमुखावर येतं. राज्याच्या झगड्यांचा निपटारा करण्यासाठी न्यायाधीश असतात. हे कार्य ज़र त्यांच्याकडून झाले नाही, तर ती समस्या राजासमोर प्रस्तुत केली जाते. राजाचं हे कर्तव्य असते की, त्या तथ्याच्या मुळापर्यंत जावं अन् सत्याचा पत्ता लावावा. अन् त्याप्रमाणे न्याय करावा. खरा न्याय देशाच्या आंतरिक सुखशान्तीसाठी आवश्यक आहे. त्यामुळे राजा हा प्रजेच्या प्रेम व आदराला पात्र होतो. प्रजेचं पूर्ण समर्थन असेल, तर त्याची शक्ती हजार अक्षौहिणी सेनेइतकी होते.

अशा प्रकारे राजा न्यायवर्धनने कुमारसेतुला न्याय विषयावर बऱ्याच गोष्टी सांगितल्या आणि दुसऱ्या दिवशी राजसभेत अुपस्थित राहून न्याय-विचाराची प्रक्रिया लक्षपूर्वक पहायला व ऐकायला सांगितले.

दुसऱ्या दिवशी कुमारसेतु न्यायवर्धनबरोबर बसून राजसभेत होणारी न्याय प्रक्रिया लक्षपूर्वक पाहू लागला.

त्या दिवशी न्याय - निर्णयासाठी तीन व्यक्ती आल्या होत्या. त्यातला पहिला फिर्यादी एक साधारण शेतकरी होता. त्याचं नाव होतं स्वामी. त्याच्या प्रतिवाद्याचं नाव होतं चन्द्र.

राजाचा आदेश मिळून स्वामीने फिर्याद करताना म्हटले, ''महाराज, माझा प्रतिवादी चन्द्र लहानपणापासून माझा मित्र आहे. आम्ही दोघं तरुण झालो तेंव्हा आपली मैत्री स्थायी बनवण्यासाठी विवाहापूर्वीच आपसात व्याही बनण्याचं ठरवलं. आणि कालक्रमाप्रमाणे



माझ्या घरी एक मुलगा झाला. मी चन्द्रला खुश होऊन म्हटले, ''बघ! तुझा जावई जन्मला'' तोही खूप खूश झाला. त्याच्यानन्तर चन्द्रचं लग्न झालं अन् त्याच्या घरी एक मुलगी जन्मली. मी ही आपली सून जन्मली म्हणून खूप खूश झालो. दोन्ही मुलं जेंव्हा जरा मोठी झाली तेंव्हा त्यांची आपसात मैत्री झाली. आम्ही दोघांनी त्यांच्या विवाहाचं नातं पक्कं केलं. दोन्ही परिवारातल्या वयोवृद्ध लोकांनीही आपापली संमती दिली.

''संयोगाची गोष्ट पहा! त्याच दिवसापासून त्यांचे दिवस फिरले. तिनं ज्या कोणत्या वस्तूला हात लावला, ती सोनं बनली. दिवसेंदिवस त्यांची सम्पत्ती वाढली. तो काही वर्षांतच गावचा एक मोठा शेतकरी बनला.

''पण तेंव्हापासून माझ्यावर दुर्भाग्याची छाया फिरू लागली. माझी आर्थिक स्थिती हळू हळू खराब होत गेली. माझे परिश्रम व्यर्थ होत राहिले. मी जितकी मेहनत करी, तितकं फळ मिळत नसे. मला पाच मुलं झाली. परिवार वाढत राहिला, पण अुत्पन्न कमी होत गेलं. परिणाम असा झाला की, जी काही थोडीशी जमीन होती, ती विकावी लागली.

''माझी ही दुरवस्था पाहून चन्द्र अन् त्याची पत्नी आमच्या कुटुंबापासून दूर-दूर राहू लागले. एक दिवस त्यांनी सांगून टाकल की - आमच्या मुलीचं लग्न आम्ही तुमच्या मुलाशी कधीच करणार नाही.''

चन्द्रची धन संपत्ती पहाता पहाता आमच्या कुळातले काही प्रमुख लोकही त्याचंच समर्थन करू लागले. त्यांचंही म्हणणं आहे की, लहानपणाच्या गोष्टींचं काही मूल्य नसतं. ते जमेत धरू नये. महाराज, पूर्ण विषय मी आपणाला सांगितला. आता आपणच त्याला समजवावं की वचन मोडणं बरं नव्हे. ते चूक आहे. लक्ष्मीला आमची सून बनायला, तिला आदेश द्यावा.'' वीर म्हणाला, ''त्याच्या बोलण्यात कधी सरळपणा असे, तर कधी व्यंग्य. पण शेवटी तो जोर भरल्या स्वरात सांगत राहिला.

महाराजाने चन्द्रकडे पहात त्याला विचारले, ''चन्द्र, तुझं काय म्हणणं आहे?''

**क्रमशः**



# भारत-गाथा

एका महान् संस्कृतीचा शोध
युगायुगांचा गौरवशाली इतिहास

## अज्ञात कुल असणारा ऋषी

अुन्हाळ्याच्या सुट्या सुरू झाल्या होत्या. चमेली व संदीप यांच्याजवळ त्यांच्या ग्रँड-पाच्या गोष्टी ऐकायला वेळच वेळ होता. आजोबा डाइनिंग टेबलवर असोत, की ड्रॉईंग रूममधे; नदी किनारी फिरत असोत वा लायब्ररीत असोत; मुलं त्यांच्याकडून एकादा इतिहासाचा प्रसंग, आख्यान किंवा गोष्टी ऐकण्याची सुवर्ण संधी कधीही हातून जाअू देत नसत.

"आजोबा, दण्डकारण्याची गोष्ट खरोखरीच मोठी मोहक होती. अन् त्या महा अरण्यात वेळो वेळी घटित होणाऱ्या घटनाही काही कमी चित्ताकर्षक नव्हत्या." चमेली म्हणाली.

"आणि प्राचीन भारतात वनात शैक्षणिक केंद्रही असत. मी बरोबर बोलतोय न आजोबा?" संदीप म्हणाला.

"ठीक. वनांमधे गुरुच्या आसपास अथवा समुदायांची स्थापना होत गेली. कारण ऋषिगणच गुरु असत. ते जंगलात रहाणं पसंत करत" आजोबा म्हणाले. "निःसंदेह सदा आदर्श स्थानांवरच, - नद्यांच्या तीरावर किंवा रम्य अशा दरीत या पाठशाला असत.

'सुन्दर' संदीपने आपला मनोभाव व्यक्त केला -

"आजोबा, हा दादा 'सुन्दर' तर म्हणतोय. पण गुरुकुलात हा एक दिवसही राहू शकणार नाही. कारण त्यावेळी त्यांच्याजवळ बॅडमिंटन नव्हतं ना!" चमेलीने टीका केली.

"काही हरकत नाही." पण मी आपल्या मित्रांबरोबर लपंडाव खेळलो असतो. शहरात अशी संधी कुठून मिळणार?" संदीप म्हणाला.

"खरंच आहे की त्यांच्याजवळ बॅडमिंटन, टेनिस किंवा क्रिकेट नव्हतं, पण शारीरिक व्यायाम आणि खेळाची अुत्कृष्ट पद्धत होती, जशी-कुस्ती, पळणं, पोहोणं, झाडावर चढणं अन् खूप प्रमाणात खेळ. कबडी अन् हा-डू-डू त्याच परम्परेचे खेळ आजही आहेत. त्यात श्वासावर नियंत्रण आणि शरीराची लवचिकता यांची खूप आवश्यकता असते. या शिवाय क्षत्रीय परिवाराच्या बालकांना धनुष्यविद्या, असिक्रीडा, लाठी फिरवणेही खूप शिकावे लागत असे." आजोबा म्हणाले.

"हाँ, आठवलं. त्या काळी वर्णव्यवस्था काय फार कडक होती आजोबा?" संदीपने विचारले.

"वर्णव्यवस्थेच्या सुरुवातीपासूनचं आपल्याकडे काही विवरण नाहीयं. पण एक वस्तु निश्चित आहे. व्यक्तीचा स्वभाव आणि पेशा यांच्यात सामंजस्य आणण्यासाठीच याची सुरुवात झाली होती. काही लोक जे साहसिक कार्य पसन्त करत असत त्यांच्यासाठी क्षत्रीयाचा पेशा होता. काहींना व्यापार आवडे त्यांना वैश्य असे म्हणत. काही शेती किंवा ते तऱ्हेतऱ्हेच्या सेवा देणं पसंत करत. त्यांना शूद्र म्हणत, जे शास्त्राच्या अध्ययनात व ध्यानात रत रहात. असत, त्यांना ब्राह्मण म्हणत असत. सर्वच कामांना सारखं महत्व दिलं जाई. आपलं सामान्य ज्ञान असं म्हणतं की, आरंभी हे वर्गीकरण वंशानुगत नसावं." आजोबा असं म्हणून थांबले.

"मग हे वंशानुगत कसं झालं?" संदीपने जिज्ञासा दाखवली.

"व्यावहारिक कारणांमुळे. शास्त्रांचं अध्ययन आणि कर्मकांडाच्या वातावरणात राहिल्यामुळे ब्राह्मणाचा मुलगा आपोआपच या सर्वांमधे रुचि दाखवू लागला. क्षत्रीयाचा मुलगा आपल्या पित्याला शस्त्रास्त्र चालवताना पाहून आकर्षित झाला व शस्त्र विद्या शिकू लागला. त्याच्या पित्याला हे आपल्या मुलाना शिकवायला चांगलं वाटलं असेल. हीच गोष्ट अन्य दोन पेशांच्या बाबतही झाली असेल. तोपर्यन्त या व्यवस्थेत कसलाही दोष नव्हता, कारण एका



शाखेतून दुसऱ्या शाखेत स्थानांतर होअू शकत असे. त्रास तेंव्हा सुरू झाला, जेंव्हा श्रेष्ठता व हीनता या भावनेनं हे सर्व परंपराग्रस्त झाले. दोष तर मानव स्वभावात आहे, त्याच्या अहंभावात आहे. आशा करूया, कि एक दिवस असा येईल, की आपण आपल्या अहंकारी भावनेपासून वर अुठू शकू."

"अशी अुदाहरणं आहेत का कोणी आपल्या वर्णाचा पेशा सोडून दुसरा पेशा स्वीकारला आहे?" चमेलीने जाणायची अुत्सुकता दाखवली.

"हा आदर्श वंशानुगत पद्धतीत बदलण्यापूर्वी अशी हजारो अुदाहरणं असतील. ती जेंव्हा एक पद्धत बनली, तेंव्हा सुद्धा पुष्कळ दिवसपर्यंत तिच्यात लवचिकता राहिली. राजा व प्रजा दोन्हींमधे समान रूपाने सन्मानित ऋषी शिष्यांची प्रकृति समजून



विश्वावसु

घेऊन असा निर्णय घेत असत कि अमुक शिष्य कोणत्या कर्म व पेशासाठी अुपयुक्त आहे. असे दृष्टान्त पुष्कळ राहिले असतील. परन्तु एकाचं लिखित असं विवरण अुपलब्ध आहे. कारण नंतर तो स्वतः एक प्रख्यात ऋषी बनला!'' आजोबा म्हणाले.

''त्याच्या विषयी सविस्तर सांगा ना आजोबा!''



चमेली अन् संदीप दोघांनीही अुत्सुकता प्रकट केली.

तेंव्हा आजोबांनी त्याची कथा सांगितली.

जंगलाच्या शेवटी एक स्त्री आपल्या एकुलत्या एका मुलासह रहात असे. जेंव्हा ही एक पद्धत बनली तेंव्हा ही अनेक दिवसपर्यंत यात लवचिकता बनून राहिली. राजा अन् प्रजा दोन्हीतही समान रूपानं ऋषी शिष्यांची प्रकृति समजून घेऊन निर्णय घेत असत कि कोणत्या कर्म व पेशासाठी हा शिष्य अुपयुक्त आहे. असे दृष्टान्त पुष्कळ झाले असतील. परन्तु एकाचंच लिखित विवरण अुपलब्ध आहे कारण नंतर तो स्वतः एक प्रख्यात ऋषी बनला. आजोबांनी सांगितले.

''कृपा करून हा विषय सविस्तर सांगाना.'' दोघांनी अुत्सुकता दाखवली.

आजोबांनी तेंव्हा त्यांची कहाणी सांगितली.

जंगलाच्या शेवटी एक बाई आपल्या एकुलत्या एक मुलासह रहात असे. त्यांच्या झोपडीच्या जवळूनच नदी वहात असे. नदीच्या दुसऱ्या तटावरच एक गुरुकुल होते. त्याचे प्रमुख एक महान ऋषी गौतम होते.

दररोज तो मुलगा नदीत स्नान करताना दुसऱ्या किनाऱ्यावर आपल्या समवयस्क मुलांनाही स्नान करताना पहात असे. गुरूने त्यांना गायत्री मंत्राचा अुच्चार करायला आणि सूर्यनमस्कार घालायला शिकवले होते. या बालकाच्या मनात इच्छा होत असे की ''आपणही त्यांच्याबरोबर राहून तसं करू शकणार नाही?''

एक दिवस त्याने आपली इच्छा आईला सांगितली, ''का नाही करू शकणार? गुरूला भेटून स्वतःला आपला शिष्य बनवायला त्यांना प्रार्थना कर की, ''आईने त्याला सुचवले.

दुसऱ्या दिवशी त्या बालकाने नदी पोहून पार केली अन् गुरूंना आपली इच्छा सांगितली. त्याची इच्छा जाणून गुरुजी प्रभावित झाले, पण बालकाची पार्श्वभूमी जाणणं आवश्यक होते. कारण त्याच्या अनुरूप व योग्य पाठ्यक्रम निश्चित केला जाअू शकेल. म्हणून त्यांनी विचारले. ''तुझी जात काय?''

''मला माहीत नाही.'' बालकाने संकोचत अुत्तर दिले.

''आपल्या आईला विचारून सांग.'' ऋषी म्हणाले.



दुसऱ्या दिवशी बालकाने ऋषींना सांगितले, ''माझ्या आईला माझ्या पित्याची जात माहीत नाहीये.''

''काही हरकत नाही. पण आपल्या पित्याचं नाव तरी सांग.'' ऋषीने विचारले.

''मला माहीत नाही गुरुवर!''

''आईला विचारून ये.'' ऋषी म्हणाले.

बालक दुसऱ्या दिवशी पुन्हा गुरूजवळ आला परन्तु तो फार निराश दिसला. त्याने सांगितले, ''गुरुवर माझी आई निरनिराळ्या घरी मोलकरीण म्हणून काम करी. एकदा एका घरगुती नोकराशी तिचा विवाह झाला, पण त्याचं अुपनाम माहीत होण्यापूर्वीच तो महामारीत कालवश झाला. परिवारही विभाजित झाल्यामुळे ती एकटीच राहिली. माझ्या जन्मानंतर ती जंगलाच्या जवळच रहात असे. आणि जंगली लाकडं अन् फळं विकून गुजराण करत असे.

''अरे माझ्या बाळा, तुझी जात तर स्पष्ट आहे. तू ब्राह्मण आहेस.'' ऋषी म्हणाले व त्याला आपला शिष्य म्हणून स्वीकारले.

''ऋषीवर, आपण कसं ओळखलंत की तो ब्राह्मण आहे?'' कोणीतरी विचारले.

''जो सर्वदा सत्य बोलतो, तोच ब्राह्मण. या बालकाची आई व हा स्वतः यांना खोटं बोलायची कितीतरी वेळा संधी मिळाली. पण त्यांच्यात खरं बोलायचं साहस व सत्यपणा आहे.'' ऋषींनी समजावले.

याची आई त्याला काय नावाने हाका मारते हे आम्हाला माहीत नाही. पण गुरुजींनी त्याला 'सत्यकाम' नावाने सम्बोधित केलं - म्हणजेच 'जो सत्यावर प्रेम करतो, सत्यकामच्या आईचे नाव 'जाबाली' होते. म्हणून त्याला 'सत्यकाम जाबाला' अशा नावाने सम्बोधित केले गेले. यामुळे इतर सत्यकाम नावाच्या मुलांपासून निराळे ओळखता येअू लागले.

''ऋषींचा समाजावर कित्ती मोठा प्रभाव आहे!'' संदीप बोलला.

''आणि हे ही ध्यानात घे कि जो कोणी ऋषी बनतो, तो जाती-पाती पासून वर अुठेल.'' आजोबा म्हणाले.

क्रमशः





# कर्ण-भेदी गायक

भीमतरंगिणी राज्यात एक शेतकरी दंपती रहात असे. पतीचं नाव होतं वीरभद्र आणि पत्नीचं स्वर्णलक्ष्मी. विवाहाला बरीच वर्षं होऊनही त्यांना एकादंही मूल झालं नाही. स्वर्णलक्ष्मीने अनेक व्रतं, अनुष्ठानं, पूजा-पाठ, दानं वगैरे केल्यानंतर शेवटी तिला एक पुत्ररत्न प्राप्त झालं.

अति मनोहर असा दिसणारा हा बालक जन्मल्याबरोबर तो मेघ-गर्जनेसारखा रडू लागला. त्याच्या त्या भयानक आवाजाने दाई घाबरून गेली. अचेत पडलेल्या आईला आवाज कोठून येत आहे, हेच कळेना! परन्तु जेंव्हा तिला कळले की तो भयंकर, कर्कश्य आणि कर्णभेदी स्वर आपल्या नवजात मुलाकडूनच येत आहे, तेंव्हा तिच्या आश्चर्य अन् घबराट यांना काही सीमाच उरली नाही. वीरभद्रला जेंव्हा माहीत झाले की आपल्या बाळाचा आवाज अस्वाभाविकपणे भारी, घाणेरडा अन् असाधारण रूपाने विकृत आहे. तेंव्हा तो मुलगा झाल्याच्या आनन्दाऐवजी चिन्ताग्रस्त झाला. परन्तु आपली ही चिन्ता लपवून बायकोला मात्र त्याने सान्त्वना दिली.

त्यांनी मुलाचे नाव ठेवले - राजशेखर. जसजसे त्याचे वय वाढत गेले, तसतसा त्याचा आवाज जास्तच घाणेरडा अन् कर्णकटु होत गेला. तो जेंव्हा एकाद्या गोष्टीने चिडून किंचाळू लागे. तेंव्हा तर विजांचा कडकडाट झाल्यासारखा आवाज होई.

राजशेखर आणखी थोडा मोठा झाला तेंव्हा वीरभद्रने त्याला शिकण्यासाठी शाळेत भरती केले. तिथे त्याचा आवाज ऐकून इतर मुलं आजारी पडली अन् काहीजणं त्याला दुरून पाहूनच भयाने कापू लागली.

या घटनेनंतर शाळेच्या गुरुजींनी वीरभद्रचे पाय धरून म्हटले, "राजशेखर जर शाळेत येत राहिला, तर माझ्या उपजीविकेचा एकुलता एक आधार तुटून जाईल. म्हणून दया करून त्याला शाळेत पाठवणं बंद करा."

भुवनगिरि

आता वीरभद्र चिन्तेत राहू लागला. नाइलाज म्हणून त्याने राजशेखरला शाळेत पाठवणे बन्द केले. पण आता पुढे काय करायचं, हीच चिंता त्याला खाऊ लागली.

तेंव्हाच त्यांच्या गावी शार्दूलपाद नावाचा एक संन्यासी आला. गावभरात असा बोलबाला होता की, तो मोठा चमत्कारी बाबा आहे. वीरभद्र आपल्या मुलाला त्याच्याकडे घेऊन जाऊन आदराने म्हणाला, "हा मुलगा राजशेखर, माझा मुलगा आहे. भगवन्ताने त्याला फार भयंकर आणि कर्णकटु आवाज दिलाय. शाळेत याच्या भयंकर आवाजानं विद्यार्थी कापू लागतात आणि आजारी पडतात. गुरुजीही त्याला शिकवायला नकार देतात. दया करून एकादा इलाज सांगाल का?"

संन्यासी शार्दूलपदने मुलाच्या हस्तरेखा लक्षपूर्वक पाहून म्हटले, "याच्या विसाव्या वर्षी याच्या भाग्याचा तारा चमकून उठेल. अन् याच्या गाण्याने एक महान कार्य घडून येईल. याच्यावर देवी लक्ष्मीची कृपा बरसेल.

संन्याशाच्या बोलण्यावर वीरभद्रचा एकदम विश्वास बसेना. त्याला वाटले की त्याचा आवाज इतका अप्रिय आहे, तो महान् कसा बरं बनू शकेल? तरीही संन्याशाच्या भविष्यवाणीवर विश्वास ठेवून त्याने राजशेखरला संगीत शिक्षण देण्याचा निश्चय केला.

त्याच्या जवळच्या गावात गुरु अमृतपाणी नावाचा एक प्रसिद्ध गायक होता. वीरभद्रने



आपल्या मुलाला त्यांच्याकडे घेऊन जाऊन विनंती केली, "माझ्या मुलाला गाण्याची फार आवड आहे. कृपा करून याला आपला शिष्य बनवून संगीत-शिक्षण द्या. परतफेड म्हणून आपल्या आज्ञेनुसार सेवा करायला मी तयार आहे.

गुरु अमृतपाणीने एका भजनाची एक ओळ ऐकवली अन् राजशेखरला सांगितले की ही मी जशी गायली, तशीच तूही गाऊन दाखव.

राजशेखरने आलाप केल्याबरोबर गुरूला वाटले की ढग गडगडत आहेत! त्याने ताबडतोब मुलाच्या तोंडावर हात ठेवून म्हटले, "मुला तू काही अगदीच बाळ नाहीस. माझं हृदय अगदी कमजोर आहे. तू गाणं बन्द न



केलंस, तर हृदय थांबून जाईल'' इतकं बोलून अमृतपाणीचा चेहरा अगदी रडवा झाला.

पण राजशेखर नाराज होऊन म्हणाला, ''गाणं मधेच बन्द करायची माझी सवय नाही.'' त्याने जेंव्हा गाणे बन्द केले, तेव्हा गुरुजी म्हणाले, ''खरं म्हणजे, तुला गाणं शिकायची काहीच जरूर नाही. तू तर जन्मजात गायक आहेस. कर्ण जसा कवच-कुंडलं घेऊनच जन्माला आला होता. तसाच तूही गाण्याची प्रतिभा घेऊनच जन्मलास.''

वीरभद्र गुरु अमृतपाणीचे व्यंग्य समजला, पण अबोध राजशेखर समजला की गुरुजी आपल्या गाण्याची स्तुती करत आहेत.

घरी परत आल्यानंतर दुसरा काही उपाय नाही असे पाहून वीरभद्र राशेखरला म्हणाला, ''हे बघ बाळा, तुझ्यात गाण्याची प्रतिभा आहे. पण तुझ्या प्रतिभेचा गावचे लोक द्वेष करतील. म्हणून तू गावाबाहेरच्या निर्जन स्थानी आपला अभ्यास चालू ठेव.''

राजशेखरला पित्याचा सल्ला चांगला वाटला. तो गावाबाहेर एका टेकाडावर बैठक मारून गाऊ लागला. गावचा पुजारी निर्मल पांडे हा त्यावेळी पाळंमुळं गोळा करायला त्या टेकाडावर गेला होता. राजशेखरच्या आवाजाला मेघगर्जना समजून तो इकडे-तिकडे पाहू लागला. त्याला राजशेखर गात असलेला दिसल्यावर त्याच्या आवाजाने तो चकित व भयभीत झाला. काही विचार करून तो राजशेखरला म्हणाला, ''दुरून तुझं गाणं गंधर्वगानासारखं वाटलं. तू राजाला भेटून त्याला आपलं गंधर्वगान का ऐकवत नाहीस? राजा नक्कीच तुझा सन्मान करील.''

भोळ्याभाळ्या राजशेखरने पुजाऱ्यावर विश्वास ठेवला अन् कुणालाही न सांगता तो सरळ राजाकडे गेला.

त्या वेळी राजा सुप्रभात हा संकटात होता. त्याला गुप्तहेरांकडून कळलं की त्याच्या शेजारचा राजा त्याच्या देशावर आक्रमण करायला निघालेला आहे. परन्तु त्याचा सेनापती तापामुळे बिछान्यावर पडलेला होता. राजा किंकर्तव्यमूढ होऊन चिंतेत बसला होता. तेंव्हाच एका सैनिकाने सूचना दिली की, राजशेखर नावाचा गायक आपल्याला भेटू इच्छित आहे. आणि गाण्याने आपलं मनोरंजन करू इच्छित आहे. त्याला येऊ द्यावं काय?''



राजाने डोके हलवून त्याला पाठवायला सांगितले. राजशेखर राजासमोर आल्याबरोबर गाऊ लागला. त्याचा स्वर ऐकूनच राजा घाबरला. त्याला वाटले की जणू काही त्याच्या देशावर शत्रूच्या हजार तोफा एकाच वेळी गोळे डागत आहेत. महालातल्या राण्यांना आवाज ऐकून वाटले की भीम तरंगिणी नदीच्या पुराचं पाणी फोफावत महालाकडेच येत आहे.

राजाने क्रोधाने प्रथम विचार केला की गाणाऱ्याची जीभच कापून टाकावी! म्हणजे त्याचा आवाज कायमचा बंद होईल. परन्तु नंतर आठवलं की राज्याच्या दक्षिण दिशेच्या अरण्यात एक राक्षस फिरत आहे. या गायकाला त्याच जंगलात नेऊन सोडला, तर राक्षस आपोआपच त्याला गिळून टाकील. त्याने ताबडतोब सैनिकांना आज्ञा दिली की या कर्णभेदी गायकाला राक्षसाच्या अरण्यात सोडून द्या.

सैनिक राजाच्या आदेशानुसार राजशेखरला राक्षसाच्या अरण्यात सोडून आले. आतापर्यन्तच्या अनुभवावरून त्याला हे कळलं होतं की, आपला आवाज इतका भयंकर आहे की सर्वजण घाबरून जातात. त्याचा आपल्या आवाजावर पुरेसा भरंवसा बसला होता. त्याला विश्वास वाटत होता की राक्षसदेखील त्याच्या आवाजापुढे टिकू शकणार नाही.

इतक्यातच झाडांच्या फांद्या



गाजरमुळ्यांप्रमाणे तोडत समोरून, हातात एक खडक गदेप्रमाणे घेऊन मस्त हत्तीप्रमाणे डोलत राक्षस त्याच्याचकडे येताना त्याला दिसला. राजशेखरला पहाताच तो राक्षस म्हणाला, ''कितीतरी दिवसांनी आज एक जिवन्त माणसावर नजर पडत आहे. हा. हा?'' आणि हसतच लांबलांब पावलं टाकत तो त्याच्याचकडे येऊ लागला.

राजशेखर प्रथम तर त्याचं अगडबंब शरीर अन् त्याच्या हातातला खडक पाहून घाबरून गेला. पण नंतर धैर्य एकवटून गंभीर गर्जना करत म्हणाला, ''अहा! देवाची करणी पहा! या अधम राक्षसाचं मरण माझ्या हातूनच लिहिलं आहे.'' इतके बोलून तो गळा फाड-फाडून गाऊ लागला.

राजशेखरचं गाणं ऐकताच राक्षसाचं पुढे येणारं पाऊल एकदम थांबलं. त्याची पावलं अडखळू लागली अन् तो खाली पडला. पुन्हा उठत तो ओरडला, "बन्द कर हे गाणं! बंद हे गाणं, माझे कान तर फाटून चाललेत."

राजशेखर यावरून समजला की आता राक्षसापासून काही धोका नाहीय. उलट त्याला सतावायला राजशेखर आणखीच जोराने गाऊ लागला. नंतर जरा थांबून तो म्हणाला, "मी कर्ण-भेदक गायक आहे. जोपर्यंत माझं गाणं पुरं ऐकणार नाहीस, तोपर्यन्त मी थांबणार नाही" इतकं बोलून तो पुन्हा गाऊ लागला.

राक्षसाला तो कर्णभेदी गायन ऐकवेनासे झाले. तो ओरडत जंगलाकडे पळाला. राजशेखर गातगात त्याचा पाठलाग करू लागला.

त्याच वेळी शत्रुराजा मार्तण्ड आपल्या सैन्यासह भीम तरंगिणी राज्यावर हल्ला करायसाठी त्याच मार्गाने येत होता. पर्वताकार राक्षसाला आपल्या घराकडे पळताना पाहून सैनिक भीतीने कापू लागले. मार्तण्डही हे दृश्य पाहून घाबरून गेला. त्याने विचार केला की या राज्याचा एक सामान्य नागरीक हत्यारा शिवायच एका अक्राळविक्राळ राक्षसाचा पाठलाग करत आहे, तेंव्हा इथले सैनिक किती बहादुर असतील! त्याने आपला घोडा तात्डतोब मागे वळवला अन् आपल्या सैन्यालाही परत फिरायची आज्ञा दिली.

इकडे राक्षसाला वाटेत जितके सैनिक भेटले, त्या सर्वांना आपल्या खडकाने मारत तो पुढे धावत होता. यामुळे मार्तण्डच्या सैन्यात हाहा:कार माजला. राक्षस स्वतःला वाचवण्यासाठी विंध्य पर्वताच्या एका गुहेत लपला.

गुप्तहेरांनी राजाला जेंव्हा ही बातमी सांगितली, तेंव्हा त्याला हे समजायला वेळ लागला नाही, की शत्रुची कटकट सगळी एकदमच राजशेखरच्या गाण्यामुळे टळली. त्यामुळे राजाने त्या दिवशीच मोठ्या सन्मानाने खूपशी धन दौलत राजशेखरला भेट दिली. त्याबरोबरच, त्याला कधीही न गाण्याची शपथ घालून त्याला आस्थानात नोकरीही दिली.





कावेरी तटांच्या यात्रेचा पुढला पडाव कुंभकोणम् येण्यापूर्वीच कंजनूर व तिरुविसनल्लूर ही दोन नगरे आहेत. कंजनूर एके काळी हातमागावरील साड्यांसाठी फार प्रसिद्ध होते. तिरुवसिनल्लूर हे प्रसिद्ध व्यंग्यकार, विकटम रामास्वामी शास्त्रीयार व मशहूर समाजसुधारक श्रीधर अय्या (ज्यांना अय्यावल नावाच्या सन्माननीय पदवीमुळे ओळखले जात असे) यांचे निवासस्थान होय. श्रीधर अय्या यांनी तिरुवसनल्लूरमधे आपले भक्तिपूर्ण व आध्यात्मिक जीवन घालवण्यासाठी म्हैसूरमधील मंत्रीपदाचा त्याग केला होता. त्यांच्या करुणा व मानवतेच्या गोष्टी पौराणिक कथांमधे विशेष प्रसिद्ध आहेत.

एकदा आपल्या मातेच्या श्राद्ध-संस्काराच्या वेळी नदीजवळ त्यांना एक निर्धन हरिजन दिसला. तो अगदी जर्जर अन्

---

# कावेरीच्या किनारी - १०

**लेखन : जयंती महालिंगम**

## दक्षिणेतील बनारस

**चित्रण : गौतम सेन**

---

दुर्बळ दिसत होता. भुकेनं तो वाळून अगदीच काडीपहिलवान दिसत होता. त्याला पाहून अय्याचे हृदय दयेने भरून आले. ते लवकर घरी परत गेले अन् श्राद्धासाठी शिजवलेलं अन्न आणून ते त्याच्यापर्यन्त त्यांनी पोचवले. ब्राह्मण भारी चिडले व त्यांनी संस्कार विधी पूर्ण करायला नकार दिला. अय्या चुपचाप उभे राहून त्या ब्राह्मणांना परत जाताना पहात राहिले. यानंतर त्यांनी ब्राह्मणांच्या जागी दुर्वांकुर ठेवले व स्वतःच सगळे संस्कार पूर्ण केले.

कुंभकोणमला 'कावेरीची काशी' म्हटले जाते. कावेरीच्या दक्षिण किनारी असलेलं हे शहर फारच समृद्ध व सुंदर आहे. कावेरीची सहायक नदी अरासलार ही सुद्धा इथेच येऊन कावेरीला मिळते. नवव्या शतकापासून कुंभकोण कावेरीच्या कच्छाचे धार्मिक, सांस्कृतिक व आर्थिक केन्द्र आहे. येथील रेशीम व कापसाच्या उद्योगाला फार महत्व आहे. त्याप्रमाणेच कासं या धातूचे ओतीव काम, पितळी भांडी बनवणे व सोन्याचे दागिने बनवण्यातही या गांवाचं वैशिष्ट्य आहे. येथील कला-विद्यालयाने कित्येक उत्तम चित्रकार व मूर्तिकारांना मार्गदर्शन केलेले आहे. सौराष्ट्रमधून येणाऱ्या प्रवाशांनी या नगराला जर विणण्याचे काम



आदि कुंभेश्वर आलय



ऐरावतीश्वर आलय

भेट म्हणून दिलेलं आहे. गुजराथी व्यापारी मोठ्याच संख्येने इथे येऊन राहिलेले आहेत.

येथील सरकारी कला महाविद्यालयात कित्येक विद्वान अध्ययन व अध्यापन करत आले आहेत. यासाठीच कुंभकोणमला दक्षिण भारताचे 'केम्ब्रिज' म्हटले जाते. हे मंदिरांचे नगरही आहे. इथे जवळजवळ ६० मंदिरे आहेत. येथील कुलदैवत आहे कुंभेश्वर. याच्याच नावावरून नगराचे नाव 'कुंभकोणम' पडले आहे. हे मंदिर नगराच्या अगदी मध्यावर आहे. लिंग व नगराचे सृजन पाहून एक पौराणिक कथा इथे प्रचलित आहे. महाप्रलयाच्या काहीसे अगोदरच शिवाने ब्रह्मदेवाला सर्व जीवांची दिव्य बीजे दिली व त्यांना असे सांगितले की ही सर्व बीजे अमृताने भरलेल्या एका कुंभात ठेवावी. त्यांना असा निर्देश पोचला की बिल्व पत्रांनी या कुंभाची पूजा करावी व प्रलय आल्यावर मेरु पर्वताच्या शिखरावर हा सोडून द्यावा. परंतु पाण्यामुळे हा कुंभ शिखरावरून वाहून गेला. अन् शेवटी येऊन कुंभकोणम येथे थांबला. शिव त्या स्थानी पोचले व बाण चालवून त्यांनी कुंभ मोडून टाकला. कुंभाच्या वस्तु निरनिराळ्या ठिकाणी पडून गेल्या. महामहम कुंड व पात्रेमराई कुलम् (सुवर्णकमलांचं सरोवर) या दोन स्थानी अमृत सांडले. शिवाने अमृत मिसळून लिंग बनवले व शेवटी त्याच्याबरोबरच विलीन झाले. सृजनापूर्वीच हे अस्तित्वात असल्याने त्याला 'आदि' म्हटले जाते. याचा अर्थ 'सर्वप्रथम' असा होतो.

आदि कुंभेश्वर हे कुंभकोणमचे सर्वात मोठे मंदिर होय. ९००० वर्ग मीटर इतक्या क्षेत्रात पसरलेल्या या मंदिराला तीन गोपुरे आहेत. या मंदिराचा इतिहास ७ व्या शतकापासून सुरु होतो. संबंदर व अप्पर यांच्या मंत्रांमधे याची प्रशंसा केलेली आहे. १६ व्या व १७ व्या शतकात विजयनगरच्या नायक शासकांनी इथे कित्येक निर्मिती केल्या. अच्युतप्पा नायकाचे मंत्री गोविन्द दिक्षितर याने महामहम कुंडाच्या आसपास १६ मंडप, अन्य सरोवरें, विहिरीव घाट बनवले. ते एक फार मोठे विद्वान, तत्वज्ञ व मानवतावादी होते. त्यांनी विहिरी निःस्वार्थपणे जनसेवा केली. अय्यन नावाने प्रसिद्ध असलेल्या या मंत्र्याला अय्यनकुलम् (सरोवर), अय्यनतेरु(मार्ग) व अय्यन कडै (बाजार) सारख्या कित्येक सार्वजनिक निर्मितींमुळे आजही कोणी विसरू शकत नाही.

कुंभकोणमचे दुसरे महत्वाचे मंदिर आहे - नवव्या शतकात चोल-युगाचे नागेश्वर मंदिर. हे मंदिर म्हणजे प्रारंभिक





महामहम कुंड

चोल-युगाची मूर्तिकला व वास्तुकलेचे सुंदर उदाहरण आहे. मंदिरांच्या भिंतींवर शिव व रामायणाच्या कथा-शृंखलेच्या सुंदर व उत्कृष्ट पत्थराची नक्षीदार चित्रे खोदली गेली आहेत.

चोल साम्राज्याच्या एकट्याच एका विष्णूला समर्पित असे सुन्दर मंदिर आहे - सारंगपाणी. येथील मूर्ति आडव्या झोपलेल्या आहेत. मुख्य देवालय एका सुंदरशा रथाच्या रूपात कोरलेले आहे. रथाबरोबर चौखूर उधळणारे उच्च श्रेणीचे घोडे, हत्ती व चाके बनलेली आहेत. नायक राजांनी यात नंतर बारा मजली गोपुरांची भर घातलेली आहे.

कुंभकोणमपासून ५ कि.मी. दूर ऐरावतेश्वर नावाचे एक आणखी रथ-रूपी चोल मंदिर आहे. या मंदिराचे वर्णन बहुधा 'मूर्तिकारांचे दगडातील स्वप्न' असे केलेले आहे. याचा मुख्य भाग एक विशाल रथाचे रूप घेतलेला असा आहे. तो रथ घोडे ओढून नेत आहेत. येथील चित्रकला व मूर्तिकला म्हणजे समृद्ध असे खजिनेच आहेत. मंदिरासमोर असणाऱ्या काही स्तंभांना हलकासा धक्का दिला तर त्यातून संगीताचा आवाज निघतो. दारासुरम् ही पलैयरैची पूर्वीची चोल राजधानी होती.

ऐरावतीश्वर आलयचे होते चित्र



कुंभकोण्चा सर्वात मोठा महोत्सव म्हणजे महामहम्. हा महोत्सव उत्तरेच्या कुंभमेळ्याप्रमाणे बारा वर्षांनंतर येतो. लोकांचा असा विश्वास आहे की या दिवशी भारतातल्या सर्व नद्यांचं पाणी जमिनीच्या आंतून वहाते आणि कावेरीला येऊन मिळते. त्या विशेष पवित्र क्षणांमधे हजारो श्रद्धाळू एकाच वेळी महामहम कुंडात डुबकी मारण्यासाठी उतरतात. मानवसमूह इतका दाट असतो की कुंडात जरासं देखील पाणी कुठे दिसत नाही. असा यापूर्वीचा माहमहम महोत्सव फेब्रुवारी १९९२ मधे झाला होता. कुंभकोणमच्या आसपास कावेरीच्या किनाऱ्यावर कित्येक अशी गावे पसरलेली आहेत, की जी तमिळनाडुच्या अनेक महान संगीत रचनाकारांची आणि संगीतज्ञांची जन्मस्थानं किंवा निवासस्थानं आहेत. उदा.



कोट्टैयुर, पापनासम्, स्वामीमलै (आपल्या सुंदर कार्तिकेय किंवा मुरुगा मंदिरासाठी, प्रसिद्ध), अुमालयपुरम्, कपिस्थलम् आणि सिरकड.

कोट्टैयुरने अलवर व नयन्मारोबरोबर आदर्श विद्वान व संगीतकारांची एक पूर्ण श्रृंखलाच तयार केली की, त्यांच्यातील काहींची नावे इथे दिली आहेत. महामहोपाध्याय यू. व्ही. स्वामीनाथन् अय्यर (१८५५-१९४२), यांनी संगमकाळातले तमिळ साहित्य पुनर्जीवित केले. आज त्यांना तमिळ-ताता (तमिल पितामह) नावाने ओळखले जाते. त्यांचे गुरू महाविद्वान टी.पी. मीनाक्षी सुंदरम पिल्लै सुद्धा एक महान् विद्वान आणि संगीत-रचनाकार होते. गोपालकृष्ण भारती (नन्दन चरित्रम चे लेखक) आणि वेदनायकम पिल्लै (पहिली तमिळ कादंबरी 'प्रतापनु मुदलियार' चे लेखक) हे सर्वजण कावेरी किनारीच वाढले व तिच्याच पाण्याने जीवन सार्थ केले. यू.व्ही. स्वामिनाथन् अय्यर कुंभकोणम् महाविद्यालयात कित्येक वर्षे व्याख्याता म्हणून राहिले. कुंभकोणम् आकाशगंगेच्या ज्या सर्वात चमकदार ताऱ्याला कधीही विसरू नये, त्याचं नाव आहे - श्रीनिवास रामानुजन. त्यांचे अध्ययनही इथेच झाले होते व हे सर्वांना माहीत आहेच. भारताचा हा अभूतपूर्व महान सुपुत्र साऱ्या विश्वात महान् गणितज्ञाच्या रूपाने प्रसिद्ध झाला.

कुंभकोणम सोडल्यानंतर कावेरी त्रिभुवनम् वरून वहात जाऊन अत्यन्त उत्कृष्ट कलाकृती म्हणून मानली जाते. याच्या गोपुरावर शिखर विमान निर्माण केले गेले आहे. नंतरच्या चोल वास्तुकलेत असे पहायला मिळाले आहे. समोरच्या मुख्य मंडपम् दारासुरम मंदिराप्रमाणे रथाचे रूप धारण केलेला आहे. याची निर्मिती कुलोत्तुंग तृतीय (१९७८-१२१८) च्या काळात केली गेली होती.



श्रीनिवास रामानुजम

इथून काही कि.मी. दूर तिरुवदैमरुदुर मधे तमिळनाडूचे सर्वात मोठे देवालय आहे. ते महालिंगेश्वर-रूपी शिवाला समर्पित आहे. इथे सापडणाऱ्या एका विशेष झाडाच्या नावे याला 'मरुधमरम' म्हटले जाते. या विशाल मंदिराची शिखरे अतिशय अुंच आहेत. त्याच्या आतील भिंतींवर १२०० वर्ष जुने अभिलेख सापडले आहेत. यांवर कोरलेल्या प्रशंसा नयन्मारांद्वारे संबंदर, अप्पर व मणिक्कावाचगर प्रमाणे गायल्या जात असत.

कावेरीचा पुढील पडाव आहे, गीतिमय मयिलदुरै किंवा मयूरम. याचा शाब्दिक अर्थ आहे - 'असे स्थान की जेथे मयूर नृत्य करतात | मयूरम् मधे स्थित लाकूडम घाट हा तलकावेरीनंतरचे दुसरे पवित्र स्थान आहे. हजारो तीर्थयात्री ऑक्टोबर - नोव्हेंबर महिन्यांमधे येणाऱ्या कडैमुखम या दिवशी इथे स्नान करण्यासाठी जमा होतात. कावेरीशी जुळलेल्या गीत व महाकाव्यांमधे 'पट्टिनापलै' प्रमाणे 'मयूरम्' चे ही विशेष स्थान आहे.





# पिशाच्चांचा सूड

चमनपुरीमधे शूरसेन नावाचा एक तरुण होता. लहानपणीच त्याचे आईबाप वारले होते. त्याच्या मामाने काही दिवस त्याची काळजी घेतली; पण दुर्भाग्याने तोही या जगात राहिला नाही. शूरसेनची काळजी घ्यायला आता त्याच्या कुटुंबात कोणीही नव्हते. त्यामुळे गाववाल्यांनी मिळून त्याचे पालनपोषण केले. मोठा झाल्यावर तो सशक्त आणि निडर-साहसी युवक निपजला.

शूरसेनसाठी आता सारा गावच त्याचे मायबाप होते. गावात काही शुभ कार्य, अुत्सव किंवा समारंभ असला, तर तो कुणीही न सांगता त्या कामात मनापासून मदत करी अन् प्रत्येक काम इतकं पूर्णतेनं करी कि त्यात कसली खोड काढायला जागा नसे; रात्री सर्वांच्या पिकांचं जंगली जनावरांपासून रक्षण करी. गावच्या बकऱ्या अुचलून घेअून जाणाऱ्या लांडग्यांशी लढायला तो घाबरत नसे. सर्वजण त्याची तारीफ करताना म्हणत, "शूरसेन खराच शूर वीर आहे. जसं नांव, तसं काम!"

एके दिवशी गावचे पंडित अनिलशास्त्री यांनी त्याला बोलावून म्हटले, "अरे शूर! तुला कदाचित माहीत नसेल की, गावाच्या सीमेवर चिंचेच्या बनात दोन पिशाच्चांनी आपला अड्डा बनवला आहे. शहरातून परत येणाऱ्या आपल्या प्रत्येक गावकऱ्याला रात्री ती त्रास देतात. सारा गाव त्यांना भिअून आहे. याशिवाय आपले महाराज योगिनीदेवी सिद्ध पीठ मन्दिरात अुद्या दर्शन अन् पूजा करण्याच्या हेतूनं येणार आहेत. ही पिशाच्चं त्यांचं काही अशुभ करू शकतील. त्यांचं जर तू रक्षण केलंस, तर मी तुला राजवाड्यात चांगल्या पदावर नोकरी मिळवून देअू शकेन."

शूरसेनने मोठ्या श्रद्धेने शास्त्रीबुवांचं बोलणं ऐकलं. नंतर तो म्हणाला, "पंडितजी, मला या गावात कसलाच त्रास नाहीये. मी इथे आरामात

महेश्वर



आहे. राजाच्या महालात नोकरी करायची माझी मुळीच इच्छा नाहीय. तरीही राजाचं रक्षण करणं हा आपला धर्म आहे. आपल्याला ही मोठी सौभाग्याची गोष्ट आहे की राजा आपल्या परिवारासह आपल्या गावात येत आहे. अन् ते आपले पाहुणे असतील. आपण निश्चिन्त रहावं! त्यांच्यावर कसलीही आंच येणार नाही. मी पिशाच्चांना पाहून घेईन.''

शूरसेन त्या रात्री चिंचेच्या दाट झाडांच्या मधे जाअून लपला. त्याने एका विहिरीच्या कट्ट्यावर दोन पिशाच्चं बसलेली पाहिली. त्यांच्यातलं एक अुंच अन् दुबळं होतं. दुसरं बुटकं अन् जाडगेलं होतं. दोघं आपसात बोलत होती.

अुंच पिशाच्च सांगत होतं, ''आपण ज्या सुंदरशा सरोवराजवळ रहात होतो, तिथे हा घमेंडखोर राजा सैनिकांसह शिकारीला येअू लागला. एकान्तभंग झाल्यामुळे आपल्याला ते स्थान सोडावं लागलं. आता आपल्याला त्याच्यामुळेच घाणेरड्या जागी रहावं लागत आहे. आता आपल्याला त्याचा सूड घ्यायची सुंदर संधी मिळत आहे. तो अुद्याच इथे सहकुटुंब येत आहे.''

''हं, ही खरंच अुत्तम संधी आहे. फक्त राजाच का, आपण त्याच्या संबंध कुटुंबाचाच नाश करू. मारून टाकू त्यांना.'' बुटके पिशाच्च बोलले.

''ठीक आहे, राजाचा रथ गावची सीमा पार करून डोंगराजवळ वळेल, तेंव्हा मी वरून एक वजनदार शिळा त्याच्या रथावर ढकलून देईन. म्हणजे सारा परिवारच मरून जाईल.'' त्या अुंच पिशाच्चाने म्हटले.

''खरंच, चांगली संधी आहे. केवळ राजालाच का, आपण सारं कुटुंबच मारून टाकू.'' बुटका म्हणाला.

''ठीक आहे. राजाचा रथ सीमा ओलांडून डोंगराकडे वळेल. तेंव्हा मी वरून शिळा टाकून रथातल्या साऱ्यांनाच त्याखाली दाबून मारून टाकीन.'' अुंच पिशाच्च म्हणाले.

''आणि त्यातूनही तो वाचला, तर मी पूजेच्या मांडवात आग लावून सर्वांना जाळून भस्म करीन त्यांचं.'' बुटका हसत बोलला.

''पण, या दोन्ही संकटांतून राजा वाचून निघाला, तर काय आपण चुप बसणार?'' अुंच पिशाच्च हे बोलून काही तरी विचार करू लागले.

थोडा वेळ गप्प राहिल्यानंतर बुटक्या





पिशाच्चाने अचानक चुटकी वाजवली अन् हसत ते म्हणालं, ''नाही राजाचा सूड घेईपर्यंत आपण कधीच शांत बसणार नाही. आपण तर त्याचाही विचार केलेला आहे. तू अगोदरच राजाच्या पानाच्या डब्यात एक विषारी विंचू बनून बैस. जर या साऱ्या धोक्यांपासून वाचून राजा सुरक्षित महालात पोचलाच, तर रात्रीच्या भोजनानंतर पान खाण्यासाठी जेंव्हा डबा अुघडेल, तेंव्हा त्यातून निघून तू त्याला डंख मार.''

''मी राणीच्या सोन्याच्या फुलांच्या टोपलीत दोन डोकीवाला विषारी साप बनून अगोदरच लपून राहीन. सकाळी राणी जेंव्हा फूल घेण्यासाठी टोपलीत हात घालील, तेंव्हा मी तिला डसेन.''

''वा, वा! तू किती छान अुपाय योजला आहेस! आता यामुळे ते नक्कीच वाचणार नाहीत. आपण सूड घेतलाच असं समज आता.'' असे म्हणून तेही खदाखदा हसू लागले अन् खुशीनं अुड्या मारायला लागले.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी शूरसेन गावच्या सीमेवर अुभा राहिला. राजाचा रथ येताना पाहून त्याने संकेत करून रथाला थांबायची खूण केली अन् त्यांना सावध करत म्हटले, ''पुढे डोंगराकडे जाणारं वळण फार धोकादायक आहे. वळल्याबरोबर वेग एकदम वाढवा. तेथे राजा संकटात सापडायची भीती आहे. म्हणून खूपच सावध रहा. राजाने हे बोलणे ऐकले तो अजून धोक्याच्या शंकेचा विचारच करत होता, इतक्यात वृद्ध मंत्र्याने सांगितले की मला या भागाची माहिती नाहीय. तेंव्हा हा माणूस जसं सांगतोय तसं करण्यात भलं आहे.''

शूरसेनने सांगितल्याप्रमाणेच सारथ्याने रथ वळवला. ते वळण पार करताच खूप वेगाने रथ पुढे झाला. तेंव्हाच टेकाडावरून एक मोठा खडक खाली आला. राजा अगदी थोडक्यात वाचला; हे कसं झालं याबद्दल सर्वजण चकित झाले. पण याहूनही जास्त आश्चर्य अशांना वाटलं, की या धोक्याची कल्पना शूरसेनला कशी आली? काहीही असो. सर्वांनी त्याच्याजवळ कृतज्ञता प्रकट केली. मंत्री व सेनापतीने शूरसेनचा सन्मान करण्याची राजाला विनन्ती केली. राजाने ते मान्य केले.

यानन्तर रथ गावात पोचला. ग्रामीण लोकांनी राजा व त्याच्या परिवाराचे स्वागत करून त्यांच्यासाठी एक मंच बनवला आणि राजा,



राणी व राजकुमारी यांच्यासाठी आसने बनवली गेली. राजा जेंव्हा मंचावर चढू लागला, तेंव्हा शूरसेन पुन्हा येऊन म्हणाला, "महाराज, आपण तिघंही इथे ठेवलेल्या आसनांवर बसू नका एका बाजूने फक्त मंचावर चढून दुसऱ्या बाजूने खाली उतरा. आसनांवर मुळीच बसू नका. नाहीतर काही अनर्थ होईल.

लठ्ठ पिशाच्च मंचाखाली लपून आग लावण्यासाठी बसले होते. ते राजाची मंचावर चढायची वाट पहात होते. राजा, राणी व राजकुमारी जसे मंचाकडे पुढे सरकले अन् जवळ पोचले; त्याबरोबर त्याने मंचाला आग लावली अन् म्हटले, "राजपरिवाराचा नाश होवो!"

परंतु तोपर्यन्त परिवार मंचाच्या दुसऱ्या टोकाला जाऊन पोचला होता. ते सर्वजण जळून जाण्यापासून थोडक्यात वाचले. मंच पहाता पहाता जळून खाक झाला, गावभरात यामुळे हाहाःकार माजला. हा अपघात कसा घडला, हे कोणालाच कळले नाही. सर्वजण आश्चर्यचकित झाले होते.

मंत्री व सेनापती यांना शूरसेनवर शंका येऊ लागली. ते राजाला म्हणाला, "याला आपल्यावर प्राणसंकट आहे, हे कसे कळले? हा जादूगार असावा अशीही शक्यता आहे. कदाचित हे सर्व याचेच कारस्थान असेल. जोवर खऱ्या गोष्टीचा पत्ता लागत नाही, तोवर यालाच कैद करून ठेवू."

"ठीक आहे." राजा म्हणाला.

सैनिक त्याला कैद करायला पुढे झाले, त्याबरोबर ग्रामाधिकारी राजाला म्हणाला, "महाराज, मी याला लहानपणापासूनच ओळखतो. हा अनाथ आहे, पण मोठा परोपकारी आहे. दुसऱ्यांचं भलं करणं याचा स्वभाव आहे. आणि मंत्र-तंत्र, जादू-टोणा यांच्याशी याचा काहीही संबंध नाही."

तेंव्हा शूरसेनने मोठ्या शांतपणे राजाला पुन्हा म्हटले, "दोन पिशाच्च्यांमुळे आज रात्री आपल्याच राजमहालात आपले व राणीसाहेबांचे प्राण धोक्यात असतील. मी बरोबर राहिलो नाही, तर आपण दोघंही वाचणं अशक्य आहे.

मन्त्र्याने सल्ला दिला, "महाराज, शूरलाही राजवाड्यात येऊन चला. रात्री येणारं संकट जर खरंच आलं तर हा त्यातूनही आपल्याला वाचवू शकेल. आतापर्यंत याने दोन संकटांतून आपणाला वाचवले आहे."

राजाने हे म्हणणे मानले. शूरसेनही



परिवारासह राजभवनात आला. राजावर येणारी संकटं पहाण्यासाठी मंत्री व सेनापतीही तेथे पोचले.

रात्रीच्या भोजनानंतर राजा पानाचा उबा अुघडणार, इतक्यात शूरने डबा आपल्या हातात घेतला, त्याने स्वतःच तो अुघडला. त्याच्या आत बसलेला विंचू शूरसेनला डंक मारणार, इतक्यात त्याने डबा बंद केला.

त्यानन्तर त्याने पाहिले, की राणी फुलांचे टोपले घेऊन त्यातून फुलं घेण्यासाठी टोपलं अुघडणार, इतक्यात शूरने तिला थांबवून स्वतःच झाकण अुघडले. तेंव्हा त्यात लपून बसलेला साप फुत्कारू लागला. शूरसेनने तत्काळ झाकण बन्द केले.

सर्वचजण हे पाहून चकित व भयभीत झाले. शूरसेन राजाला म्हणाला, "महाराज, आपल्या सैनिकांना सांगा की डबा अन् फुलांची टोपली मोठ्या काळजीपूर्वक जमिनीखाली सहा फूट खोल गाडून टाका. ही दोन दुष्ट पिशाच्चं आहेत. अन् परिवारासह आपला सूड घ्यायला ते टपले होते."

नंतर त्या दोन पिशाच्च्यांची गोष्ट त्याने राजाला ऐकवली.

शूरसेनची वीरता अन् परोपकारबुद्धी यांवर राजपरिवार मुग्ध झाला.

राजकुमारी म्हणाली, "महाराज, अशा वीरांना तर तुमच्या सैन्याचा सेनापती करायला हवा."

सेनापती आणि मंत्री यांनी आपापल्या पदांवर गदा येत आहे, असे पाहून म्हटले, "महाराज असा सर्वगुणसंपन्न व्यक्ती तर युवराणीसाठी योग्य वर आहे अन् आपला अुत्तराधिकारी व्हायला योग्य आहे.

राजाचे सर्व गोष्टींना एकच अुत्तर होते - "ठीक आहे." शूरसेनने मनात विचार केला कि राजाचा आपला स्वतःचा असा काहीही विचार नाहीय. तो सर्वांच्याच विचारांना, "हो, ठीक आहे." असंच म्हणतोय. अशा व्यक्तीजवळ एक क्षणभरही रहाणं धोक्याचंच आहे. म्हणून तो झटकन तिथून अुठला. अन् 'आपल्या आजारी पित्याला पहाण्यासाठी आत्ताच मला गावी गेलं पाहिजे' असे सांगून तेथून निघून गेला.



# त्रास

एकदा अुन्हाळ्याच्या दिवसात रामपुरातल्या सगळ्या विहिरी आटून गेल्या. त्यामुळे पाण्याचे फार हाल होअू लागले. परन्तु गावाबाहेर एका मोठ्या तलावात अजूनही पाणी होते. लोक तिथूनच पाणी आणत असत.

कृष्ण हा गावच्या दहा कुटुंबांसाठी घड्यांमधून पाणी आणत असे आणि प्रत्येक कुटुंबाकडून त्याबद्दल दर महिना दहा रुपये घेत असे. कुणाकडेही तो कधी खाडा करत नसे.

तो प्रामाणिकपणे काम करत असे अन् रोज खाडा न करता सर्वांना वेळेवर पाणी आणून देत असे.

एके दिवशी पायात काटा मोडल्यामुळे तो पाणी आणून देअू शकला नाही. घराच्या मालकांना जेंव्हा ही गोष्ट कळली, तेंव्हा त्यांनी महिनाअखेर एक दिवसाच्या खाड्याचे त्याचे पैसे कापून घेतले नाहीत अन् पुरी मजुरी त्याला दिली.

परंतु वीरबाहु नावाचा एका घराचा मालक फार कंजुष होता. त्याने मात्र एका दिवसाच्या खाड्याचे पैसे-एक रुपया - त्याच्या महिनाभराच्या पगारातून कापून घेतला.

कृष्णाने विनंती करत म्हटले, ''मी रोजच अगदी वेळेवर तुमच्या घरी पाणी आणून देतो. केवळ एकच दिवस पायात काटा बोचल्यामुळे मला फार त्रास झाला अन् मी पाणी आणू शकलो नाही. तेंव्हा त्या दिवसाचे पैसे कापून घेणं बरं नाही वाटत.''

''तुम्च्या त्रासाचं आम्हाला काय?'' कृष्णा मुकाट्याने निघून गेला.

एके दिवशी वीरबाहूच्या घरी पाहुणे आले. कृष्ण त्या दिवशी जाणूनबुजून त्याच्या घरी पाणी द्यायला गेला नाही. घरच्या मालकाना हे कळले तेंव्हा वीरबाहु खूप चिडून म्हणाला, ''काल पाण्यावाचून आम्हाला किती त्रास झाला माहीत आहे?''

''तुमच्या त्रासाचं मला काय? वाटलं तर एक रुपया कापून घ्या!'' कृष्णाने बेफिकिरीने अुत्तर दिले.

वीरबाहुजवळ आता काहीच अुत्तर नव्हते !





५४ - युद्धाच्या पूर्वीचा दिवस

# महाभारत

सर्वात अगोदर भीमाने युद्ध सुरू केले. तो भयानक रूपाने सिंहनाद करत कौरवसेनेवर तुटून पडला. यावर दुर्योधन, दुःशासन, दुर्मुख, दुःसह इ. अनेक योध्यांनी भीमाला घेरले. त्या सर्वांचा सामना अुपपांडव, अभिमन्यु, नकुल, सहदेव, धृष्टद्युम्न आदींनी केला. हळू हळू युद्ध सर्वच क्षेत्रावर पसरले.

सर्वप्रथम भीष्म आणि अर्जुन यांच्यात द्वंद्वयुद्ध झाले. दोघांनीही आपापल्या साहसाचा चांगला परिचय दिला. या शिवाय सात्यकीने कृतवर्माबरोबर, अभिमन्यूने बृहद्बल (कोसलराजा) बरोबर, भीमाने दुर्योधनाबरोबर, दुःशासनाने नकुलशी, दुर्मुखने सहदेवाशी युधिष्ठिरने शल्याशी, धृष्टद्युम्नने द्रोणांशी, धृष्टकेतुने बाल्हिकशी, घटोत्कचाने अलंबुसबरोबर, शिखण्डीने अश्वत्थामाशी, विराटने भगदत्तशी त्याप्रकारे द्रुपदाने सैंधवशी द्वंद्वयुद्ध केले. पण यांच्यात कोणीही हरलं नाही. ते युद्ध खूपच पहाण्यासारखे होते.

यानंतर दोन्ही दलांमधे अन्दाधुन्द युद्ध झाले. पण भीष्माने आपल्या प्रतापाचा अुत्तम परिचय दिला. सर्वजण त्यांच्या वीरतेवर चकित झाले होते. ठीक दुपारी भीष्म पांडवांच्या सैन्यात घुसले. त्यांच्या रक्षणासाठी दुर्मुख, कृतवर्मा, कृपाचार्य, शल्य व वगैरे दहा योद्धे येअून पोचले.





अुत्तर एका हत्तीवर स्वार होअून शल्याशी लढायला आला. पण त्या युद्धात जख्मी होअून हत्तीवरून खाली पडला. हे पाहून अुत्तरचा भाअू श्वेतु याने एका रात्री एकाच वेळी सात कौरव योध्यांना तोंड दिले. त्या भयंकर युद्धात शल्य मरतामरता वाचला. परन्तु भीष्माकडून श्वेतुचे रक्षण करण्यासाठी पांडवांना भयंकर युद्ध करावे लागले. याच्या परिणामस्वरूप दोन्ही पक्षांमधे भयानक युद्ध झाले. श्वेतुने बाकी सर्व कौरव योध्यांना पळवून लावले आणि जर श्वेतु भीष्मांशी भिडला नसता, तर भीष्मांनी पांडवांच्या अधिकांश सैन्याचा संहार केला असता. श्वेतुने आपल्या पराक्रमाचा अद्भुत परिचय देअून शेवटी भीष्मांनाही माघार घ्यायला भाग पाडले. यावर पांडवांनी हर्षनाद केला.

भीष्म मागे हटल्याबरोबर श्वेतु धृतराष्ट्राच्या पुत्रांजवळ पोचला. कौरव-सेनेचा नाश होताना पाहून भीष्माने पुन्हा श्वेतुकडे मोर्चा वळवला. भीष्माच्या मदतीला आठ कौरवयोद्धे आले अन् सर्वांनी बरोबरच श्वेतुवर बाणांचा वर्षाव केला. तरीही श्वेतुने सर्वांना बरोबरच तोंड दिले अन् भीष्मांना अनेक प्रकारे त्रास दिला. पहाणारांना तर असे वाटले की, भीष्म श्वेतुच्या हातून पराजित होणार. त्या युद्धात श्वेतुचा रथ तुटला. भीष्मांचा वध करण्यासाठी श्वेतु गदा घेअून त्यांच्या रथावर आला. त्याच्या गदाप्रहाराने भीष्मांचा रथही तुटला. भीष्माला प्रथमच माहीत होते की आपला रथ तुटेल, म्हणून ते आपल्या रथातून अुतरून दुसऱ्या रथावर चढले आणि श्वेतुवर तुटून पडले.

श्वेतु आपला रथ सोडून पृथ्वीवर अुभा होता. ते पाहून सात्यकी, भीम, अभिमन्यु वगैरे त्याच्या मदतीला येअून पोचले. परंतु भीष्माने त्या सर्वांना दूरच अडवले. त्यानंतर भीष्मांनी एका बाणाचा प्रयोग करून श्वेतुचे प्राण घेतले. श्वेतु महारथीच नव्हता, परंतु पांडवांच्या सेनापतींपैकी एक होता, त्यामुळे पांडवांना अपार दुःख झाले अन् कौरवांना आनन्द! दुर्योधन वाद्यांच्या नादाबरोबर नाचत सुटला.

श्वेतुचा मृत्यु झाल्यावर त्याचा भाअू



शंकु हा क्रुद्ध झाला. आणि कृतवर्माबरोबर रहाणाऱ्या शल्याशी युद्ध करायला आला. तेंव्हा सात कौरव योद्धे शल्याच्या मदतीसाठी पुढे सरसावले. भीष्मही यमाप्रमाणे शंखुवर तुटून पडला. यावर अर्जुन शंखुच्या मदतीसाठी येअून पोचला. शल्याने शंखुचा रथ मोडून टाकला. तेंव्हा शंखु अर्जुनाच्या रथात जाअून बसला.

भीष्म अर्जुनाला सोडून द्रुपदावर तुटून पडला. आणि आपल्या बाणांनी दावानला-प्रमाणे द्रुपदाच्या सैन्याचा नाश करू लागला. त्यावेळी भीष्माचे अपूर्व असे युद्ध पाहून पांडवयोद्धे कांपू लागले. त्यांना तोंड देणे पांडवांना असंभव वाटू लागले.

इतक्यात सूर्यास्त झाला. दोन्ही पक्षांचे लोक युद्ध थांबवून आपापल्या शिबिरात परतले. भीष्माने जे भयंकर युद्ध केलं होतं त्यावर दुर्योधन खूपच प्रसन्न होता. परंतु पहिल्याच दिवशी आपल्या सैन्याची अपार हानी पाहून युधिष्ठिर मात्र फार दुःखी झाला. आणि कृष्णाजवळ जाअून म्हणाला, "कृष्णा, आज भीष्मांनी कसं दारूण युद्ध केलंय! आपल्या सेनेला दावानलाप्रमाणे जाळून टाकलंय त्यांनी! भीष्मांना कोण पराजित करू शकणार? त्यांना सामना देअून मी मूर्खपणाच केलाय. हे कृष्णा, आपण लोक जंगलात जाअून आरामात राहू. यामुळे बाकी सर्व राजांना मरणापासून वाचवता येईल. राज्याच्या आकांक्षेनं मला या परिस्थितीत आणून सोडलंय. माझे सारे छोटे भाअू जख्मी झालेत. आपण आयुष्यभर तपस्या करू या. मला सांगा की, माझं आता कर्तव्य काय आहे? युद्धात अर्जुन तटस्थ रहात आहे. एकटा भीमच



मनापासून युद्ध करत आहे. असं वाटतंय की भीष्मांच्या हातूनच आपणा सर्वांचं मरण ओढवणार आहे.

कृष्णाने युधिष्ठिराला सान्त्वना देत म्हटले की, "तुझं अशा प्रकारे व्याकुळ होणं ठीक नाही. तुझ्या भावांच्यात तीन्ही लोकांना हरवण्याची शक्ती आहे. सात्यकी, विराट, द्रुपद, धृष्टद्युम्न यांसारखे महारथी अनेकजण तुझ्या पक्षात आहेत. त्यामुळे तुला चिन्ता करायची काय गरज आहे? शिखण्डी भीष्मांना मारण्यासाठीच तर जन्मला आहे.

यावर युधिष्ठिर धृष्टद्युम्नाला म्हणाला, "कृष्णानं आम्हाला आदेश दिलाय की तुला सेनापती बनवावं. त्यासाठी तुला कौरव सेनांचा संहार करायला हवा. आम्ही सगळे तुझ्या पाठीशी असूच."

यावर धृष्टद्युम्न म्हणाला, "राजा मी द्रोणवधासाठीच जन्मलो आहे. भीष्म, द्रोण, कृप, शल्य आणि अन्य साऱ्या योध्यांना तोंड मी देईन.

"मी तर ऐकलंय की क्रौंच-व्यूह शत्रूचा नाश करतो. देव आणि राक्षसांना युद्धाच्या वेळी इन्द्राने बृहस्पतीला हा व्यूह सांगितला होता. ही व्यूह-रचना सर्वच लोक जाणत नाहीत. अुद्या आपल्या सैन्याला क्रौंच व्यूहात अुभं कर." युधिष्ठिर म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सकाळ होताच पांडवांची सेना क्रौंच-व्यूहात अुभी



राहिली. त्या पुढे अर्जुन अुभा होता. व्यूहाच्या शिरोभागी द्रुपद अुभा होता. युधिष्ठिर पुच्छस्थानी, भीम व धृष्टद्युम्न पंखांच्या स्थानी अुभे झाले. सूर्योदयापूर्वीच व्यूह रचना निर्माण होअून युद्धासाठी तयार झाली.

पांडवसेनेला क्रौंच - व्यूहात पाहून भीष्म, द्रोण, दुर्योधन वगैरेंनी मिळून व्यूहाची रचना केली त्यात विविध योद्धे विभिन्न स्थानांवर होते. दोन्ही पक्षांच्या सेना अत्यन्त अुत्साहाने शंख, भेरी आदि निनाद करून युद्धासाठी तयार झाल्या.

युद्धाला प्रारंभ होताच भीष्माने अभिमन्यु, भीम, अर्जुन, विराट, धृष्टद्युम्न इ. पांडव दलाच्या योध्यांवर बाणांचा



वर्षाव केली. त्यामुळे पांडवांचा व्यूह तुटू लागला. अर्जुनाने रागाला येअून कृष्णाला म्हटले की, माझा रथ भेट भीष्मांच्या रथाकडे घेअून चल. त्याने भीष्मांचा वध करायचे ठरवले. कपिध्वज बरोबरच इतर अनेक प्रकारच्या पताकांवाला अर्जुनाचा रथ भीष्माकडे पुढे होत होता. मार्गावर अर्जुनाने अपार कौरव - सेनेचा वध केला.

हे पाहून भीष्म अर्जुनासमोर आले. त्याच्यामागे रक्षणासाठी सैंधव आदि अनेक वीर आले. अर्जुनावर भीष्मांबरोबरच द्रोण, कृप, दुर्योधन, शल्य, अश्वत्थामा, विकर्ण आदि वीरांनीही बाण चालवले. बाणांनी जखमी होअून ही अर्जुन विचलित झाला नाही. परंतु अुत्साहाने येअून मदतीसाठी अुपपांडव, अभिमन्युही युद्ध करायला आले. अर्जुनाला द्रोणांपासून मुक्त करायला द्रुपदाने द्रोणांवर हल्ला केला. तेंव्हा अर्जुन शत्रुच्या प्रमुख वीरांच्या मधे जाअून युद्ध करू लागला.

याच वेळी दुर्योधनाने भीष्मांजवळ जाअून म्हटले, "आजोबा, अर्जुन आपल्या सैन्याचा सर्वनाश करत आहे. तुमच्यामुळेच तर कर्णाने, आपण युद्धक्षेत्रात असेपर्यन्त अस्त्रग्रहण न करण्याची शपथ घेतलीय. तो ही आता असता, तर छान झालं असतं. पण आता तो इथं नाहीय. म्हणून आता अर्जुनाचा वध करायचा अुपाय तुम्हीच शोधा."

दुर्योधनाच्या तोंडून हे शब्द ऐकून भीष्म चिडून बोलले, "छी:, हा कसला तुझा क्षत्रीय धर्म आहे!" यानन्तर भीष्म अर्जुनाच्या रथाजवळ पोचले. ताबडतोब भीष्मांच्या साह्यासाठी कौरव योद्धे अन् अर्जुनाच्या मदतीसाठी पांडववीर एकत्र झाले. पहाता पहाता भीष्म व अर्जुन यांच्यामधे युद्ध सुरू झाले. दोघेही अुत्साहाने युद्ध करू लागले. दोघेही एकमेकांच्या बाणांपासून आपले रक्षण करू लागले. अन् आपल्या सहासाचा परिचय देअू लागले. या युद्धात दोघांचेही रथ मोडले. दोघांचेही सारथी घायाळ झाले. कृष्णालाही तीन बाण लागले आणि त्यांच्या शरीरातून रक्त वाहू लागले. यावर राग येअून अर्जुनाने भीष्माच्या सारथ्यावर



तीन बाण चालवून त्याला घायाळ केले. या युद्धात भीष्म अर्जुनाला किंवा अर्जुन भीमाला घायाळ करू शकले नाहीत. हरवू शकले नाहीत.

याच वेळी इतर द्वंद्व - युद्धेही सुरू झाली. द्रोण व धृष्टद्युम्न यांच्यात घोर युद्ध झाले. धृष्टद्युम्नाचे युद्धकौशल्य पाहून पांडववीरांनी सिंहनाद केले. अखेर धृष्टद्युम्न आपले बाण व रथही घालवून बसला. त्याच्या कवचामधे भोके पडली आणि द्रोणांच्या बाणांच्या प्रहारांनी तो घायाळ झाला. तेंव्हा भीमाने येअून त्याचे रक्षण केले व द्रोणांशी युद्ध सुरू केले.

तेंव्हा दुर्योधनाने भीमावर कलिंग व त्यांचे सैन्य पाठवले. यावर द्रोण भीमाला सोडून विराट आणि द्रुपदाबरोबर युद्ध करायला गेले. धृष्टद्युम्न दुसऱ्या एका रथात बसून युधिष्ठिराजवळ पोचला. भीमाने कलिंगसेनेबरोबर युद्ध केले आणि कलिंगपुत्र भानुमत, श्रुतायुष आदींचा वध केला. नंतर त्यांच्या सेनेच्या मधे घुसून अंदाधुन्द सर्वांचा वध करू लागला. हे दृश्य पाहून धृष्टद्युम्नामधे नवाच अुत्साह संचरला आणि सिंहनाद करत भीमाच्या मदतीसाठी पोचला. त्यावेळी भीम मानवाप्रमाणे नव्हे, तर साक्षात काळाप्रमाणे दिसू लागला. सेनांच्या मधे कोलाहल पाहून भीष्म वेगाने त्या ठिकाणी पोचले. सात्यकी, भीम व धृष्टद्युम्न त्यांच्यावर तुटून पडले. भीष्माने तिघांशीही भयंकर युद्ध केले. त्यात भीमाच्या रथाचे घोडे मरून गेले. तेंव्हा धृष्टद्युम्न भीमाला आपल्या रथावर चढवून दुसरीकडे घेअून गेला. भीमाला प्रसन्न करण्याकरता सात्यकीने सारथ्याला आपल्या बाणांनी मारून टाकले. तेंव्हा घोडे भीष्माच्या रथाला दुसऱ्या दिशेला घेअून गेले. यानंतर सात्यकी भीमाजवळ येअून त्याच्या खांद्यावर थपथपवून बोलला, "वाह, भीमा, तुझ्या प्रतापाबद्दल काय म्हणावे! तू एकट्यानेच कलिंग व त्याच्या पुत्रांना मारून टाकलेस!" असे म्हणून त्याला गळामिठी घालून त्याने भीमाचा अुत्साह वाढवला.





# परतफेड

हेलापुरी गावात विवेक आचार्य नावाचा एक वैद्य रहात असे. त्याच्या वैद्यकीची प्रसिद्धी दूर दूर पर्यन्त पसरली होती. राज्याच्या बाहेर दूरची शहरे व खेड्यांतूनही असाध्य रोगी त्याच्याकडे येत व स्वास्थ्यलाभ करून घेत.

तो दररोज सकाळपासून दुपारपर्यन्त रोग्यांवर इलाज करी व त्यानंतर शिष्यांना आयुर्वेद शास्त्र शिकवी.

जो रोगी त्यांच्याजवळ इलाजासाठी जाई, तो वैद्याच्या आदेशानुसार परतफेड म्हणून पैसे देऊनच परत जात असे. ही परतफेड करण्यात ते जराही संकोच करत नसत, कारण वैद्याच्या उत्तम इलाजामुळे ते रोगमुक्त होत.

एके दिवशी वैद्याने रोग्याला तपासले व इलाज केल्यानन्तर त्याला विचारले, "रात्री तू काय खाल्लं होतंस?

रोगी उत्तरला, "रात्री पेजेबरोबर थोडेसे कांद्याचे तुकडे खाल्ले होते."

"ठीक आहे, मग आता इलाजाच्या बदल्यात दोन रुपये देऊन जा."

"रात्री काय खाल्लं होतं?" वैद्याने दुसऱ्या एका रोग्याला तपासून, व औषध देऊन त्याला विचारले.

"डाळ-भात अन् भाजी खाल्ल्यानंतर खीर खाल्ली अन् झोपण्यापूर्वी एक आंबा खाल्ला." रोग्याने सांगितले.

"मग तू दहा रुपये देऊन जा." वैद्याने सांगितले.

मोठ्या खुशीने दहा रुपये देऊन रोगी निघून गेला. त्यानन्तर आणखी एक रोगी आला. वैद्याने त्यालाही औषध देऊन तोच प्रश्न विचारला.

"रात्री मी जेवणात भाजलेलं मांस, माशाचं कालवण अन् तळलेला झिंगा घेतला होता." तिसऱ्या रोग्याने सांगितले.

"ठीक आहे. तू बीस रुपये देऊन जा." वैद्याने सांगितले.

रोग्याने आनन्दाने बीस रुपये दिले व तो निघून गेला.

वैद्याजवळ बसलेला त्याचा मित्र हे सर्व लक्षपूर्वक पहात होता. वैद्याची चिकित्सा-पद्धत त्याला फार आवडली. पण चिकित्सेनंतर प्रत्येकाला हेच विचारणे कि, 'रात्री तू काय खाल्लंस?' त्याला काहीसे विचित्र वाटले.

जेंव्हा सर्व रोगी निघून गेले, तेंव्हा मित्राने त्याचे कारण विचारले. वैद्य हसून म्हणाला, "मी प्रत्येक रोग्याला त्याच्या रात्रीच्या जेवणाबद्दल विचारून माहिती करून घेतो की, त्याची आर्थिक स्थिती कशी आहे. त्याच्या स्थितीप्रमाणे मी चिकित्सेची परतफेड मागतो, म्हणजे त्याला ती देणं अवघड होणार नाही."

"इतकंच नव्हे, रोग्याची खाण्याची आवड व संवय याच्यामुळे त्याच्या रोगाचं निदान करणंही मला सोपं जातं. माणसाचे अधिकांश रोग त्याचं खाणं-पिणं व आहार-विहार यात संयम नसल्याने होत असतात. गरीबांना रोग पोषक तत्त्वांच्या अभावामुळे होतात, तर श्रीमंत माणूस आपल्या पचनशक्तीपेक्षा जास्त खाल्ल्यामुळे बहुधा आजारी पडतो.

"रोगाचं एक प्रमुख कारण म्हणजे, भोजन पदार्थांचं कुमिश्रण. बहुतेक माणसं जाणत नाहीत की, कोणत्या पदार्थाबरोबर काय खावं अन् काय खाऊ नये. जसं - दूध प्यायल्यानन्तर किंवा आधी, आंबट, खारट किंवा मास-मदिरा यांचं सेवन करावं, कीं नाही? जेवणाच्या कुमिश्रणामुळें ते विषारी होते अन् मग भयंकर रोग होऊं शकतात.

"अशा प्रकारे रोग्याची भोजनसंबंधी होऊं शकतात. औषधाची निवड सोपी होते. माझे रोगी यामुळेच माझ्या औषधाने बरे होतात."

वैद्याच्या अुदारतेमुळे मित्र फारच प्रभावित झाला अन् त्याने यासाठी वैद्याचे अभिनन्दन केले.

गौतम सेन





# कंजूष

शिवकरण हा गावचा एक छोटासा व्यापारी होता. तो रहात असे गावात, पण व्यापार शहरात करत असे. पैसे मिळवणं त्याला माहीत होतं. पण त्यातून काहीं खर्च करणं त्याला येत नसे.

कधी-कधी गावातून शहरात येण्याजाण्याचा त्रास होत असल्याने तो शहरातच राहू इच्छित असे. परन्तु खर्च वाचवण्यासाठी तो गावातच रहात असे. तो सकाळीच खाऊन-पिऊन घरातून बाहेर पडे अन् शहरातून रात्रीच परत येत असे.

तो आपली बायको राधा हिलाही खर्च कमी करण्याबद्दल सल्ला देत असे. तो म्हणे, ''भूक भागवायला खायला हवं अन् जिभेच्या स्वादासाठीही.'' त्यामुळे ती रोज अगदी साधं, मामुली जेवण बनवत असे. कसली पर्व किंवा सण यांदिवशी सुद्धा शिवकरणने पक्वान्न, मिष्टान्न आदि बनवायला, 'नको' म्हटले. दूध, भाजी वगैरे सुद्धा मोठ्या मुश्किलीने पहायला मिळे. पण राधाला आपल्या माहेरी दररोज स्वादिष्ट भोजन अन् पक्वान्न मिळत असत. तिला अुंची खाण्याची सवय झाली होती. पण नवऱ्याच्या भीतीमुळे ती कधी विशेष पदार्थ किंवा पक्वान्न बनवू शकत नसे.

पण स्वादिष्ट पदार्थ खाल्ल्यावाचून तिला आता अधिक दिवस काढणं मुश्किल झालं होतं. तिने विचार केला की नवरा तर दोन दिवस घरात रहात नाही. मग तेवढ्यात आपले मनपसंत पदार्थ का बनवू नयेत? पैशांची काहीं कमतरता नव्हती. शिवकरणला तर विश्वास होता की राधाही आपल्याप्रमाणेच काटकसरी आहे. त्यामुळे तो सगळे पैसे तिच्याच जवळ ठेवायला देत असे.

म्हणूनच ती रोज दिवसा तऱ्हेतऱ्हेची पक्वान्न बनवून खाऊ लागली. कधी पकोडे, भाजी तर कधी लाडू, जिलबी इत्यादी. तिनं नवरा रागावेल म्हणून त्याला हे कधी सांगितलं नाही.

एके दिवशी शिवकरण जेंव्हा रात्री परत येत होता, तेंव्हा त्याच्या शेजाऱ्याने म्हटले, ''आज माझ्या घरी भगवंताची पूजा होती. येअून प्रसाद खा. पण आमच्या घरची मिठाई तितकी स्वादिष्ट नाही, जितकी राधाभाभी बनवते.'' असे म्हणून त्याने शिवकरणच्या हातावर दोन - चार जिलब्या ठेवल्या.

''माझी बायको तर रोज साध्या जेवणाशिवाय इतर काही बनवतच नाही. तिला येतच नाही.'' शिवकरण बोलला.

''भाअूसाहेब, अहो काय बोलत आहात? ती तर सगळी पक्वान्न अन् मिष्टान्न बनवू शकते. तसं तर पक्वान्नांच्या वासानेच पत्ता लागतो. माझ्या बायकोच्या पक्वान्नांना तितका चांगला वास कधीच येत नाही. मी तर कित्ती वेळा म्हटलं, की तिच्याकडे जाअून काही चांगली पक्वान्न बनवायला शीक.'' शेजारी बोलला.

शिवकरणला आश्चर्य तर वाटलंच, पण शेजाऱ्याला तो काहीच बोलला नाही. मुकाट्याने तो घरी आला. त्याने राधाला सुद्धा काहीच विचारले नाही. त्याला स्वतः आपल्या डोळ्यांनी पाहूनच खरं काय हे जाणायचं होतं. म्हणून दुसऱ्या दिवशी शहरात जायच्या बहाण्याने तो सकाळी बाहेर तर पडला; पण मागल्या दारून परत येअून घराच्या एका कोपऱ्यात लपून राहिला.

त्या दिवशी राधाने पुरी व खीर बनवली. मुगाच्या डाळीचे लाडू बनवले. गल्लीतून अूस आणून त्याचे तुकडे चोखले. नंतर खाअून पिअून भांडी साफ केली अन् ती अशी ठेवली की जणू काही बनवलंच नाही.

शिवकरण हे सर्व पहात राहिला. नंतर संधी साधून मुकाट्याने बाहेर निघून गेला. बाहेर जाअून त्याने आपल्या पायाला पट्टी बांधली अन् लंगडत घरी आला.

राधाने घाबरून विचारले, ''अरे, तुमच्या पायाला काय झालंय?''

''साप चावला ना! आणिक काय होईल? व्यंगाने दुःखी आवाजात त्याने तक्रार केली.

''काय फार मोठा साप होता?'' राधाने घाबरून विचारले.

''हो, जेवढा तुझा अूस मोठा होता न, तितकाच मोठा होता बघ. तुझ्या लाडूंसारखा माझा पाय सुजलाय. तुझ्या खिरीप्रमाणे माझ्या तोंडातून फेस निघालाय.'' शिवकरण म्हणाला.

नवऱ्याला सगळं कळलंय हे जाणून राधाला फार भीती वाटली. तिचा चेहरा पांढरा पडला ! घाबरल्यामुळे तिला घाम फुटला.

तेंव्हा शिवकरणने आपल्या चेहऱ्यावरचा भाव बदलून हसत म्हटले, ''घाबरू नको ग! चूक माझीच आहे. साधन असूनही कोरडं - कोरडं खाअून मन मारण्यात काय अर्थ? शेवटी माणूस कमावतो तरी कशाला? आजपासून माझ्यासाठी अुत्तमोत्तम पक्वान्न बनवत जा.''



२५- वर्षांपूर्वी 'चान्दोबा' चे प्रकाशित कथा

# परोपकारी समीर

चांदोबा सादर करीत आहे.

चित्र : पाणी

रामपुरचे लोक चोर व भुतांच्या भयाने थरकापत होते.



लोकांची समजूत होती की जुन्या राजवाड्याच्या पडक्या अवशेषांमध्ये भुता-प्रेतांचा अड्डा आहे. त्यांना चोर लुटारूंचे ही भय होते; कारण ते आसपासच्या निर्जन ठिकाणी लपून रहात, व संधी मिळताच गावकऱ्यांना लुटत असत. अशा वेळी समीर नावाचा एक तरुण आपला कुत्रा शेरू याच्याबरोबर गावात आला, आणि भुतांच्या अड्ड्यावर राहू लागला.



त्या युवकाने गावच्या अधिकाऱ्याला भेटून म्हटले की, - आता तुम्हा लोकांना भुतांची भीती बाळगण्याचं काहीही कारण नाही. - कारण भुतांपासून सर्वांना वाचवायची जबाबदारी आता त्याने स्वतःवर घेतली आहे. अधिकाऱ्याने आता ही माहिती सर्व लोकांना दिली.




















# चांदोबा

## भारताचा शोध - प्रश्नोत्तरी

खालीं दिलेल्या प्रश्नांची उत्तरें पुढच्या अंकात दिली जातील.
तोपर्यंत तुम्ही स्वतः ही उत्तरें शोधून काढा, आणि आपल्या परंपरेचा परिचय करुन घ्या.



1

१. अ. कोणते दोन महान पैगम्बर समकालीन असून दोघेही राजवंशातील होते?

ब. बौद्ध धर्माची प्रारंभिक पुस्तके कोणत्या भाषेत लिहिली गेली?

क. बौद्ध धर्माच्या सर्वात पहिल्या ग्रंथाचे नाव काय आहे?

ड. कोणत्या भाषेत जैन धर्माची प्रारंभिक पुस्तके लिहिली गेली?

इ. जैन धर्माच्या सर्वात पहिल्या लिहिल्या गेलेल्या ग्रंथांची नावे काय आहेत?

2

पौराणिक काळचा एक राजा जंगलात शिकार खेळायला गेला. शिकार केलेल्या पशूंच्या रक्ताने त्याचे अुत्तरीय वस्त्र लडबडून गेले. ते वस्त्र त्याने आपल्या राणीकडे पाठवले. त्याने वस्त्रवाहकाला आदेश दिला की, त्याने राणीला काहीच सांगू नये, केवळ ते रक्तरंजित वस्त्र तेवढे तिच्या समोर ठेवावे. त्याला राणीची प्रतिक्रिया पहायची इच्छा होती; कारण त्याला विश्वास होता की, वस्त्र पाहून त्याला ती मृत समजेल.

ही चेष्टा फार महाग पडली कारण राजा महालात पोचपर्यंत शोकमुळे राणी मरुन गेली होती.
या राजाचे नाव काय होते?
राणीचे नाव काय होते?



## सृजनात्मक स्पर्धा

**अेप्रिल महिन्यासाठी निवडलेली म्हण - हात जळल्यानन्तर पानं पकडून काय अुपयोग? - यावर आधारित गोष्ट**

# चोराला आसरा

शिल्पंगेरी गावात सोना नावाचा एक किराणा मालाचा व्यापारी रहात असे. एके दिवशी मध्यरात्री तो झोपेत असताना कोणीतरी दरवाजा खटखटवला. अुठून त्याने दार अुघडले.

तिथे एक माणूस अुभा होता. त्याच्या हातात एक पिशवी होती. दार अुघडल्याबरोबर तो आत आला अन् दरवाजा बंद करून घेतला. नंतर तो सोनाच्या पाया पडून गयावया करू लागला, ''महाराज, मला वाचवा. मोठ्या संकटात सापडलोय मी. जमीनदाराची माणसं माझा पाठलाग करत आहेत. त्यांनी ओळखलंय, की मी चोरी करून पळून जात आहे. पकडला गेलो, तर जन्मभराची शिक्षा होईल मला ! आपण मला वाचवलंत, तर या पिशवीत जेवढे दागिने आहेत, ते सारे आपल्या हवाली करीन.''

सोना क्षणभर विचारात पडला. नंतर 'होय' म्हणून चूप राहिला. जमीनदाराच्या लोकांनी येअून चोराबद्दल चौकशी केली. सोनाने त्यांना 'इथे कोणी आलं नाही.' असे म्हणून परत पाठवले.

आता चोराने निश्चिन्त होअून चाकू काढून सोनाला म्हटले, ''हं, घरात जितके दागिने अन् पैसे असतील, ते सारे काढ, अन् माझ्या ताब्यात दे.''

सोना स्तंभित होअून चोराकडे पहातच राहिला. नन्तर स्वतःला सावरत तो म्हणाला, ''मी तर तुझ्यावर अुपकार केला, अन् अुलट तू मात्र माझ्यावर अपकार करू पहातोस?''

''मी एक चोर आहे, हे जाणूनच तर तू मला आसरा दिलास. न्याय-अन्याय याबाबत बोलायचा तुला काय हक्क पोचतो? मुकाट्यानं दागिने अन् पैसे काढ, नाहीतर तुझ्या जिवाची काही खैर नाही!''

सोनाने भयाने थरथरतच दागिने व पैसे त्याच्या हवाली केले. चोराने आता सोनाला एका खांबाला बांधून टाकले अन् गुरकावत तो म्हणाला, ''मी इथून गेल्याबरोबर आरडा-ओरडा करून कोणाला बोलवायचा प्रयत्न केलास, तर आधी मी तुला यमलोकी पाठवीन बघ!'' अशा प्रकारे त्याला सावध करून तो तिथून पळून गेला.

सकाळ झाली. "जमीनदाराने दवंडी पिटवली, की जी माणसं चोराचं वर्णन देतील, त्यांना सोन्याच्या एक हजार मोहोरा दिल्या जातील." हे अैकून सोना चाटच पडला!

तो आता विचार करू लागला की, जर मी एका जबाबदार नागरीकासारखा वागलो असतो, तर आपले दागिने अन् पैसे घालवून बसलो नसतो; अन् शिवाय मला सोन्याच्या मोहोराही मिळाल्या असत्या. हावरटपणानंच मला खड्डयात लोटलंय! माझेच हात जळालेत. आता वैल गेल्यावर झोपा करून काय अुपयोग?'' अशा प्रकारे तो हळहळत बसला.





# भारत
## तेंव्हा आणि आता

# पुरी
## जगन्नाथाचे नगर ओरिसात

भारतात पूर्व समुद्रतटावर ओरिसात पुरी हे अति प्राचीन शहर वसलेले आहे. इथल्या प्राचीन मंदिराचे इष्ट देव आहेत - जगन्नाथ, त्यांचे अग्रज बलराम व छोटी बहीण सुभद्रा. वर्तमान मन्दिर हे राजा चोडागंग देव द्वारा बाराव्या शतकात बांधले गेले. या पूर्वी इथले देव एका जुन्या मंदिरात अथवा सम्भवतः कित्येक पुरातन मंदिरात रहात असत.

असा विश्वास आहे की, जगन्नाथ स्वामीच्या काष्ठ प्रतिमेत एक रहस्यमय पदार्थ आहे. तो नवीन प्रतिमेत वेळोवेळी स्थानान्तरित केला जातो. काही लोकांचा असा विश्वास आहे की तो पदार्थ दुसरं काही नसून खुद्द श्रीकृष्णाचे अवशेष आहेत. अवशेषांची मंजुषा एका आदिवासी सरदार विश्ववसुकडून पुजली जात असे. संभवतः विश्ववसु जरा शबराचा (ज्याने चुकून श्रीकृष्णावर बाण चालवला होता) वंशज होता. एक पौराणिक राजा इन्द्रद्युम्न याला असे वाटले की भगवंताची उपस्थिती पुरीच्या आसपासच्या जंगलांमधे कुठे लपून पडलेली आहे. त्याने पुरीच्या चारी दिशांना चार बुद्धिमान व्यक्तींना याच्या शोधासाठी पाठवले. त्यांच्यापैकी एक - विद्यापती - पूर्व दिशेला गेला व विश्ववसुचा अतिथी बनला. विश्ववसुची कन्या ललिता व विद्यापती - दोघेही एकमेकांवर प्रेम करू लागले. व नंतर विवाहबंधनात बांधले गेले. काही दिवसांनी विद्यापतीला कळले की त्याचे सासरे कोणत्याशा गुहेत जाऊन एका रहस्यमय पदार्थाची पूजा करतात. तो पहाण्याची. त्याने इच्छा व्यक्त केली. परंतु त्याच्या डोळ्यांवर पट्टी बांधून गुहेत नेले गेले. विद्यापतीने मोठ्या चतुराईने काम केले. त्याने मार्गात मोहोरीचे दाणे पसरून टाकले.

गुहेत पोचलाबरोबर त्याला असा अन्तर्बोध झाला की तो भगवंताच्या अवशेषाच्या उपस्थितीत आहे. काही दिवसांनंतर जेंव्हा मोहोरीचे दाणे उगवून आले, तेंव्हा त्यांचे अनुसरण करत तो त्या गुहेत पोचला आणि भगवन्ताचे अवशेष असलेली मंजुषा घेऊन पळून गेला. राजा इन्द्रद्युम्न खूपच प्रसन्न झाला. तो स्वतः जंगलात जाऊन विश्ववसुला भेटला आणि त्यांना या गोष्टीला राजी केले की आता दिव्य अवशेष सर्वांना उपलब्ध करण्याचे दिवस आलेले आहेत.

ही मोठी अजब गोष्ट आहे की विद्यापती व ललिताचे वंशज जगन्नाथ स्वामीच्या पुजाऱ्यांमधे आहेत. विद्यापती हा ब्राह्मण होता. त्यावरून ही गोष्ट कळून येते की त्या दिवसांत जातीसंबंधी काहीही वर्ज नव्हते.

स्वामी जगन्नाथाची रथयात्रा याच महिन्यात येत आहे. ही घटना कृष्णाची गोपांबरोबर मथुरेपर्यन्तच्या यात्रेचा स्मरणोत्सव आहे. दहा दहा हजार लोक या निमित्ताने पुरीत एकत्र होतात.

पुरीत प्रत्येकाला अनुभव येतो की दूरचं अतीत व वर्तमानाची खाई संकीर्ण झालेली आहे. मन्दिरात दिला जाणारा प्रसाद म्हणजे असे भोजन असते की जे अधिक नाही तरी एक हजार वर्षा पूर्वी लोक खात असत.

पुरीमधे अनेक पुरातन मन्दिरे आहेत. परन्तु या शहरात आधुनिक सोयीही उपलब्ध आहेत. इथल्या समुद्रतटावरील विहारस्थल एक रम्य दृश्य आहे. दररोज हजारो तीर्थयात्री व पर्यटक समुद्रात स्नान करतात किंवा रुपेरी रेतीवर सहलीचा आनन्द लुटतात.

आधुनिक पुरीमधे संस्कृत अध्ययनासाठी एक बृहत् संस्था आहे. आणखी एक संस्था आयुर्वेद अध्ययनासाठी आहे.



# विशेष बातम्या

## हवाई पारितोषिक

यंदा शाळांत परिक्षेचे निकाल जेव्हां जाहीर झाले, तेव्हां चेन्नईजवळच्या एका शाळेत आनंदाचे वातावरण होते. वृंदा व प्रवीणा, या दोन विद्यार्थिनींनी आपापल्या विषयांत सर्वाधिक गुण मिळवले होते. त्यांना रोख बक्षिसे व पुढल्या अभ्यासक्रमासाठीं शिष्यवृत्ती मिळाल्या. त्या शाळेने आणखी एक पाऊल पुढें टाकले. शाळेने त्या दोघींना सुटीसाठी विमानाने हैदराबादला पाठवायचा निर्णय घेतला. त्यामागची भूमिका अशी होती की त्या दोघी खेड्यांत राहात होत्या. पण मोफत विमानप्रवास घडल्यामुळें त्यांना शहरांतल्या विद्यार्थ्यांइतक्याच सुविधा मिळण्याची संधी शाळेने दिली. परंतु खरं पाहिलं तर शहरांतल्या किती विद्यार्थ्यांना विमानातून प्रवास करण्याची संधी मिळते? दुसरी शंका अशी की केवळ विमानप्रवास महत्वाचा, की ऐतिहासिक किंवा प्रेक्षणीय स्थळांना भेट देऊन त्या भूभागाची ओळख करून घेणे जास्त महत्वाचे? अनेक शाळा भरपूर खर्च करतात आणि आपल्या यशस्वी विद्यार्थ्यांचे फोटो, त्यांचे गुण, क्रमांक इ. माहितीच्या जाहिराती देतात. अनेक खाजगी वर्ग चालवणाऱ्या संस्थादेखील यशस्वी विद्यार्थ्यांचे फोटो छापतात. मग भले, तो विद्यार्थी त्यांच्या संस्थेत गेलासुद्धां नसेना कां! यांत खरा लाभ कोणाचा होतो - त्या विद्यार्थ्यांचा की त्या शिक्षणसंस्थेचा? विचार करण्यासारखी गोष्ट आहे ही!

*****

## राष्ट्राची माफी

बँकॉकमधल्या एका टॅक्सी ड्रायव्हरची चौदा वर्षांची मुलगी ऐशा नवावी ही मलेशियामधल्या लँगकावी बेटावर जूनमधें गेली होती. तिथल्या रहिवाशांच्या मनांत तिने नवीन आशा निर्माण केली. २०० वर्षांपूर्वी महसुरी या थाईसुंदरीने या बेटाला शाप दिला होता. ऐशा ही तिची वंशज आहे. माहसुरीचा जन्म फुकेट बेटावर झाला होता. जास्त चांगले जीवन जगण्याच्या शोधांत ती मलायांत (आता मलेशिया) आली. लँगकावीत ती पोंचली व नंतर तिने एका मलायी सैनिकाशी विवाह केला. तिचा पती लढाईवर गेला असताना दुसऱ्या एका मत्सरी स्त्रीने, माहसुरीने पतीशी प्रतारणा केली आहे अशी कंडी पिकवली. माहसुरीला देहान्त शिक्षा झाली व तिला भोसकून ठार करण्यांत आले. तिच्या रक्ताचा रंग पांढरा दिसत होता. म्हणजेच ती निर्दोष होती असं मानण्यांत आलं. मरण्यापूर्वी तिने शाप दिला की त्या बेटावर सात पिढ्या मुलींचा जन्म होणार नाही. लौकरच सयामने (आता थायलंड) मलायावर आक्रमण केले व माहसुरीचा एकुलता एक मुलगा व इतर कुटुंबीय पुन्हां फुकेट बेटावर राहायला गेले. मलेशियाने ऐशाचे फार थाटांत स्वागत केले आणि राष्ट्रातर्फे तिची माफी मागितली. त्याखेरीज तिथले नागरिकत्व, एक घर व नोकरीची हमी सरकारतर्फे तिला देण्यांत आली. बेटावरच्या माहसुरीच्या समाधीचे दर्शन घ्यायला जेव्हां ती गेली, तेव्हां अंधश्रद्धेने भारावलेल्या नागरिकांनी तिच्याभोवती एकच गर्दी केली.

*****

## यापुढें मित्र - शत्रू नव्हेत



१ जुलैला डेन्मार्क व स्वीडन यांच्या दरम्यान एका १६ किलोमीटर लांबीच्या पुलाचे उद्घाटन झाले. या पुलामुळें दोन्ही देशांमधली ४०० वर्षांची जुनी वैरभावना विसरण्याची संधी उपलब्ध झाली आहे. ७००० वर्षांपूर्वी दोन्ही देशांची भूमी एकत्र होती. बर्फयुगांत हे देश वेगळे झाले आणि हजार वर्षांपूर्वी त्यांच्यात वैर उत्पन्न झाले. भांडणाचे मूळ कारण होते स्वीडनचा स्कान हा दक्षिण इलाखा - हा डेन्मार्कच्या अधिपत्याखाली सुमारें ६०० वर्षे होता व त्यावरून सतत लढाया होत राहिल्या. शेवटी १६५८ मधें स्कान हा पुन्हां एकदा स्वीडनच्या



ताब्यांत आला.

तरीदेखील, तिथल्या जनतेचे प्रेम व श्रद्धा कायम डेन्मार्कवर राहिली. डेन्मार्कला जाण्यासाठीं पूल व्हावा अशी जनतेची गेली शंभर वर्षे मागणी होती. दोन्ही सरकारांनी बरीच वर्षे खल करून शेवटी मसुदा तयार झाला. चार वर्षांपूर्वी पुलाच्या बांधकामाला सुरुवात झाली. सुप्रसिद्ध कथाकार हॅन्स ख्रिश्चन अँडरसन राहात असे ती डेन्मार्कची राजधानी कोपनहेगन व दक्षिण स्वीडनमधले मालमोफ या दोन्ही शहरांना जोडणारा हा प्रचंड पूल ऑरसँडच्या सामुद्रधुनीवरून जातो. पुलाच्या दोन्ही टोंकावर हजारो प्रेक्षक जमून हा उद्घाटनाचा सोहळा आनंदाने पाहात होते.



# बाललेखकांस व बालकलाकारांस निमंत्रण



चांदोबाचा नोव्हेंबर २०००चा खास अंक हा मुलांनी सजवलेला असेल.
सोळा वर्षांखालील सर्व मुलांमुलींसाठी चांदोबाची पानें राखून ठेवलेली आहेत.

कथालेखन : तुम्ही स्वतः लिहीलेली, १०० ते १००० शब्दां पर्यंतची एखादी गोष्ट आकर्षक शीर्षकासहित पाठवा. इंग्लिश, हिंदी, मराठी, बंगाली, ओडिया, तेलगू, कानडी, किंवा तामीळ भाषेंत जास्तीत जास्त तीन कथा पाठवाव्यात.

चित्रें : भारतीय पौराणिक किंवा ऐतिहासिक प्रसंगावर आधारलेली रंगचित्रे किंवा श्वेतश्यामल चित्रें, त्या प्रसंगाच्या वर्णनासह पाठवावीत. जी चित्रें निवडली जातील, त्या बालचित्रकारांना आम्ही नवरात्राच्या सुटींत चेन्नईला बोलावूं व या खास अंकातल्या गोष्टींची चित्रें काढण्यास सांगू.

प्रवेशपत्रिका स्वीकारण्याची अंतिम तारीख : १८ सप्टेंबर २०००

पारितोषिकें : स्तुत्य प्रयत्नांना आकर्षक पारितोषिके दिली जातील.

शिफारसपत्रक : प्रत्येक स्पर्धकाने खालील कुपन भरून, त्यावर पालकांची सही घेऊन, आपल्या कथा वा चित्रांबरोबर पाठवावे.

नांव : ____________________ वय/ जन्म तारीख ____________

इयत्ता : ____________ शाळा ____________________

घरचा पत्ता : ____________________

____________________

____________________

पिन कोड: ____________________

प्रवेशपत्रिका वर्णन

१. ____________________

२. ____________________

३. ____________________

मी ______ इथें नमूद करतो कीं सोबतच्या प्रवेशपत्रिकेंत माझ्या मुला/लीने, कुणाच्याही मदतीशिवाय, स्वतः तयार केलेल्या कथा/कलाकृती आहेत.



स्पर्धकाची सही

पालकांची सही



वेताळ कथा

# महोन्नत आत्मा

निश्चयाचा महामेरु विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरचे प्रेत त्याने खाली उतरवले आणि खांद्यावर ते प्रेत घेऊन तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला. त्या वादळी रात्रीं ढगांचा गडगडाट, विजेचा मधूनच लखलखाट आणि भुताप्रेतांच्या किंकाळ्यांमुळे वातावरण जास्तच भेसूर झाले होते. तरी देखील विक्रमार्क निर्भयपणें पुढें चालत होता. जसा तो मन उदास करणाऱ्या स्मशानाजवळ आला, तसा प्रेताच्या आंत लपलेला वेताळ बोलूं लागला, "राजन्, तूं तर



एका महान देशाचा योग्य आणि ज्ञानी राज्यकर्ता आहेस. तुझ्या राज्यांत कितीतरी ज्ञानी, पंडित व प्रज्ञावंत असतील. तेव्हां निरनिराळे विद्वान एकाच धर्मशास्त्राच्या व सिद्धांताच्या निरनिराळ्या व्याख्या करीत असतात, हे तूं पाहिलेच असशील. त्यांच्या व्याख्या अगदी भिन्न प्रकारच्या असतात. अशा वेळेला जो विद्वान आपल्या चतुर वाणीने, आणि युक्तीवादाने आपला सिद्धान्त जास्त स्पष्ट करतो, त्याचे विवेचन राजाला स्वीकारावे लागते. नाही तर ज्याचे विचार राजाच्या विचारांशी मिळतेजुळते असतील त्याचे! पण अशामुळें कांही वेळां अयोग्य व ज्ञानहीन व्यक्तींना फाजील महत्व मिळूं शकते. उदाहरण म्हणून विश्वनाथ नांवाच्या पंडिताची व नयसागर राजाची गोष्टच मी तुला सांगतो.''

वेताळाने गोष्टीला सुरवात अशी केली - ''फार पूर्वीच्या काळची गोष्ट आहे ही ! भुवनगिरी राज्यांत पंडित विश्वनाथ एका गुरुकुलाचे प्रमुख होते. न्यायशास्त्र व व्याकरणाचे ते गाढे विद्वान होते.

एक दिवस राजाकडून त्यांना पत्र आले. त्यांत त्यांना राजाला भेटण्यास सांगितले होते. दुसऱ्या दिवशी आपला शिष्य कनकशर्मा याला सोबत घेऊन ते राजाला भेटायला निघाले.

संध्याकाळ होईपर्यंत ते काशीपूर गांवात पोंचले. तिथें रात्रींपुरता त्यांनी धर्मशाळेंत मुक्काम केला. त्या रात्रीं कनकशर्माला एक आश्चर्यजनक गोष्ट कळली. ती त्याने आपल्या गुरुजींना लगेच सांगितली.

दुसऱ्या दिवशी सकाळीं ते दोघेजण गांवाबाहेरच्या तलावाजवळ गेले. तिथें बरीच गर्दी होती. सर्वांची नजर तलावाच्या मध्यभागीं असलेल्या वाळूच्या छोट्या टेकाडावर होती. चौकशी केल्यानंतर कळलं की दरवर्षी श्रावण पौर्णिमेच्या दिवशीं स्वामी विमलानंद तलावाच्या पाण्यांतून बाहेर येतात व भक्तांना दर्शन देतात.

तितक्यांत अचानक भक्तगणांमधे गडबड सुरुं झाली. स्वामीजींचा जयजयकार सुरुं झाला. पं. विश्वनाथ व कनकशर्माची नजर पाण्यांतून बाहेर पडणाऱ्या एका तेजस्वी पुरुषावर पडली. ते पाण्यावरुन चालतचालत किनाऱ्याकडे येत होते. त्यांचे दर्शन झाल्यामुळें कनकशर्माला धन्य वाटले.

ते दृश्य पाहिल्यानंतर पं. विश्वनाथ व



कनकशर्मा राजधानीच्या दिशेने चालूं लागले. अरण्यांतल्या वाटेने जाताना एका आश्रमांत ते थांबले. महान तपस्वी शरभमुनींचा तो आश्रम होता. आश्रमाच्या आवारांत एक मोठे हवनकुंड प्रज्वलित केले जात होते. आश्रमवासियांनी सांगितले की दुसऱ्या दिवशी प्रातःकाळीं शरभमुनी त्या कुंडात प्रवेश करणार होते. म्हणून ते कुंड रात्रभर पेटलेले ठेवायचे होते.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्या मुनींनी खरोखरच अग्निकुंडात प्रवेश केला. आणि तासाभराच्या समाधिनंतर ते पुन्हां बाहेर आले. प्रेक्षक चकित झाले, स्तंभित झाले आणि जरा घाबरले देखील! हवनकुंडातून बाहेर पडल्यानंतर त्यांचे शरीर सोनसळी कांतीचे दिसत होते व चमकत होते. कनकशर्मा तर आनंदाने वेडापिसा झाला. मुनिवर्यांना पाहून आपले जीवन कृतार्थ झाले, असे त्याला वाटूं लागले.

हे दृश्य पाहून ते दोघे पुन्हां राजधानीच्या वाटेला लागले. डोंगर पार करुन दुपारपर्यंत राजदुर्ग गांवात पोंचले. तिथली जमीन ओसाड होती. त्या वर्षी पाऊस पडलाच नव्हता, म्हणून दुष्काळ पडला. अन्नपाण्यावांचून लोक तडफडूं लागले.

तेव्हां त्या गांवातला एक तरुण शेतकरी रमेश, गांवकऱ्यांच्या रक्षणासाठी जणूं देवदूत बनून पुढें सरसावला. त्याने दुष्काळी भागांतल्या उत्साही तरुणांना गोळा केले व धान्यवाटप केंद्र सुरुं केले. त्या केंद्रात इतर सुपीक प्रांतातून धान्य गोळा केले जात होते. या केंद्रात उपाशी लोकांना अन्न पाणी देऊन त्याने त्यांचे प्राण वांचवले.



तरीसुद्धां पं. विश्वनाथ व कनकशर्माच्या समोरच भुकेने कळवळून एक म्हातारी मरण पावली. रमेशने तिला वांचवण्याची शिकस्त केली, पण ती जगली नाही. ते पाहून रमेशचे डोळे भरुन आले.

पं. विश्वनाथांनी रमेशची तडफदार वृत्ती व त्याचे कोमल मन, या दोन्ही गोष्टींची मनःपूर्वक प्रशंसा केली. ते म्हणाले, ''रमेश, ज्याप्रकारें निस्वार्थी भावाने, रात्रंदिवस तूं कष्ट करतो आहेस, स्वतःची चिंता न करता गांवकऱ्यांच्या सेवेत गुंतला आहेस, ही फार कौतुकास्पद बाब आहे. आपल्या देशांतल्या तरुणांसाठीं हा एक फार मोठा आदर्श आहे. मोठमोठ्या तपश्चर्येपेक्षां हा जास्त कठीण असा कर्मयोग आहे. मानवाची सेवा हीच देवाची सेवा आहे.



"पण तूं महाराजांना कळवून त्यांच्याकडून सरकारी मदत घेण्याचा प्रयत्न वेळेवर कां केला नाहीस?"

पं. विश्वनाथांनी रमेशला विचारले.

रमेशने नम्रपणें उत्तर दिले, "दुष्काळ पडेल असं वाटल्यावर आम्ही प्रथम महाराजांना कळवले होते. व मदतीची याचना केली होती. पण महाराजांनी त्याच्याकडे फारसे लक्ष दिले नाही. कारण इतक्या मोठ्या राज्यांत कुठे ना कुठेंतरी अशी परिस्थिती येत असते. सरकारी मदत किती ठिकाणीं देऊं शकणार?"

त्याच्या उत्तरांत किंचित उपहासाची छटा असावी असं विश्वनाथांना वाटलं. रमेशच्या मनांतली व्यथा त्यांना कळली. ते त्याला नंतर कांहीच बोलले नाहीत. गुरुशिष्य पुन्हां राजधानीच्या मार्गाला लागले.

राजधानीमधें पंडित विश्वनाथांचं भव्य स्वागत झालं. वाटेंत दिसलेले सारे अनुभव त्यांनी महाराजांना सांगितले. समाजसेवा करणारा तरुण शेतकरी रमेश याचे त्यांनी कौतुक केले. त्याच्या दुष्काळपीडित गांवात सरकारी मदत मिळायला हवी अशी शिफारस केली.

विश्वनाथांचे बोलणें लक्षपूर्वक ऐकल्यानंतर राजा म्हणाला, "आपल्या देशांत कितीतरी उच्चदर्जाचे आत्मा आहेत. त्यांत सर्वांत श्रेष्ठ कोण हे ठरवणें महाकठीण. राज्यांतल्या श्रेष्ठ व्यक्तींची यादी मी तुम्हाला राज्याच्या कर्मचाऱ्यांमार्फत देतो. तुम्हीच साधकबाधक विचार करुन ठरवावे की कोण खरोखरच उत्तम व्यक्ती आहे ते!" असं म्हणून राजाने पंडित विश्वनाथांना कांही कागदपत्रें दिली.

ते कागद नीट पाहिल्यानंतर विश्वनाथांनी राजाला सांगितलं - "महाराज! रमेशच्या दुष्काळग्रस्त गांवात आपण लौकर मदत पाठवण्याची व्यवस्था करावी. आपल्या भुकेल्या प्रजाजनांचं रक्षण करण्याच्या यज्ञांत, तो एकटाच आपल्या प्राणांची आहुती द्यायच्या बेतांत आहे. तो राज्याचा सहसा न मिळणारा असा दुर्लभ व कर्तव्यतत्पर कर्मयोगी आहे. माझ्या मतें, आपल्या संपूर्ण राज्यांत तोच खरा महोन्नत आत्मा आहे."

वेताळाने गोष्ट इथें संपवली आणि राजा विक्रमार्कास विचारले, "राजन! लोकमत आणि राजा नयसागरच्या मताने पंडित विश्वनाथ महान शास्त्री व पंडित असतील. पण माझ्या मते मात्र



ते अज्ञानी आणि वितंडवादी आहेत. त्यांनी स्वतः दोन तपस्वी पाहिले; ज्यांच्यापाशीं दिव्य शक्ती आहे अशा दोन महापुरुषांना पाहिले. आपल्या तपोबलाने एकाने पाण्यांत व दुसऱ्याने अग्निकुंडात समाधि घेण्याची शक्ती आहे हे विश्वनाथांनी पाहिले. पण त्यांना श्रेष्ठ न समजता, एका सामान्य शेतकऱ्याला उच्चकोटीचा आत्मा मानणं, हे त्यांचं अज्ञान नाही कां? त्यांच्या न्यायशास्त्राची हीच कां विचारमर्यादा? जर माझ्या प्रश्नाचं उत्तर माहीत असूनही तूं जर गप्प राहिलास तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होतील."

राजा विक्रमार्काने आपले मौन सोडले व तो वेताळास म्हणाला, "वेताळा, तुझी विचार करण्याची पद्धत उथळ, बाळबोध व सरधोपट आहे. तूं हठयोगी विमलानंद स्वामी आणि शरभमुनींच्या चमत्कारांनी प्रभावित झाला आहेस. पण तूं जरा खोलवर, गंभीर विचार करुन पहा बरं! आपला स्वार्थ आणि अहंभाव कुरवाळणारे हठयोगी समाजाला कोणती मदत करतात? उलट ते भोळ्याभाबड्या जनतेला आपल्या चमत्कारांनी चकित करतात आणि आपला स्वार्थ साधतात. या चमत्कारांनी एखादा भुकेला जीव कांही ते वांचवूं शकत नाहीत.

"परंतु रमेशने, निरलसपणें रात्रंदिवस खपून, आपल्या गांवातल्या लोकांना मृत्यूच्या दाढेंतून वाचवलं आहे. हठयोगीची सिद्धी स्वतःपुरती आहे, व्यष्टिपरक आहे. पण रमेशचा पुरुषार्थ मात्र इतरांच्या कल्याणासाठी आहे, समष्टिपरक आहे! हे तपस्वी आपल्या चमत्कारांचं प्रदर्शन करुन प्रजेंत आपला उदोउदो करुन घेतात. पण त्यांच्यामुळें प्रजेचे कोणतेही हित साधले जात नाही. त्यांच्यापासून नागरिकांना काडीमात्र लाभू होऊं शकत नाही. मानवसेवा याचा खरा अर्थ परमेश्वराची सेवा असाच आहे. या कसोटीवर रमेश हाच उच्च श्रेणीचा श्रेष्ठी ठरेल. म्हणून माझ्या दृष्टीने पंडित विश्वनाथांचा निर्णय न्यायशास्त्रानुसार अगदी योग्य आहे आणि तुझा संदेह अनाठायी आहे."

राजाचे मौन भंग करण्यांत सफल झालेला वेताळ, पुन्हां शवासहित अदृश्य झाला आणि त्या झाडावर जाऊन बसला.

**(आधार : वल्लभ यांची रचना)**



# भारत गाथा



एका महान संस्कृतीचा शोध
युगायुगांचा गौरवशाली इतिहास

## ८. भारत भूमी अशी पवित्र झाली



दसऱ्याचा सुट्या सुरू झाल्या होत्या. संदीप आणि चमेलीला मिळालेल्या खजिन्याची बातमी शेजार-पाजारच्या मुलामुलींना समजली होती. प्रथम त्यांना आश्चर्य वाटले की हे भाऊ बहीण गेल्या सुट्टीत येत होते तसे खेळायला का आले नाहीत? मग त्यांनीच शोधून काढले की ही दोघे एका वयोवृद्ध माणसाबरोबर फिरायला जातात व ते जे सांगतात ते अगदी लक्षपूर्वक ऐकतात. एक दिवस एक दुसरे भाऊ-बहीण, किशोर आणि रोमाने नदी किनाऱ्यावर फिरत असलेल्या प्रोफेसर देवनाथ, संदीप व चमेलीचा पाठलाग केला. संदीप आणि चमेली प्रो. देवनाथचे बोलणे ऐकण्यांत इतकी तल्लीन झाली होती की अर्धा तास लपतछपत मागे येणाऱ्या आपल्या मित्रांकडे त्यांचे लक्षच गेले नाही. जेव्हां प्रोफेसरांनी आपली कहाणी थांबवली तेव्हा किशोर आपले आश्चर्य लपवू शकला नाही. - "आहा, किती सुंदर!" त्यावेळी तिघांनी मागे वळून पाहिले.

संदीप आणि चमेलीला त्यांना पाहून सानंद आश्चर्य वाटले. त्यांनी आपल्या आजोबांना मित्रांची ओळख करून दिली. ते आनंदित झाले व म्हणाले - "मला आश्चर्य वाटत होतं की आपल्या नातवडांच्या मित्रांची भेट का होत नाही. किशोर, रोमा, माझ्यामुळें तुम्ही तुमच्या मित्रांना भेटू शकला नसाल तर मला माफ करा हं!" सदैव हसतमुख असणाऱ्या, मनमिळाऊ स्वभावाच्या प्रोफेसरांनी म्हटले.

"नाही, नाही, चूक करणाऱ्यांना आम्ही नुसतेच सोडून देत नाही. आपल्याला आम्हाला



पण कहाणी सांगावी लागेल." रोमाने म्हटले.

"का नाही? अवश्य सांगेन. कारण मला आत्ता आणखी दोन नातवंडं मिळाली आहेत, मी त्याचं मूल्य चुकते करायला तयार आहे." प्रोफेसर हसत म्हणाले.

दुसऱ्या दिवशी प्रोफेसरांच्या कहाणी-सत्रात किशोर व रोमाने यायचे निश्चित झाले. पण ते त्यांच्या जॉर्ज व ज्यूली नांवाच्या आणखी दोन मित्रांना घेऊन आले. संध्याकाळ झाली होती. संदीपच्या आई-वडीलांच्या घरासमोरच्या मखमली लॉनवर ती सगळीजण बसली होती. पण त्याचवेळी लाऊडस्पीकरवर मोठ्याने सिनेमांतली गाणीं ऐकू आली.

"नवरात्र असल्यामुळें दुर्गापूजेच्या उत्सवातली ही गाणी आहेत असं वाटतं." किशोर म्हणाला.

"दुसऱ्यांच्या भावनांची बिलकुल कदर न करण्यामुळे हे असे होते. प्राचीन काळापासून असे उत्सव आले नि गेले. वर्षानुवर्षे लोकांनी देवीची पूजा-आराधना केली आहे. गीतांच्या रूपाने प्रार्थना करून देवीला आळवले गेले.परंतु कोणाच्याही भक्तीमुळे दुसऱ्यांना त्रास झाला नाही. आत्ता लाऊडस्पीकरमुळे असे होते आहे. मोठ्या आवाजातली गाणी सांगतात कीं या उत्सवाचे आयोजन करण्याची संधी मिळेल तेव्हां तुम्ही अगदी अवश्य लक्ष द्यायला हवे की तुमच्या कार्यक्रमामुळे दुसऱ्यांना त्रास किंवा क्लेश होणार नाहीत." प्रोफेसर म्हणाले.

"ह्या दसऱ्याची परंपरा कशी व केव्हां सुरू



झाली, आम्हाला सांगाल का?" रोमाने कुतुहलपूर्वक विचारले.

"आपल्याला त्या जगाच्या आरंभापासून सुरवात करावी लागेल. अध्यात्म आणि भारताच्या महान शास्त्रांचा जर तुम्ही अभ्यास कराल तर तुम्हाला समजेल की, सृष्टी एक अशी प्रक्रिया होती, की जिच्यांत अनंत व असीम हे सीमित वस्तूंत लपून राहिले. हा एक लपंडावासारखा खेळ आहे. आत्मानुसंधानासाठीं

असीम आत्मा असे करतो.

''ब्रह्मा या जगाचा निर्माता आहे. देव, अर्धदेव, असुर, वनस्पती इत्यादिंच्या निर्मितीला ब्रह्मदेवांचा एक मुलगा दक्ष, हा जबाबदार होता. दक्षाची उत्पत्ती ब्रह्मदेवांच्या



उजव्या अंगठ्यापासून झाली होती. त्याचा विवाह ब्रह्मदेवांच्या डाव्या अंगठ्यापासून निर्माण झालेल्या विरानीशी झाला होता. याच कारणामुळे कदाचित् आजही वधू वराच्या डाव्या बाजूला बसते. त्याला पन्नास मुली होत्या. त्यांतल्या एकोणपन्नास मुलींचे विवाह दिव्य शक्ती असलेल्या देवता व ऋषींबरोबर झाले. त्यांच्यापासून मनुष्याची उत्पत्ती झाली.

''दक्षाच्या सर्वांत लहान मुलीने, सतीने, वडिलांच्या इच्छेविरुद्ध शिवाशी लग्न केले. या कारणामुळें दक्षाने कधीही आपल्या मुलीला माफ केले नाही. नंतर लवकरच दक्षाने एका मोठ्या यज्ञाची तयारी कली. व त्याला सर्व देवतांना आणि ऋषीमुनींना निमंत्रण दिले, आपल्या सर्व मुलींना व जांवई लोकांनाही आमंत्रण दिले पण शिवाला व सतीला बोलावले नाही. पण ही बातमी सतीला कळली व हरद्वारजवळ कनखल गांवी ती आपल्या वडिलांच्या घरी गेली. आमंत्रण नसल्यामुळें शिवाने सतीला जायची परवानगी दिली नाही. पण आई-वडिलांच्या घरी जायला मुलीला निमंत्रणाची गरज नाही असे म्हणून सतीने जाण्याचा आग्रह धरला.

''दुर्दैवाने, सतीला पाहताचा दक्षाच्या रागाचा पारा चढला व शिवाचा अपमान होईल असे तो बोलू लागला. तो म्हणाला की शिव वेशभूषा ठीकपणे करत नाही, तो भूत-प्रेतांचा स्वामी आहे, त्याला कुठलेही काम नीट येत नाही, त्याचे खाणें पिणें ठीक नाही.

''सती आपल्या नवऱ्याचा अपमान सहन करूं शकली नाही. तिने यज्ञकुंडात उडी मारली, व ती जळून मेली. सर्वजण ह्या अनपेक्षित घटनेमुळे स्तंभित झाले. सतीचे रक्षक बनून आलेल्या काही भुतांनी ही दुःखद बातमी कैलासला जाऊन शिवांना सांगितली. क्रोधित झालेल्या शिवांनी आपली एक जटा पृथ्वीवर टाकून दिली. त्यांतून वीरभद्र नावाचा एक हजार हात असलेला राक्षस प्रगट झाला.

''वीरभद्र दक्षाच्या कनखल नगरींत



असलेला राक्षस प्रगट झाला. त्याने भयंकर उपद्रव घायला सुरवात केली, यज्ञाचा नाश केला व आलेल्या सर्व निमंत्रितांना पुरेपुरे करून सोडले. शिव देखील त्वरित तिथे येऊन पोहोचले. त्यांनी आपल्या त्रिशूळाने दक्षाचे डोके कापून टाकले. शिवांचा राग शांत झाल्यावर एका बकऱ्याचे डोके त्या धडावर जोडण्यात आले.

''शिव सतीचे मृत शरीर आपल्या खांद्यावर घेऊन संबध देशभर भ्रमण करत राहिले. विष्णूने आपल्या सुदर्शन चक्राने सतीच्या शरीराचे तुकडे तुकडे केले. ते वेगवेगळ्या ठिकाणीं पडले. खरे तर सती ही देवी भगवतीचा अवतार होती हे मोठ्या जाणकार ऋषीमुनींना माहित होते. त्यांनी जिथे जिथे सतीचे अवयव येऊन पडले होते, त्या त्या ठिकाणी त्यांचे एक पवित्र देऊळ बनवले. अशी पवित्र देवळें काश्मीरपासून कन्याकुमारी पर्यंत अनेक आहेत.

''त्यामुळेच भौगोलिक दृष्टचा ही भारतभूमी पवित्र मानली जाते. ह्या सर्व घटना इतक्या प्राचीन काळांत घडलेल्या आहेत, की भगवती देवीच्या पूजेच्या प्राचीन काळची नक्की नोंद कुठेही नाही. हीच देवी, शक्ती, दुर्गा, काली, चंडी व आणखी कितीतरी नावांनी, गुणांनी व रूपांनी अवतार घेते.

''ही गोष्ट आहे का?'' चमेलीने विचारले.

''गोष्ट म्हणता येईल, पण पौराणिक कथा म्हणणे अधिक उचित होईल. पौराणिक कथा ही प्राचीन कथा असते व त्यांत कुठलेतरी महान सत्य असते. अशा प्राचीन कथांच्या संग्रहांना व त्यांच्या अभ्यासाला पुराणशास्त्र म्हणतात. भारताचे पुराणशास्त्र खूप समृद्ध आहे.'' इतके बोलून प्रोफेसर आलेल्या काही प्रमुख व्यक्तींना भेटण्यासाठी उठून उभे राहिले.

''आम्हाला आणखी काही पौराणिक कथा केव्हां सांगाल तुम्ही?'' अशोकने विचारले.

''तुमची इच्छा असेल तेव्हां'' प्रोफेसर हसत म्हणाले.



## या महिन्यांत जन्मलेली श्रेष्ठ व्यक्ती

# डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन



डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांचा जन्म ५ सप्टेंबर १८८८ रोजीं झाला. भारतीय तत्वज्ञानाचा जगांत प्रसार करणारे ते सर्वश्रेष्ठ तत्ववेत्ते होते. नंतर त्यांनी भारताचे राष्ट्रपतीपद भूषविले.

डॉ. राधाकृष्णन यांची दैदीप्यमान कारकीर्द प्रेसिडेन्सी कॉलेज, मद्रास, इथें तत्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून सुरुं झाली. त्यानंतर त्याच विषयाचे प्राध्यापक म्हणून ते कलकत्ता विद्यापीठांत गेले. १९३६-१९३९ या काळांत इंग्लंडमधें ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींत त्यांची पौर्वात्य धर्मांचे प्राध्यापक ही बहुमानाची नेमणूक झाली. त्यानंतर १९४८ पर्यंत बनारस हिंदू विद्यापीठाचे उपकुलगुरु म्हणून त्यांनी काम पाहिले.

ह्या वेळेपर्यंत, त्यांची एक सर्वोच्च श्रेणीचे विद्वान व उत्कृष्ट वक्ते म्हणून देश देशविदेशांत ख्याति पसरली होती. १९४९ मधें ते युनेस्कोचे अध्यक्ष झाले. भारत आता स्वतंत्र झालेला होता. कांही अति महत्वाच्या देशांत स्वतंत्र भारताची बाजू समर्थपणें मांडणारा एक श्रेष्ठ प्रवक्ता हवा होता. डॉ. राधाकृष्णन यांना भारताचे राजदूत म्हणून सोव्हिएट संघात (जो आता अस्तित्वांत नाही) म्हणजेच रशियांत, पाठवले गेले. त्यावेळेस तिथें स्टॅलिनची राजवट होती. स्टॅलिन हा अतिशय आडमुठा व कठोर नेता होता. परंतु डॉ. राधाकृष्णन यांची गाढ विद्वत्ता आणि धोरणी वृत्ती पाहून स्टॅलिन बराच प्रभावित झाला होता. डॉ. राधाकृष्णन यांच्याबद्दल त्याला आदर व कौतुक वाटत असे. ह्यामुळें भारत व रशिया या दोन्ही देशांत सामंजस्य व मैत्री निर्माण झाली.

भारताला एका श्रेष्ठ उपराष्ट्रपतीची निकड होती. त्यावेळेस डॉ. राधाकृष्णन यांनी ते पद स्वीकारले. १९६२ मधें ते भारताचे राष्ट्रपती झाले. १९६७ मधें ते निवृत्त होईपर्यंत राष्ट्रपतीपदाची प्रतिष्ठा व सन्मान राखून त्यांनी हे पद सांभाळले.

त्यांनी लिहीलेल्या अनेक पुस्तकांपैकी "भारतीय तत्वज्ञान" हे सर्वाधिक लोकप्रिय पुस्तक आहे.

१९७५ मधें डॉ. राधाकृष्णन यांचे निधन झाले. ५ सप्टेंबर हा त्यांचा जन्मदिन आता साऱ्या भारतदेशांत शिक्षक-दिन म्हणून उत्साहाने पाळला जातो.





# सुवर्ण सिंहासन

⑨

(आजपर्यंत : मलयध्वजाची कथा संपवून दुसऱ्या सालभंजिकेनेदेखील विजय दत्ताला प्रश्न विचारले. त्याने त्यांची बरोबर उत्तरें दिली आणि सुवर्ण सिंहासनाच्या दुसऱ्या पायरीवर चढण्यास तो लायक ठरला. तेव्हां तिसरी सालभंजिका न्यायदेवी हिने विजयदत्ताला एक कहाणी सांगितली. त्यांत सुभद्रा देशचा राजा न्यायवर्धन आदर्श न्यायासाठीं प्रसिद्ध होता. त्याच्या दरबारांत न्याय मागण्यासाठीं दोन मित्र आले आणि दोघांनी आपापल्या दृष्टीकोनातून आपली बाजू मांडली. वीर नांवाच्या व्यक्तिने आपला मित्र चंद्र याच्यावर आरोप लादला की त्याने लहानपणीच आपल्या मुलीचा विवाह वीरच्या मुलाशी करण्याचे वचन दिले होते. परंतु आता चंद्र श्रीमंत झाला असल्यामुळें गरीब वीरच्या मुलाशी तो मुलीचा विवाह करण्यास तयार नव्हता. यावर राजाने चंद्रला आपली बाजू मांडण्यास सांगितले. त्यानंतर...)

चंद्रने महाराजांस विनयपूर्वक प्रणाम केला व म्हटले, "वीरने जे कांही माझ्याबद्दल सांगितले आहे, ते अगदी खरं आहे. परंतु आपले म्हणणे सिद्ध करण्यासाठी खऱ्या गोष्टीवर खोटेपणाचा इतका मुलामा त्याने दिला आहे की खरी हकीकत झांकली गेली आहे. त्याचे बोलणे ऐकून प्रत्येकाला जरुर वाटेल की त्याच्यावर अन्याय होत असून पूर्णपणे मीच दोषी आहे.

"वीर व मी लहान पणापासूनचे मित्र आहोत हे खरे आहे. मैत्री कायम टिकावी म्हणून आपण एकमेकांचे व्याही-संबंधी बनावे असे आम्ही ठरवले. पण हा विचार टाळण्याचे कारण तो गरीब आहे आणि माझी परिस्थिती सुधारली आहे हे नाही. त्याचं खरं कारण आहे - आम्हा दोघांच्या बायकांच्या राहणीमानात आणि विचारसरणीत जमीन - आसमानाचा फरक आहे. हा विवाह न करण्याचे हे खरे कारण आहे."

चंद्र पुढे म्हणाला, "माझी पत्नी जानकी

लक्ष्मी गायत्री



कष्टाळू, काटकसरी असून आपल्या कुटुंबाचा उत्कर्ष पाहाणारी आहे. मी जे कांही मिळवतो त्यांतील अर्धा भाग शिल्लक टाकून अर्धा भाग ती घरखर्चासाठी वापरते. फावल्या वेळांत पापड करुन विकते. श्रीमंत लोकांच्या घरी थोडे फार काम करुन जास्त पैसा मिळवण्याचा प्रयत्न करते. शिल्लक टाकलेले पैसे ती व्याजाने उधार देते व उत्पन्न वाढवण्याचे प्रयत्न करते. तिच्या बुद्धी, चतुराई व कष्टामुळें आज आम्ही सुखी व संपन्न आहोत. मी पण तिच्यापासून सतत कष्ट करण्यास शिकलो. आमच्या दोघांच्या सहवासांत आमची मुलगीदेखील अतिशय कामसू झालेली आहे. आम्ही तिघे कामांत मग्न राहून आपले जीवन सुखमय व जास्त चांगले बनवण्याचा प्रयत्न करतो.

"वीरच्या पत्नीचा, कनकाचा स्वभाव माझ्या पत्नीच्या स्वभावाच्या अगदी उलट आहे. ती आळशी व बेजबाबदार बाई आहे. आपल्या नवऱ्यासाठीं व मुलांसाठी स्वयंपाक करायला देखील ती नाखूष असते. अर्ध्या शेराचा भात करण्याऐवजी ती एक शेराचा करुन ठेवते. घरखर्च वाटेल तसा, विचार न करता, करते. तिचा नवरा जे कमावून आणतो ते उधळपट्टी करुन खर्चून टाकते. त्याला जास्ती पैसे आणण्याचा तगादा लावते. स्वतः कष्ट करुन घरांतल्या मिळकतीला हातभार लावावा हे तर दूरच! तिची मुलेंही घरकामांत मदत करीत नाहीत. मळकट कपडे घालून गल्लोगल्ली भटकत फिरतात. त्यांच्याकडे तिचे लक्षही नसते.

"सुरवातीला या त्यांच्या वागणुकीकडे आम्ही दुर्लक्ष केले. कारण मी घरांतल्या वडीलधाऱ्या मंडळींच्यासमोर शब्द दिलेला होता. म्हणून आमच्या भावी जांवयाला, सारंगला सुधारण्याचा आणि त्याला उद्योगी बनवण्याचा आम्ही निश्चय केला. माझ्या पत्नीने या दृष्टीने अनेक प्रयत्न केले. पण सारंगवर त्याचा कांहीही परिणाम झाला नाही. तो काम टाळत असे. त्याच्यावर काम करण्यासाठी जर दडपण आणले तर त्याची आई नाराज होत असे. माझ्या पत्नीवर ती उलट आरोप करायची की पैशाच्या घमेंडीत सारंगला माझी पत्नी सतावते, आणि त्याला अपमानित करते. वीरच्या बायकोला वाटायला लागलं की आम्ही त्यांच्या मुलाला आईवडिलांपासून वेगळा करतो आहोत. त्यांचे हे विचार बदलतील आणि आमचा हेतू लक्षांत घेउन आपली चूक ते मानतील अशी आम्हाला अजूनही आशा होती. पण शेवटी आम्ही निराश झालो.

"आता सारंग सतरा वर्षांचा तरुण आहे.



तरीसुद्धां जीवनमान न सुधारता बेछूट झालेला आहे. गांवातल्या उनाड तरुणांच्या संगतीत दिवसभर ताडी पितो आणि जुगार खेळतो. तरीसुद्धां त्याचे आईवडील त्याला कांहीच बोलत नाहीत! असल्या आळशी, बेज़बाबदार, वाईट संवयी असलेल्या तरुणाशी, माझ्या सुशील आणि उद्योगी मुलीचा विवाह करुन, माझ्या हाताने मी तिचे नुकसान कसे करुं? आपल्या डोळ्यांदेखत तिच्या आयुष्याचा सत्यानाश कसा करुं? ही परिस्थिती पाहून गांवातल्या सूज्ञ आणि अनुभवी वडीलधाऱ्या मंडळींनी माझी बाजू घेतली आहे व माझा निर्णय योग्यच मानला. पण वीर माझ्या संपत्तीच्या लोभाने ही वस्तुस्थिती खोट्या प्रकारे रंगवून सांगतो आहे. गांवकारी पैशाच्या लोभाने माझी बाजू घेत आहेत असं तो म्हणतो. परंतु खरी गोष्ट अशी आहे की माझी संपत्ती व माझा निर्णय यांचा कांहीही संबंध नाही. आम्हाला वीर व सारंग ह्यांच्या गरीबीची घृणा नाही. राग आहे तो त्यांचा आळशीपणा, बेलगाम वर्तन व वाईटसाईट संवयी यांचा!" एवढं सांगून चंद्र गप्प बसला.

महाराजांनी चंद्रचे भाषण लक्षपूर्वक ऐकले. क्षणभर त्यांनी दोघांकडे नीट न्याहाळून पाहिले. चंद्रचा पोशाख साधा, स्वच्छ होता. चेहरा शांत होता. वीरचा पोशाख कळकट होता व केंस विस्कटलेले होते. त्याच्या डोळ्यांत भिती होती व तो बावरलेला दिसत होता.

वीर आवेशांत कांही बोलणार होता. पण महाराजांनी त्याला शांत राहाण्याची खूण केली आणि चंद्रला विचारले, "आतां मुलीचा विवाह कुणाशी करण्याचा विचार आहे?"



"महाराज! आजपर्यंत मी ही गोष्ट गुप्त ठेवली होती. पण आपण जेव्हां हा प्रश्न विचारला आहे तेव्हां त्याचे उत्तर देणें माझें कर्तव्य आहे. माझ्या मेव्हण्याचा मुलगादेखील सारंग एवढाच आहे. तो सर्व दृष्टीने माझ्या मुलीसाठी योग्य आहे. तो सालस स्वभावाचा आहे. त्याला कोणतीही वाईट संवय नाही. तो कष्टाळू असून शेतीवाडीचे सारे काम जाणतो. अभ्यासांतही तो हुशार आहे. त्याच्या आईवडिलांना हा संबंध पसंत आहे. मुलगा व मुलगी या विचाराशी सहमत आहेत." चंद्रने सविस्तर सारे कांही स्पष्टपणें सांगितले.

चंद्रचे बोलणें ऐकून वीर पुन्हां आवेगाने कांही बोलणार होता. पण महाराजांनी त्याला थांबवले आणि म्हटले, "इथें रागवायचे किंवा दांडगेपणाचे कांहीच कारण नाही. तुम्ही दोघांचे म्हणणे मी ऐकले



आहे. आता दोघेही शांतपणें बसा.''

त्यानंतर महाराजांची परवानगी घेऊन मणिकर्ण या विदेशी व्यापाऱ्याने आपली तक्रार ऐकवली.

''महाराज! इथून थोडे दूर असलेल्या सिंहद्वीपचा मी एक नागरिक आहे. माझे वडील एक मोठे व्यापारी होते. त्यांच्या इच्छेनुसार मी लहानपणापासूनच व्यापाराच्या कामांत त्यांना मदत करुं लागलो. पण मला त्या कामाची विशेष आवड नव्हती. म्हणून मी मित्रांबरोबर हिंडायला निघून जात असे. परंतु अचानक माझे वडील वारले व त्यांचा व्यापार मला संभाळावा लागला. वेळोवेळीं त्यांच्या मित्रांनी मला मार्गदर्शन केले. त्यांचा व्यापार नीट चालवून वाढवण्याचा मी खूप प्रयत्न केला. माझी महत्वाकांक्षा समुद्रपार व्यापार करावा अशी होती. माझ्या वडिलांच्या हितचिंतकांनी व माझ्या आईनेदेखील या व्यापाराला मनाई केली होती. पण माझा मात्र ठाम विश्वास होता की समुद्रावर केलेल्या व्यापारांत मला शंभरपटींने फायदा होण्याची संधी आहेच, त्याशिवाय तो व्यापार रोमांचकारी व धाडसाचा आहे. पण आता मला कळतंय की ती माझी फार मोठी चूक होती.

''मार्वी बेटांतून मी स्वस्त किंमतीत सुगंधी द्रव्ये, नारळ, सुंभ आणि हस्तिदंताच्या अनेक वस्तू खरेदी केल्या. हा माल एका व्यापारी जहाजावर लादून मी बंदरातून निघालो. वाटेंत अनेक बंदरातून आणखी सुंदर व आकर्षक वस्तू खरीदल्या. तोपर्यंत वाटेंत कांही त्रास झाला नाही. मी एक मोठा समुद्रावरचा व्यापारी झालो आहे असा माझा विश्वास पक्का झाला.

''जहाजाचा प्रवास पुढें सुरुं होता. जहाजावरच्या कांही व्यापाऱ्यांना आपला माल विकण्यासाठीं सुभद्रा देशांत कांही दिवस थांबायची इच्छा होती. त्यांनी मलादेखील सल्ला दिला की माझ्या मालाला इथें बरीच मागणी आहे आणि मी आणलेल्या वस्तूंना वाटेल ती भरमसाट किंमत मिळूं शकेल. आमचे जहाज तिथें एक आठवडा थांबणार होते. पण सगळा माल विकण्यासाठी जास्त दिवस लागले असते. यावर कांहीजणांनी कल्पना सुचवली की माल ठेवण्यासाठीं भाड्याने जागा मिळतात तिथें माल ठेवावा.

''तोपर्यंत जहाज सुभद्रा देशच्या बंदराला लागले होते. मी अजून कांहीच ठरवले नव्हते. माझी द्विधा मनस्थिती होती. माल उतरवावा की नाही अशा विचारांत असताना मला रत्नगुप्त दिसला''



असं म्हणून त्याने रत्नगुप्ताकडे बोट दाखवले.

महाराजांची नजर पडताच रत्नगुप्त उभा राहिला व त्याने त्यांना अभिवादन केले.

रत्नगुप्त सुभद्रादेशाच्या राजधानींत राहात होता. तो नगरांतला फार चतुर व अनुभवी व्यापारी म्हणून प्रसिद्ध होता. महाराजांनी त्याला नीट न्याहाळले व आपली मान हलवून मणिकर्णला आपली फिर्याद पुढें सांगण्याची खूण केली.

मणिकर्ण म्हटले, ''महाराज! रत्नगुप्त खरंच एक फार धोरणी व्यापारी आहे. मी गोंधळून गेलो आहे हे पाहून मी समुद्रव्यापारांत नवशिका आहे हे त्याने लगेच ओळखले. तो तावडतोब माझ्याजवळ आला आणि त्याने स्वत:चा परिचय करुन दिला. माझ्या व्यापाराबद्दल त्याने चौकशी केली. मी त्याला एखादा व्यापारी आपल्या भागीदाराला सांगतो त्याप्रमाणें सगळं कांही खरं तेच सांगितलं. त्याच्या सचोटीबद्दल मला थोडीसुद्धां शंका आली नाही. ही बहुतेक माझी दुसरी चूक होती.

''माझ्याकडून सारी हकीकत समजल्यानंतर तो मोठ्या आपुलकीने म्हणाला, ''बेटा, आठवडाभरांत इतका सगळा माल विकला जाणें कांही शक्य होणार नाही. तूं परदेशी आहेस, त्यामुळें इथले स्थानिक लोक तुला फसवण्याचा प्रयत्न करतील. येथील बाजाराची पद्धत समजण्यास तुला वेळ लागेल. पण त्यासाठीं तुला गोदाम भाड्याने घ्यायचं म्हणजे ते खूपच महाग पडेल. आणि ते सुद्धां, राजाज्ञेशिवाय विदेशी व्यापाऱ्यांना गोदाम देता येत नाही. राजाची परवानगी काढायची म्हणजे त्यालाही खूप वेळ लागण्याची शक्यता आहे. तुला पाहिल्यावरच मला



कुणाच ठाऊक, पण तुझ्याविषयीं आपुलकी निर्माण झाली. मीही एक व्यापारी आहे आणि माझ्याकडे माल ठेवण्यासाठी जागादेखील आहे. तुझा माल माझ्या घरालगतच्या गोदामांत सुरक्षित राहील. तूंही माझ्या घरी पाहुणा म्हणून राहा. तुझ्या व्यापारांत माझ्या मदतीची आवश्यकता वाटली तर तीही मदत मी करुं शकेन. तुझा माल आरामांत विकून तूं आनंदाने घरी परत जा.''

हे त्याचे गोड बोलणें ऐकून मला वाटलं की देवाने माझ्या मदतीसाठीच याला पाठवला आहे. मला मनांत काडीमात्र संशय आला नाही. मी जहाजावरुन माल उतरवला व गाड्यांत भरुन त्याच्याबरोबर त्याच्या घरीं घेऊन गेलो. घरीं गेल्यानंतर त्याने नोकरांकडून माल उतरवून एका खोलींत ठेवला. त्याला कुलूप लावून त्याची किल्ली



त्याने मला दिली.

"त्याचं हे अलोट प्रेम पाहून मला वाटलं की माझ्या वडिलांचा आत्मा त्याच्यात शिरला आहे आणि परदेशांत सुद्धां मला पावलोंपावली प्रेमळ मार्गदर्शन करीत आहे. माझ्या आनंदाला पारावार उरला नाही. स्नान केल्यानंतर त्याने मला सुग्रास भोजन दिले. थकल्यामुळें मी गाढ झोपलो. संध्याकाळपर्यंत मला जाग आली नाही.

रात्रीं मनोरंजनाच्या निमित्ताने तो मला विलासमंदिरात घेऊन गेला. तिथें सुंदर नर्तकीचे नृत्य चालू होते. प्रेक्षकांचे मदिरापान चालू होते. व त्या नशेत चेष्टामस्करीही चाललेली होती.

"हे वातावरण मला नवे नव्हते. वडिलांच्या बरोबर व्यापाराचे काम शिकत होतो, तेव्हां मीदेखील कधीमधीं विलासमंदिरांत जात होतो. पण जेव्हां कामाची पूर्ण जबाबदारी माझ्यावर पडली तेव्हां मी या मंदिरांपासून लांब राहू लागलो. त्या जागीं पुन्हां एकदा बऱ्याच दिवसांनंतर मी आलो होतो. म्हणून पूर्वीची वृत्ती उफाळून आली. मदिरापान करत नर्तकीच्या नृत्यामधें मी तल्लीन झालो. रत्नगुप्त मात्र शांतपणें नृत्य पाहात होता. त्याने मदिरापान केले नाही किंवा नर्तकीच्याबरोबर थट्टामस्करीदेखील केली नाही. त्याला घरी लवकर यायची इच्छा होती, पण मला तिथें थांबायची इच्छा होती. माझ्यासाठी तोही तिथें थांबला. तिथें जो कांही खर्च झाला, तो सगळा खर्च रत्नगुप्ताने केला. मला त्याने खर्च करूं दिला नाही.

परत येताना वाटेंत त्याने म्हटले, "मणिकर्ण, तुझा माल विकण्यास तुला बराच त्रास पडणार आहे. त्यासाठी तुला मदत करण्यासाठीं मीच तुझा माल खरेदी करतो. माझ्या मालापेक्षां तुझा माल निराळा आहे. पण मला खात्री आहे की लहान व्यापाऱ्यांना तुझा माल विकून थोडाफार नफा मी कमवूं शकेन. तुला काम वाटतं?"

त्याचा विचार ऐकून मला फारच आनंद वाटला. मी धुंदीत होतो. त्यामुळें विचार न करताच मी त्याला होकार दिला, आणि घरी जाऊन मी निश्चिंत मनाने झोंपी गेलो.

सकाळीं जागा झालो तेव्हां रात्रीच्या बोलण्यावर मी नीट विचार करूं लागलो. आंघोळ झाल्यानंतर न्याहारीच्यावेळीं मी त्याला म्हटले, "रत्नगुप्तजी, तुम्ही मला खूप मदत केली आहेत आणि तुमच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. तरीदेखील, तुम्ही माझा सारा माल कां खरेदी करणार आहात? मला हे जाणण्याची इच्छा आहे.



आणि जर तुम्हीच माझा माल घेणार असलात तर मालाची अर्धी रक्कम तुम्ही मला आगाऊ दिलीत तर बरे पडेल. कारण आता माझ्याजवळ फारसे पैसे शिल्लक राहिलेले नाहीत."

माझ्या बोलण्यावर तो नाराज होऊन म्हणाला, "अजून तर तुझ्या मालाचा इथल्या बाजारांत काय भाव येईल ती चौकशी मी केलेली नाही. तरीही मी माल खरेदी करण्यास तयार आहे. आज बाजारांत जाऊन मी मालाच्या भावाची माहिती काढून येईन. तोपर्यंत माझ्याजवळ हे दहा हजार रुपये आहेत, ते ठेवून घे. संध्याकाळपर्यंत आणखी कांही पैशांची जमवाजमव करतो. कारण हा व्यापारांतील देवघेवीचा व्यवहार आहे. म्हणून या कागदावर तूं सही करून ठेव. वेळ मिळाला की त्यावरचा मजकूर सविस्तर लिहीन."



"असे म्हणून त्याने मला दहा हजार रुपये व एक साधा कोरा कागद दिला. मी रुपये घेतले व कागदावर सही केली. त्यानंतर दिवसभर रत्नगुप्त आपल्या धंद्यांच्या कामांत गुंतलेला होता. मी देखील शहरांत हिंडतफिरत होतो. उत्सुकतेच्या पोटीं मी माझ्या मालाच्या भावासंबंधी बाजारांत चौकशी केली. माझ्या मालाला इथें भरपूर मागणी होती. आणि माझ्या देशांतल्या भावापेक्षां इथें त्याला दसपट किंमत मिळणार होती. एका महिन्यानंतर होणाऱ्या वसंतोत्सवाच्यावेळीं तर भाव जास्त वाढले असते.

"मला जेव्हां हे सारे समजले तेव्हां मी आपल्या दैवाला दोष देऊं लागलो. रत्नगुप्ताला सारा माल विकण्यापूर्वी मी बाजारांत चौकशी कां केली नाही? मला याचे फार वाईट वाटले आणि मी हळहळत बसलो. रत्नगुप्ताला बाजारभावाची कल्पना होती. तरीदेखील खरी वस्तुस्थिती लपवून त्याने मला धोका दिला याबद्दल माझी खात्री पटली. बाजारांतल्या इतर व्यापाऱ्यांजवळ मी रत्नगुप्ताबद्दल विचारपूस केली तेव्हां तो अतिशय प्रामाणिक व विश्वासपात्र व्यापारी आहे असे सर्वांनी सांगितले. मला कांहीच कळेना. मी गोंधळून गेलो व घरीं आलो.

"रत्नगुप्त घरीं माझी वाट पहात होता. मला पाहून तो म्हणाला, "एकटाच कुठे रे गेला होतास मणिकर्णा?"

मी माझ्या मनांतली रुखरुख त्याला सांगितली आणि स्पष्टपणें विचारले, "माझ्या सर्व मालाबद्दल तुम्ही मला किती पैसे देणार आहात?"

"त्यावर चमकून रत्नगुप्ताने लगेच उत्तर दिले,

"काय बोलतो आहेस तूं मणिकर्ण? तुझ्या मालाबद्दल तूं पुरे चाळीस हजार रुपये वसूल केले आहेस. आणि वर उलट मलाच विचारतोस की मी किती पैसे द्यायचे आहेत? काय मदिरापान करुन आला आहेस की काय? म्हणून कांहीतरी बरळतो आहेस!"

त्याचे हे बोलणे ऐकून मी थक्कच झालो. माझे शरीर दगडासारखे निर्जीव झाले. त्याने मला सही करण्यासाठी जेव्हां कागद दिला होता, तो कोरा होता. पण आता मात्र त्यावर स्पष्ट अक्षरांत लिहीलेले होते की मी माझा सारा माल त्याला चाळीस हजार रुपयांना विकलेला आहे. तो त्या कागदावर खरे तेच लिहील, या विश्वासावर मी सही केलेली होती. पित्यासारखी माया करणारा हा गृहस्थ अशा प्रकारें दिवसाढवळ्या मला लुबाडून फसवील अशी मी कधी कल्पनाही केली नव्हती. मला तेव्हां कळले कीं व्यापारांत कुणावर विश्वास ठेवणें, बेसावध व निष्काळजी राहाणें, हे मूर्खपणाचे आहे आणि व्यापारी आचारसंहितेच्या विरुद्ध आहे, मी स्वतःलाच दोष दिला. मला माझ्या चुकीबद्दल पश्चात्ताप झाला. आता कपाळ बडवून काय उपयोग? मी बाजारांत जाऊन लोकांना जीव तोडून सांगितले की रत्नगुप्ताने मला फसवून लुटले आहे. परंतु कुणीही माझ्यावर विश्वास ठेवला नाही. माझ्या बाजूने कुणी बोललेदेखील नाहीत. उलट मलाच ते विश्वासघातकी व दगाबाज म्हणूं लागले.

"महाराज, शेवटी निराश होऊन मी आपल्या न्यायसभेंत हजर झालो आहे. आपल्या राज्यांत एका विदेशी असहाय्य नागरिकाला न्याय मिळेल आणि मला माझा माल परत केला जाईल अशी मी आशा करतो.

"हो महाराज! आणखी एक गोष्ट! ज्या खोलींत माझा माल ठेवलेला होता, त्या खोलीची किल्लीदेखील हरवून टाकलेली आहे. आता माझ्या नशिबाचा निकाल आपल्या हातांत आहे." आपले हे लांबलचक फिर्यादीचे भाषण संपवून मणिकर्ण गप्प बसला.





# ऑलिंपिक्स साठीं खास सदर

## ओहो... ऑलिंपिक्स!

सादर कर्ता : चन्दामामा





कवीच्या म्हणण्यानुसार ऑलिंपिक खेळांना सुरुवात झाली ती देवांच्या लढाईमुळे. देवांचा पिता झियस आणि दुसरा एक देव क्रोनोस यांच्यात पृथ्वीच्या मालकीसाठी माउंट ऑलिंपस या पर्वतावर युद्ध झाले. झियस जिंकला आणि विजय साजरा करण्यासाठी त्याने खेळांचे समारंभ सुरु केले.











ग्रीसचा सर्वश्रेष्ठ लोकप्रिय नायक हर्क्युलिस ह्यालाही ऑलिंपिक सामन्यांचा जनक मानतात. ऑजियस राजाने एकदा हर्क्युलिसला तबेले साफ करायला बोलावले. ते कष्टप्रद काम संपल्यावर राजाने त्याला कांहीही बक्षीस दिले नाही. म्हणून चिडून हर्क्युलिसने राजाचा वध केला. नंतर खेळांच्या स्पर्धा ठेवून आपला विजय साजरा केला.














त्याकाळीं क्रीडा महोत्सवाच्या सुरुवातीला झियस देवतेसाठीं एका ज्योतीने एक अग्नी पेटवला जाई. आणि ही ज्योत सूर्याच्या किरणांनी पेटवत असत. जर त्या दिवशी सूर्यप्रकाश नसला, तर उत्सव सुरुं होत नसे.














काळाच्या ओघांत, देवतेला व मृतवीरांना बळी म्हणून एका लहान बालकाला मारून त्याचा प्रसाद वाटण्याची क्रूर प्रथा सुरुं झाली.

एका ब्रॉंझच्या तबकावर वर्तुळांची रांग दाखवणारे इफिटस राजाचे हे फर्मान आजही पाहायला मिळते. देवाचे आभार मानण्यासाठीं त्याने ते वचन दिलं होतं.












ऑलिंपिक खेळांपूर्वी सर्व स्पर्धकांना सराव व शिक्षणासाठी अेलिसच्या व्यायामशाळेंत दहा महिने तालीम घ्यावी लागत असे.






प्राचीन ऑलिंपिक सामने पांच दिवस चालत. पहिल्या दिवशीं पंच व सर्व खेळाडू डुकराच्या मांसाचा तुकडा हातांत घेऊन प्रामाणिक व न्यायी असण्याची शपथ घेत असत.









कसरतीचे खेळ तसेच घोड्यांच्या शर्यती फार लोकप्रिय होत्या.



कसरतपटूंची खास चाचणी पांच खेळांत घेतली जात असे - थाळीफेक, भालाफेक, धावणे, लांब उडी व कुस्ती - हे पंचक फार लोकप्रिय होते.




कुस्ती ही प्राचीन ऑलिंपिक्समधली लोकप्रिय स्पर्धा होती. ही हल्लीच्या कुस्तीसारखी नव्हती. कुस्ती व मुष्टियुद्ध यांचे मिश्रण असलेल्या या खेळाला "पॅंक्रेशन" असे म्हणत. प्रतिस्पर्ध्याला चावणे, त्याची बोटे मोडणे किंवा डोळे फोडणे याखेरीज इतर कांहीही केलेले चालत असे.







अराचियन ह्या प्रसिद्ध मल्लाने पॅंक्रेशनचे ऑलिंपिक मुकुट तीन वेळा जिंकले. पण तिसऱ्या वेळेला त्याला मुकुट घालण्यापूर्वी तो मरण पावला. निकराची कुस्ती झाल्यावर त्याच्या प्रतिस्पर्ध्याने त्याचा गळा दाबला व तो खाली पडला. पंचांनी मात्र नंतर त्याच्या मृतदेहावरच मुकुट चढवला.






ऑलिंपिक्समधली सर्वांत महत्त्वाची स्पर्धा म्हणजे रथांची शर्यत. त्यांत भाग घेणारे जिंकण्यासाठी कांहीही करायला तयार असत. प्रतिस्पर्ध्यांच्या सारथ्यांना लांच देणे किंवा त्यांच्या रथाशी मुद्दाम टक्कर किंवा धक्का देणे हे होत असे. रथांच्या श्रीमंत मालकांना बक्षिसे मिळत. आणि बिचारे सारथी नुसतेच घाम पुसत बसत!



यांत सर्वांत कमाल केली इ.पू. ४१५ मध्ये अलिसिबियाडीसने! त्याने एकाच स्पर्धेत सात रथ उतरवले. आणि फक्त पहिलेच नव्हे तर दुसरे नि चौथे बक्षीसदेखील मिळवले.




ऑलिंपिक स्पर्धा केवळ खेळांची प्रदर्शने राहिली नाहीत. त्यांना प्रचंड जत्रेचं स्वरूप आलं. ३०,००० पेक्षां जास्त प्रेक्षक आपल्या आवडत्या खेळाडूंना पाहायला स्टेडियमवर येत.





ग्रीकांना खेळांत नियमभंग करणे हा अक्षम्य व शिक्षापात्र गुन्हा वाटत असे. त्यावर आसूडाचे फटके किंवा दंड या शिक्षा होत्या.




आधुनिक ऑलिंपिक्समध्ये विजेत्यांना पदके देतात. पूर्वी मात्र ऑलिव्ह पानांची माळ डोक्यावर ठाकत नि तारफांचा पखा. ही बहुमानाची बक्षिसे असत.





इ.स. ६५ पर्यंत ग्रीकांखेरीज इतर देशातले नागरीक या खेळांत सामील होऊं लागले. परंतु नुसत्या ऑलिव्ह पानांच्या बक्षिसाने विजेत्यांचे समाधान होईना.







जेव्हां रोमनांनी ग्रीस जिंकला, तेव्हां ऑलिंपिक्सकडे त्यांनी उत्साहाने लक्ष दिले. त्यांनी रणगाजी सारखे आकर्षक रोमन खेळ ऑलिंपिक्समध्ये सुरुं केले.






ऑलिंपिक्सची आधुनिक पद्धत इ.स. ६७ पासून सुरुं झाली असं म्हटलं पाहिजे. कांही खेळांतल्या पंचांना प्रथमच लांच दिली गेली.

पंचांना लांच देणारा पहिला स्पर्धक होता, रोमचा सम्राट नीरो - रोम जळताना फिडल वाजवत बसणारा! त्याने दहा घोड्यांचा रथ घेऊन स्पर्धेत भाग घेतला. तो रथांतून खाली फेकला गेला. त्याने शर्यत पूर्ण केली नाही. तरीसुद्धां तोच विजेता म्हणून घोषित केला गेला.








पहिले आधुनिक सामने जुन्या ऑलिंपिक खेळांच्या जागीं, ग्रीसच्या ऑलिंपिया गांवात व्हावेत अशी बॅरनची इच्छा होती. पण ऑलिंपियामध्ये तेवढ्या सुविधा नव्हत्या. गांवही तसे आडवाटेला होते.






१८९६च्या पहिल्या अर्वाचीन ऑलिंपिक्ससाठी अथेन्स शहराची निवड झाली.

पण जिओर्गोस अव्हेरॉफ या ग्रीक धनवंताने ऑलिंपिकसाठी मैदानाचे नूतनीकरण करण्यासाठी ९२०,००० सुवर्णमुद्रा (ड्रॅक्मा) दिल्या. त्याच्या या उदार देणगीमुळें सामने भरवणें शक्य झालें.




पहिल्या अर्वाचीन ऑलिंपिक सामन्यांची सुरुवात ऑलिंपिक स्तवनाने झाली. ग्रीक राजकवी कॉस्टिस पालामास याने हे गीत लिहीलें आणि स्पायरॉस सामारास याने त्याला संगीतबद्ध केलें.

"कसा थाटात सामने चाललेत, पण..."

"हे लोक तर सर्वनाश करून टाकतील."

"उत्तम"

"पुन्हा म्हणा."

"व्वा, व्वा,

अथेन्सच्या पहिल्या अर्वाचीन ऑलिंपिक्सचा पहिला विजेता होता अमेरिकेचा जेम्स कॉनोली. त्याने तिहेरी उडीत प्राविण्य दाखवले.

"बाप रे - कसा छान पळतोय! मी फक्त तुरुंगातूनच असा लांब पळलो!"






या सामन्यात सर्वात शानदार होती ग्रीक मॅरथॉन. त्याची आकर्षक स्पर्धा. स्पायरिडॉन लुई या ग्रीक खेळाडूने ती जिंकली. तो मैदानात शिरल्यावर, जॉर्ज व निकोलस हे दोन्ही ग्रीक राजपुत्र, त्याच्या दोन्ही बाजूंनी त्याच्या-बरोबर, शेवटच्या रेषेपर्यंत पळत होते. एका ग्रीक न्हाव्याने त्याची जन्मभर मोफत दाढी करण्याचे वचन दिलें. आणि एका ग्रीक उपाहारगृहमालकाने त्याला जन्मभर मोफत भोजन द्यायचे ठरवले!



पॅरिस १९००. ऑलिंपिक्सचे बोधवाक्य प्रथमच निवडले गेले. सर्वांत वेगवान, उच्च व बलवान. एका डॉमिनिकन धर्मगुरुचे हे शब्द आंतरराष्ट्रीय ऑलिंपिक समितीने १८९७ मधें स्वीकारले. पॅरिसच्या भव्य प्रदर्शनाच्या शेवटी सुरुं झालेल्या या स्पर्धा, दोन महिने रेंगाळल्या होत्या.

ZZZZZ

फ्रान्स व जर्मनी या दोन कट्टर वैऱ्यांमधें होणारा फुटबॉलचा सामना, हे पॅरिस ऑलिंपिक्सचे एक खास आकर्षण होते. पण सामन्याच्या वेळीं बराच गोंधळ माजला. फ्रान्सचा संघ अखेरीस २५ गोलच्या फरकाने जिंकला.

goal!!

GOAL!

??

ऑलिंपिक्सच्या इतिहासांत स्त्रियांना खेळांत भाग घ्यायची प्रथमच परवानगी मिळाली. ब्रिटनच्या शार्लोट कूपर हिने लॉन टेनिस सिंगल्समधे पदक मिळवले, व ती ऑलिंपिक्समधली पहिली स्त्री विजेती ठरली.




अमेरिकेत सेंट लुईस येथल्या तिसऱ्या ऑलिंपिक्समधे मोठा वाद निर्माण झाला. अमेरिकेच्या मॅरथॉनच्या स्पर्धक फ्रेड लॉर्झ याने मधेच ट्रकमधून प्रवास केला. आणि तो रिंगणात पहिला आला. पंचांनी त्याच्यावर फसवणुकीचा आरोप केला. परंतु दुसऱ्या क्रमांकाच्या खेळाडू थॉमस हिक्सने औषधी पदार्थ सेवन केले होते. पंचांचा नाइलाज झाला. त्यांनी थॉमस हिक्सलाच विजेता म्हणून जाहीर केले.












## ऑलिंपिक प्रश्नावली



१. एका मिनिटाच्या आंत १०० मीटर पोहणारा पहिला जलतरणपटु कोण आहे?

२. ह्याने कांही क्षण काळ गोठवला आणि भावीकाळासाठी हा प्रसंग फिल्मवर चित्रित केला. ही घटना १९३६ सालीं बर्लिनमधें झालेल्या ऑलिंपिक सामन्यांच्या वेळची आहे. त्याचे श्रेय प्रथमच ऑलिंपिक्स मधें व्हि- डियो-रेकार्डिंग झाले. हा छायाचित्रकार कोण होता?

३. कोणत्या ऑस्ट्रेलियन स्पर्धकाने १५०० मीटर वेळेच्या आंत धांवून "मानवी मृग" ही पदवी मिळवली?

४. वयाच्या ६५ व्या वर्षी स्पर्धेत भाग घेऊन, सुवर्णपदक जिंकणारा व आपल्या देशाची शान वाढवणारा जुना स्पर्धक कोण होता?

५. भारतीय हॉकी संघ प्रथम केव्हां विजेता ठरला आणि ऑलिंपिक सुवर्णपदक प्रथम केव्हां हारला?

६. ऑलिंपिक ज्योत प्रज्वलित केली गेली. पहिल्या खेळाडूने धांवत येऊन ती मशाल दुसऱ्या खेळाडूकडे दिली. या सांखळीतला तिसरा खेळाडू ज्योत येण्याची वाट पहात बसला. परंतु त्याच्या दुर्दैवाने ज्योत घेऊन येणारा खेळाडू आलाच नाही. ऑलिंपिक्सच्या इतिहासांत प्रथमच मशाल चोरीला गेली होती. हे केव्हां घडले?

७. १९९६ च्या अटलांटा ऑलिंपिक्समधें विजेत्यांना दिलेली पदके पूर्वीच्या ऑलिंपिक्समधें दिलेल्या पदकांपेक्षां वेगळी होती. दोन्ही पदकांत कोणता फरक होता?

८. ऑलिंपिक्समधें मार्क स्पिट्झ कशाबद्दल प्रसिद्ध आहे?

९. उंच उडीचा २८ फुटांचा विक्रम मोठ्या डौलदारपणें मोडणारा तो पहिलाच कसरतपटु होता. त्याने पहिल्या वेळेसच २९ फूट २१/५ इंच उंच उडी मारली होती. त्याचे नांव काय?

१०. वैयक्तिक स्पर्धांत ऑलिंपिक पदक मिळवणारा एकमेव भारतीय स्पर्धक कोण आहे?

उत्तर

१. जॉनी वेसमुल्लर हा अमेरिकेचा स्पर्धक होता. पुढे तो चित्रपटांत 'टारझन' ची भूमिका करून प्रसिद्ध झाला.

२. लेनी राईनफेन्स्टाल.

३. १९६० सालीं रोमच्या सामन्यांत ऑस्ट्रेलियाच्या हर्ब ईलियटने १५०० मी. अंतर ३ मिनिटें व ३५.६ सेकंदात धावून पार केले.

४. स्वीडनचे नेमबाज ऑस्कर स्वान हे जवळजवळ ६५ वर्षांचे असताना त्यांनी वैयक्तिक "मानवी मृग" ही स्पर्धा जिंकली व आपल्या देशाला सांघिक अजिंक्यपद १९१२ साली स्टॉकहोमच्या ऑलिंपिक्समधे मिळवून दिले.

५. १९२८ साली ॲमस्टरडॅममधें भारतीय हॉकी संघाने पहिले सुवर्णपदक जिंकले. नंतर बरीच वर्षे सतत जिंकल्यानंतर १९६० सालीं रोममधे भारत प्रथमच सुवर्णपदक हरला.

६. [illegible] चोरीस गेली होती.

७. अटलांटा ऑलिंपिक्सच्या वेळीं विजेत्यांना दिलेल्या पदकांवर एका बाजूला ऑलिंपिक्सचे पांच वर्तुळांचे बोधचिन्ह होते. दुसऱ्या बाजूवर त्या विशिष्ट खेळाची माहिती देणारे बोधचित्र होते.

८. १९७२ च्या म्युनिक ऑलिंपिक्समधें मार्क स्पिट्झ याने पोहोण्याच्या स्पर्धांत सात सुवर्णपदकें जिंकली आणि ऑलिंपिक्सचे पूर्वीचे सात विक्रम मोडले.

९. मेक्सिको सिटीमधें १९६८ साली बॉब बीमन.

१०. नॉर्मन प्रिचर्ड. याने १९०० साली पॅरीसच्या ऑलिंपिक्समधें २०० मीटर्सच्या सामन्यांत रजतपदक मिळवले.



## चित्र प्रश्नोत्तरी










ही ऑलिंपिक स्पर्धांची चित्रे आहेत. तुम्ही या स्पर्धा ओळखूं शकता कां?

उत्तरांसाठी पुढचे पान पहा.

## योग्य जोडी

निरनिराळ्या देशांचे राष्ट्रध्वज ओळखण्यांत तुम्ही पटाईत आहात ना? छान ! मग खाली दिलेले ध्वज ओळखीचे आहेत कां? त्यासोबतची ऑलिंपिक सूचकचिन्हेही तुम्ही ओळखायला हवी हं! कोणत्या ऑलिंपिक्समधें ही चिन्हे दिसली होती? त्या देशाच्या राष्ट्रध्वजाबरोबर चिन्हांची जोडी जमवा पाहूं!









# मार्ग शोधा

अमितवर ऑलिंपिक ज्योत प्रज्वलित करण्याची महान कामगिरी सोंपवलेली आहे. पण मैदानांत प्रवेश केल्यानंतर तिथें निरनिराळ्या खेळांच्या स्पर्धा चालू आहेत, त्यामुळें तो अगदीच गोंधळून गेला आहे. या गडबडीतून मार्ग शोधायला तुम्ही त्याला मदत करूं शकाल कां?







## उत्तरें

**चित्र प्रश्नोत्तरी**

१. रिले रेस - स्पर्धकाच्या हातांतली काठी पहा ना!

२. जलद धांवणें

३. कसरत

४. उंच उडी

**योग्य जोडी**

१. वॉल्डी - कुत्रा - १९७६ मॉन्ट्रियाल, कॅनडा

२. कोबी - मांजर - १९९२ बार्सिलोना - स्पेन

३. होदोरी - चित्ता - १९८८ - सोल दक्षिण कोरिया

४. ऑली - कुकाबरा, मिली - एचिड्ना आणि सिड् - प्लॅटिपस ही २००० सिडनी ऑलिंपिक्सची सूचक चिन्हें आहेत.



# विसराळूपणा

एका गावात वासव नावाचा कांद्याचा व्यापार करणारा एक व्यापारी रहात होता. एक दिवस तो काही कामानिमित्त ग्रामाधिकाऱ्याला भेटायला गेला. वाटेत त्याने दोन माणसे जोरजोराने भांडत असलेली पाहिले. गांवातली बरीच माणसे त्यांचा हा तमाशा पहात उभी होती. वासवला अशी भांडणे पाहिली की त्यांच्या मध्यांत पडून त्यांची भांडणे मिटवण्याची भारी हौस होती. त्यामुळे त्याने जेव्हां हे भांडण पाहिले, तेव्हा तो लगेच गर्दीतून वाट-काढत भांडणाऱ्या माणसांजवळ गेला व त्यांना रागावत मोठ्या आवाजात म्हणाला, - "हे काय चाललंय तुमचं, रस्त्यावर येऊन मोठ्मोठ्याने कां एवढे भांडताय?"

भांडणाऱ्यातल्या एकाचे नाव रंगा व दुसऱ्याचे नाव मंगा असे होते. रंगा म्हणाला - "माझं आणि रंगाचं सासर एकाच गावात आहे. काही महिन्यापूर्वी माझ्या मेहुण्याने त्याला एक हजार रुपये उधार दिले व सांगितलं की हे रुपये मला परत कर म्हणून. पण मंगाने पैसे तर परत केले नाहीच, पण त्याविषयी एक शब्दसुद्धा तो माझ्याशी काही बोलला नाही. आत्ता जेव्हां दोन दिवसांपूर्वी माझ्या मेहुण्याने विचारले की मंगाने मी दिलेले एक हजार रुपये तुला परत केले की नाही, तेव्हा मला ही गोष्ट समजली. आता मी व्याजासकट पैसे मागत आहे आणि हा बेईमान पैसे द्यायलाच तयार नाही."

मंगा हात जोडून विनम्रपणे म्हणाला - "महोदय, हे खरं आहे की मी रंगाच्या मेहुण्याकडून एक हजार रुपये घेतले होते पण मी बेईमान नाही. सासरी-जाऊन आल्यावर घरच्या विविध कामात इतका गुंतून गेलो की रंगाला हे सांगायला विसरून गेलो. मी पैसे परत द्यायला नकार देत नाही, पण हा व्याजसुद्धा द्यायला हवं म्हणतोय. मी व्याजावर पैसे उधार घेतले नव्हते. त्यामुळे व्याज दे म्हणणे उचित नाही. पण, हो, मी सांगायला विसरलो म्हणून मला माफ करा, आणि एक हजार रुपये द्यायलाही मी तयार आहे."

"अरे वा रे, नुसतं विसरलो म्हणून सांगून काम नाही होणार! दहावीस रुपयांची गोष्ट असती तर हरकत नव्हती पण ही हजार रुपयांची गोष्ट आहे. नक्कीच यात कांहीतरी गडबड आहे." रंगा म्हणाला.

"एक हजार असोत की एक लाख. जेव्हा एखादी गोष्ट विसरून जाते, तेव्हां लाखों रुपयांचं नुकसान होतं.









या विसरण्याला नियम किंवा कायद्याने नियंत्रण घालता येतं कां?'' बासव म्हणाला.

त्यावर गर्दीतून कुणीतरी मोठ्याने आवाज दिला - ''हो, हो, शास्त्राद्वारे नियंत्रण घालता येतं.''

बासवने आवाजाच्या रोखाकडे एक तीक्ष्ण दृष्टी टाकून रंगाला म्हटले - ''विसराळूपणा हा मनुष्याचा एक स्वाभाविक दोष आहे. माझेच उदाहरण घ्या ना. आज सकाळी आंघोळ करताना गळ्यांतली सोन्याची सांखळी मी विहीरीच्या कट्टयावर ठेवली आणि नंतर ती घ्यायलाच विसरलो. आत्ता इथे रस्त्यांत आठवण झाली. त्याची किंमत दोन हजारपेक्षा जास्त आहे. जर मला आत्ता कुणी विचारलं की सांखळी कां विसरलास, तर मी काय उत्तर देऊ शकतो?'' बासव म्हणाला. मग त्याने रंगा आणि मंगाला समजावून त्यांच्यामधले भांडण आणि गैरसमज दूर करून टाकला, आणि तो आपल्या कामासाठी निघून गेला.

जेव्हां तो आपलं काम संपवून घरी परत आला, तेव्हां त्याच्या बायकोने त्याला विचारलं - ''तुमच्या गळ्यांतली सोन्याची सांखळी कुठे आहे?''

''सकाळी आंघोळ करताना विहीरीच्या कट्ट्यावर विसरून गेलो, तिथेच असेल.'' बासव म्हणाला.

''अहो, पण आत्ताच पंधरा मिनिटांपूर्वी कुणीतरी एक माणूस आला होता व तुम्हीच विहीरीच्या कट्ट्यावर विसरलेली सांखळी विचारली आहे म्हणून घेऊन गेला.'' त्याची बायको काळजीच्या सुरांत म्हणाली.

बासवला कळलं की गर्दीत उभ्या असलेल्या कुणीतरी चलाख माणसान आपण बोललेलं ऐकून त्याचा योग्य तो फायदा घेतला आहे. तो मनोमन अतिशय उदास झाला. त्याला वाटलं - मंगाच्या विसराळूपणामुळे रंगाचे जरासुद्धा नुकसान झालं नाही. पण माझ्या विसराळूपणामुळे मात्र माझंच आज दोन हजार रुपयांचं नुकसान झालं आहे.

त्याचवेळीं एक तरुण धावत त्याच्याजवळ आला व म्हणाला - ''साहेब, मी रंगाच्या नोकराचा मुलगा आहे. आपण खरोखरच गांवातली लहान मोठी भांडणं मिटवण्यास व गैरसमजुती दूर करण्यास योग्य आहात. आपण सर्वांसमोर आपल्या विसराळूपणाचा स्वीकार केलात. आपण खरोखरच आपली सोन्याची सांखळी विहीरीच्या कट्यावर विसरला आहात की काय, हे पाहण्यासाठी माझ्या मालकांनी मला आपल्या घरी पाठवलं, आणि मी आपल्या पत्नीला खोटं सांगून ती सांखळी घेऊनही गेलो. ही घ्या आपली सांखळी.'' असं म्हणून त्याने बासवच्या हातात त्याची सांखळी परत दिली व तो धावतपळत आपल्या घरी निघून गेला.



## ५५. दुर्योधनाचा शोक

# महाभारत

दुसऱ्या दिवशीं दुपारपर्यंत कौरवांच्या बाजूने अश्वत्थामा, कृप आणि शल्यानी पांडववीर धृष्टद्युम्न व अभिमन्यूशी युद्ध केले. त्यानंतर दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण व अभिमन्यू यांच्यात भयंकर द्वंद्वयुद्ध झाले. त्यांत लक्ष्मण पराभूत झाला. हे पाहून दुर्योधन व इतर कौरववीरांनी अभिमन्यूला घेरले. त्यांच्याशी अभिमन्यू निर्भयपणें लढत असताना अर्जुन त्याच्या मदतीला आला. भीष्म, द्रोण आदि महारथी पण आले. त्यावेळीं अर्जुनाशी लढणें कुणालाही शक्य झाले नाही. कारण प्रलयकालाप्रमाणें त्याने रुद्रावतार धारण केला व तो कौरव सैन्याचा नाश करुं लागला. कौरव सेनेंतले कित्येक शूरवीर मारले गेले, कांही पळून जाऊं लागले.

त्यावेळीं भीष्मांनी द्रोणाचार्यास म्हटले, ''अशा रितीने युद्ध करताना, अर्जुनाच्या पुढें कुणीच टिकूं शकणार नाही. त्याला भिऊन पळणारे आपले सैन्य परत येण्याची शक्यता नाही. शिवाय सूर्यास्त होऊं लागला आहे. तेव्हां आजचे युद्ध आत्ताच समाप्त करणें आपल्या हिताचे ठरेल.''

तिसऱ्या दिवशीं सकाळीं कौरवसेना गरुडव्यूहांत आणि पांडवसेना अर्धचंद्रव्यूहांत





कुरुक्षेत्राच्या मैदानांत युद्धासाठीं सज्ज होत्या. युद्धाला सुरवात होताच दुर्योधनाने आपली रथसेना बरोबर घेऊन घटोत्कचाशी सामना केला. पांडवांचे योद्धे भीष्म व द्रोणाशी लढूं लागले. अभिमन्यू व सात्यकीने शकुनीशी सामना केला. अर्जुन रथांतल्या वीरांना कंठस्नान घालूं लागला. अशाच प्रकारे भीष्म व द्रोण पांडवांच्या सैन्याचा नाश करुं लागले. पण भीम व घटोत्कचाने मिळून कौरवसेनेला पळवून लावले. त्या सेनेला परत रणांगणात आणणें भीष्म व द्रोणांनाही जमले नाही. परंतु हे काम दुर्योधनाने एकट्याने केले. दुर्योधन सैन्य घेऊन आलेला पाहून पळणारे सैनिक लाजेने थांबले व पुन्हां युद्ध करण्यास परत मैदानांत आले.

तेव्हां दुर्योधन भीष्माजवळ आला व अतिशय तीक्ष्ण व कठोर शब्दांत म्हणाला, "पितामह, आपण रणभूमीवर असताना आपले सैन्य हतबल होऊन पळून जाते हे आपल्याला किती अपमानास्पद आहे! जर पांडवांच्याबद्दल इतकी दया व सहानुभूती आपल्याला वाटते आहे, तर युद्ध सुरुं होण्यापूर्वीच आपण सांगायचंत कीं मी पांडव, सात्यकी आणि धृष्टद्युम्न, यांच्याबरोबर लढणार नाही. आपण सर्व आपल्या पराक्रमाला साजेसे युद्ध करणार नसाल तर माझे काय होईल? आपल्या सर्वांच्या शौर्यावर अवलंबून मी या महाभारत युद्धाला तयार झालो होतो. ही गोष्ट आपण सदैव लक्षांत ठेवा."

भीष्म रागावले होते तरीही त्याला हंसत बोलले, "मी कितीतरी वेळां तुला सांगितलेले आहे, की पांडवांना हरवणें इंद्र आणि देवतांना शक्य नाही. मी म्हातारा झालो आहे, तरी मी माझी शक्ति पणाला लावून लढतो आहे. मी कसा लढतो ते तूं आणि तुझे कैवारी, तुम्ही सारे बघाच!

युद्धांत पांडवांचा हात उंच आहे ते बघून भीष्म संतापले व अत्यंत निकराने लढूं लागले. दुर्योधनाची सारी सेना त्यांच्याबरोबर होती. त्यादिवशी भीष्मांसमोर येणारा कोणताही योद्धा घायाळ झाल्याशिवाय राहिला नाही. पांडवांचे सैन्य अनेक भागांत विखुरले. कृष्ण आणि अर्जुनदेखील भीष्मांना थांबवूं शकले नाहीत.

उधळलेल्या जनावरांप्रमाणें सैरावैरा पळणाऱ्या सैनिकांना पाहून कृष्ण अर्जुनास म्हणाला, "आता तुझा प्रताप दाखव. तूं मला वचन दिले होतेस की तुझ्यासमोर जो कोणी कौरव येईल, त्या सर्वांना तूं ठार मारशील. भीष्मांना पाहून जणूं आपल्यासमोर साक्षात काळ आपण पाहात आहोत, असे समजून सारे योद्धे भिऊन पळत सुटले आहेत."

"कृष्णा, भीष्मांच्या समोर आपला रथ ने त्या वृद्धाला आता शेवटचा श्वास घ्यायला लावतोच" अर्जुन म्हणाला. कृष्णाने त्याप्रमाणें केले.

भीष्मावर नजर पडताच अर्जुनाने एका बाणाने त्यांच्या हातांतील धनुष्यच तोडून टाकले. त्याबद्दल भीष्माने अर्जुनाचे कौतुक केले व दुसरें धनुष्य हातांत घेऊन युद्धासाठी त्याला ललकारले. दोघांच्यात भीषण युद्ध झाले, तरीदेखील कृष्णाला वाटले की अर्जुन मनापासून लढत नाही आहे. म्हणून कृष्णाने मनांत विचार केला, "भीष्माबद्दल जर अर्जुन असा आदर दाखवतो आहे तर युधिष्ठिराच्या सेनेचा नाश होण्यास वेळ लागणार नाही. मलाच कवच धारण करून, भीष्माचा वध करण्याचे पांडवांचे कार्य सफल करावे लागेल."

इतक्यांत कौरवांच्या शेंकडों सैनिकांनी येऊन अर्जुनाला वेढा घातला. त्या परिस्थितींत सात्यकी अर्जुनाच्या मदतीस आला. पळणाऱ्या सैनिकांना त्याने आवेशाने आदेश देऊन थांबविले. तेव्हां कृष्ण सात्यकीस म्हणाला, "सात्यकी, जे पळून जात आहेत, त्यांना जाऊं दे. मी आज या भीष्म, द्रोण आणि बाकी कौरव योद्ध्यांना आपल्या चक्रायुधाने ठार करून युधिष्ठिराचा राज्याभिषेक करीन."

असं म्हणून कृष्णाने आपले चक्र खांद्यावर घेतले. हातांत धरलेले घोड्याचे लगाम सोडून देऊन तो खाली उतरला. चक्र घेऊन आपल्यावर





हल्ला करण्यासाठी येणाऱ्या कृष्णाला भीष्मांनी शांत स्वरांत म्हटलं, "ये कृष्णा, तुझ्या हातून मरण आलं तर मी त्यांत माझं यश व माझा सत्कारच झाला आहे असं मानीन."

तेव्हां कृष्णाने भीष्माच्या जवळ येऊन म्हटले, "प्रजेच्या नाशाला तुम्ही कारण आहात. द्यूत खेळण्यापासून तुम्ही दुर्योधनाला परावृत्त केले नाहीत. आणि आता त्याचे रक्षण करण्यास तयार झालात? जो वंश तुमची आज्ञा ऐकत नव्हता व द्रोही होता, तर तुम्ही त्यावेळेस त्याचा त्याग कां केला नाहीत?"

"राजा म्हणजे परम देवता असतो." भीष्माने उत्तर दिले.

"कां? यादवांनी कंसाला नाही सोडलं? ज्याची बुद्धी उलटा विचार करते, त्यांचा विनाश निश्चित होतो." कृष्ण म्हणाला.

तेवढ्यांत अर्जुन आपल्या रथांतून उतरुन आला आणि कृष्णाला घट्ट धरुन म्हणाला, "कृष्णा, शांत हो! तुझ्याशिवाय पांडवांचा रक्षणकर्ता कोण आहे? मी जी प्रतिज्ञा केली आहे. त्याचं मी अवश्य पालन करीन. मी आपले आप्त व मित्रांच्यासमोर शपथ घेऊन सांगतो की, मी साऱ्या कौरवांचा नाश करीन." हे बोलणें ऐकून कृष्ण संतुष्ट झाला व रथावर आरूढ झाला. त्याने घोड्याचे लगाम हातांत घेतले व शंखध्वनी केला. लगेच अर्जुनाने युद्धास सुरवात केली. भीष्म, भूरिश्रवा, शकुनि वगैरे कौरव योद्धे अर्जुनाबरोबर लढूं लागले.

अर्जुनाच्या बाणांनी कौरव योद्धयांचे रथ मोडले, हत्ती आणि घोडे जखमी झाले. सर्व कौरव योद्धे घायाळ होऊन पडले.

लौकरच विराट, द्रुपद वगैरे अर्जुनाच्या मदतीस येऊन पोंचले. सारी युद्धभूमी प्रेतांनी भरुन गेली. रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या. पांडवांनी विजय घोष केले. अर्जुनाने ऐंद्रास्त्राचा प्रयोग केला. त्यामुळें भीष्म, द्रोण, दुर्योधन वगैरे परत फिरले आणि कौरवसेना विस्कळीत झाली.

त्यादिवशीं अर्जुनाने आपला अद्भुत पराक्रम दाखवला. कौरव योद्ध्यांना मोठाच पराभव पत्करावा लागला. दिवसभराचे युद्ध संपवून युधिष्ठिर आपल्या शिबिरांत परत गेला.

चौथ्या दिवशीं पहाटे कौरव सेनेचे महासेनापती भीष्म अतिशय चिडून युद्धासाठी तयार झाले. त्यांच्या पाठोपाठ द्रोण, दुर्योधन, वाल्हिक वगैरे वीर चालूं लागले. त्या दिवशीं





पांडव सेनेच्या अग्रभागीं अर्जुन उभा होता.

युद्धाला प्रारंभ होताच भीष्म आणि अर्जुनाचे युद्ध सुरुं झाले. द्रोण, कृप, शल्य, विविंशती, दुर्योधन व आणखी कांहीजण अर्जुनावर तुटून पडले. अर्जुन व अभिमन्यूच्या मदतीला धृष्टद्युम्न येऊन पोंचला. त्यानंतर जे युद्ध झालं त्यांत सांयम नांवाच्या योद्धयाचा पुत्र धृष्टद्युम्नाने मारला.

त्यावेळेला शल्याने धृष्टद्युम्नावर हल्ला केला. दोघांच्यात दोन प्रहर घनघोर लढाई चालली होती. तितक्यांत अभिमन्यू शल्यावर तुटून पडला. शल्याचे रक्षण करण्यासाठी दुर्योधन, दु:शासन, दुर्मर्षण, दु:सह, दुर्मुख, चित्रसेन इत्यादि कौरवांनी अभिमन्यूला घेरले. तेव्हां भीम, धृष्टद्युम्न, उपपांडव, नकुल, सहदेव, अभिमन्यू वगैरे दहा लोकांनी दुर्योधनादि दहाजणांशी युद्ध केले.

त्या युद्धांत भीम गदा घेऊन शल्यावर धांवून गेला. हे पाहून दुर्योधनाने गजसेनेला पुढें ठेवले व भीमाशी लढायला सुरवात केली. भीम गदा घेऊन गर्जत रथावरुन खाली उतरला आणि हत्तींना गदेने धडाधड मारुं लागला. इतर नऊ पांडवांनी भीमाचे पाठीमागे राहून त्याचे रक्षण केले. त्या युद्धांत अनेक गजयोद्धे मारले गेले. ही सेना मगध राजाची होती. तेव्हां मागधने ऐरावतासारख्या हत्तीवर स्वार होऊन अभिमन्यूच्या रथाच्याकडे मोर्चा वळवला. परंतु अभिमन्यूने त्या हत्तीला व मागधलाही अचूक बाण मारुन ठार केले. त्यानंतर भीमाच्या गदेच्या प्रहारांना हत्ती घाबरुन परत वळले व पळूं लागले. त्यांच्या पायाखाली कौरवसैनिक तुडवले गेले. तेव्हां भीमाचा वध करण्यासाठीं आलेले कौरव वीर आणि भीमाच्या रक्षणासाठीं आलेले पांडववीर यांच्यात घनघोर युद्ध झाले. हे युद्ध पाहून कुणीही भयभीत झाला असता.

पांडववीरांमधें सर्वांत अधिक शौर्य दाखवून युद्धांत अनेक कौरवांचा संहार करणारा वीर सात्यकी होता. त्याच्याशी सामना करण्यास प्रत्येकजण बिचकत होता. अशा परिस्थितींत भूरिश्रवाने त्याच्याशी सामना केला. मण सात्यकीने त्यालाही जखमी करुन पळवून लावले.

त्यावेळेस दोन्ही पक्षांच्या योध्द्यांमधे जे युद्ध झालें, त्यांत भीमाने मुख्य कामगिरी बजावली. लढतांना धृतराष्ट्राचे पुत्र सुषेण,

जलसंध, वीरबाहु, भीमरथ आणि सुलोचन यांना ओळीने ठार मारले. हे भीषण दृश्य पाहून धृतराष्ट्राचे इतर पुत्र पळून गेले.

हे दृश्य पाहाताच भीष्मांनी भीमाला घेरण्याची आज्ञा आपल्या महारथींना दिली. त्यांच्यापैकी नरकासुराचा पुत्र भगदत्त, एका माजलेल्या हत्तीवर स्वार होऊन भीमावर चालून आला. तेव्हां अभिमन्यू वगैरेंनी भगदत्तावर आणि त्याच्या हत्तीवर बाणांचा वर्षाव केला. भगदत्ताने आपला घायाळ हत्ती पांडवसैन्यांत सोडला आणि भीमाला एका खास बाणाने बेहोष केले.

हे पाहून घटोत्कचाला राग आला. तोही दुसऱ्या एका माजलेला हत्तीवर स्वार होऊन भगदत्ताशी लढूं लागला. त्या दोघांचे युद्ध महाभयंकर होते. भगदत्ताचा मृत्यू आता जवळ आला आहे हे कौरवाना समजून चुकलं. म्हणून त्याच्या मदतीला द्रोण, दुर्योधन व इतर अनेक योद्धे आले. इकडे घटोत्कचाच्या मदतीला देखील पांडवांचे कित्येक योद्धे येऊन पोंचले.

घटोत्कचाचे युद्ध-कौशल व पराक्रम पाहून भीष्मांनी द्रोणाला सांगितलें, "हा वीर बालक किती अद्भुत आणि असाधारण पराक्रम दाखवतो आहे! त्याच्या रक्षणासाठी देखील अनेक पांडव योद्धे उभे आहेत. आपले सैनिक आता थकले आहेत. म्हणून आजचे युद्ध आता थांबवूं या!"

ही गोष्ट सर्वांना पसंत पडली. म्हणून सर्व वीरयोद्धे मोठ्या शिताफीने घटोत्कचाच्या समोरुन निसटले. आणि रणभूमींतून जाऊं लागले. तेव्हां पांडवांनी शंखनाद केला व भीम आणि घटोत्कचाची प्रशंसा करीत ते आपल्या शिबिरांत परतले. सगळेपण तिथून गेल्यानंतर दुर्योधन आपल्या भावांच्या मृत्यूबद्दल शोकाकुल झाला.

संजयच्या मुखातून युद्धाचे हे सविस्तर समालोचन ऐकल्यानंतर धृतराष्ट्र म्हणाला, "संजय, या युद्धांत काय होणार आहे, याचा विचारही भीतीप्रद आहे. माझ्या मुलांचा पराभव किंवा त्यांच्या मृत्यूसंबंधी मला कांही एक ऐकण्याची इच्छा नाही. कांहीतरी असा उपाय सुचव की त्यापायीं पांडवांचा नाश होईल आणि माझे पुत्र जिवंत राहातील.





# काळी गाय

खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. एका गावात जसवंत नावाचा एक शेतकरी रहात होता. जसवंत स्वभावाने खूप लालची, स्वार्थी व निर्दयी होता. त्याच्याजवळ एक काळी गाय होती. त्या गाईने एका सुंदर वासराला जन्म दिला. वासराला पाहून जसवंत खूप आनंदी झाला पण लोभी स्वभावामुळें तो वासराला गाईचे दूध प्यायला देत नसे. बिचारी गाय आपल्या छोट्याशा वासराला आसुसल्या नजरेने पाहात राही आणि जसवंत दूध सगळें घेऊन जाई. कांही दिवसांतच वासरूं मेले. जसवंत गायीचे दूध काढी पण गाईला चारा नीट देत नसे, उलट तिला शेतावर सोडून द्यायचा. गाय संध्याकाळपर्यंत शेतावर चरायची व मग घरी परतायची.

एक दिवस जसवंतची गाय संध्याकाळी घरी आली नाही. रात्र झाली तरी गाईचा पत्ता नव्हता. जसवंत गांवच्या मुखियाला भेटायला गेला, कारण हरवलेल्या गाईंना शोधून काढण्याची जबाबदारी मुखियाची होती. जसवंतने मुखियाला सांगितले की त्याची काळी गाय हरवली आहे. दुसऱ्या दिवशी मुखियाने गाईला शोधायला आपली माणसे पाठवली. व संध्याकाळी ते एक काळी गाय घेऊन आले.

"ही तुझीच गाय आहे कां?" मुखियाने जसवंतला विचारले. मिळालेली गाय जसवंतची नव्हती हे जसवंत गाईला पाहताच समजला होता, कारण त्याची गाय खूप बारीक व तिची हाडन् हाडं दिसायची. आणि समोर तर ताजीतवानी, गलेलठ्ठ सुंदर गाय! ती पाहून लोभी मनाचा जसवंत म्हणाला - "होय, हीच माझी गाय आहे." मुखियाची परवानगी घेऊन जसवंत गाईला घेऊन आपल्या घरीं गेला. तो मनांतल्या मनांत अतिशय खुष होता. पण त्याचा हा आनंद फार काळ टिकला नाही. घरी येताच त्याला कळले की ही गाय दूध देणारी नाही. आपण केलेल्या चुकीचा त्याला खूप पश्चात्ताप झाला. पण तो समजून होता की आत्ता कांहीही करता येणार नाही. कारण तो स्वतःच मुखियाजवळ ही आपली गाय म्हणून सांगून घेऊन आला होता. उपाय नसल्याने त्यांने त्या गाईला आपल्या घरी बांधून ठेवले, पण तिला खायला प्यायला काही दिले नाही. हळूंहळूं चारा नसल्यामुळे गाय बारीक होऊन अशक्त झाली.

आलोक तिवारी

खरे तर चांगली गलेलठ्ठ असलेली जी गाय जसवंत घरी घेऊन आला होता ती रणधीर नांवाच्या दुसऱ्या एका शेतकऱ्याची होती. दोन दिवस आपली गाय घरी न आलेली पाहून रणधीरने मुखियाजवळ तक्रार केली की त्याची गाय घरी आलेली नाही.

मुखियाने आपल्या नोकरांना हुकूम दिला की रणधीरची गाय शोधून आणा. नोकर गायीला शोधायला निघाले. शेवटी त्यांना गावाच्या हद्दीजवळ जसवंतची गाय दिसली. नोकर तिला घेऊन मुखियाजवळ आले.

"ही गाय तुझीच आहे का?" मुखियाने रणधीरला विचारले. रणधीरने पाहिले की गाय खूप अशक्त आहे पण दूध देणारी आहे. त्याने मनांत विचार केला की जरा या गाईची देखभाल केली व चांगले खायला प्यायला दिले तर ही भरपूर दूध देईल. असा विचार करून तो मुखियाला म्हणाला - "होय, ही माझीच गाय आहे."

मुखियाने गाय घरी घेऊन जायला त्याला परवानगी दिली. आपल्या घरी गेल्यानंतर रणधीरने अशक्त गाईची खूप सेवा केली. तिला चांगलं खायला प्यायला दिलं आणि प्रेमाने तिची देखभाल केली. कांही दिवसांत गाईचं रूपच बदलून गेलं. ती फक्त सुदृढच नव्हे तर दूध ही पूर्वी पेक्षा खूप जास्त देऊ लागली. आपल्या प्रेमळ मालकाचे प्रेम घेऊन ती सदैव प्रसन्न असे.

तिकडे जसवंतजवळ जी रणधीरची गाय होती, ती योग्य चारापणी नसल्याने अगदी वाळून गेली.

आणखी कांही दिवस असेच निघून गेले. मग एक दिवस जसवंतला कळले की त्याची दूध देणारी गाय रणधीरच्या घरी आहे. त्वरित तो रणधीरच्या घरी गेला व म्हणाला - "आपल्या गाई बदलल्या आहेत. चुकून माझी दूध देणारी तुझ्याकडे, व तुझी दूध न देणारी गाय माझ्याकडे आली आहे. तूं मला माझी गाय परत दे व तुझी गाय घेऊन जा."

"ही गाय मला मुखियाने दिली आहे. तुला जे














काही सांगायचे असेल ते मुखियाला जाऊन सांग," रणधीरने लगेच उत्तर दिले.

जसवंतने मुखियाजवळ जाऊन विनवणी केली की - "चुकून आमच्या गायी बदलल्या आहेत. माझी चूक लक्षांत आल्याबरोबर मी आपल्याकडे आलोय. कृपा करून न्याय द्या व माझी गाय मला परत मिळवून द्या."

मुखियाने दोन्ही गाईंना घेऊन यायाला सांगून रणधीरला विचारले - "जसवंतचं म्हणणं खरे आहे का?"

त्यावर रणधीर म्हणाला - "त्याचं म्हणणं खरं असूं शकेल. पण जसवंतजवळ जी गाय आहे ती अतिशय वाळून गेली आहे, तेच त्याची अशक्त असलेली गाय मी भरपूर खायलाप्यायला देऊन सुदृढ केली आहे. जर जसवंत त्या वाळून गेलेल्या गाईला धष्टपुष्ट करत असेल तर मी गाय बदलायला तयार आहे.

रणधीरचे म्हणणे खरे असल्याने मुखियाने जसवंतला एक महिन्याचा अवधी दिला व सांगितले की त्या अवधीत रणधीरच्या गाईला बलवान कर. उपाय नसल्याने जसवंत रणधीरच्या गाईला घेऊन परत घरी गेला. एक महिनाभर त्याने रणधीरच्या गाईला खूप खाऊंपिऊं दिले व चांगली सुदृढ बनवले. व पुन्हा मुखियाजवळ घेऊन आला. रणधीर पण जसवंतच्या गाईला घेऊन आला होता.

"आता तुम्ही आपआपल्या गाईंना घेऊन जाऊं शकतां." मुखियाने जसवंतला म्हटले. ते ऐकून जसवंत आपली गाय घ्यायला पुढे झाला. पण गाय जागची हलेना. जसवंतने पुन्हा प्रयत्न केला पण गाय कांही टीचभरही हलली नाही. ते पाहून जसवंतला अतिशय राग आला व रागाने त्याने गाईला काठीने जोराने मारले. त्यावर त्याच्या गाईने, जी आता योग्य देखभालीमुळे धष्टपुष्ट झाली होती, आक्रमक रूप धारण केले व शिंगाने त्याच्यावर वार केला. जसवंतला आश्चर्याचा धक्का बसला.

तेव्हा मुखियाने निर्णय घेतला व म्हटले - "जसवंत, ही गाय तुझ्याबरोबर जायला तयार नाही. ही गाय तुझीच असेल पण ती तुला आपला मालक मानायला तयार नाही. तू तिला योग्य चारा पाणी न दिल्याने अन्याय केला आहेस. एका महिन्यापासून तू रणधीरच्या गाईची योग्य देखरेख करत आहेस. कदाचित् ती तुझ्याबरोबर यायला तयार होईल. पुढे सुद्धा तिची चांगली काळजी घे. तिला वासरूं झाल्यावर तुला पण खूप दूध मिळेल. त्यामुळें आत्ता तू त्या गाईलाच आपल्याबरोबर घेऊन जा."





# चांदोबा

## भारताचा शोध - प्रश्नोत्तरी

खाली दिलेल्या प्रश्नांची उत्तरें पुढच्या अंकात दिली जातील.
तोपर्यंत तुम्ही स्वतः ही उत्तरें शोधून काढा, आणि आपल्या परंपरेचा परिचय करुन घ्या.

1



१. अ. पृथ्वी सूर्याभोवती फिरते हे कोपर्निकसच्या पूर्वी, एक हजार वर्षे अगोदर सांगणारा भारतीय वैज्ञानिक कोण होता?

आ. या स्थानी शिवलिंग कधी प्रकट होते किंवा कधी अदृश्य असते. भारतांतले हे स्थान कोणते आहे?

इ. प्राचीन भारतीय साहित्यांत एका बालकाने मृत्यूनंतर आपली चेतना कुठे जाते ते ज्ञान यमराजाकडून मिळवले. हा बालक कोण?

ई. एका राजाने एक नवा धर्म चालू केला. पण तो धर्म फारसा लोकप्रिय झाला नाही. हा राजा कोण?

2

पूर्वीच्या काळीं, अनेक ऋषि जंगलात राहात असत. त्यांच्या मुलांपैकी एक तरुण व एका तरुणीचा लवकरच विवाह होणार होता. परंतु एके दिवशीं ती तरुणी सर्पदंशाने मरण पावली. तो तरुण शोकांत बुडाला. प्रेमदेवतेच्या मदतीने तो मृत्यूलोकांत गेला, व त्याने आपल्या प्रेमिकेला शोधून काढले. मृत्यूदेवता त्याच्यावर प्रसन्न झाली. त्यातरुणाच्या उरलेल्या आयुष्यापैकी अर्धे जीवन त्याच्या प्रेमिकेला देऊन, प्रेमदेवतेने तिला पुन्हां जिवंत केले. त्या तरुणीला जीवन मिळाले. या युवकाचे व युवतीचे नांव काय?





वैदीश्वरन कोईल (मंदिर) हे कावेरीच्या कांठावर वसलेले एक छोटेसे गांव आहे. त्यांत एकच मुख्य रस्ता आहे, तिथें शिवाचे जुने मंदिर उभे आहे. या मंदिरात शिवाला औषधोपचारांचा देव म्हणून पूजतात. अर्थातच, इथल्या वैद्यांचा वैद्यही शिवभगवान आहे. इथले मंदिर तामीळनाड-मधल्या इतर मंदिरांप्रमाणेच आहे. परंतु इथल्या देवळाची




कावेरीच्या कांठी

## यात्रेचा शेवटचा टप्पा

कहानी : जयंती महालिंगम ❊ चित्रण : गौतम सेन

एक विशेष प्रसिद्धी आहे. हे मंदिर अगस्तीनाडी ज्योतिषी पाहाणाऱ्या ज्योतिषांसाठीं स्वर्ग आहे. इथले ज्योतिषी सांगतात की त्यांच्याजवळ अशी प्राचीन ताडपत्रें आहेत की, त्यावर प्रत्येक व्यक्तीचे भूत, वर्तमान व भविष्य लिहीलेले आहे. ही भविष्यवाणी हजारों वर्षांपूर्वी अगस्ती ऋषीकडून लिहीली गेली होती असं मानतात. वैदीश्वरन मंदिरात असे अनेक ज्योतिषी आहेत. भविष्य सांगण्याचा त्यांचा एक पारंपारिक नियम आहे. ज्योतिषी प्रथम तुमच्या आंगठ्याचा ठसा घेतात, नंतर आंत जाऊन त्यांच्याजवळ असलेल्या ताड-पत्र्यांच्या थप्प्यांतून एक ताडपत्र काढतात. एकदोन तासानंतर परत येऊन तुमचा परिवार, व्यापार, भूतकाळांत घडलेल्या घटनांसंबंधी सांगतात. कांही लोकांच्या मते हे लबाड लोक आहेत. पण बहुतेक जास्त लोक या विधेवर व या भविष्यकथनावर पूर्ण विश्वास ठेवतात.

वैदीश्वरन कोईल आणि चिदंबरम यांच्यामधे तामीळनाडचे एक प्रसिद्ध शैव संत तिरुज्ञानन संबंधर यांचे जन्मस्थान आहे. सिरकाई गांवदेखील तिथे जन्मलेल्या संगीतकारांच्यावरुन प्रसिद्ध झाले आहे. संबंधरच्या बाबतीत असं सांगतात की त्यांनी तीन वर्षांच्या बालवयांतच अकरा कडव्यांचे तामीळ गाणें गाऊन दाखवले होते.



चिदंबरमचे नटराज मंदिर



चिदंबरममधे शिवाचे दर्शन करण्याची नंदनारची इच्छा होती.

कावेरीची उत्तरेकडची शाखा कोलेरुन किंवा कोल्लिडम हिच्या मुखावर चिदंबरम गांव वसले आहे. इथल्या सुप्रसिद्ध नटराज मंदिरात आकाशलिंगाची स्थापना झालेली आहे. आकाश हे पंचमहाभूतांपैकी एक तत्व आहे. इथे शिवभगवानाची आनंदतांडव करणारी मूर्ती पुजली जाते. या मूर्तीमधे शिवभगवानाचा डावा पाय हवेंत उचललेला आहे. पुराणकथेनुसार याच जागी एकदा शिव व पार्वती या दोघांत नृत्यस्पर्धा झाली. शिवाच्या सर्व मुद्रांना पार्वती प्रति उत्तर देत जात होती. यामुळें दोघांच्यात श्रेष्ठ कोण हे ठरवता येईना. पण शेवटी शिवभगवानाने आपला एक पाय उचलला आणि खांद्यावर ठेवला. स्त्रीसुलभ संकोचाने आणि शिष्टाचाराला अनुसरुन पार्वतीने तसे केले नाही. तिने आपला पराजय स्वीकारुन मान खाली घातली.

दार्शनिक विचारांच्या आधारे, शिवभगवानाचे नृत्य हे एकात्मतेचे प्रतीक, अस्तित्वाची गती आणि सृजन व विनाशाची सनातन प्रक्रिया आहे. या मंदिराच्या आठ विशाल गोपुरांच्या दोन्ही बाजूला भरतनाट्यमच्या निरनिराळ्या १०८ मुद्रा कोरलेल्या आहेत.

हे मंदिर केव्हां बांधलं गेलं याला निश्चित असा कांही पुरावा नाही. नटराजाला आपला संरक्षक देव मानणाऱ्या चोल राजांनी या मंदिराचे छत सोन्याने मढवले आहे. पांड्य व नायक राजांनीदेखील वेळोवेळीं या मंदिराला धन अर्पण केले आहे. आणि मंदिराच्या निर्मितीस सहाय्य केलेलं आहे.

चिदंबरम मंदिराशी एका महानायकाचं, नंदनारचं नांव जोडलेलं आहे. ते सेक्कियार आणि गोपालकृष्ण भारती (नंदन चरित्रम) या नांवांनी अमर झाले. नंदनार खरोखरीच चिखलांत सांपडलेल्या अनमोल रत्नाप्रमाणें होते. ते अस्पृश्य होते. त्यांची जात हीन होती. ते ढोल वाजवत असत. परंतु लहानपणापासूनच त्यांच्या मनांत शिवाबद्दल अतूट नि अपार भक्ती होती. जेव्हां त्यांच्या वयाची इतर लहान मुले मातीची खेळणीं बनवत होती, तेव्हां ते मातीचे शिवलिंग बनवून त्याची पूजा करीत होते. त्यांना तिल्लै किंवा चिदंबरमच्या नटराज मंदिराचं दर्शन करण्याची उत्कट इच्छा होती. ''मी उद्या तिल्लैला जातो आहे'' असं ते नेहमीं इतरांना व स्वतःलाच बजावून सांगत. वरीच वर्षे ते असं सांगत. तेव्हां त्यांचं खरं नांव बाजूला पडलं. लोकांत ते आता ''नालई पोवान (उद्यां जाणार आहे तो) या नांवाने ओळखले जाऊं लागले. शेवटीं ते फारच अधीर झाले आणि चिदंबरमच्या



रस्त्याला लागले. पण आपल्या हीन जातीचा विचार त्यांच्या मनात आला. नगराच्या बाहेर शीवेवर ते जेव्हां उभे राहिले तेव्हां ते भीतीने कांपायला लागले. बरेच दिवस ते नगरांत हिंडत फिरत होते. पण मंदिरांत जाण्याचं धैर्य कांही त्यांना होईना. एका रात्री त्यांच्या मनांत विचार आला की त्यांचे आराध्यदैवत आणि ते, ह्यांच्यामधे केवळ त्यांची छोटी जात आडवी येत आहे. नाहीतर त्यांना शिवभगवानाचे दर्शन लौकर घेता आले असते. विचार करता करता त्यांना झोंप लागली, त्या रात्रीं त्यांच्या स्वप्नांत शिवभगवान आले, आणि त्यांनी नंदनारना सांगितले की, तूं मंदिराकडे जायला लाग. त्याच रात्रीं भगवान शिव मंदिराच्या पुजाऱ्याच्या स्वप्नांत आले आणि त्याला आदेश दिला की उद्यां माझा एक महान भक्त मंदिरात येणार आहे. त्याच्या स्वागताची तयारी ठेवा. भगवान शिवाची पूजा करण्यासाठी नंदनार कनकसभेंत पोंचले. तिथले ब्राह्मण त्यांच्याकडे डोळे विस्फारुन पाहायला लागले, तोंच महान शिवभक्त नालईप्पोवान आपल्या आराध्यदैवताच्या मूर्तीत विलीन झाले.

कोडगुपासून ७६५ किलोमीटरचा प्रवास करीत येणारी कावेरी नदी, पुंपुहार नांवाच्या स्थानीं एका लहान धारेच्या रुपांत बंगालच्या उपसागराला मिळते.

पुंपुहार हे प्राचीन चोल साम्राज्याचे कावेरीपुंपट्टीनम नांवाचे बंदरगांव होते. युनानी भूगोलशास्त्रज्ञ टॉलेमी, याच्या म्हणण्यानुसार हे पौराणिक कथांत वर्णन केलेले कावेरीचे प्रमुख व्यापारी केंद्र होते.

दुसऱ्या शतकाच्या अखेरपर्यंत हे बंदर व शहर भरभराटीस आलेले होते. इथून रोमशी व्यापार केला जात होता. नंतर याचा बराच भाग समुद्रांत बुडाला.

नंतर कांही पुरातत्ववेत्यांना उत्खनन करताना, विटांची एक संपूर्ण व एक फुटकी भिंत मिळाली, त्यांच्या अंदाजाने ती भिंत इ.पू. तिसरे शतक ते ई.पू. दुसरे शतक, या दरम्यानच्या संगमकाळांतली आहे; पुंपुहारच्या आसपास केलेल्या उत्खननांत भाजलेल्या मातीची भांडी, गोल घाटदार विहीरी, रोमन नाणी, विटा, दगडचुन्याचे स्तंभ आणि लाल व काळ्या मातीच्या भांड्यांची खापरें मिळाली आहेत. पल्लावनीश्वरमच्या जवळच खणताना एक चांगल्यापैकी बुद्ध विहारदेखील सांपडला आहे.

१९७० मधें पुंपुहारमधें एक सुंदर, सातमजली, शिलापडिकारम कला संग्रहालय बांधले आहे. त्यांत इळंगो आडिगलचे महाकाव्य शिलपडिकारम (नुपूर) यांतली चित्रें कोरलेली आहेत. चेर राजकुमार इलंगोने पुंपुहारामधें राहाणारे एक समृद्ध दांपत्य कण्णगि व कोवलन यांची भावपूर्ण



चिदंबरम मंदिराचे प्रमुख दैवत, नटराज



कण्णगिने आपला नुपूर तोडून त्यांत मणी होते ते दाखवले.

कथा यामधे लिहीलेली आहे. कोवलन हा राजनर्तकी माधवीच्या प्रेमांत पडला आणि आपला वेळ व पैसा तिच्यासाठी खर्च करीत राहिला. आपला पती आपल्याकडे परत यावा म्हणून उपेक्षिता कण्णगि प्रार्थना करीत होती. कांही काळानंतर तिच्या प्रार्थनेला यश आले. कोवलनला आपल्या मूर्खपणाचा पश्चात्ताप झाला. तो कंगाल होऊन घरी परत आला. आपले नशीब नव्या ठिकाणी आजमावयाचे म्हणून या पतीपत्नीने मदुरेला जायचे ठरवले. कावेरीच्या बरोबर केलेल्या या यात्रेचे फारच मनोहर वर्णन इळंगोने केलेले आहे. मदुरेला पोंचल्यानंतर कण्णगिच्या पायांतला एक नुपूर कोवलनने सोनाराला विकला. त्या सोनाराने, थोड्याच वेळापूर्वी पांड्य राणीचा एक चांदीचा नुपूर चोरला होता. स्वतःला वांचवण्याची त्याला ही छान संधी मिळाली. कोवलने राणीचा नुपूर चोरला आहे, अशी त्याने राजाजवळ तक्रार केली. राजाने तावडतोब निर्णय केला. आपण निर्दोष आहोत असं कोवलन परोपरीने सांगत होता. पण त्याची विनवणी कुणी ऐकली नाही. त्याला देहदंडाची शिक्षा दिली गेली. कण्णगिला जेव्हां हे कळलं, तेव्हां संतापाने ती बेभान झाली. राणीच्या समोर जाऊन तिने याचा जाब विचारला. तिने राणीचा दुसऱ्या नुपूर हातांत घेतला व तो तोडून खाली फेंकला. त्यांत मोती जडवलेले होते हे तिने दाखवलं. नंतर तिने स्वतःचा दुसरा नुपूर काढला. तोही तोडून खाली टाकला. त्यांत मात्र मणी लावलेले होते. ते पाहून राजा व राणी अवाक् झाले. त्यांना फारच पश्चात्ताप झाला, आणि दोघांनी दुःखातिरेकाने प्राण सोडले. कण्णगिने अतिसंतापाने आपली छाती फाडली नि मदुरानगरीला शाप दिला. सारे शहर अग्नीच्या ज्वाळांत घेरले गेले. दुःखाने वेडी झालेली कण्णगि नगरांत फिरत राहिली. शेवटी जशी कावेरी नदी समुद्राला जाऊन मिळते, व आपले जीवन समर्पित करते, त्याचप्रमाणे कण्णगिने मनोरथावर आरुढ होऊन कोवलनला भेटण्यासाठी स्वर्गाची वाट धरली.



पुंपुहारजवळ कावेरी समुद्राला मिळते.



## सृजनात्मक स्पर्धा

### म्हणीवर आधारित कहाणी - उधार घेतलेली वस्तू महाग पडते.

# सुभद्राचा उपहास

मोठ्या हुशारीने पोलिसांनी चोरांना पकडले. ग्रामाधिकाऱ्यांनी त्यांची खूप शिफारस केली. गावांतल्या लोकांनीही ग्रामाधिकाऱ्यांनी भरपूर प्रशंसा केली. कारण त्यांच्या सुव्यवस्थेमुळे हे सर्व घडून आले होते. बधूपक्षाचे लोक अतिथीगृहात राहिले होते आणि दुर्दैवाने त्यांच्या दागिन्यांची चोरी झाली होती.

जेव्हा त्यांना कळले की चोर पकडले गेले आहेत व त्यांचे सर्व दागिने सुरक्षित आहेत तेव्हा त्यांच्या आनंदाला सीमा उरली नाही. ते सर्वच्या सर्व ग्रामाधिकाऱ्यांच्या घरी गेले. "आपण आमच्या गांवात लग्नकार्यासाठी आलात पण आपल्या दागिन्यांची चोरी झाली हे कळताच मला शरम वाटली. ह्यापेक्षां आणखी मोठी बदनामी काय असू शकते? नशिब आमचे, या बदनामीतून आम्ही सुटलो. देवाला लाख लाख प्रणाम. आपण एकएकटे माझ्याजवळ या, आपल्या दागिन्याचं नांव, वजन सांगा, ओळख पटवा व मग घेऊन जा." ग्रामाधिकाऱ्यांनी लग्नकार्यासाठी दुसऱ्या गांवाहून आलेल्या पाहुण्यामंडळींना सांगितले.

ग्रामाधिकाऱ्यांच्या सांगण्यानुसार ते एका मागोमाग एक आले व आपल्या दागिन्यांची ओळख पटवून घेऊन गेले. आत्ता त्यांच्याजवळ एक दागिना शिल्लक राहिला. तो घ्यायला कोणीही आले नाही. ग्रामाधिकाऱ्यांनी त्यांना म्हटले - "माझ्याजवळ आता एक दागिना उरलाय. आपल्यापैकी कोणी त्याचा मालक आहे कां?"

"का बरं नाही? आहे आहे, त्या कोपऱ्यात बसून जोरजोराने रडत आहे ना, ती बाई त्या दागिन्याची मालकीण आहे. तो खूप मौल्यवान दागिना आहे. त्या दागिन्याने आम्हां सर्वांना फार कष्ट दिले." एक बाई पुढे येऊन म्हणाली.

ग्रामाधिकाऱ्यांनी तिला आपल्याजवळ बोलावले. ती जवळ आली पण तिला कांही बोलवेना. डोके खाली करून ती गप्प उभी होती आणि डोळ्यांतून आसवांच्या धारा वहात होत्या. ग्रामाधिकाऱ्यांनी धाडस करून हळूंच विचारले - "ज्या दागिन्याने चोरी झाली होती तो तर मिळाला, मग आता पुन्हां कशाला तुम्ही इतक्या रडता आहात? काय कारण बरं?"

तरीही ती बोलली नाही व रडतच राहिली. तिच्या नवऱ्याला तिची ही अवस्था पाहवली नाही. तो पुढे येऊन म्हणाला - "साहेब, हा दागिना आमच्या शेजारी राहणाऱ्या लक्ष्मीचा आहे. मी हिला बजावलं होतं की कुणाचाही दागिना उधार आणू नको. पण हिने माझे सांगणे ऐकलं नाही. इथे आल्यावर सर्वांना दागिना दाखवून त्याची स्तुती ऐकून भारी खूष होत होती. आत्ता हिला त्या दागिन्याचं वजन, विशिष्ट ओळख कांही ही माहिती नाही, कारण तो तिचा नाही. त्यामुळे ती रडत आहे."

ग्रामाधिकाऱ्यांनी चौकशी करता त्यांना समजले की त्या माणसाने जे सांगितले ते खरे आहे. शेवटी सुभद्रेने उधार आणलेला दागिना तिला मिळाला. तिने मनांतल्या मनात निश्चय केला की यापुढे कधीही किंमती वस्तू उधार आणायची नाही. दागिना मिळाला नसता तर देव जाणे, तिची काय अवस्था झाली असती!

-के.के. राव



# भरपूर सोने

मल्यापूर नगरात रामदास नावाचा एक सज्जन गृहस्थ राहात होता. दोन मुलांच्यासह त्याचे वैवाहिक जीवन तो आनंदाने घालवीत असे.

एक दिवस अचानक त्याची बायको गंभीर दुखण्याने आजारी पडली व मृत्यू पावली. रामदास ह्या संकटामुळें अतिशय घाबरला. त्याच्यापुढे मोठा प्रश्न पडला की आपल्या या छोट्या छोट्या मुलांचे संगोपन कोण करणार? त्याने विचार केला की दूर गांवी राहणाऱ्या मुलांच्या मामाच्या घरी मुलांना ठेवूं या.

गांवाला जाण्यापूर्वी त्याने आपल्या बायकोचे दागिने व आपल्याजवळ असलेली सर्व संपत्ती आपल्या श्रीमंत शेजारी, सैतानसिंहाजवळ देऊन म्हटले, "भाऊ, माझ्या मुलांच्या भविष्यासाठी जी थोडीफार संपत्ती आहे ती तुमच्या जवळ देतो, तुम्ही ती सुरक्षितपणे आपल्याजवळ ठेवा."

"घाबरूं नकोस, जसा सूर्य आकाशात सुरक्षित असतो, तशी तुझी संपत्ती माझ्याजवळ अगदी सुरक्षित राहील," सैतानसिंहाने विश्वास दाखवत म्हटले.

पण सैतानसिंह जितका श्रीमंत होता तितकाच कंजूष होता. जेंव्हा कांही महिन्यानंतर रामदास मल्यापूरला परत आला व सैतानसिंहाजवळ त्याने आपले दागिने व संपत्ती विचारली, तेंव्हा सैतानसिंहाने नकली दागिने व खोट्या नाण्यांनी भरलेली एक पेटी त्याला दिली. लवकरच रामदासला कळले की सैतानसिंहाने त्याला पूर्णपणे फसवले आहे. तो लगेच आपल्या मुलांकडे परत आला व सैतानसिंहाने कसा विश्वासघात केला ते सांगितले. जीवनभराची पुंजी व भविष्याची संपत्ती अशा रीतीने गमावल्यामुळे रामदासला मोठा धक्का बसला, आणि त्यांतच त्याचा मृत्यू झाला.

काही वर्षे अशीच निघून गेली. रामदासचे दोन्ही मुलगे मोठे हुशार निघाले. त्यांनी सोन्याचा व्यापार सुरू केला व लवकरच खूप श्रीमंत झाले. परंतु सैतानसिंहाची लबाडी ते विसरले नव्हते. एक दिवस ते मल्यापूरला आले.

मोठ्या भावाचे केस लांब होते व दाढी वाढलेली होती. तो एक भिक्षुकाचा वेष घेऊन मल्यापूरजवळून वाहणाऱ्या नदीच्या समोर असलेल्या एका देवळांत राहिला.

धाकटा भाऊ राजकुमाराचा वेष घेऊन आपल्या नोकरांच्या ताफ्यासह सैतानसिंहाच्या बंगल्यासमोर असलेल्या एका मोठया घरांत भाड्याने राहू लागला. हा "राजकुमार" मोठ्या ऐषआरामात राहात असे. त्यामुळे लवकरच सैतानसिंहाचे त्याच्याकडे लक्ष वेधले.

"शेतकऱ्यांनी शेतात धान्याची लागवण करावी तसा हा तरुण उदारतेने दानधर्म करतो. भिकाऱ्यांना एक पैसा देण्याऐवजी हा एक रुपया देतो. रोज संध्याकाळीं गवई लोक याला गाणे ऐकवून भरपूर संपत्ती घेऊन जातात. तिजोऱ्यांमध्ये भरून ठेवण्याऐवजी हा सर्व संपत्ती भिकाऱ्यांना व गवई लोकांत वाटत आहे ही किती दुःखाची गोष्ट आहे." सैतानसिंहाला मनोमन वाटे.

सैतानसिंह लवकरच त्या "राजकुमाराला" भेटला आणि त्याची खूप स्तुती करू लागला. "राजकुमाराने" त्याला मानसन्मान दिला. लवकरच दोघे चांगले मित्र बनले.

एक दिवस रात्री राजकुमार जोरजोराने किंचाळूं लागला, "चोर चोर!" शेजारी धावत आले. तरुणाने सांगितले की कांही चोर त्याच्या शयन-गृहात आले होते व सोन्यांनी भरलेल्या पेट्या घेऊन जायला पहात होते. पण त्याला झोपेतून जाग आल्याबरोबर ते पळून गेले.

सैतानसिंहाला ही संधी वाया घालवायची नव्हती. ज्यावेळी इतर शेजारी निघून गेले तेव्हा तो राजकुमाराला म्हणाला, "हे बघ राजकुमारा, आता यापुढे या घरांत राहणे सुरक्षित नाही. मी तुझा मित्र आहे आणि माझे घर महालासारखे आहे. तू माझ्याबरोबर रहा, तुझी संपत्ती माझ्या घरांत सुरक्षित राहील." राजकुमाराने त्याला धन्यवाद देत त्याच्या प्रस्तावाला होकार दिला. मग सोन्यांनी भरलेल्या एक डझन पेट्या सैतानसिंहाच्या घरी



आणण्यात आल्या. राजकुमाराला एका अलिशान खोलीत राहायची व्यवस्था केली व तिथेच त्याच्या साऱ्या पेट्या ठेवण्यात आल्या.

आपल्या घरी आलेल्या या पाहुण्याची संपत्ती पाहून सैतानसिंहाला अतिशय आनंद झाला. कशा रीतीने ती संपत्ती आत्ता हडप करायची याच्या तो वेगवेगळ्या योजना करू लागला. त्यामुळे त्याची झोपसुद्धा उडून गेली.

एक दिवस राजकुमाराच्या नोकरांकडून सैतानसिंहला कळले की राजकुमार आजारी आहे व तो कांही जेवत नाही. एक दिवस सकाळी राजकुमारने सैतानसिंहाला बोलावणे पाठवले व अगदी हलक्या व अस्पष्ट आवाजात कुजबुजला - "मी आत्ता काही दिवसांचा पाहुणा आहे. मला माझ्या स्वप्नांत आदेश मिळालाय की सारी संपत्ती गावांतल्या नदीसमोर असलेल्या देवळांतल्या



भिक्षुकाला दे म्हणून. कृपा करून आपण त्याला इथे बोलवाल का?''

सैतानसिंहाने ऐकले होते की देवळांतला हा भिक्षुक सकाळ संध्याकाळ एका पायावर बराच वेळ उभा राहतो व त्याला सांसारिक संपत्ती व इतर कशाचा मोह नाही. इतकेच नव्हे तर भक्तांकडून आलेल्या भेटीही तो गरीबांमध्ये वाटून टाकतो. सैतानसिंह त्वरित या भिक्षुकाकडे गेला व नम्रपणे त्याने आजारी असलेल्या राजकुमाराला भेटायला येण्याची व त्याची अंतिम इच्छा पुरी करायची प्रार्थना केली.

''त्याची अंतिम इच्छा पुरी करण्यात मला कांही अडचण नाही. पण खरी समस्या ही आहे की मी सोन्याची किंमत जाणत नाही. त्याशिवाय ह्या एकाकी देवळांत ते सुरक्षित राहील का?''

''आपण चिंता करू नका. मी सोन्याची किंमत जाणतो. जरूर पडली तर मी ते विकायची जबाबदारी घेतो. सुरक्षिततेविषयी म्हणाल तर मी ते माझ्या घरी ठेवायला तयार आहे. आणि आपण जर माझ्या घरी राहाल तर मी तो माझा गौरव समजेन.'' सैतानसिंहाने भिक्षुकाबद्दल खोटा आदर व प्रेम दाखवत म्हटले. बिचारा भिक्षुक या प्रस्तावाला हो म्हणण्याखेरीज दुसरे काय करू शकत होता? तो सैतानसिंहाबरोबर त्याच्या घरी आला व थोडा संकोच करीत त्याने मरणोन्मुख असलेल्या ''राजकुमारा'' ची सारी संपत्ती दान स्वरुपात स्वीकारली आणि त्याला त्याने आशिर्वाद दिला.

परंतु काय आश्चर्य, राजकुमार मरण्याऐवजी भिक्षुकाच्या दैवी आशिर्वादाने लगेच बरा झाला. व भिक्षुकाबरोबर जगातले सर्व स्वादिष्ट भोजन व गोडधोड खाऊ लागला, अगदी, सैतानसिंहाच्या खर्चावर.

काही दिवसानंतर राजकुमार आपल्या राज्यांत परत जाण्याची तयारी करू लागला. त्याने आपल्याबरोबर भिक्षुकालाही यायची विनवणी केली. भिक्षुक जाऊ इच्छीत होता पण सोने विकल्याशिवाय जायची त्याची इच्छा नव्हती.

सैतानसिंहाने आपल्या फायद्यासाठी भिक्षुकाला म्हटले - ''आपल्याला आत्ता जायची गडबड आहे, त्यामुळे बाजारात जाऊन किंमतीची चौकशी करण्याच्या समस्येतून वाचवण्यासाठी मीच हे सोने विकत घेईन. आपण इतके सज्जन आहात की बाजार-भावापेक्षा जास्त किंमत द्यायला मला दुःख होणार नाही.''

''आपण खरंच किती दयाळू आहात,'' भिक्षुक म्हणाला.

सैतानसिंह मनांतल्या मनांत अतिशय खूष होता. त्याने सर्व पेट्यांमधल्या सोन्याच्या बदल्यात त्यांच्या किंमतीचा फक्त दहावा हिस्सा रक्कम त्याने दिली.



पण ती रक्कम सुद्धा इतकी मोठी होती की त्यानंतर त्याच्याजवळ एक पैसा सुद्धा शिल्लक राहिला नाही.

एका तासानंतर राजकुमार आणि भिक्षुक त्याचा निरोप घेऊन निघून गेले. सैतानसिंह एक सोन्याचा तुकडा सोनाराला दाखवायला घेऊन गेला.

''तुम्ही हे सोनं समजून घेऊन आलाय काय? तसे असेल तर माशी आणि फुलपाखरूं यांत तुम्हाला काहीच फरक कळत नाही असं म्हणावं लागेल. हाऽ हाऽ हाऽ.'' सोनार त्याची टिंगल करीत म्हणाला.

सैतानसिंहला आपण फसवले गेले आहोत हे समजता अतिशय धक्का बसला. जे सोने त्याने लाखों रुपये देऊन खरेदी केले होते, ते कांही रुपयांपेक्षा जास्त नव्हते. तो बरोबर फसला होता, लुटला गेला होता.

दुसरा कुठलाही उपाय नसल्यामुळे तो न्याय विचारण्यासाठी राजाकडे गेला व आपली दर्दभरी कहाणी ऐकवली. त्वरित राजाने या दोन बाहेर गांवाच्या व्यक्तींना शोधून आणण्याचा हुकूम दिला. ते दोघेही अजून त्याच नगरात होते व मोठ्या आनंदाने राजदरबारी हजर झाले.

खटला सुरू झाला. ''मी माझं सोनं कुणालाही विकलेलं नाही. मी सोनं भिक्षुकाला दान म्हणून दिलं होतं. कारण त्याच्या आशिर्वादाने मी मृत्यूच्या दाढेतून बाहेर आलो. ह्या सोन्याशी माझा काहीही संबंध नाही, कारण ते सोनं आता भिक्षुकाचं झालं होतं.'' राजकुमाराने आपली बाजू मांडली.

राजाला त्याचे म्हणणे योग्य व सयुक्तिक वाटले.

''मी सैतानसिंहाला प्रथमच स्पष्ट सांगितलं होतं की माझ्या दृष्टीने सोनं आणि दगड एकसमान आहे, कारण सोन्याची किंमत मी अजमावू शकत नाही. सैतानसिंहाने सोनं आपणच खरिदण्याचा प्रस्ताव मांडला. त्यानेच सोन्याची किंमत ठरवली. त्याने दिलेली सर्व संपत्ती मी गरीबात वाटून टाकली.'' भिक्षुकाने आपले म्हणणे राजापुढे मांडले.

राजाला भिक्षुकाची बाजूही योग्य व समर्पक वाटली.

राजाने निर्णय सुनावला, - सैतानसिंह, मला खेद वाटतो की याबाबतीत मी कांही करू शकत नाही. ही मोठी विचित्र स्थिती आहे. दान दिलेल्या गोष्टी विषयी राजकुमाराला जबाबदार ठरवले जाणार नाही. भिक्षुकालाही दोषी ठरवणे योग्य नाही. कारण तूं स्वतः सोनं खरीदण्याचा प्रस्ताव मांडला होतास व तूच सोन्याची किंमत ठरवली होतीस. जे कांही तू खरेदी करणार होतास, त्याची पारख करून घेणे ही तुझी जबाबदारी होती.''

राजकुमार व भिक्षुक, दोघांनी राजाला धन्यवाद दिले व ते दोघे आपल्या घरी निघून गेले.



## महायुद्धसमाप्तीची आठवण




जेव्हां १९३९ मधें दुसरें जागतिक महायुद्ध सुरुं झाले, तेव्हां सोव्हियेट संघ (रशिया), जर्मनी, जपान व इटली यांच्या बाजूने होता. ब्रिटन, फ्रान्स आणि अमेरिका ही दोस्त राष्ट्रें सुरवातीला बहुतेक सगळ्या आघाड्यांवर हरत होती. हर हिटलर या नाझी नेत्यामुळें जर्मनीने पोलंड व झेकोस्लोव्हाकिया हे देश जिंकले होते. हिटलरने रशिया पादाक्रांत करण्याचा एक असफल प्रयत्न केला. म्हणून रशिया दोस्त राष्ट्रांना सामील झाला आणि युद्धाचे चित्र लगेच बदलले. ब्रिटनचे विन्स्टन चर्चिल, अमेरिकेचे हॅरी ट्रुमन व सोव्हियेट संघाचे जोसेफ स्टॅलिन या तिघांची एक ऐतिहासिक शिखर बैठक झाली, आणि युद्ध संपल्याची घोषणा झाली. रशियन सेंट्रल बॅंकेने नुकतेच शंभर रुबल्सचे एक नाणें पाडले आहे. त्यावर या तिघांचे चित्र आहे. टांकसाळींत ही सध्यां फक्त पांचशे नाणीं पाडलेली आहेत. त्यामुळें ही नाणीं संग्राहकांसाठी मूल्यवान ठरणार आहेत.

## प्रथम परिणाम, नंतर कारण



आत्तापर्यंत, प्रकाश हा सर्वांत वेगवान मानला जात असे. त्याचा वेग सेकंदाला १८६,००० मैल असतो. पण आता हा समज बदलायला लागेल. डॉ. वँग या एन. इ.सी. रिसर्च इन्स्टिट्यूटच्या अमेरिकन संशोधकाने सिद्ध केले आहे की प्रकाशाचा पल्सरेट ३०० पटीने वाढवता येतो. सोप्या भाषेंत सांगायचं तर प्रकाश सुरुं होण्यापूर्वींच पृथ्वीवर पोचूं शकेल. म्हणजे भौतिकशास्त्रांतले एक मूलतत्व आता पुन्हां लिहायला हवे. परिणामांपूर्वी होणारी कारणें आता यापुढें बदलतील. आईन्स्टाईनचा सिद्धांतदेखील आता बदलायला हवा.



## विसरलेले उद्‌गारचिन्ह



रशियाच्या राष्ट्राध्यक्षांना पाठवलेल्या एका पत्रांत दोन चुका होत्या. माननीय व्लादिमिर पुतिन या शब्दांनंतर उद्गारवाचक चिन्ह असायला हवे ते लिहीलेले नव्हते. आणि दुसरी मोठी चूक म्हणजे शाळा सोडून जाणाऱ्या विद्यार्थ्यांच्या होणाऱ्या नृत्याच्या कार्यक्रमासाठी, या नेत्याला निमंत्रणपत्र लिहीताना "तुमचा वेळ अवश्य चांगला जाईल, आम्ही तुम्हाला मेजवानी खिलवूं" असा मजकूर होता. त्यांत you (तुम्ही) या शब्दांतले Y हे अक्षर पहिल्या लिपींत (कॅपिटल लेटर) नव्हते. अध्यक्षांच्या कार्यालयांत याबद्दल संताप उसळला. अध्यक्षांनी ह्या कार्यक्रमाला हजर राहूं नये म्हणून प्रस्ताव मांडण्यात आला. हे पत्र कुणी लिहीलं याचाही कसून तपास झाला. सतरा वर्षांच्या ॲना प्रोनेरोवा हिने ते पत्र, शालेय अभ्यासक्रम संपवून शाळा सोडणाऱ्या विद्यार्थ्यांच्या वतीने लिहीलेले होते. म्हणून तिने त्यावर सही केली नव्हती. रशियन अधिकाऱ्यांना मात्र हा बेफिकिरपणा जास्तच खटकला. त्यांनी ॲनाचे रौप्यपदक तिला देऊं नये व वार्षिक परीक्षेतले तिचे गुण कमी करावे अशी सूचना त्या शाळेला केली. परंतु शाळेच्या प्रमुखांनी तर राष्ट्राध्यक्षांनीच या प्रकरणांत लक्ष घालावे व ॲनाचे परीक्षेतले गुण व रौप्यपदक तिला रीतसर मिळावे म्हणून त्यांना विनंती केली आहे.

## लेखनांतली चूक नव्हे !




ब्रॅडसेन हा खरंच ब्रॅडमन होता - सर्वश्रेष्ठ क्रिकेटवीर सर डोनल्ड ब्रॅडमन नव्हे, तर त्यांचा सुपुत्र जॉन ! सुमारें तीस वर्षे जॉन ब्रॅडमन आपले आडनांव ब्रॅडसेन लावत होता. त्याला लोकांमधल्या प्रसिद्धीची बिलकूल हाव नव्हती. नुकतेच त्याने वार्ताहरांना सांगितले की वडिलांच्या कीर्तीमुळें निर्माण झालेल्या कांतिच्या पिंजऱ्यांत राहाण्यापेक्षां त्याने स्वतःचे नांव बदलून घेतले. आणि वडिलांच्या अफाट लोकप्रियतेपासून आणि जनतासंपर्कापासून दूर राहाण्याचे ठरवले. सर डोनल्ड यांचा ऑस्ट्रेलियांतल्या हॉल ऑफ फेमचे "शतकांतले सर्वश्रेष्ठ खेळाडू" म्हणून नुकताच सत्कार करण्यांत आला. याप्रसंगी वृद्ध वडिलांऐवजी मुलाने सन्मान स्वीकारला, व 'जॉन ब्रॅडमन' हे त्यांचे खरे नांव जाहीररित्या १९७२ नंतर प्रथमच पुकारले गेले. आजवर मात्र प्रसिद्धीच्या झोताबाहेर राहाण्यांत तो यशस्वी झाला होता.

# वेगळ्या धर्तीची लक्ष्मीपूजा

उत्कल किंवा कलिंग नांवाने पूर्वी प्रसिद्ध असलेल्या ओरिसाच्या भूमीत असंख्य मंदिरें होती. त्या अद्वितीय कलात्मक मंदिरापैकी कित्येक मंदिरे होती. त्या अद्वितीय कलात्मक मंदिरापैकी कित्येक मंदिरे आजही सुस्थितीत आहेत.

ओरिसाची कला जशी वेगळी आहे, त्याचप्रमाणें तिथल्या देवतांच्या पूजापद्धतीदेखील जरा निराळ्या आहेत. उदाहरणार्थ, तिथली लक्ष्मीदेवीची पूजा!

आपले तांदूळ मापायचे मापटें असते ना, ते शीगोशीग नांदळाच्या साळींनी भरून ठेवायचे, आणि ती लक्ष्मीची प्रतिमा मानायची. मार्गशीर्ष महिन्यांतल्या दर गुरुवारी घर व अंगण चांगले साफसूफ करतात व दारापुढें सुंदर रांगोळ्या काढतात. नंतर लक्ष्मीदेवीच्या प्रतिमेची पूजा केली जाते. या विधीला मुनबसा म्हणतात. स्त्रिया या व्रतानिमित्त उपवास करतात.*

यासंबंधी एक मजेदार दंतकथा प्रचलित आहे. आणि पुरीच्या श्रीजगन्नाथमंदिराशी या कथेचा धागा गुंफलेला आहे. श्रीजगन्नाथ म्हणजेच श्रीविष्णू आणि लक्ष्मीदेवी ही त्याची पत्नी आहे.

मार्गशीर्षातल्या एका गुरुवारी आपले भक्त आपली आराधना कशी करतात ते पाहाण्यासाठी लक्ष्मी निघाली. चांडाळ जमातीतली एक स्त्री श्रीया, हिची श्रद्धा पाहून लक्ष्मीदेवी प्रभावित झाली. श्रीयाच्या घरासमोर लक्ष्मीदेवी उभी राहिली होती. नेमके त्याचवेळेस जगन्नाथ व त्यांचे ज्येष्ठ बंधू बलभद्र तिथून जात होते. लक्ष्मीदेवीला एका शूद्र स्त्रीच्या दारासमोर थांबलेली पाहून बलभद्र बिथरले. त्यांनी जगन्नाथाला तावडतोब लक्ष्मीचा त्याग करण्यास सांगितले. जगन्नाथ पडला धाकटा आज्ञाधारक भाऊ! त्याला नाईलाजाने या थोरल्या संतापी भावाचे म्हणणे मान्य करावे लागले. जेव्हां लक्ष्मीदेवी मंदिरातून निघून गेली, तेव्हां तिचे सर्व सेवक तिच्यापाठोपाठ गेले. जाताना मंदिरात सांठवलेली सारी संपत्ती घेऊन गेले. ताल व वेताल हे देवीचे दोन चैतन्यरूपी निष्ठावंत सेवक होते. जाताना त्यांनी देवांचे दोन्ही रत्नजडित मंचकदेखील बरोबर नेले. जगन्नाथ आणि बलभद्र - दोघांना खरोखरीचा उपास घडला, आणि ते भिक्षा मागण्यासाठी बाहेर पडावे लागले. परंतु लक्ष्मीदेवीची अवकृपा झालेल्या या दोघाजणांना कुणीही भिक्षा वाढीना. त्यांना तहान लागली होती म्हणून त्यांनी एका तलावाच्या पाण्यांत पाय ठेवला, तर तो तलावच एकाएकी आटला.

दोघे बंधू तहानभुकेने तळमळत होते. शेवटीं नाईलाजाने शरमून जाऊन त्यांनी ज्या चांडाळ स्त्रीच्या घरी लक्ष्मीदेवी राहात होती, त्या घराचे दार ठोठावले. लक्ष्मीला त्यांची ही दशा पाहून वाईट वाटले व तिने स्वतः त्यांच्यासाठी भोजन बनवले. परंतु आपण इथें आहोत याची मात्र अजिबात कल्पना दिली नाही. तिने बनवलेले पोडपिठे चाखल्यानंतर दोघांही बंधूंची खात्री झाली की तो स्वादिष्ट पदार्थ निश्चितच लक्ष्मीदेवीच्या हातचा असला पाहिजे. त्यांनी तिची क्षमा मागितली आणि तिला परत घरी येण्याची विनवणी केली. तिने एका अटीवर मंदिरात परत येण्याचे मान्य केले. तिची अट होती की मंदिरात येणाऱ्या भक्तांना जो महाप्रसाद वांटला जातो त्यावर सर्व भक्तगणांचा सारखाच अधिकार असला पाहिजे. त्यांत जातिभेद असता कामा नये.

मार्गशीर्ष महिन्यांतल्या निरनिराळ्या पूजाअर्चनांतून ही सारी कथा पुन्हां एकदा आळवली जाते.




*भारतांतल्या बहुतेक भागांत जरी दिवाळीत लक्ष्मीपूजा केली जाते, तरी ओरिसामधें मात्र लक्ष्मीपूजा डिसेंबर - जानेवारीमधें केली जाते.

वेताळ कथा

# दोन राजकुमार

आपला निश्चय पक्का असलेला विक्रमार्क पुन्हां झाडापाशीं पोंचला. त्याने झाडावरुन प्रेत खाली उतरवले आणि आपल्या खांद्यावर ते घेऊन तो स्मशानाच्या दिशेने भराभर जाऊं लागला. तेव्हां नेहमीप्रमाणेंच प्रेतांत लपलेला वेताळ म्हणाला, "राजन्, मध्यरात्र झाली आहे. स्मशानांत भुतेप्रेतें स्वच्छंदपणें फिरत आहेत. केव्हां कोणते संकट पुढें उभे राहील ते सांगता येत नाही. तिथें क्रूर प्राणी देखील असतात हे तुला माहीत आहेच. तरीसुद्धां तूं निर्भयपणें आणि मनापासून आपले कर्तव्य पार पाडीत आहेस याचे मला नवल वाटते. असं वाटतं की तुझ्या या चिकाटीच्या मागें एखादे मोठे ध्येय आहे. आणि ते मिळवणें हा तुझ्या जीवनमरणाचा



प्रश्न आहे.

"आता मी तुला तुझ्यासारख्याच दोन निर्भय पण हट्टी राजकुमारांची गोष्ट सांगतो. ते महान आदर्शांचे अनुकरण करीत असत. त्यांच्या नसानसांत निःस्वार्थीपणा भरलेला होता. परंतु दुःखाची गोष्ट अशी की एके दिवशीं ते दोघे स्वार्थी बनले आणि त्यांची वागणूक बदलली. ज्या आदर्शांसाठी आणि ध्येयासाठी त्यांनी आजवर घोर परिश्रम केले आणि संकटे झेलली, त्यावर पाणी पडले. तुझी पण तशीच अवस्था होईल की काय याची मला भिती वाटते. तुझे श्रम वायां जातील. तुझा हितचिंतक या नात्याने मी तुला ही कथा जरूर सांगेन. त्यामुळें तूं स्वतःचे मत बदलशील आणि हे काम सोडून देशील." एवढं बोलून वेताळाने गोष्ट सांगण्यास आरंभ केला.

"श्रीचंदनपूर आणि प्रणयपुरी नांवाची दोन शेजारी राज्यें होती. ही दोन्ही राज्ये प्रचंडगिरी राज्याच्या महाराजांची मांडलिक राज्यें होती. श्रीचंदनचे महाराज चंदनदत्त यांची एकुलती एक कन्या जयंती अतिशय देखणी होती. महाराजांनी तिचे संगोपन एखाद्या राजपुत्रासारखे केले होते व क्षत्रियांस उचित अशा सर्व विद्या तिला शिकवल्या होत्या. आता जयंती मोठी झाली होती आणि तिचे लावण्य जास्तच मोहक दिसू लागले. तिच्या अनुपम सौंदर्याचे वर्णन लोक सतत करीत आणि साऱ्या जगांत अशी मुलगी मिळणार नाही असं म्हणत.

एक दिवस आपल्या मैत्रिणींना घेऊन ती वनविहारास गेली. तेव्हां एका भिल्ल (एक आदिवासी जमात) सरदाराने राजकुमारी जयंतीला एक छोटा पांढरा घोडा भेट दिला. तिने त्या घोड्याला एका तबेल्यांत ठेवले आणि त्याच्यासाठी सर्व आवश्यक सोयी करुन त्याची काळजी घेण्यास नोकरांना सांगितले. ती स्वतः त्याला रोज चारा खाऊं घालीत असे आणि पाणी पाजत असे. दोन वर्षातच तो घोडा चांगला धष्टपुष्ट झाला.

घोड्याच्या प्रशिक्षकाने एक दिवस राजकुमारीला घोड्यावर बसून फेरफटका करुन येण्याची सर्व व्यवस्था केली. पंधरवड्यातच राजकुमारी मोठ्या वेगाने घोडा पळवण्यांत तरबेज झाली.

आता त्या घोड्याची काय ती ऐट! तो वाऱ्याच्या वेगाने पळूं लागला. पागेंतला एकही घोडा या पांढऱ्या घोड्याइतका चपळ आणि वेगवान नव्हता.

त्यावेळेस गांवकऱ्यांनी प्रचंडगिरी महाराजांकडे जाऊन तक्रार केली की जंगलातल्या हत्तींनी शेतांत नासधूस करायला सुरवात केली आहे. जर त्यांना आवरलं नाही तर गांवागांवातली पिकें पार नष्ट होतील. सगळीकडे दुष्काळ पसरेल.



महाराजांनी ही तक्रार ऐकल्यानंतर आपला पुत्र रुद्रकेतू याला कांही सैनिक बरोबर देऊन जंगलाच्या दिशेला पाठवले. सूर्यास्त झाल्यानंतर सैनिकांनी मशाली पेटवल्या. थोड्याच वेळांत कांही हत्ती गांवाच्या रोखाने येऊं लागले. कांही शिपायांनी ढोल वाजवले आणि कांही शिपायांनी हत्तींच्यावर बाणांचा वर्षाव केला. या आकस्मिक हल्ल्याने हत्ती गोंधळून गेले आणि पुन्हां जंगलात पळाले.

दुसऱ्या दिवशी सकाळीं राजकुमार रुद्रकेतू आणि त्याचे सैनिक जवळच असलेल्या चंदनपुरचे मांडलिक राजे चंदनदत्त यांच्याकडे पोंचले. राजा चंद्रदत्ताने त्यांचे स्वागत केले आणि त्यांच्या रहाण्याची पूर्ण व्यवस्था केली. यावेळांत रुद्रकेतूने राजकुमारी जयंतीला बागेंत फिरताना पाहिली. तिच्या रुपसंपदेवर तो मोहित झाला. मनांतल्या मनांत त्याने या अपूर्वसुंदरीला आपली पत्नी म्हणून स्वीकारण्याचा विचार पक्का केला.

त्यानंतर जेव्हां त्याने तिचा पांढरा घोडा पाहिला, तेव्हां तो राजाला म्हणाला, "वा! घोडा असावा तर असा! हा घोडा मला हवा आहे." त्यावेळेस जयंती तिथून जात होती व तिने हे बोलणें ऐकले. तिने राजकुमाराला सांगितले, "आमच्यातर्फे एक छोटीशी भेट म्हणून हा घोडा आपल्याला दिला आहे. आपण याला घेऊन जावे."

या घटनेनंतर कांही दिवसांनी नवरात्राचा उत्सव होता. त्याचं निमंत्रण घेऊन प्रणयपुरीचा युवराज वैभववर्मा स्वतः श्रीचंदनपुरला आला, आणि त्याने राजा चंद्रदत्ताला उत्सवाचे आमंत्रण दिले. युवराजाचा स्वतः येण्यामागे आणखी एक हेतू होता. बहुतेक लोकांना माहिती होतं की जयंती व वैभववर्मा यांच एकमेकांवर प्रेम आहे.

त्या दिवशी संध्याकाळीं जेव्हां जयंती



वैभववर्माला भेटली तेव्हां बोलण्याच्या ओघांत तिने पांढऱ्या घोड्याची गोष्ट युवराजाला सांगितली. तिच्या आवाजांत त्याबद्दलचे दुःख दिसून येत होते. तिने पांढरा घोडा रुद्रकेतूला दिला होता खरा, पण तिला त्याचे वाईट वाटत होते. रुद्रकेतूच्या स्वभावाबद्दल तिचे मत वाईट झालेले होते. "अग, आपण दुसरं काय करणार? तो पडला महाराजांचा पुत्र, आणि आपण आहोत त्यांचे मांडलिक! जाऊं दे, तूं ही गोष्ट विसरुन जा. तेच ठीक होईल." युवराजाने जयंतीची समजूत घातली.

दुसऱ्या दिवशी वैभववर्मा आपल्या राज्यांत परत गेला. त्याच्या राज्यांतल्या प्राचीन मंदिरांची दुरुस्ती करण्याचे काम चालले होते. तिथल्या भिंती खणताना मजुरांना एक चमकणारा नीलमणी सांपडला. वैभववर्मा व त्याच्या वडिलांनी निर्णय घेतला की नवरात्राच्या उत्सवांत हा मणी देवीच्या



मुकुटांत बसवून देवीला ते रत्न अर्पण करायचे !

ही बातमी हेरांमार्फत रुद्रकेतूला समजली. त्याने लगेच राजा वीरसेनाला निरोप पाठवला की लौकरच रुद्रकेतूचा राज्याभिषेक होणार आहे. त्यावेळेस राजमुकुटांत तो नीलमणी बसवावा ही त्याची तीव्र इच्छा आहे. तेव्हां तो मणी शक्य तितक्या लवकर रुद्रकेतूकडे पाठवावा.

युवराजाचा हा निरोप ऐकून राजा वीरसेनास फार वाईट वाटले. हा हुकुम टाळण्यासाठीं तो उपाय शोधूं लागला. पण त्याला कांहीं मार्ग सुचेना. वैभववर्माने राजाला काळजी करताना पाहिले व तो म्हणाला, ''पिताश्री, या गोष्टीवर आपण इतका विचार करण्याची मुळीच जरुरी नाही. आपण कांही तो नीलमणी आपल्यासाठी वापरणार नव्हतोच! आपण तो मणी देवीलाच अर्पण करणार होतो. तेव्हां महाराजांच्या पुत्राला तो देण्यांत आपण कांकूं करुं नये. कारण त्यांतच प्रजेचे कल्याण आहे.''

एका आठवड्यांतच वैभववर्मा प्रचंडगिरीला गेला आणि स्वतः तो मणी रुद्रकेतूला देऊन आला. यानंतरच्या आठवड्यांत प्रणयपुरीत नवरात्राच्या उत्सवाला सुरवात झाली. उत्सवाच्या अगोदर एक दिवस श्रीचंदनपूरहून राजा, राणी व जयंती प्रणयपुरीला पोंचले. नवरात्राच्या शेवटच्या दिवशीं युवराज रुद्रकेतू प्रणयपुरीला आला. वीरसेनने त्याचे भव्य स्वागत केले.

दुसऱ्या दिवशी सकाळीं नवरात्र उत्सव सुरुं झाला. राज्यमंदिराच्या समोरच्या प्रांगणात हळद, चंदन व कुंकू यांचे सोन्याच्या भांड्यात भरलेले मिश्रण वैभववर्माने जयंतीवर उडवले. जयंतीने रुसल्याने नाटक करीत त्याच्या हातातून ते भांडे काढून घेतले. वैभववर्मा पळूं लागला व ती त्याचा पाठलाग करुं लागली. हे पाहून रुद्रकेतूच्या मनांत मत्सराने संतापाची कळ उठली. त्याला वाटले की जर त्याने उशीर केला तर जयंती निश्चित वैभववर्माची होईल. तावडतोब उठून तो राजा चंद्रदत्ताजवळ गेला व म्हणाला, ''राजन्! येत्या कार्तिकी द्वादशीला माझा राज्याभिषेक होणार आहे. त्या शुभ प्रसंगी आपली कन्या जयंती हिला माझी राणी म्हणून स्वीकार करण्याची माझी इच्छा आहे. या माझ्या मागणीला आपण विरोध करणार नाही अशी मला आशा आहे.''

रुद्रकेतूचे बोलणें ऐकून चंद्रदत्त हतबुद्ध झाला. आणि जवळच बसलेला वीरसेन राजाही चकित झाला. दोघेही एकमेकांकडे पाहूं लागले. कांहीही न बोलता चंद्रदत्त गप्प झाला. या दोघांच्या मौनाचा अर्थ रुद्रकेतूच्या लक्षांत आला. तो संतापून म्हणाला, ''जर आपल्या मुलीचा विवाह माझ्याशी करण्यास आपण तयार नसलात, तर तसें स्पष्टपणें सांगा. मला



जी गोष्ट हवी असते, ती मिळवल्याखेरीज मी राहात नाही.''

थोड्या अंतरावर उभे असलेले वैभववर्मा व जयंती यांनी रुद्रकेतूचा चढलेला आवाज ऐकला. दोघेही जवळ आले व चंद्रदत्तास याचे कारण विचारुं लागले. पण चंद्रदत्त आपली असहाय परिस्थिती त्यांना समजावूं शकला नाही.

तेव्हां कुत्सित स्वरांत रुद्रकेतू त्यांना म्हणाला, ''काय झालं ते मीच सांगतो. लौकरच प्रचंडगिरीच्या भावी सम्राटाची तूं राणी होणार आहेस. ही आनंदाची गोष्ट ऐकून तुझे पिताश्री अस्वस्थ झालेले आहेत. त्यामुळें त्यांच्या तोंडून कांही शब्द उमटत नाहीत.''

जयंतीने लगेच सांगितले, ''क्षमा करा युवराज, या विवाहाला मी तयार नाही. मी या विचाराचा स्वीकार करुं शकणार नाही. यापूर्वीच मी एका दुसऱ्या व्यक्तीशी विवाह करण्याचा निश्चय केलेला आहे.'' तेव्हां चिडून रुद्रकेतू तिला म्हणाला, ''असं होय! अशी गोष्ट आहे तर! अग, हा वैभववर्मा तर केवळ मांडलिकाचा पुत्र आहे. मी उद्यांच पिताश्रींची परवानगी घेतो आणि ह्या दोन्ही राज्यांशी युद्धाची घोषणा करतो. मग मात्र तुझा हा वैभववर्मा फांशीच्या शिक्षेतून वांचणार नाही. त्यानंतर तरी तुला माझा हात धरावाच लागेल.''

वैभववर्माला हे बोलणें सहन झाले नाही. तो मधें पडून म्हणाला, ''युवराज इतका आवेश चांगला नाही. आमच्या विवाहाला वडील मंडळींनी संमती दिलेली आहे. वैयक्तिक कारणासाठी आमच्या राज्यांवर आक्रमण करणें ही राजनीती धर्मविरुद्ध आहे. हा अधर्म होईल.''

हे ऐकून रुद्रकेतू जास्तच संतापला. त्याने वैभववर्माला फटकारले, ''मूर्खा! जरा विचार



करुनच बोल. प्रचंडगिरीच्या भावी महाराजांशी बोलण्याची ही रीत आहे कां?''

दुसऱ्याच क्षणीं वैभववर्माने आपल्या तलवारीच्या मुठीवर हात ठेवला नि म्हटले, ''युवराज! एक उपाय आहे. आपण दोघे खड्गयुद्ध करुं. जो जिंकेल त्याच्याशी जयंती विवाह करेल. यामुळें, तीन राज्यांच्यामधें होणारे युद्ध टळेल. तसेंच युद्धामुळें होणारी जीवितहानीही टळेल. आपली तलवार काढा.''

वैभववर्माचे हे आवेशपूर्ण व समंजस बोलणे ऐकून रुद्रकेतू अवाक् झाला. स्वतःचा राग आवरत तो म्हणाला, ''प्रणयपुरीचे युवराज! आपल्या दोघांच्यात खड्गयुद्ध करण्याची आवश्यकताच नाही. तूं जयंतीशी विवाह करुन सुखी हो. तिच्याबाबतीत माझा जो विचार होता तो अनुचित होता. त्याबद्दल मला खेद होतो आहे.''

पूर्ण गोष्ट सांगून वेताळ विक्रमार्कास म्हणाला, ''राजन्, राजकुमारी जयंतीला आपला पांढरा घोडा फार आवडत होता. तरीदेखील तिने तो रुद्रकेतूला भेट दिला. परंतु मनांत तिला त्याबद्दल वाईट वाटत होतं. तिने ती गोष्ट विसरुन जावी व त्याबाबतीत आपलं मन शांत ठेवावं असा सल्ला वैभववर्माने देखील तिला दिलेला होता. अशाच तऱ्हेने रुद्रकेतूने नीलमणी मागितल्याबरोबर त्याने त्याला लगेच देऊन टाकला. हे पाहून असं वाटतं की तो रुद्रकेतूला घाबरत होता. असा भेदरट पुरुष जयंतीच्या बाबतीत मात्र एकदम खड्गयुद्धाला कसा काय तयार झाला? अशा वेळेला उन्मत्त रुद्रकेतूने आपली तलवार म्यानांतून बाहेर कां काढली नाही? उलट एका नेभळट माणसाप्रमाणें घाबरुन, वैभववर्माला जयंतीबरोबर विवाह करुन सुखी हो असं तो सांगू लागला! हे सारं पाहून हे दोन्ही राजकुमार भित्रे व स्वार्थी आहेत असं मला वाटतं. त्यांच्यात ना धडाडी आहे, ना निर्भयपणा! फक्त आपण शूर असल्याचं दोघंही नाटक करत होते! जर तुला माझ्या प्रश्नांची उत्तरें माहीती असून देखील तूं उत्तर दिले नाहीस तर तुझ्या मस्तकाची शंभर शकले होतील.''

विक्रमार्क म्हणाला, ''स्वार्थ, आग्रह, परिस्थिति आणि बुद्धी या सर्व दृष्टीकोनांतून त्या दोघांबद्दल विचार केला पाहिजे.

जयंतीच्या सौंदर्यावर दोघेही मोहित झाले होते. दोघांनाही तिच्याशी विवाह करायची इच्छा होती. म्हणून त्यांना स्वार्थी ठरवता येणार नाही. कुणीही कितीही शूर आणि हट्टी असला तरी कुठे बिघडलं? जेव्हां त्याला समजून चुकलं की आपला पराजय निश्चित आहे, तेव्हां जर त्याने माघार घेतली तर तो भेकडपणा होऊं शकत नाही. आपल्या प्रेयसीला वांचवण्यासाठी वैभववर्माने तलवार उपसली, आणि खड्गयुद्ध आपल्या दोघांतच व्हावे अशी सूचना केली. यामुळें प्रजेची व राज्याची हानी झाली नसती. कारण ते वैयक्तिक कारण होते. रुद्रकेतूने राज्य आणि प्रजेचे हित लक्षांत घेऊन न्यायाच्या मार्गाने जाण्याचे ठरवले. आणि म्हणून संघर्ष इथेंच समाप्त करण्यांत तो यशस्वी झाला. हे एका चांगल्या व बुद्धिमान सम्राटाचे गुण त्याच्यात दिसून येतात. त्याला रुद्रकेतूचा भेकडपणा नाही म्हणता येणार.''

अशा प्रकारे राजाचे मौन भंग झाले व वेताळ शवासहित पुन्हां झाडावर जाऊन बसला.







# चोराचा स्वाभिमान

कुलवंत एक परिश्रमी माणूस होता. परंतु त्याला दारू व सट्टा खेळण्याचे व्यसन लागले. त्यामुळे तो मेहनत करून जितके पैसे कमवी, ते सारे या वाईट व्यसनांत संपून जात. त्याच्या मुलांना व बायकोला घरांत खायला अन्नाचा एक कण नसला, तरी तो त्यांच्याकडे लक्ष देत नसे.

एक दिवस तो आजारी पडला. त्याला खूप ताप आला. तो अतिशय अशक्त व कमजोर झाला, त्याला पलंगावरून उठणे सुद्धा कठीण झाले. त्याच्या बायकोने व मुलांनी वैद्याला बोलावले, पण तो पैशाशिवाय यायला तयार नव्हता. कुणाजवळही त्यांनी पैसे उसने मागितले की ते ''आधी घेतलेले पैसे परत द्या'' म्हणायचे. कुलवंत घरखर्चासाठी पैसेच देत नसे. बिचाऱ्या बायकोचें फार हाल व्हायचे. आत्ता कुणीही त्यांना पैसे उधार द्यायला तयार नव्हते.

त्याच वेळेला त्या गांवात दयामय नांवाचा एक व्यापारी आला. त्याने गांवातले नारळ व इतर फळांच्या झाडांची खरेदी केली. छोटे छोटे कारखाने सुरुं करून अनेक लोकांना काम दिले. सर्वजण म्हणूं लागले की तो नांवाचे सार्थक करत आहे. कुलवंतची बायको, गौरीला जेव्हां कुठलाही मार्ग दिसला नाही, तेव्हां ती दयामय व्यापाऱ्याजवळ गेली व तिने आपली समस्या त्याला सांगितली.

दयामय म्हणाला, ''मी तुझे कर्ज फेडीन तसेच तुझ्या नवऱ्याच्या उपचारासाठी पैसेही देईन. पण प्रकृती ठीक झाल्यानंतर तुझ्या नवऱ्याला माझ्याकडे काम करावे लागेल. मी सांगितलेल्या नियमांनुसार त्याला इथे काम करावे लागेल. माझी ही अट तुला मान्य असेल तर सांग.'' गौरीला ''हो'' म्हणण्याखेरीज दुसरा उपाय नव्हता. तिला दयामयने घातलेल्या अटी योग्य वाटल्या व तिने त्वरित होकार दिला. तिला वाटले की आत्ता आपले व मुलांचे नवे जीवन सुरू होईल.

वसुंधरा



दयामयला तिच्या होकारावर विश्वास नव्हता, म्हणून त्याने लगेच कराराचे कागदपत्र तयार करून घेतले व त्याच्यावर गौरीची स्वाक्षरी घेतली. त्यानंतर त्याने आपल्या माणसांना पाठवून कुलवंतला हॉस्पिटलमध्ये दाखल केले. चार पांच दिवसांतच कुलवंत ठीक झाला व हिंडूफिरूं लागला मग एक दिवस सर्वांचे आभार मानून तो आपल्या घरीं जाण्यासाठी तयार झाला.

''कुठे जातोस तू? आता तुला माझ्याकडेच काम करावे लागले.'' दयामय गंभीरपणे म्हणाला. कुलवंतला भीती वाटली नाही, परंतु दयामयचे सामर्थ्य व आपल्या पत्नीने त्याला दिलेले वचन, यातून बाहेर पडणे महामुष्किल आहे हे जाणून तो शांतपणे दयामयबरोबर गेला व त्याने दिलेले काम करूं लागला.

रोज सकाळीं त्याला आपल्या रात्रीचे थंड जेवण दिले जाई. मग चार तास सतत काम केल्यानंतर गौरी त्याला घरी बनवलेले गरम गरम जेवण घेऊन येत असे. जेवण करून थोडी विश्रांती घेऊन तो पुन्हा चार तास मेहनत करी. रात्री पुन्हां गौरी त्याला गरम जेवण घेऊन येई. आणि याचवेळी तो आपल्या पत्नीबरोबर व मुलांसमवेत कांही वेळ एकत्र असे.

सर्व काही ठीक चालले होते. परंतु कुलवंतला त्याला घालायला दिलेले कपडे बिलकुल आवडत नसत. कारण ते कपडे कैद्याच्या कपड्यांसारखे होते. त्यामुळें कुलवंतच्या मनांत सारखे विचार येत की तुरुंगात नसूनही आपण एखाद्या कैद्यासारखे जीवन जगत आहोत.

असाच एक महिना संपला. काम केल्याबद्दल कुलवंतला एका महिन्याचे वेतन मिळणार होते, पण दयामयने ते त्याच्याजवळ न देता संपूर्ण वेतन गौरीला देऊन टाकले. त्या दिवशी कुलवंत गौरीच्या पुढे अगदी हमसून हमसून रडला. तो म्हणाला की मला कसेही करून या कैदखान्यांतून बाहेर काढ. इकडे चोरासारखे राहणे मला बिलकुल पसंत नाही. तूं मुलांबाळांबरोबर सुखांत राहतेस, पण मी इथे प्रत्येक गोष्टीसाठी तडफडतो आहे. गौरीलाही आपल्या नवऱ्याची खूप दया आली. ती दयामयजवळ जाऊन म्हणाली - ''मालक, आपल्या मदतीबद्दल मी आपली आभारी आहे. पण माझ्या नवऱ्याला कैद्यासारखी वागणूक देऊन आपण त्याचा अपमान करत आहात. मला त्यांची दया येते. हवे तर मी त्यांच्याऐवजी काम करीन, पण कृपा करून माझ्या नवऱ्याला यांतून मुक्त करा. किंवा कमीत कमी, त्यांना जरा चांगले कपडे घालायला द्या.''

गौरीचे म्हणणे शांतपणे ऐकून घेऊन दयामय म्हणाला-''करारपत्रात जे काही लिहीले आहे,



त्याप्रमाणेच सर्व होत आहे. यापुढे या विषयावर कांहीही मला सांगू नकोस. मी कांही करूं शकत नाही.'' असे म्हणून दयामयने तिला पिटाळले. रोज कुलवंत आपल्या पत्नीला त्याच्या मनांतले दुःख सांगून रडायचा. एक दिवस तो म्हणाला, ''पुराणांत अशा कितीतरी गोष्टी आहेत की ज्यांत नवऱ्याने आपल्या बायकोला विकले आहे. पण इथे तू आपल्या स्वार्थासाठी स्वतःच्या नवऱ्याला विकले आहेस. तापाने फणफणलेल्या नवऱ्याला कांहीही न विचारता, त्याची परवानगी न घेता, तूं स्वतःचा स्वार्थ पाहिलास व मला कष्ट भोगावे लागत आहेत. अशा रीतीने तू एक नवे पुराण निर्माण केले आहेस. मला विकून टाकण्याचा अधिकार तुला कुणी दिला? मला ग्रामाधिकाऱ्यांना निवेदन करायचे आहे.''

गौरीला वाटले की आपल्यामुळेच नवऱ्याला हा सारा अन्याय सहन करावा लागतोय. तिला फार वाईट वाटले. ती स्वतः ग्रामाधिकाऱ्याला भेटली व सारा वृत्तांत सांगून नवऱ्याला मदत करा म्हणून तिने विनवणी केली.

गौरीने सांगितलेले ऐकून ग्रामाधिकाऱ्याला आश्चर्य वाटले. त्याने त्वरित दयामयला बोलावून गौरीने केलेल्या आरोपांची छाननी सुरू केली.

दयामय निर्भीडपणे म्हणाला - ''मी सर्व कांही स्पष्टपणे सांगून मगच करारपत्र केले व गौरीने त्यावर स्वाक्षरी पण केली आहे. इतकेच नव्हे तर माझ्यामुळे आज या कुटुंबाचा फायदाच झालेला आहे, मी कुलवंतकडून जास्त काम करवून घेतो, तसेच त्याला वेतनही जास्त देतो, माझ्या या नियमांमुळे आज कुलवंत दारू व सट्ट्यासारख्या वाईट व्यसनांपासून दूर राहिला आहे, त्याला मिळणाऱ्या वेतनातून खर्च वजा करता एका ठराविक रकमेची बचत होते व जर अशीच बचत केली, तर गौरी कांही महिन्यां-नंतर स्वतः शेत सुद्धां खरेदी करू शकेल.''

''मनुष्याला फक्त पैसा मिळाला की सर्व काही मिळाले असे नाही. त्याला स्वातंत्र्य हवे असते, मानसन्मानाने जगायचे असते. आणि दुसरे म्हणजे



कुलवंत आपल्या घरी दारू पिऊ दे की सट्टा खेळूं दे, तुमचा काय संबंध? तो कांही गुन्हा नाही.'' ग्रामाधिकारी म्हणाला.

''कुलवंत चोर आहे. तुमचे न्यायशास्त्र त्याला सजा देत नाही, म्हणूनच मला या बाबतीत दखल घ्यावी लागली.'' दयामय म्हणाला.

''कुलवंत चोर आहे म्हणून सिद्ध करून दाखवा. व ते सिद्ध झाले तर मी त्याला तुरुंगात टाकीन.'' ग्रामाधिकारी म्हणाला, ''हो, आता सर्वजण लक्षपूर्वक ऐका. आपल्या समाजामध्ये प्रत्येक नागरिकाची एक जबाबदारी आहे, एक कर्तव्य आहे. आई-वडील, पत्नी, मुले यांची काळजी घ्यायची, त्यांचे पालन-पोषण करायचे हे त्यांतलेच एक कर्तव्य आहे. या साऱ्या जबाबदाऱ्या सांभाळून जर माणूस अर्थसंपादन करत असेल तर त्याला स्वतःच्या इच्छेप्रमाणे कांही संपत्ती खर्च करायचा अधिकार आहे. पण कुलवंतने आपले कर्तव्य केलेच नाही. जी रक्कम तो काम करून मिळवित असे, ती सर्व तो स्वतःसाठी खर्च करी. त्यामुळे मी त्याला स्वार्थी व चोर म्हणेन.''

''गौरीने ह्या चोराला माझ्या स्वाधीन केले. मी त्याला आवश्यक त्या नियमांनुसार, कडक वागणूक ठेवून त्याला एक योग्य नागरिक बनवण्याचे कर्तव्य पुरे केले आहे. एक दिवस तो श्रीमंत होईल याची सर्व व्यवस्था करणे माझे कर्तव्य व ध्येय आहे. एका बाजूला पत्नी व मुले भुकेने तळमळतात व दुसरीकडे हा दारू व सट्टेबाजीत पैसे गमावतो त्याला कुठला आला आहे मानसन्मान? अशा कामचोर, स्वार्थी, बेजबाबदार लोकांनाच शिक्षा मिळते.'' दयामय रागाने तारस्वरात म्हणाला.

आता ग्रामाधिकारी व गौरीला खरी परिस्थिती समजली होती. गौरीने हात जोडून दयामयची क्षमा मागितली.

गौरीकडून सारी वस्तुस्थिती जाणून घेतल्यावर कुलवंत म्हणाला - ''खरंच, मी चोर आहे. दयामयने मला जी शिक्षा दिली आहे, ती योग्य आहे, मी त्यालाच पात्र आहे.''

या घटनेनंतर कुलवंतमध्ये खूप बदल झाला. एक वर्ष पूर्ण झाल्यावर दयामयने त्याला इतरां-सारखे कपडे वापरायला दिले. व घरी राहायला परवानगी दिली. कुलवंतही सर्व व्यसनांपासून दूर राहून आपल्या कुटुंबियांसमवेत आनंदात राहू लागला.








(10)

(आतापर्यंत आपण पाहिले की तिसऱ्या सालभंजिकेने एक कथा सांगण्यास आरंभ केला. ह्या कथेत सुभद्रा देशाचा राजा न्यायवर्धन न्यायासाठीं प्रसिद्ध होता. त्याच्या दरबारांत न्याय मागण्यासाठीं चंद्र व वीर नांवाचे दोघे मित्र आले. चंद्र श्रीमंत होता व वीर गरीब होता. वीरने चंद्रावर आरोप ठेवला की आपले दिलेले वचन न पाळला, चंद्र आपल्या मुलीचा विवाह वीरच्या मुलाशी आता करं इच्छित नाही. त्यावर चंद्रने आपली बाजू मांडताना सांगितले की हा गरीबी श्रीमंतीचा प्रश्न नाही. परंतु वीरचे कुटुंब निरुद्योगी व कामचुकार आहे. माझी मुलगी असल्या घरांत राहू शकणार नाही. दुसऱ्या निवाड्यासाठीं सिंहद्वीपचा व्यापारी मणिकर्ण याने सुभद्रा देशांतला व्यापारी रत्नगुप्त याच्यावर फसवणुकीचा आरोप ठेवला. - त्यानंतर)

महाराजांनी मणिकर्णला मधें अडवलं नाही. त्यांनी त्याची तक्रार लक्षपूर्वक ऐकली, व नंतर रत्नगुप्ताकडे आपली मान वळवली.

रत्नगुप्त लगेच उठून उभा राहिला आणि महाराजांना सविनय प्रणाम करुन म्हणाला, ''महाराज, मी इथें नवीन नाही. गेली तीस वर्षे मी इथें सचोटीने व्यापार करत आलो आहे. ही खरी गोष्ट आपणही जाणता आणि या शहरांतले इतर व्यापारीदेखील जाणतात. व्यापारांत माझी केवढी कमाई आहे ते आपल्याला ठाऊक आहे. असलं क्षुद्र काम करुन अपमानित होण्याची मला काय जरुर आहे? त्याला चाळीस हजार रुपये दिल्यानंतरच मी त्याचा माल ताब्यांत घेतला आहे. यापेक्षां जास्त मी काय सांगू? आणि सांगण्यासारखं आहे तरी काय? एक विदेशी मला धोकेबाज म्हणतो, माझ्यावर तऱ्हेतऱ्हेचं

लक्ष्मी गायत्री



लांछन लावतो आहे. यापेक्षां जास्त अपमान कोणता असूं शकेल?'' सद्‌गदित होऊन, डोळ्यांतली आसवे पुसत तो म्हणाला.

न्यायवर्धनने स्मित करुन उत्तर दिले, ''रत्नगुप्ता, अरे भगवान कृष्णालादेखील माखनचोर म्हणतात. आपण सारी तर सामान्य माणसें! भगवानाच्या अगाध लीलेसमोर कधीकधी आपल्याला मान खाली घालणें आवश्यक असते. आता हें मला सांग तुझा लाडका एकुलता एक मुलगा, तुझ्या वंशाचा दिवा, सुखरुप आहे ना?''

''खुशाल आहे, महाराज!'' रत्नगुप्ताने मान लवून सावकाश उत्तर दिले.

महाराज म्हणाले, ''रत्नगुप्त! सर्व सभेसमोर तुम्हाला दोषी ठरवलं गेलं आहे याबद्दलची काळजी करणं सोडून द्या. एकांतात बसा आणि निर्मळ मनाने परमेश्वराचे स्मरण करा. भगवान सर्वव्यापी आहे. त्याच्या दिव्य दृष्टींतून कोणतंही पाप लपूं शकत नाही.'' नंतर त्यांनी रत्नगुप्ताला आंतल्या दालनांत घेऊन जाण्याची सैनिकांना आज्ञा दिली. नंतर महाराज मणिकर्णाला म्हणाले, ''मणिकर्ण, रत्नगुप्त इथें एक प्रमुख व्यक्ती आहेत. तूं त्यांच्या मुलासारखा आहेस. उगीच जास्त चिंता करं नकोस. थोडा वेळ बसून राहा.''

महाराजांचे बेलणें ऐकून रत्नगुप्त विचारांत पडला आणि सैनिकांच्या पाठोपाठ जाऊं लागला. इकडे मणिकर्णालाही अंदाज येईना की महाराज यानंतर काय निर्णय देणार आहेत ते! ते ऐकण्यास तो फारच आतुर झालेला दिसत होता. तो जिथें उभा होता, तिथेंच खाली बसला.

महाराजांनी तिसऱ्या फिर्यादीला बोलवून घेतले. ही तिसरी फिर्याद एक म्हातारी आई व तिचा एकुलता एक मुलगा यांच्यामधें चाललेल्या भांडणाबद्दल होती. ही मंडळी राजधानीपासून दूर असलेल्या एका गांवात राहात होती.

तिच्या मुलाने प्रथम आपली तक्रार नोंदवली. तो म्हणाला, ''महाराज, मला ठाऊक आहे की माझी पत्नी घरकामांत तितकीशी तरबेज नाही. ती बरीच अडाणी आहे. पण जर तिला कोणतं काम कसं करायचं ते नीट सांगितलं कीं ते काम ती व्यवस्थितपणें करते. तसं सांगितल्याबद्दल ती रागावत नाही किंवा रूसत नाही, तिला छक्केपंजे कळत नाहीत. पण



माझी म्हातारी आई मात्र, जेव्हां पाहावं तेव्हां, तिला शिव्या देत असते. तिच्या अगदी पाठीस लागते. भलत्या सलत्या शिव्या ती देत सुटते. तिच्याशी कधीही प्रेमाने बोलत नाही. दोनतीन दिवसांतून एकदां तिच्यावर हातदेखील टाकत असते. माझी बायको बिचारी रडत बसते. आपलं तोंड शिवून गप्प बसून राहाते. मी तर नेहमी म्हणतो की एका निष्पाप जिवाला मारलंस तर नरकांत जाशील. ही मारण्याची वाईट संवय सोडून दे. पण माझे हे बोलणें ती ऐकून न ऐकल्यासारखे करते. आता माझ्यासमोर दुसरा कांही मार्ग उरला नाही. पत्नीला घेऊन मी दुसरीकडे जाण्याचा विचार करत होतो. पण आईने प्रतिज्ञा केली की जर आम्ही घराबाहेर राहायला गेलो तर ती आत्महत्या करुन जीव देईल. ती पळतपळत विहीरीजवळ गेली होती. गांवच्या पाटलाला मी माझी दुःखी कहाणी सांगितली होती. त्यांचाही सल्ला मानण्यास ही तयार झाली नाही. उलट पुन्हां विहिरींत उडी मारायला निघाली. पण त्याने गोडीगुलाबीने तिची समजूत घातली. आणि आम्हाला गुपचूपपणें बैलगाडींत बसवून इथें पाठवले.''

मुलाचे बोलणें संपल्यावर लागलीच म्हातारीने तारसप्तकांत आवाज चढवून बोलायला सुरवात केली. ''शाबास, जर सासूने सुनेला मारलं तर कुठें बिघडलं? हा तर सासूचा अधिकार आहे. इतक्या क्षुल्लक कारणासाठी इथपर्यंत यायची कांही जरुर होती कां?

''आजपर्यंत मी असं कुठे पाहिलं नाही किंवा ऐकलं नाही. कांहीही होवो, या दोघांनी





निमूटपणें माझ्याजवळच राहिलं पाहिजे. जर ही दोघे मला सोडून गेली तर मी विहीरींत उडी मारुन जीव देईन.''

महाराजांनी तावडतोब दोन शिपायांना बोलावून सांगितलं, ''या म्हातारीला तुम्ही दोरीने नीट बांधा. नगराच्या बाहेर जे स्मशान आहे, तिथल्या विहिरींत हिला फेकून द्या. तिच्या तोंडात बोळा कोंबा, म्हणजे ती ओरडणार नाहीं, आणि कांहीही वेडंवाकडं बोलणार नाही.''

महाराजांची ही आज्ञा ऐकून आई व मुलगा दोघेही हबकले. पण म्हातारीने क्षणभरांतच स्वतःला सांवरले. तिला पकडण्यासाठी आलेल्या शिपायांपासून स्वतःला वाचवण्यासाठी ती इकडेतिकडे पळूं लागली व ओरडत बोलूं लागली, ''बाप रे, असलं कसलं मरण रे देवा! हा राजादेखील ढोंगी! हा अगदी निर्दय राजा आहे. मला विहीरीत फेंकायची आज्ञा देतोय! हा तर मला मरण्याचीच शिक्षा देतोय!''

शिपायांनी म्हातारीला सहजरित्या पकडलं, तिचे हात पाठीमागे घेऊन दोरीने नीट बांधले. तेव्हां महाराजांनी म्हातारीला जवळ येण्यास फर्मावले. जेव्हां तिला महाराजांच्यासमोर आणले गेले, तेव्हां महाराज तिला म्हणाले, ''अग कजाग म्हातारे, तूं तर सारख्या धमक्या देत होतीस की, विहिरीत उडी टाकून जीव देईन म्हणून! जर मी तुला विहीरीत फेकायला सांगितले, तर त्यांत काय चुकलं? तूं मला ढोंगी राजा म्हणाली आहेस. या अपराधाबद्दल मी तुला विहीरींत फेंकणार नाही. सुसरी-मगरी असलेल्या तलावांतच तुला टाकायला सांगीन.'' असं म्हणून राजाने शिपायांना आज्ञा दिली की म्हातारीला मगरी-सुसरी असलेल्या तलावांतच फेंकावे!

म्हातारी रडूं-भेकूं लागली आणि म्हणाली, ''महाराज, मला क्षमा करा. माझी फार मोठी चूक झाली. मला मारुं नका. मी पुन्हां कधीही विहिरींत उडी मारुन आत्महत्त्या करण्याची धमकी देणार नाही, माझ्या सुनेला पुन्हां कधी मारणार नाही. माझ्यावर विश्वास ठेवा महाराज!''

महाराज गंभीर स्वरांत म्हणाले, ''तुझ्या-सारख्या लोकांवर विश्वास ठेवता येत नाही. मी तुला इतक्या सहजासहजीं सोडणार नाही.''



नंतर त्यांनी तिला तुरुंगातल्या कोठडींत बंद करुन ठेवण्याची आज्ञा शिपायांना दिली. तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना सांगितलं की तिला रोज एकवेळचं जेवण द्यावं आणि दररोज चार वेळां चाबकाचे फटकारे मारावेत. आणि जर तिने विहीरीचं नांव काढलं तर तिला सुसरी-मगरींच्या तलावांत फेकून द्यावं.

हातपाय बांधलेले होते म्हणून धडपडणाऱ्या म्हातारीला शिपाई जबरदस्तीने तिथून घेऊन गेले. आईचे हे धिंडवडे झालेले पाहून मुलाचे डोळे पाणावले. तो म्हणाला, ''महाराज, माझ्या आईला खरोखरच आपण सुसरीमगरींच्या तलावात फेंकणार आहात?''

महाराज हंसून म्हणाले, ''नाही! मरण्याची धमकी देणाऱ्यांना हा एक वठणीवर आणण्याचा उपाय आहे. माझ्या शिपायांना देखील हे गुपित ठाऊक आहे. दोन दिवस तुरुंगात एकटी राहिली की तुझ्या आईची बुद्धी ठिकाणावर येईल. तोपर्यंत हे दोन दिवस तूं धर्मशाळेंत राहा आणि नंतर तुझ्या आईला तुझ्या बरोबर घरीं घेऊन जा. पुन्हां कधीं जर म्हातारी कांहीतरी मूर्खासारखं बोलायला लागली, तर तिची पर्वा करुं नकोस असं तुझ्या पत्नीला सांग! आता तूं जाऊं शकतोस.''

म्हातारीचा मुलगा खूष झाला व महाराजांना वारंवार प्रणाम करत तिथून बाहेर गेला.

यानंतर महाराजांनी वीरला तिथें बोलावलं आणि हळुवारपणें त्याला विचारलं, ''एव्हांना तुझा राग शांत झाला असेल. आता नीटपणें



विचार करुन बोल. चंद्रच्या कुटुंबातली काटकसर पाहून, त्यांचे कौतुक कधी केले होतेस का? तुझ्या घरांतली आळशी माणसे पाहून तुला स्वतःचीच चीड कधी आली नाही? मनांतल्या मनांत या बाबतींत कधी तूं कष्टी झाला नाहीस?''

महाराजांच्या हळुवार बोलण्यांतच किती अचूक निदान केलेले आहे आणि त्याला किती धार आहे हे वीरच्या लक्षांत आले. तो बोलायला भीत होता पण उत्तर तर द्यायला हवंच होतं. तो म्हणाला, ''महाराज, एकदाच नव्हे, तर शंभर वेळां मी स्वतःलाच दोष देत बसलो आहे. माझे मुलगे व पत्नी यांनाही मी खूप रागावलो. तरी देखील...'' त्याला पुढें भितीने बोलता येईना.



''तरी देखील - याचा अर्थ असा झाला की तुला तुझी चूक समजली आहे. तूं त्यांच्या दोषारोपांचा स्वीकार करीत आहेस आणि त्यांच्याशी सलोखा करण्याचा हेका धरतो आहेस. होय ना?

''चंद्र आपले वचन पाळूं इच्छित नाही. पण त्याच्यामागें केवळ पैसा हे कारण नसून तुझा बेजबाबदारपणा आहे, हे खरं आहे ना?'' महाराजांनी विचारले.

वीरच्या डोळ्यांत अश्रू आवरेनात. तो म्हणाला, ''महाराज, आपण अगदी बरोबर सांगत आहात. या सर्वांचे मूळ माझी आळशी बायको आहे. मी तिला कांही माझ्या काबूंत ठेवूं शकत नाही.''

महाराजांनी त्याला रागावून म्हटले, ''वीर, सारी चुकी तुझ्या बायकोचीच आहे असं म्हणूं नकोस. तुझ्यांत जरा जरी अक्कल असती तरी तूं इतका तिच्या कह्यांत गेला नसतास. तूं तिला तुझ्या बाजूने वळवून घ्यायला हवं होतंस. झालं ते झालं! मी तुला आठवड्याची मुदत देतो. ठीक सातव्या दिवशीं तूं, तुझी पत्नी आणि मुलगे यांना माझ्याकडे घेऊन ये.

''इथले अध्यापक, कलाकौशल्य शिकवणारे शिक्षक, तुझ्या मुलांची चांचणी घेतील. त्यांची आवडनिवड जाणून घेतील आणि त्याप्रमाणें त्यांना सुधारतील. त्यांचे जीवन सुरळीत होईल. त्याची सारी जिम्मेदारी आमच्यावर राहील. पण हो, त्याच्यासाठी तुझ्या शेतीच्या पिकांचा अर्धा हिस्सा ग्रामाधिकाऱ्याकडे तुला पाठवला पाहिजे. तूं म्हणशील की माझ्याकडे जमीनच नाही राहिली तर मी कुठून देणार उत्पन्नाचा हिस्सा? ग्रामाधिकाऱ्याला सांगून तुला एक एकर सुपीक जमीन दिली जाईल. त्या शेतांत तूं आणि तुझी पत्नी मिळून काम करायचे आणि त्या शेतांत आणखी पीक मिळवायचे. अर्धे पीक तुझे आणि अर्धे सरकारचे!'' महाराजांनी सांगितले.

नंतर चंद्रकडे पाहून महाराज म्हणाले, ''चंद्र, जर तुला तुझ्या मुलीचा विवाह तुझ्या इच्छेनुसार करायचा असेल तर ठीक आहे. पण एक गोष्ट लक्षांत ठेव. कांहीही असो, वीर तुझा परम मित्र आहे. जर त्याचं आयुष्य योग्य मार्गाने चालत नसेल, तर त्याला सुधारणें, त्याला मदत करणें हे एक मित्र या नात्याने तुझे कर्तव्य ठरते. एक चांगला नागरिक म्हणून तुझा हा धर्म आहे.



हा धर्म जर कायावाचामनाने तूं पाळलास तर वीरचे जीवन निश्चित सुधारेल. तुमचे दोघांचे संबंध भविष्यकाळांत सुधारतील. दिलेले वचन न पाळणें हे माझ्या दृष्टीने चुकीचे आहे. चूक ही नेहमी चूकच असते. तुझी चूक सुधारणें हे तुझ्या हातांत आहे. माझी अशी इच्छा आहे की भावनेच्या आहारीं न जाता तूं नीट व्यवहारीपणाने वागावेस.''

महाराजांच्या या न्यायनिवाड्यावर चंद्रने हात जोडून म्हटले, ''आपण जसं सांगितलंत तसंच मी करीन. आम्ही वीरला हीन, तुच्छ व नालायक समजत होतो. तो कोणत्याही कामाला योग्य नाही. असे आम्हाला वाटत होते. पण ही आमची चूक आहे. यापुढें त्याला आपला मानून आम्ही त्याला सुधारण्याचा प्रयत्न करुं. मी आपल्याला तसें वचन देतो.''

वीरनेही महाराजांना हात जोडून प्रणाम केला. नंतर दोघेही तिथून निघून गेले.

महाराजांनी त्यानंतर एकटाच बसलेल्या रत्नगुप्ताला बोलावणें पाठवले. तेव्हां महाराजांच्याजवळ बसलेल्या भीमदेशच्या युवराज कुमारकेतूने पाहिलं की रत्नगुप्तचा चेहरा निस्तेज झाला आहे आणि तो फार दीनवाणा दिसतो आहे.

तेव्हां महाराजांनी रत्नगुप्तास म्हटले, ''आपल्या मुलाच्याबाबतीत तुम्ही बरेच काळजीत दिसता आहात. यांत इतकं काळजी करण्यासारखं कांहीही नाही. या मणिकर्णाचे वडीलदेखील तुमच्यासारखेच आपल्या मुलाच्या भविष्याबद्दल चिंता करीत असतील.'' मणिकर्णाकडे वळून महाराज म्हणाले, ''मणिकर्ण, रत्नगुप्त तुझ्या वडिलांसारखे आहेत. त्यांना तुझ्याबरोबर घरीं घेऊन जा आणि उद्यां तूं एकटाच इथें ये.''

महाराजांनी कांही निर्णय न घेता त्यांना घरीं पाठवले हे मणिकर्णाला आवडले नाही. तो फारच निराश झाला. तरीदेखील त्याला आशा होती की दुसऱ्या दिवशीं महाराज त्याच्याच बाजूने निकाल देतील व योग्य न्याय करतील. त्याने व रत्नगुप्ताने महाराजांना आदराने प्रणाम केला आणि दोघेही तिथून निघून गेले.

(क्रमशः)



## ९. आपले भाग्य बदलणाऱ्या मुलांची कथा



"आजोबा, आपल्या उत्सव, सण आणि रिती रिवाजांबद्दल आम्ही किती दुर्लक्ष करतो? तुम्हीच विचार करा आम्हाला त्याविषयी किती थोडी माहिती असते!" चमेलीने म्हटले.

"खरं पाहिलं तर आपले उत्सव, सणवार आणि रितीरिवाजांच्यामागें अनेक महत्वाच्या घटना नोंदवलेल्या आहेत. अनेक उपयोगी गोष्टींचे महत्व त्यामागें दडलेले आहे. पण शेंकडो वर्षे ज्या कथा या उत्सवांमागे गुंफलेल्या आहेत त्यांच्याकडे आपण लक्ष दिले पाहिजे."

"या गोष्टी कशा तयार होतात आणि पुढें 'चालूं राहातात ते सांगा आजोबा," संदीपने विचारले. "याची अनेक कारणें आहेत. पण त्यांतलं प्रमुख कारण आहे अज्ञान! जर कधीं एखाद्या व्यक्तीला एखाद्या घटनेची माहिती नसली, तर दुसऱ्याला वाटतं की त्याला ती सविस्तर माहिती सांगावी. तुम्ही भिंतीवर लावलेलं ते चित्र पाहिलेलं असेल, बरीच ओंगळ चित्रें चितारलेली आहेत त्याविषयावर! शिवभगवानाकडे एकजण फांस फेंकत आहे आणि शिवजीचे त्रिशूळ त्यांना दूर पळवत आहे."

"आजोबा, ही तर टेलीपथी आहे असं वाटतं! मला कितीतरी वेळा तुम्हाला विचारायचं होतं. त्या चित्रांत शिवाच्या पाठीमागे जो एक लहान सुंदर बालक दोन्ही हात जोडून उभा आहे, त्याचा अर्थ काय?"

"त्या चित्रांतल्या बालकाच्या ती मागे निश्चितच एखादी गोष्ट असेल. आजोबा, तुम्ही आम्हाला ती गोष्ट सांगणार नाही कां? ती सांगितलीत तर आमचा फायदाच होईल की!" चमेलीने गोष्ट सांगण्यासाठीं आजोबांना विनंती केली.

विश्वावसु



"चमेली, मला ती गोष्ट तुम्हाला सांगावीच लागेल. कारण जे चित्र तुम्ही पाहिले आहे त्यामागची गोष्ट तुम्हाला माहीत असली पाहिजे." प्रो. देवनाथांनी म्हटले व कथा सांगण्यास सुरवात केली.

"फार वर्षांपूर्वी मृकण्डा नांवाचे एक ऋषी राहात होते. त्यांना मूलबाळ नव्हते. त्याकारणाने त्यांनी खूप वर्षे शिवाची पूजा केली व तपस्या केली. त्यांच्या भाग्यांत निपुत्रिक होणेच लिहीलेले होते. त्यामुळें त्यांची प्रार्थना व तपस्या फळाला येईना. शेवटी त्यांनी देवाला नवस केला व पुन्हां मनःपूर्वक तपस्या केली. भगवान शिव एक दिवस प्रगट होऊन म्हणाले, "तुला कसा पुत्र हवा? शतायुषी होणारा मूर्ख पुत्र हवा की बारा वर्षापर्यंतच जगणारा विद्वान व सज्जन पुत्र हवा?"

सर्वज्ञानी ऋषी मृकण्डांनी दुसऱ्या प्रकारचा पुत्र मिळावा असे सांगितले.

कांही दिवसानंतर त्यांच्या घरांत पुत्रजन्म झाला. बाळाचे नांव त्यांनी 'मार्कण्डेय' ठेवले. पांच वर्षे वयांतच मार्कण्डेय आपली विद्वत्ता व काम करण्याची क्षमता याचा परिचय इतरांना दाखवूं लागला. दूरदूरचे साधुसंत या बाळाला भेटण्यासाठीं येऊं लागले. त्याला भेटल्यानंतर ते आश्चर्यचकित होत असत आणि जाताना अतिशय अस्वस्थ होऊन जात! मार्कण्डेय मात्र केवळ आपली बुद्धिमत्ता व ज्ञानानेच नव्हे, तर आपले व्यावहारिक आचरण आणि तीव्र ग्रहणशक्ती याने सर्वांना प्रभावित करत असे.

जेव्हां तो आठ वर्षांचा झाला, तेव्हां तो वेदांचा अर्थ लोकांना अगदी सहजपणें समजावून सांगू लागला. त्याच्या आईवडिलांना आपल्या मुलाच्या या विद्वत्तेचा अतिशय आनंद व अभिमान वाटत होता. साहजिकच आहे ते! पण जेव्हां तो दहा वर्षांचा झाला, तेव्हां त्याच्या मातापित्याच्या चेहऱ्यावर उदासपणा दिसूं लागला. त्यांना माहीत होतं की दोन वर्षांनंतर हे अद्‌भुत ज्ञानी बालक जिवंत राहाणार नाही. ह्या विचारांनी त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहायला लागत. सुरवातीला कुणाला कळूं नये म्हणून ती दोघंजण एकांतात रडत असत. पण

जेव्हां मार्कण्डेयाच्या आयुष्याचे थोडेच महिने शिल्लक राहिले, तेव्हां त्यांचे दुःख अनावर होई. रडतरडत ते आपल्या नशिबाला बोल लावीत. एक दिवस मार्कण्डेयाने त्यांना विचारले, ''पिताश्री! एक संत असूनदेखील आपण कोणत्या दुःखामुळें इतके उदास आहात? तुमच्या डोळ्यांतले पाणी खळत नाही. माझी माता तर शांत व सहनशील स्वभावाची आहे. एखाद्या सामान्य अबलेप्रमाणे तीही सारखी आजकाल रडते. आपल्या दैवाला दोष देते. हे सगळं काय आहे? कृपा करुन आपण मलाही खरी वस्तुस्थिती सांगा. मी आपलं दुःख समाप्त करीन.'' मार्कण्डेय म्हणाला.



अतिशय दुःखी स्वरांत मृकन्डा ऋषी आपल्या मुलाला म्हणाले, ''हे पुत्रा! तूं आमचं दुःख निवारण करुं शकणार नाहीस. मला तुला सांगताना अतिशय वाईट वाटतं की आमच्या दुःखाचं कारण तूंच आहेस.'' मार्कण्डेय आश्चर्यचकित होऊन म्हणाला, ''काय? मी इतका हीन दर्जाचा, अयोग्य पापी आहे कां? की माझ्या श्रेष्ठ आईवडिलांच्या अपार दुःखाला मी कारणीभूत व्हावं?''

''पुत्रा, खरं कारण दुसरंच आहे. तूं इतका चांगला, सज्जन आणि आज्ञाधारक पुत्र आहेस की तुझ्याशिवाय जगणें आम्हाला अशक्य आहे'' असं म्हणून मृकण्डा ऋषींनी मार्कण्डेयाला त्याच्या जन्माची पूर्ण कथा सांगितली.

मार्कण्डेय बराच वेळ गप्प राहिला. नंतर आई व वडिलांच्याबद्दल आदर व प्रेम व्यक्त करुन तो निश्चयी स्वरांत म्हणाला, ''आपण दोघे काळजी करुं नका. हा विषय माझ्यावर सोंपवा. माझे भाग्य मला स्वतःला पाहाण्याची संधी मला द्या.''

मार्कण्डेयाने एक शांत जागा शोधली व तिथें बसून त्याने समाधि लावली. लवकरच तो ध्यानांत मग्न झाला. तिथें प्रार्थनेला बसण्यापूर्वी त्याने आपल्या मित्रांना आणि आईवडिलांना सांगितले होते की त्याच्या प्रार्थनेत कुणीही अडथळा आणूं नये. उंचउंच पहाड व बर्फाच्छादित शिखरें असलेल्या भागांत राहाणाऱ्या शिव भगवानाचे ध्यान व तपस्या करण्यांत मार्कण्डेय मग्न झाला. एक दिवस असा आला की मार्कण्डेय



असा वेगळा राहिला नाही. तो शिवाच्या अंशात विलीन झाला. (इथें शिव म्हणजे शुद्ध व अमर असा अर्थ समजायला हवा). असं झाल्यानंतर, मार्कण्डेयाने समय, जन्म व मृत्यूला आपल्या ताब्यांत घेतले.

भगवान शिवाच्या वरदानाप्रमाणें जेव्हां मार्कण्डेय बारा वर्षे वयाचा झाला तेव्हां नियमानुसार मानवशरीरांतून आत्मा वेगळा करणारी शक्ती (यमपाश) मार्कण्डेयाजवळ आली. परंतु मार्कंडेय त्या शक्तीला दिसला नाही. कारण तो आपल्या शुद्ध आचरणाने व तपश्चर्येने शिवरूप झालेला होता.

त्यामुळें ती शक्ती (यमाची) अयशस्वी झाली व परत गेली.

ह्या वेळेच्या मृत्यूची घटना टळली तेव्हां मार्कंडेय आता नव्या व्यक्तीप्रमाणें नव्या जीवनांत प्रवेश करता झाला. हळूंहळूं त्या घोर तपस्येतून व ध्यानरूपी निद्रेतून तो बाहेर आला आणि त्याने आकाशाकडे पाहिले. तिथें त्याला सात महाऋषी आकाशमार्गाने जाताना दिसले.

मार्कंडेयाने त्या सर्वांना वंदन केले. त्या सर्वांनी त्याला 'दीर्घायुषी होशील' असा आशिर्वाद दिला. अशा प्रकारें मार्कंडेयाला दीर्घ आयुष्य प्राप्त झाले.

ही पौराणिक कथा ऐकताना संदीप व चमेली त्यांत इतके गुंगले की त्यांना तिथून उठावेसे वाटेना. पण त्या वेळेस आजोबांचे मित्र येणार होते म्हणून आजोबांना गोष्ट संपवावी लागली. ते म्हणाले, ''बाळांनो, ज्या चित्राबद्दल आपण बोलत होतो, त्याचा खरा अर्थ काय आहे ते तुम्हाला आता कळलं असेल. ''शिवो अहम्'' या शब्दांनी मृत्यूवर विजय प्राप्त करण्याची ही क्रिया पूर्णपणे समजत नाही. म्हणून पौराणिक सत्यकथा जिवंत ठेवण्यासाठी तिचे एका नाटकांत रुपांतर करणें आवश्यक होते. रूढ नियमांप्रमाणें यमराज आणि दयामय भगवान शिव यांच्यात भांडण झाले. शेवटी सत्याचा विजय झाला आणि हे प्रमाण ठरले गेले.'' ''आता आम्हाला समजलं कीं गोष्टी ऐकणें हा शिकण्याचा एक मार्ग आहे.'' मुलें खुषीत येऊन म्हणाली!

